# हिंदुस्थानच्या इतिहासाचें अंतरंगदर्शन

अर्थात्

## हिंदुस्थानचा

# साधनरूप इतिहास



[ वेदपूर्वकालांतील वस्तूपासून कॉमनवेल्थमध्यें राहण्याच्या नेहरू घोषणेपर्यंत साडेचार हजार वर्षांच्या कालांतील दोनशेंवर इतिहासाच्या साधनांचें सटीक व सुबोध संपादन ]

---

संपादक
प्रा. शं. दा. चितळे
प्रा. रा. वि. ओतुरकर

सभासद
भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणें.

---

**अनाथ विद्यार्थी गृह प्रकाशन**

६२४, सदाशिव, पुणें २.

प्रकाशक
**वि. गं. केतकर**
अ. वि. गृह प्रकाशन
६२४ सदाशिव, पुणें २.

शके १८७१ किंमत रु. ५ इ. स. १९४९
भा. इ. सं. मंडळाचे सभासदास रु. ४।

मुद्रक
**वि. गं. केतकर**
लोकसंग्रह छापखाना
६२४ सदाशिव, पुणें २.

मराठ्यांच्या इतिहासाच्या अभ्यासास
आयुष्य वाहिलेल्या परमपूज्य रियासतकार



श्री. गोविंद सखाराम सरदेसाई
यांस सादर समर्पण

—संपादक

# तीन अमृततुल्य तत्त्वें*

त्रीणि अमृतपदानि स्वनुष्ठितानि नयंति स्वर्गम्
--दमस्त्यागो अप्रमादश्च ।

**अर्थ : तीन अमृततुल्य तत्त्वें चांगल्या प्रकारें स्वतः आचरलीं तर तीं माणसास स्वर्गास पोहोंचवितात. (१) इंद्रियदमन, (२) त्याग, अर्थात् दान व (३) अप्रमाद, अर्थात् सद्वर्तन.**

वरील वचन हेलिओडोरसचें आहे. हेलिओडोरस हा ग्रीक (यवन) गृहस्थ इ. स. पू. १५५ चे सुमारास शुंग घराण्यांतील विदिशेचा राजा काशीपुत्र भागभद्र याजकडे तक्षशिलेचा राजा डेमिट्रियस याजकडून वकील म्हणून आला असतां, त्याचे पदरीं कैक वर्षें राहिला. येथें त्यास वैष्णवधर्माची आवड उत्पन्न होऊन त्याची दीक्षा त्यानें घेतली आणि या धर्मपरिवर्तनाची खूण म्हणून त्यानें भिलसा येथें स्तंभ उभारून त्यावर वरील वचन कोरविलें. भिलसा हें भोपाळचे उत्तरेस ३०।३५ मैलांवर हल्लीं रेल्वेस्टेशन आहे. भिलसा म्हणजेच प्राचीन विदिशा होय.

* रियासतकार श्री. नानासाहेब सरदेसाई यांना 'अर्पण पत्रिके'-बद्दल अनुमतिदाखल विचारलें असतां 'माझ्या परवानगीची जरूर मला वाटत नाहीं. आपल्यावर निर्बंध घालण्याचा मला अधिकार काय? मला विचाराल तर आपण हें पुस्तक मला अर्पण करूं नये... तथापि आपणां उभयतांस योग्य दिसेल तें करावें' असें उत्तर लिहिलें. त्यांतच अनुषंगानें वरील सुंदर उतारा माहितीदाखल दिला. हा रियासतकारांचा प्रसाद आम्ही प्रेमानें स्वीकारून तो अभ्यासकांस नजर करतों.

--संपादक

# प्रकाशकाचें निवेदन

प्रा. शं. दा. चितळे व प्रा. रा. वि. ओतुरकर या इतिहासाच्या अभ्यासकांनीं 'हिंदुस्थानचा साधनरूप इतिहास' हा परिश्रमपूर्वक तयार केलेला ग्रंथ पुणें अ. वि. गृह संस्थेतर्फे प्रकाशित करण्यास आम्हांस आनंद होत आहे. कारण अशा साधनग्रंथांच्या वाचनानें मूलग्राही इतिहासाच्या अभ्यासाची आवड वाचकांच्या मनांत उत्पन्न होते. मराठ्यांच्या इतिहासावरील असे कांहीं साधनग्रंथ मराठींत आहेत. प्रा. रा. वि. ओतुरकर व कै. द. वि. आपटे यांनीं संपादिलेला व आम्हीं प्रकाशित केलेला 'महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास' हा ग्रंथ अशाच प्रकारचा आहे. परंतु समग्र हिंदुस्थानच्या इतिहासावरील साधनांचा संग्रह उपलब्ध नव्हता. त्याचा आरंभ या 'साधनरूप इतिहासा'नें होत आहे ही आनंदाची गोष्ट होय.

संपादकद्वयांनीं मराठी, संस्कृत, इंग्रजी आदि भाषांतील ग्रंथांचें परिशीलन करून शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या आणि सामान्य वाचकांच्या आटोक्यांत आणण्यासाठीं त्यांतील उताऱ्यांची निवड केली व परकीय भाषांतील उताऱ्यांचा मराठींत अनुवाद केला. मूळ ग्रंथ व ग्रंथकार यांचा परिचय, उताऱ्यांतील शब्दार्थ, प्रश्न इ. माहिती

उताऱ्यांबरोबर त्यांनीं दिली असल्यानें या ग्रंथाची शैक्षणिक उपयुक्तता वाढली आहे.

इतिहासाच्या क्रमिक पुस्तकांप्रमाणें प्रस्तुत ग्रंथहि ऐतिहासिक पुरवणी वाचन म्हणून ट्रेनिंग कॉलेज व हायस्कूलचे वरचे वर्ग यांत उपयोगी पडण्यासारखा आहे. एकाद्या विद्यालयानें प्रत्येक भाग—प्राचीन, मुसलमान, मराठा, ब्रिटिश अंमल यांतील उताऱ्यांचे सुटे भाग—बांधून मागितल्यास तसें निराळे भाग बांधून देण्याची योजना आम्हीं केली आहे.

अनंत चतुर्दशी श. १८७१
ता. ६–९–४९

वि. गं. केतकर
कार्याध्यक्ष अ० वि० गृह, पुणें

# प्रस्तावना

हिंदुस्थानच्या प्रदीर्घ म्हणजे प्राचीन कालापासून आतांपर्यंतच्या इतिहासाच्या साधनांचा कांहींसा परिचय मराठींतून करून देणारें हें पहिलेंच पुस्तक आहे. इतिहासाचे सामान्य वाचक कधीं कधीं युवानच्वांग, कल्हण, एपिग्राफिका इंडिका, बराणी, बर्नियर, मनूची, फेरिस्ता, जेधे-शकावली, सभासद बखर, काव्येतिहाससंग्रह, कीथ, रॅम्से म्यूर, इल्बर्ट असल्या अपरिचित व्यक्ती व ग्रंथनामें वाचतात व नंतर बहुधा विसरून जातात. अशांपैकीं कांहीं निवडक व्यक्तींचा व साधनांचा परिचय करून देणें हा या पुस्तकाचा उद्देश आहे. माजघरांत काढून ठेवलेल्या साहित्याचें स्वयंपाक घरांत रुचकर असें मिष्टान्न तयार होतें, तसा साधन ग्रंथांतून इतिहास तयार होतो. पदार्थ निवडून, पाखडून, दळून, कांडून, धुऊन घ्यावे लागतात तेव्हां पाकपदार्थांस रुचि येते हें खरें. पण उपलब्ध वस्तूंच्या अंगभूत गुणांवरच सुगरिणीची सारी करामत अवलंबून असते. तसें इतिहास लेखनांत मूळ साधनांच्या आधारावरच इतिहासाचा आराखडा तयार करतां येतो.

याचा अर्थ असा नाहीं कीं, अस्सल साधनांच्या अल्प आधारावर प्रतिभासंपन्न लेखकास इतिहासाचें दिव्य दर्शन दाखवितां येणारच नाहीं.

**कवि देवांचे रूपकर्ते ।**
**कवि ऋषींचें महत्त्व वर्णिते ।**

असें समर्थांनीं कवींसंबंधीं म्हटलें आहे तें प्रतिभासंपन्न इतिहासकारासंबंधींहि खरें आहे. रानड्यांचे ' राईज ऑफ दि मराठा पॉवर ' वाचणारास किंवा राजवाड्यांची 'पानिपत खंडाची' प्रस्तावना वाचणारास तरी हा संशय उरणार नाहीं. किंबहुना अर्धशतकापूर्वीं रानडे, राजवाडे प्रभृतींनीं

साधनें दुर्मिळ असतांनाहि दिव्यदृष्टीनें जें पाहिलें व मराठ्यांच्या इतिहासाचा आराखंडा मांडला त्यांतच रंग भरण्याचें काम त्यांचे लहान मोठे अनुचर आपापल्या कुंचल्यांनीं पुढील पिढींत करीत आहेत. आतां साधनें उपलब्ध होत असल्यानें त्यांचा उपयोग करून रानडे–राजवाडे यांच्याहि-पेक्षां उंचीवर गरुड-झेप घेऊन उड्डाण करणारा व तेथून आपल्या प्रतिभेचे विशाल पंख पसरणारा असा इतिहासकार स्वातंत्र्यकालांत महाराष्ट्रास पुढेंमागें लाभेलहि. सांगण्याचा मुद्दा एवढाच कीं, ऐतिहासिक विपुल साधनें व उच्च कल्पनाशक्ति या दोहोंच्या बळावरच खरोखर उत्कृष्ट इतिहासलेखन होऊं शकेल. इतिहासाच्या अध्ययनास साधनें परीक्षून नेमकें विधान करण्याची विचक्षणा व ऐतिहासिक बनावाचा साकल्यानें अभ्यास करून समाजपुरुषाच्या प्रकृतीचें निदान करण्याचें सामर्थ्य हीं दोन्हीहि अत्यावश्यक आहेत. पहिलें काम शास्त्रदृष्टीचें आहे व दुसरें दिव्य प्रतिभा-शक्तीचें आहे. प्रस्तुत पुस्तकानें सामान्य वाचकांचा व विद्यार्थींचा शास्त्र-दृष्टीशीं थोडा परिचय होईल असा भरंवसा वाटतो.

शाळांतून इतिहास शिकवितांना मूळ ऐतिहासिक साधनांचा कसा उपयोग होतो यासंबंधींचें विवेचन श्री. चितळे यांनीं अन्यत्र* केलें असल्यानें त्याची येथें द्विरुक्ति नको. परंतु या पद्धतीस उपयुक्त अशा ( Source-books ) साधन–पुस्तकाची उणीव त्यांच्या लक्षांत आल्यानें तेव्हांपासून (१९४१) ती कांहींशी दूर करण्यासाठीं प्रस्तुतसारखे उतारे संग्रहित करण्याचें व वर्गांत त्या आधारें शिकविण्याचें काम त्यांनीं सुरू केलें. यासंबंधीं एकाच विषयाचे अभ्यासक आणि स्नेहसंबंधी म्हणून श्री. ओतुरकरांची व त्यांची चर्चा होत असे. श्री. ओतुरकरांनींहि मराठ्यांचें साम्राज्य, मुसल-मानांचें साम्राज्य या पुस्तकांतून असे उतारे देण्याचा यत्न यापूर्वींच केला आहे; पण तेवढ्यानें विद्यार्थ्यांच्या वा वाचकांच्या मनांत साधनांचें महत्त्व ठसत नाहीं व साधनतंत्राशीं त्यांचा परिचय होत नाहीं. हें लक्षांत घेऊन प्रस्तुत सारखा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें उभयतांनीं ठरविलें तें आज पूर्ण होत आहे.

शिक्षणाचें साधन म्हणूनच केवळ नव्हे तर इतिहासाचें यथार्थ आकलनहि मूळ साधनांच्या अभावीं होऊं शकणार नाहीं हें लक्षांत

---

* इतिहास कसा शिकवावा–प्रकरण ६, पृ. ४२–५२

ठेवलें पाहिजे. ऐतिहासिक घडामोडींचे गुणदोष विवेचनात्मक किंवा विकास विवेचनात्मक वर्णन इतिहासकारानें कितीहि विस्तारानें केलें तरी समकालीन साधनांच्या अभावीं त्यांत अपूर्णता राहील. कार्यकारणमीमांसेचें बौद्धिक आकलन होणें हा इतिहासाच्या अभ्यासाचा एक भाग झाला. परंतु ऐतिहासिक घटनेचे संस्कार मनावर उमटण्यास तत्कालीन साधनांच्या द्वारें मनानें भूतकालांत प्रवेश केला पाहिजे. रामायणाचें ऐतिहासिक महत्त्व व तत्कालीन लोकस्थिति यासंबंधीं कितीहि अभ्यासपूर्ण विवेचन केलें तरी ऋषिपत्नी अनुसूया सीतेची वेणी घालीत असतां सीतेनें आपल्या स्वयंवराचें वर्णन अनुसयेस ऐकवलें, नंतर ' अनुसयेनें प्रेमपूर्वक दिलेल्या अलंकारांनीं भूषित झालेल्या सीतेला अवलोकन करून रामाला हर्ष झाला. ' हें आश्रमांतील वर्णन वाचकांच्या मनावर जो ठसा उमटवील तो पृष्ठेंच्या पृष्ठें केलेल्या विद्वत्ता-प्रचुर विवेचनानेंहि उमटणार नाहीं. रडणारें लहान मूल गप्प करण्यास एकादे वेळीं मानसशास्त्रज्ञ असमर्थ ठरेल पण एकाद्या परकऱ्या मुलीला तें सहज साधेल. ऐतिहासिक घटना ही जशी प्रौढपणानें तशी बालमनानें आकलन करणें अवश्य आहे. मराठे व इंग्रज यांच्यामधील लढाईंत मराठे कां हरले याचें समतोल विवेचन ' मराठे व इंग्रज ' या ग्रंथांत सांपडेल. पण प्रस्तुत पुस्तकांतील ' मराठे–इंग्रज सेनापतींची भेट ' हा उतारा वाचणारास त्या मीमांसेंतील मानवी घटना (human aspect) लक्षांत आल्यावाचून राहणार नाहीं. ' मराठे स्वारीवर देखील शकून अपशकून मानीत ' या वाक्यापेक्षां ' लॉर्ड कॉर्नवॉलिसनें मराठ्यांचे सरदारांस विनंति केली कीं, उद्या सकाळीं आपण येथून तळ हालवूं.' त्यावर मराठ्यांनीं उत्तर केलें कीं, ' ही आज्ञा आम्ही आनंदानें मानली असती पण आठ दिवस जेथें मुक्काम केला तेथून नवव्या दिवशीं हलणें हें अशुभ व धर्माचाराच्या विरुद्ध आहे. म्हणून आमचा निरुपाय आहे. त्यांच्या या भ्रामक समजुतीला लॉर्ड कॉर्नवॉलिसनें मान दिला व आपला बेत पुढें ढकलला.' हा उतारा वाचकाच्या मनावर स्पष्ट संस्कार करूं शकतो. पानिपतवर मराठ्यांच्या झालेल्या हालअपेष्टेचें व पळापळीचें यथार्थ वर्णन नाना फडणीसाच्या आत्मचरित्रांतून वाचल्यावर ज्यांचें चित्त हेलावणार नाहीं असा वाचक विरळा.

सारांश, ऐतिहासिक घटनेच्या तार्किक विवेचनाबरोबर त्यांतील मानवी बाजूचें चित्रणहि केल्यानें ऐतिहासिक सत्य पूर्णतेनें समजून येण्यास मदत होते. कारण ' समजणें ' याचा अर्थ नुसतें बौद्धिक आकलनच नव्हे तर मनावर ठसा उमटणें, चित्त हेलावणें, आणि त्या त्या प्रसंगाशीं समरस होणें हेंहि समजणें या शब्दांत येतें. ऐतिहासिक साधनांचा या समरसतेस किती उपयोग आहे हें मूळ उतारे वाचल्यानेंच कळून येणार आहे.

प्रस्तुत पुस्तकांत ऐतिहासिक साधनांचे प्राचीन, मुसलमानी, मराठी, ब्रिटिश अंमलकालीन व स्वतंत्र भारत असे ठोकळ पांच भाग केले आहेत. हीं साधनें नीट वाचणारास त्या साधनांचें व त्यावरून बनणाऱ्या इतिहासाचें प्रकृति-भिन्नत्व लक्षांत येणार आहे. **प्राचीन कालचा इतिहास** समजण्यास साधनाची मोठीच अडचण म्हणून तत्कालीन धर्मग्रंथ, धर्माज्ञा, पुराणें, शिलालेख, दान-पत्रें, क्वचित् प्रवास वृत्तें, नाणीं, वस्तूंचे अवशेष यांवर संतुष्ट रहावें लागतें. हीं साधनें संशोधक वृत्तीनें व जिज्ञासु बुद्धीनें पारखून घेऊन ठिकठिकाणीं अज्ञात दुवे तर्कानें जुळवून व जुळत नसतील तेथें शोध लागत नाहीं अशी कबुली देऊन विस्तृत कालखंडावर मधून मधून उड्या मारीत व जपून प्रवास करावा लागतो. प्राचीन इतिहासाच्या अभ्यासास पुराव्याचें पृथक्करण करण्याची संवय असावी लागते. निव्वळ राजकीय असा संगतवार इतिहास जुळविण्याचा नाद सोडावा लागतो, व मिळेल तसतशा पुराव्यानें अज्ञात दालनावर पडेल तो प्रकाश उपयोगांत आणून एकंदर चित्रपटांत त्यानें झालेला फेरफार स्पष्ट करावा लागतो. पण सामाजिक इतिहास पुष्कळ मिळूं शकतो. प्राचीन काल सोडून **मुसलमानी अंमलाकडे** वळलें कीं, तवा-रीख, तबकत, मलफुझत्, प्रवास वृत्त, जंगनामे, बखरी यांची गर्दी उसळते. येथें पुराव्याच्या अभावावर अडखळण्यापेक्षां पुराव्याचा वारेमापपणा सावधपणानें तपासून घ्यावा लागतो. कारण एक एक लेखक 'क्या कहूं' अशा थाटांत लंब्या चवड्या बाता मारतांना आढळतात, त्या वाचून वाचकानें अगदीं गारीगार होऊन जावें असा प्रकार आहे अशा वेळीं लेखक दरबारीं आहे कीं त्रयस्थ आहे, धर्मवेडा आहे कीं तर्कनिष्ठ आहे, प्रत्यक्ष पाहून लिहितो कीं ऐकीव माहितीवर विधान ठोकून देतो या सर्वांचा विचार जमेस धरावा लागतो. मुसलमानी लेखकांच्या लेखनावर तें बव्हंशीं

'रोमँटिक' असतें असा छाप मारणें अन्यायाचें होणार नाहीं. मुसलमानी कालांतील इतिहास हा घटनाप्रधान असण्यापेक्षां व्यक्तिप्रधान आहे. सर्व इतिहास वाचून अलाउद्दीन, महमद तुघ्लग, बाबर, अकबर, औरंगजेब या व्यक्तिमात्रांच्या स्वभावाचे ठसे वाचकांच्या मनावर उमटतात. मुसलमानी काळांतील ऐतिहासिक घटना म्हणजे या बादशाहांनीं केलेलीं बरीं वाईट कृत्यें असा संस्कार वाचकांच्या मनावर उमटतो. या बखरवज़ा ग्रंथांखेरीज अस्सल मुसलमानीं पत्रें व व्यापारी व्यवहाराचीं साधनें जमा होतील तर मुसलमानी इतिहासाच्या अभ्यासांतील बखरकाल मागें पडून व त्याचा रोमहर्षकपणा (रोमँटिकपणा) कमी होऊन खऱ्या लोक-इतिहासाच्या आकलनास साह्य होईल. तूर्त तरी हिंदुस्थानांतील विद्वान् म्हणविणारे इतिहास लेखकहि मुसलमानी कालखंडाबाबत या उद्योगास लागलेले दिसत नाहींत.

मुसलमानी इतिहासाचा कालखंड सोडून **मराठी कालखंडांतील** उताऱ्यांकडे नजर टाकल्यास तेथें निराळाच प्रकार जाणवतो. प्राचीन कालच्या अभ्यासांत अडणारा तुटकपणा येथें तितक्या प्रमाणांत आढळणार नाहीं. मराठेकालीन घडामोडीचें ढोबळ संगतवार चित्रण तयार होतें, पण तें सर्व बखरीच्या आधारावर होतें. पुराणिकबुवांनीं आपल्या स्मृतीवर भरंवसा ठेवून वर्णन करावें किंवा आजीबाईंनीं गोष्टी सांगाव्या व एखादी मोठी ऐतिहासिक घटना आवाक्यांत घेण्याचा वकूबच असूं नये, सर्व नेमानेम ईश्वरी अवतारावर व योगायोगावर निश्चित असल्याचें ठरवून समाधान मानावें तसा सर्व प्रकार होता. या प्रकारांतून इतिहासाच्या अभ्यासकास झपाट्यानें बाहेर काढून योग्य, तर्कशुद्ध विवेचनाच्या व साधनसंग्रहाच्या व साधनचिकित्सेच्या वळणावर आणून ठेवणाऱ्या रानडे-राजवाड्यांचे मराठी वाचकावरील उपकार शब्दानें वर्णन करण्यासारखे नाहींत. ज्या प्रचंड नेटानें व कर्तृत्वानें मराठ्यांनीं सतराव्या व अठराव्या शतकांत साम्राज्य उभारलें त्या नेटानें व त्याहूनहि अधिक पद्धतशीर रीतीनें इतिहासाच्या अभ्यासाचा प्रचंड व्याप मांडावयाचा असेल तर रानडे-राजवाड्यांनीं त्याची तयारी करून ठेविली आहे. या कारणानें मराठ्यांच्या इतिहासांतील अतिरंजितपणा व वारेमाप वर्णन कमी होऊन वस्तुस्थितीचें त्रोटक व सावध वर्णन

त्यांत येत आहे. पण यामुळें मराठ्यांच्या इतिहासाचा मूळचा सबंध चित्रपट वाचकांच्या डोळ्यांपुढून कांहींसा उधळला गेला आहे. जुना चित्रपट उधळला व नवा तयार करणारा एखादा प्रतिभावान् ट्रेव्हिलियन किंवा टॉयनबी अद्याप पुढें आलेला नाहीं. असा सध्यांचा काल आहे.

उपरोक्त पहिल्या तीन साधनांचे टप्पे सोडून चौथ्या **ब्रिटिश अंमलांतील** इतिहासाच्या साधनांकडे वळल्यावर आपणांस एक नवाच प्रकार दृष्टीस पडतो. इंग्रजांनीं आम्हांस जिंकलें तें शस्त्राच्या श्रेष्ठतेपेक्षां शास्त्राच्या वरचढपणामुळें, हें येथेंहि पहावयास सांपडतें. भरपूर साधनें, शास्त्रशुद्धसंपादन, बिनचूक माहिती, तोलदारविवेचन, निर्भीड मूल्यमापन यांनीं हिंदुस्थानांतील ब्रिटिश अंमलाचा इतिहास गजबजून गेला आहे. काय घ्यावें व किती टाकावें, काय वाचावें व काय न वाचावें याची पंचाईत! शोध घेण्यास अडचण नाहीं, परिशिष्टें, सूचि, संदर्भ ग्रंथ, व्यक्तिवार चरित्रें सर्व कांहीं तयार. एवढें कीं, त्याच्या वाचनानें इंग्रजांनीं आमच्या मनाचा पिंडहि जणूं इंग्रज़ीच असा तयार केला. शिवाय परवा परवापर्यंत इंग्रजांचें श्रेष्ठत्व, सर्वशक्तिमानपणा मनास असा जाणवायचा कीं इंग्रजी इतिहासकारांचें विवेचन अगदीं बिनतोड वाटावें. येऊन जाऊन मराठी अभ्यासकांनीं करावयाचें तें एवढेंच कीं आपले दोष कबूल करण्याचा किंवा तें विवेचकपणें दाखविण्याचा व त्यांतले त्यांत एखाद्या आत्मगुणाची वकिली करण्याचा सोज्ज्वळ प्रांजलपणा दाखवावयाचा. श्री. केळकर कृत 'मराठे व इंग्रज' हें पुस्तक अशा मनोरचनेचें उत्कृष्ट उदाहरण आहे. आम्हांस स्वातंत्र्य मिळालें तेंहि बोगद्यांतून एकदम बाहेर पडून अंगावर उजेड पडावा त्याप्रमाणें झालें. अशा वेळीं इंग्रजी इतिहासकाराच्या विवेचनांचें मूल्यमापन वगैरे व्हावयाचें तें अंमळ हा आकस्मिक संक्रमणकाल संपल्यावरच होईल. खेरीज कित्येक घटनांच्या आपण फारच नजीक असल्यानें त्यांचें निर्विकार मूल्यमापनहि एकंदरीनें तूर्त कठीणच आहे.

'स्वतंत्र भारता'चा तर सध्यां आरंभकाल आहे. त्यांतील कांहीं घटनासंबंधीं उतारे प्रस्तुत पुस्तकांत घेतले आहेत. पण या घटनांचें महत्त्व अर्थातच कालावधीनें ठरणार आहे.

असो, अशा पांच प्रकारच्या इतिहास-साधनांचा या छोटेखानी साधन ग्रंथांत विस्तार केला आहे. यांत हिंदुस्थानच्या इतिहासास साधनीभूत असणाऱ्या निरनिराळ्या १२३ ग्रंथांतून (यादी सोबत) २०४ उतारे घेतले आहेत. त्याची वांटणी पुढीलप्रमाणें—

| काल | ग्रंथसंख्या | उतारे |
|---|---|---|
| प्राचीन काल | ३० | ४२ |
| मुसलमानी अंमल | ३७ | ४७ |
| मराठी अंमल | ३२ | ४९ |
| ब्रिटिश अंमल | २१ | ६२ |
| स्वातंत्र्यकाल | ३ | ४ |

हे उतारे निवडतांना पुढील दृष्टि ठेवली आहे :—

शक्यतों समकालीन ग्रंथ वा लेखकांच्या लिखाणांतून उतारे संग्रहित केले आहेत. असें करतांना राजकीय माहिती देणाऱ्या उताऱ्याप्रमाणें सामाजिक, शैक्षणिक व धार्मिक घटनांची माहिती सांगणारे उतारे मुद्दाम दिले आहेत.

एकाच मुद्यासंबंधीं भिन्न लेखकांचे दृष्टिकोन कसे असतात ते कळावे व त्यांतील सत्य पारखण्यास कसें शिकावें हें ध्यानीं यावें म्हणून शिव-जन्मतिथि, ( उतारा क्रमांक ८ ), किंवा शहाजहानचा वैभवशाली काल ( उतारे ३३, ३४, ३५ ) अथवा 'धर्मजिज्ञासू अकबर' या शीर्षकाखालीं भिन्नमताचे उतारे एकत्रित दिलें आहेत.

दर उताऱ्याच्या प्रारंभीं त्या ग्रंथाचा किंवा ग्रंथाकाराचा परिचय दिला आहे. असें करतांना केव्हां केव्हां मिया मूठभर व दाढी हातभर असा प्रकार झाला आहे. आपल्या विद्यार्थ्यांना, सहकारी शिक्षकांना व वाचकांना या ग्रंथकाराचा परिचय आवश्यक आहे असें वाटून तो येथें दिला आहे. जिज्ञासूंनीं मूळ ग्रंथ पहावे व अधिक उतारे वाचावे हीहि इच्छा आहे.

मूळ उताऱ्याचें भाषांतर करतांना अगदीं शब्दशः भाषांतर कोठें केलें व कोठें करूं लागलों तें अगदीं अवाच्य होऊं लागलें, तेव्हां मूळांतील अर्थ मराठींत आणला. मूळ उतारा कधीं कधीं मूळ ग्रंथांतून तर कधीं कधीं दुय्यम साधन ग्रंथांतून घेतला आहे. पण प्रत्येक ठिकाणीं आम्हीं तो जेथून निवडला

त्या आधाराचा निर्देश करण्याचें सोडलें नाहीं. मिळेल तेथें साधन ग्रंथांतील उतारा मूळ ग्रंथांतून ताडून पाहिला, पण सर्वच ठिकाणीं हें जमलें नाहीं.

पुस्तक शालोपयोगी म्हणून लिहिलें असलें, तरी सामान्य वाचकांस त्यानें हिंदुस्थानच्या इतिहासाचें अंतरंगदर्शन होणार आहे व अभ्यासकास संदर्भ ग्रंथ म्हणून त्याचा उपयोग होईल. तसेंच हिंदुस्थानच्या इतिहासावरील पुस्तकांचा संग्रह करावयाचा झाला तर कोणतीं पुस्तकें पाहिजेत तेंहि कळून येईल.

प्रस्तुतचें पुस्तक तयार करतांना अनेकांचें साहृय झालें. ज्यांचें साहृय वारंवार प्रेमाच्या हक्कानें मागावें व मिळावें असे आमचे अभ्यासक मित्र श्री. शंकरराव जोशी व श्री. ग. ह. खरे, यांच्याखेरीज रियासतकार श्री. गो. स. सरदेसाई, श्री. बाळ गांगल, श्री. गो. अ. गद्रे, उपनिषद् तीर्थ जोग, प्राचार्य दांडेकर यांचे आभार मानणें अवश्य आहे. साधन ग्रंथ मिळविण्यास भा. इ. सं. मंडळ, सर परशुरामभाऊ कॉलेज व हिंदी प्रचार संघ पुणें यांच्या ग्रंथ संग्रहांचा भरपूर उपयोग झाला व तेथील ग्रंथपाल साहाय्यतत्पर राहिले याचा आम्ही आभारपूर्वक निर्देश करतों. प्रस्तुतच्या साधनग्रंथासारखीं आणखी अनेक पुस्तकें तयार व्हावयास पाहिजेत, किंबहुना कालवार तीन चार खंडांतून हें सर्व व्हावें हा विचार पुस्तक तयार करतांना मनांत आला तो तूर्त व्यक्त मात्र करून ही प्रस्तावना संपवितों.

अनंत १४, १८७१<br>
पुणें २, ६-९-४९

**शं. दा. चितळे**<br>
**रा. वि. ओतुरकर**

# साधनग्रंथांची यादी

खालीं ज्या साधन ग्रंथांतून उतारे निवडून घेतले तेवढ्याचीच यादी दिली आहे. ग्रंथविस्तार होऊं नये म्हणून जे वगळले त्यांची याद दिली नाहीं. या यादींत कांहीं आधार दुय्यम प्रतीचे आढळतील. उदा. किणीचें सोर्सबुक ऑफ इंडियन हिस्ट्री. होतां होईतों उतारा मुळांतून पाहिला, पण दर वेळीं हें साधलें नाहीं. कित्येक ठिकाणीं आहे त्या उताऱ्याचाहि संक्षेप करून उतारा द्यावा लागलेला आहे.

## भाग १ ला

## प्राचीन काल

| | | |
|---|---|---|
| १ | चित्राव सिद्धेश्वरशास्त्री | ऋग्वेदाचें मराठी भाषांतर. |
| २ | देशपांडे बी. बी., संपादक | विद्याविस्तर (रुइआ कॉलेज प्रकाशन) |
| ३ | बापट वि. वा. | सुबोध उपनिषद संग्रह. |
| ४ | काशिनाथशास्त्री लेले | वाल्मिकी रामायणाचें भाषांतर |
| ५ | चिं. वि. वैद्य | महाभारताचें मराठी भाषांतर |
| ६ | टिळक बा. गं. | गीतारहस्य |
| ७ | | विष्णुपुराण |
| ८ | कौसल्यायन आनंद | जातक (हिंदी) : प्रथम खंड |
| ९ | दत्त रमेशचंद्र | एन्शन्ट इंडिया |
| १० | कौसल्यायन आनंद | धम्मपदाचें हिंदी भाषांतर |
| ११ | मॅक्रिंडल (संपादक) | इंडिका ऑफ मेगॅस्थेनिस अँड एरियन |
| १२ | | दि इंडियन अँटिक्वेरी व्हॉल्यूम ४ |
| १३ | ज. स. करंदीकर व हिवरगांवकर | चाणक्याच्या अर्थशास्त्राचें मराठी भाषांतर |
| १४ | डॉ. श्री. व्यं. केतकर | प्राचीन महाराष्ट्र |
| १५ | गुर्जर एल्. व्ही. | एन्शंट इंडियन मॅथेमॅटिक्स अँड वेध |
| १६ | सिल्व्हां लेव्ही (संपादक) | कनिष्काच्या मृत्यूची दंतकथा |

१७ शर्मा प्राणजीवन (संपादक) — मनुस्मृति
१८ — इंडियन अॅंटिक्वेरी एस्. बी. व्हॉल्यूम् तिसरा
१९ लेग, जेम्स — फाहैन्स ट्रॅव्हल्स इन् इंडिया
२० — जर्नल ऑफ बिहार अॅंड ओरिसा रिसर्च सोसायटी
२१ प्रतिनिधी बाळासाहेब — अजंठा
२२ — एपिग्राफिका इंडिका भाग १ व ४
२३ बाण — हर्षचरितम्
२४ देव शंकरराव — भगवान बुद्धासाठीं
२५ डिकसळकर डी. बी. — संस्कृत इन्स्क्रिप्शन्स
२६ बापट विष्णुशास्त्री — श्रीमद्‌भगवद्‌गीताभाष्यार्थ
२७ लेले मा. व्यं. — कल्हणकृत 'राजतरंगिणी'चें मराठी भाषांतर
२८ दीक्षित मथुराप्रसाद — चंदकविकृत पृथ्वीराज रासोचा हिंदी अनुवाद
२९ सचौ एडवर्ड — अल्बिरुनीज इंडिया
३० कर्वे चि. ग. (संपादक) — भा. इ. स. मंडळ त्रैमासिक वर्ष २८

## भाग २ रा

## मुसलमानी अंमल

इलियट अॅंड डौसन संपादित ग्रंथ

,, (१) चचनामा
,, (२) अल उत्बीकृत तारीख–इ–यामिनी
,, (३) झकारिया इ–काझविनीचे ग्रंथ
,, (४) तबकत–इ–नासिरी
लेखक–मिन्हाजुस सिराज
,, (५) तारीख इ–फिरोझशाही
लेखक–झिआउद्दीन बर्नी
,, (६) इब्नबतूताचें लेखन
,, (७) फुतुहत–इ–फिरोझशाही
लेखक–फिरोझशाह

,, (८) मल्फुझत्–इ–तैमुरी (तैमूरचें आत्मचरित्र)

,, (९) तारीख–इ–दाऊदी
लेखक–अबदुल्ला

,, (१०) तारीख–इ–इब्राहिम (नौरसनामा लेखक–फिरिस्ता)

,, (११) पंधराव्या शतकांतील हिंदुस्थान प्रकाशक हॅक्ल्यूइट मंडळ अबदुल रझ्झाकचें लेखन

(१२) तारीख-इ राशदी
लेखक-मिर्झा-हैदर

(१३) तारीख-इ-शेरशाही
लेखक–आब्बासखान

(१४) तारीख-इ–अल्फी
लेखक-मौलाना अहमद

,, (१५) तबकत-इ- अकबरी (तारीख-इ-निझामी) लेखक-निझामुद्दीन अहमदबक्षी

,, (१६) तवारीख-इ-बदाउनी (मुनाखबुत तवारीक) लेखक-बदाउनी

,, (१७) लुब-अत-तवारीख
लेखक-रायबहादुरमल

,, (१८) मुन्तखब-उल्-लुबाब (तरीख-इ-खाफीखान) लेखक-खाफीखान

१९ जयचंद्र विद्यालंकार — इतिहास प्रवेश

२० निकोलो-दि-कोंती — प्रवासवृत्त–हॅक्ल्यूइट मंडळाचे इंडिया इन् दि फिफ्टींथ सेंचरी

२१ बाबर — आत्मचरित्र

२२ गुलबदन (बीव्हरिजचें भाषांतर) — आठवणी

| | |
|---|---|
| २३ अबुल फझल | ऐने अकबरी (ब्लॉकमनचें भाषांतर) |
| २४ श्री. म. माटे | आपापले हितगुज |
| २५ राल्फ फिंच (प्रकाशन हॅक्ल्युइटचें प्रिन्सिपल नॅव्हिगेटर) | प्रवासवृत्त |
| २६ अबुलफझल | अकबरनामा |
| २७ लेनपूल | मेडिव्हल इंडिया फ्रॉम् काँटेपोररी सोर्सेस् (उताऱ्यांचा संग्रह) |
| २८ शर्मा एस. आर. | क्रेसंट इन इंडिया |
| २९ रोजर्स अँड बीव्हरीज (भाषांतरकार) | जहांगीरच्या आठवणी |
| ३० सर टॉमस रो | वकिलातीचें वृत्त |
| ३१ विलिमोरिया (अनुवादक) | औरंगजेबाचीं पत्रें |
| ३२ बर्नियर | प्रवासवृत्त |
| ३३ मनूची | स्टोरिआ-ड.–मोगॉर |
| ३४ के | एन्शन्ट इंडियन एज्युकेशन |
| ३५ सय्यद गुलाम हुसेनखान | सियार-उल-मुताखरीन (ब्रिग्जचें भाषांतर) |
| ३६ प्राईस डॉडवेल आणि रंगाचारी (संपादक) | प्रायव्हेट डायरी ऑफ आनंद रंगा पिलै |
| ३७ रियासतकार सरदेसाई (संपादक) | महादजी शिंदे यांचीं कागदपत्रें |

## भाग ३ रा
## मराठी अंमल

| | |
|---|---|
| १ राजवाडे वि. का. (संपादक) | ज्ञानेश्वरी |
| २ | एकनाथी भागवत |
| ३ फादर स्टीफनसन | ख्रिस्तपुराण |

| | |
|---|---|
| ४ सेन, सुरेंद्रनाथ (संपादक) | फॉरिन बायॉग्रफीज ऑफ शिवाजी |
| ५ | तुकाराम गाथा |
| ६ आपटे द. वि. (संपादक) | इतिहास मंजरी |
| ७ ,, | शिवभारत |
| ८ ,, | जेधे शकावली |
| ९ | चिटणीस बखर) |
| १० गौरीशंकर ओझा | शिवजन्म कुंडली |
| ११ | जेधेकरीना |
| १२ सरदेसाई गो. स. (संपादक) | शिवाजी सोव्हेनीर |
| १३ राजवाडे | मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १,५,८ |
| १४ का. ना. साने (संपादक) | सभासद बखर |
| १५ द. ब. पारसनीस (संपादक) | इतिहास संग्रह |
| १६ आबा चांदोरकर (संपादक) | लेखनालंकार |
| १७ रामचंद्रपंत अमात्य (?) | आज्ञापत्र |
| १८ स. म. दिवेकर (संपादक) | शिवचरित्र-प्रदीप |
| १९ शं. ना. जोशी (संपादक) | शिवचरित्रसाहित्य खंड ५ |
| २० शां. वि. अवळसकर | आंग्रेकालीन पत्रव्यवहार |
| २१ गो. स. सरदेसाई (संपादक) | पेशवे दप्तर |
| २२ ग. ह. खरे (संपादक) | हिंगणे दप्तर खं. १ ला |
| २३ का. ना. साने (संपादक) | काव्येतिहाससंग्रह |
| २४ चिं. ग. कर्वे (संपादक) | भारत इतिहास संशोधक मंडळ त्रैमासिक वर्ष २७ |
| २५ वाड व पारसनीस (संपादक) | पहिले माधवरावाची रोजनिशी |
| २६ वा. वा. खरे (संपादक) | ऐतिहासिक लेखसंग्रह |

| | |
|---|---|
| २७ मेजर डायरम | नॅरेटिव्ह ऑफ दि कॅंपेन इन इंडिया....वुइथ टिपु सुलतान |
| २८ स्प्रिंगेल | हिस्टरी ऑफ दि मराठाज |
| २९ डोंगरे (ग्वालेर दरबार, संपादक) | चंद्रचूड दप्तर (निवडक उतारे) |
| ३० सरदेसाई गो. स. | ऐतिहासिक पत्रव्यवहार |
| ३१ ओतुरकर रा. वि. (संपादक) | सासवड दप्तर (अप्रकाशित) |
| ३२ बडोदा राजदप्तरखातें (प्रकाशक) | शास्त्री दप्तरांतील वेचे |


## भाग ४ था
## ब्रिटिश अंमल


| | |
|---|---|
| १ मुकर्जी | इंडियन कॉन्स्टिटयूशनल डॉक्युमेंट्स |
| २ केळकर न. चिं. | मराठे व इंग्रज |
| ३ इल्बर्ट | गव्हर्नमेंट ऑफ इंडिया, सप्लिमेंट |
| ४ किणी के. श्रीनिवास | सोर्सबुक ऑफ इंडियन हिस्ट्री |
| ५ रॉबर्टस् पी. | राइज ऑफ ब्रिटिश पॉवर इन् इंडिया |
| ६ म्यूर रॅम्से | मेकिंग ऑफ ब्रिटिश इंडिया, |
| ७ कीथ ए. बी. | स्पीचेस अॅंड डॉक्युमेंट्स ऑन् इंडियन पॉलिसी भाग १ व २ |
| ८ हचिसन | एम्पायर ऑफ दि नवाब्ज |
| ९ बानर्जी ए. सी. | इंडियन कॉन्स्टिटयूशनल डॉक्युमेंट्स भाग १ व २ |
| १० बोल्ट्स विल्यम् | कन्सिडरेशन ऑफ इडियन अफेअर्स, बेंगाल |

| | |
|---|---|
| ११ सरदेसाई गो. स. (संपादक) | महादजी शिंदे यांची कागदपत्रें |
| १२ सहस्रबुद्धे व दाते (संपादक) | मुद्रण प्रकाश (त्रैमासिक) गझीन |
| १३ एस.एम्.टी.टी. कॉलेज, कोल्हापूर ए ज्युकॅशनल पॅम्फलेटस् | वुडस एज्युकेशन डिसपॅच |
| १४ मुजुमदार जे. के. | इंडियन स्पीचेस अँड डॉक्युमेंटस ऑन ब्रिटिश रूल (इ.स.१८२१-१९१८) |
| १५ का. न. केळकर | शमीपूजन |
| १६ बा. गं. टिळक | केसरींतील लेख, भाग १, २ व ३ |
| १७ डॉ. ना. भि. परुळेकर (संचालक) | सकाळ |
| १८ अरविंद घोष, (संपादक) | वंदेमातरम |
| १९ डॉ. पट्टाभिसीतारामय्या | ए हिस्ट्री ऑफ दि इंडियन नॅशनल कॉंग्रेस |
| २० छबलाणी व जोशी | रीडिंग्ज इन् इंडियन कॉन्स्टिटयूशन अँड अॅडमिनिस्ट्रेशन |
| २१ श्री. म. माटे (संपादक) | रोहिणी |

## भाग ५ वा

## स्वतंत्र भारत

१ कॉन्स्टिटयुअंट असेंब्ली डिबेटस

२ गव्हमेंट ऑफ् इंडिया व्हाईटपेपर ऑन इंडियन स्टेटस्

३ इंडियन इन्फर्मेशन, केंद्रीय सरकारचें मासिक

# कालगणनेची समजूत

मुसलमानी व मराठी विभागांतील पत्रें व उतारे वाचतांना त्यांत काल-निदर्शक येणारे शब्द समजण्यासाठीं त्रोटक माहिती.

## मुसलमानी महिने

| | | |
|---|---|---|
| १ मोहरम | २ सफर | ३ रबिलावल |
| ४ रबिलाखर | ५ जमादिलावल | ६ जमादिलाखर |
| ७ रजब | ८ साबान | ९ रमजान |
| १० सवाल | ११ जिल्काद | १२ जिल्हेज |

मुसलमानी महिन्याच्या तारखांना चंद्र म्हणतात. सुहुर सन पत्रांतून सु॥ असा लिहिला जातो. मुसलमानी सनाचे आकडे शब्दांत लिहीत ते येणेंप्रमाणें

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| इहिदे | = १ | समा | = ८ | सीतैन | = ६० |
| इसने | = २ | तिसा | = ९ | सबैन | = ७० |
| सलास | = ३ | अशर | = १० | समानीन | = ८० |
| आर्बा | = ४ | अशरीन | = २० | तिसैन | = ९० |
| खमस्स | = ५ | सलास्सीन | = ३० | मया | = १०० |
| सीत | = ६ | आर्बैन | = ४० | अलफ | = १०००. |
| सबा | = ७ | खमसैन | = ५० | मयातैन | = २०० |

उदाहरणार्थ, सबा मयातैन व अलफ = ७ + २०० + १००० = १२०० सुहुर सनांत ५९९ किंवा ६०० मिळविल्यानें इसवी सन येतो, म्हणून उपरोक्त वर्ष इ. स. १८०६ किंवा १८०७ असूं शकेल. नुसतें अलफ असें असलेलें पत्र १६००ते१७०० या कालांतील म्हणजे शिवकालीन, मया व अलफ असें असलेलें पत्र १७००ते१८०० या कालांतील म्हणजे पेशवाईंतील व मयातैन व अलफ असें असलेलें १८००-१९०० चें म्हणजे उत्तरपेशवाई किंवा अव्वल इंग्रजींतील साधारणतः समजावें.

---

# हिंदुस्थानचा साधनरूप इतिहास

## अनुक्रमणिका

### भाग १ ला

अनुक्रम प्राचीन काळ १ ते ८२ पृष्ठें

## भाग २ रा

### मुसलमानी अमल ८३ ते १५४

## भाग ३ रा

### मराठी अंमल १५५ ते २५२

## भाग ४ था

### ब्रिटिश अंमल २५३ ते ३०९

## भाग ५ वा

### स्वतंत्र भारत ३५५–३६२

# हिंदुस्थानचा साधनरूप इतिहास

## भाग १ ला

# प्राचीन काल

## १ : : सिंधूची प्रार्थना

[सुमारें चार हजार वर्षांपूर्वीं सप्तसिंधूच्या (पंजाब) प्रांतांत वसाहत करण्यास आलेल्या आर्यांनीं पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश या पंचमहाभूतांची मनोभावें पूजा केली. निसर्गावर मानवी जीवन सर्वस्वीं अवलंबून होतें. तेव्हां निसर्गांतील पंचमहाभूतें हीं तत्कालीन मानवांस देवतारूप वाटल्यास नवल नाहीं. आर्यांनीं त्यांच्या स्तुतिपर स्तोत्रें रचिलीं व गायिलीं. ऋग्वेदांत अशीं अनेक स्तोत्रें आढळतात. ऋग्वेद हें जगांतील अत्यंत प्राचीन वाङमय होय. इतिहासाच्या अध्ययनास याहून जुना ग्रांथिक पुरावा उपलब्ध नाहीं. मोहेंजोदरो संस्कृतीचें ज्ञान आपणांस वस्तूंच्या अवशेषावरून होतें.

पं. **जयचंद्र** विद्यालंकार यांचें असें म्हणणें आहे कीं, महाभारतकालांत कृष्ण द्वैपायन नांवाचे मुनि होऊन गेले. उत्तर प्रदेशांत इतस्ततः विखुरलेल्या ऋषींच्या आश्रमांत ज्या ऋचा म्हटल्या जात त्यांचें त्यांनीं एकीकरण केलें व त्यांची ऋषिवारीनें आणि विषयवारीनें मांडणी केली; हीच रचना आतांपर्यंत चालत आली आहे.

ऋग्वेदाच्या दहाहि मंडलांचें मराठी भाषांतर पुण्याचे विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव व श्री. शं. रा. दाते यांनीं परिश्रमपूर्वक केलें आहे. दहाव्या मंडलांतील सूक्त ७५ व १२१ यांचा अनुवाद पुढें दिला आहे. ऋग्वेदाचें मराठी भाषांतर–मंडल दहावें–पृ. ५० व पृ. ८५ पहा.

पहिल्या उताऱ्यांत आर्यांनीं सिंधू नदीचें स्तोत्र गायिलें आहे. खळखळाट करीत वाहणाऱ्या व स्वतःस संजीवन देणाऱ्या नदीच्या प्रवाहाकडे प्रसन्न चित्तानें पाहात असतां मनांत आलेले विचार येथें

व्यक्त झाले आहेत. त्यांतील उपमा वाचकांचें चित्त वेधून घेणाऱ्या आहेत. चाणाक्ष वाचकांस त्यांतून तत्कालीन जीवनाचें ओझरतें दर्शनहि होऊं शकेल.

मूळ संस्कृतांतील ही प्रार्थना वैदिक ब्राह्मण स्वरसंहिते–सहित गंभीरपणें म्हणतांना एकवार ऐकलें तर कळून येईल कीं ध्वनि आणि अर्थ यांचा एकजीव झाल्याचें ऋग्वेदाएवढें दुसरें उत्कृष्ट उदाहरण नाहीं.]

## मंडल दहा–सूक्त ७५ वें

(१) हे उदकांनो, तुमचें मोठें उत्कृष्ट स्तोत्र, स्तुतिकर्ता विवस्वानाच्या घरीं म्हणत आहे. पृथ्वी, अंतरिक्ष आणि स्वर्ग अशा तीन ठिकाणीं विभागून सात सात* अशा नद्या वाहतात. वाहणाऱ्यांत सिंधू बलानें सर्वांत श्रेष्ठ आहे.

(२) हे सिंधो, ज्या अर्थी सुपीक अशा प्रदेशांतून तुझा प्रवाह गेला आहे त्या अर्थी तुझे जाण्याचेहि मार्ग वरुणानें खोदले असले पाहिजेत. तसेंच तूं जमिनीच्या उंच शिखरावरून खालीं वहात येतेस, त्यामुळें तूं ह्या जगावर सत्ता चालवितेस.

(३) तुझा जमिनीवरचा आवाज स्वर्गलोकावर जातो. आपल्या लाटांनीं ही सिंधु आपलें अनंत सामर्थ्य प्रकट करीत असते. पाऊस मेघांच्या द्वारां जसा गर्जत असतो किंवा बैल ओरडत धांवत असतो तशी सिंधु नदी खळाळत असते.

(४) हे सिंधो, आई पुत्राबरोबर जाते किंवा नुकतीच प्रसूत झालेली गाय वासरामागें जाते तसें इतर नद्या शब्द करीत सिंधूच्या मागें जातात.

(५) हे गंगे, यमुने, सरस्वती, शुतुद्रि[१], परुष्णि[२], आणि हे असिक्नी[३] सहित, असणारे मरुद्वृद्धे, हे वितस्तेसहित[४] व सुषोमेसहित असणारे आर्जीकीये तुम्ही माझें स्तोत्र ऐका.

(६) हे सिंधो, तूं वाहत्या गोमतीला मिळण्याकरितां प्रथम तृष्टामा नदीला मिळालीस. नंतर तूं सुसर्तु, रसा, श्वेती, कुभा[५] आणि मेहत्नु यांना मिळालीस, यांच्यासह तूं एका रथांत आरूढ झालीस.

---

*पंजाबला सप्त सिंधूचा प्रांत असें म्हणतात. सिंधू, झेलम, चिनाब, रावी, बिआस, सतलज व सरस्वती या त्या सात नद्या असाव्यात. खुद्द पंजाब हें नांव पंच + आप (पाणी) पांच नद्यांचा प्रदेश या अर्थानें रूढ झालें आहे.

१ सतलज, २ रावी, ३ चिनाब, ४ झेलम, ५ काबूल, बाकी अनिश्चित.

(७) सरळ वाहणारी, स्वच्छ आणि झकझकीत अशी सिंधु खूप वेगानें वाहात असते. अदम्य सिंधु वेगवानांतली वेगवान् आहे. एखादी आश्चर्यकारक वेगशाली घोडी असावी, तसेच एखादी देखणी स्त्री असावी त्याप्रमाणें सिंधु आहे.

(८) चांगले घोडे, उत्तम रथ, सुंदर वस्त्रें, सोन्याचे दागिने घातलेली, अन्न आणि लोंकर उत्पन्न करणारी, दोऱ्या करण्याचें गवत असलेली, पुण्यशील, सुंदर अशी सिंधु नदी, निर्गुडी वगैरेचीं झाडेंहि आपल्या तीरावर धारण करते.

(९) सुंदर खिडक्यांच्या .... आणि घोडे जोडलेल्या अशा रथांत बसून येऊन सिंधू आम्हाला अन्न देवो. बळकट, कीर्तिमान् आणि मोठ्या अशा सिंधूच्या रथाची युद्धांत नेहमीं स्तुति करतात.

**अभ्यास**:—१. या स्तोत्रांत वर्णिलेल्या सर्व नद्यांचीं नांवें सांगा व त्यांपैकीं नकाशांत कोणत्या सांपडतात तें पहा. २. आर्यांची वस्ती कोणत्या दोन नद्यांच्या मध्यें होती असें कळतें ? ३. नद्यांपासून कोणते फायदे मिळतात असें या सूक्तांत सांगितलें आहे ? ४. उपमा देतांना कोणत्या जनावरांचा उल्लेख आलेला आहे ? त्यावरून काय अनुमान काढतां येतें ?

---

## २ : : परमेश्वराचें स्वरूप

### मंडल दहा–सूक्त १२१ वें

[–हें सूक्त अत्यंत महत्त्वाचें आहे. 'कस्मै देवाय हविषा विधेम' म्हणजे 'सुख'स्वरूप देवाची आम्ही उपासना करतों हें पालुपद सर्वत्र आहे. परमेश्वराच्या अफाट सामर्थ्याविषयींची स्तोत्रकर्त्याची कल्पना निश्चित व उच्च दर्जाची आहे–]

(१) हिरण्यगर्भ नांवाचा परमेश्वर सृष्टीच्या पूर्वीं होता. उत्पन्न झालेल्या जगाचा तोच एक धनी आहे. त्यानेंच हें पृथ्वीपासून द्युलोकांपर्यंत सर्व उत्पन्न करून संरक्षण केलें. म्हणून आम्ही त्या सुखस्वरूप परमेश्वराची उपासना करतों.

(२) जो आत्मज्ञान देणारा आणि बल देणारा आहे आणि ज्याची सर्व लोक आणि देवहि आज्ञा पाळतात, ज्याच्या सावलींत अमरपणा आहे किंवा मृत्यु आहे, त्या सुखस्वरूप परमेश्वराची आम्ही सर्व प्रकारें उपासना करतों.

(३) जो आपल्या महत्त्वानें श्वासोच्छ्वास करणाऱ्या आणि डोळे मिटणाऱ्या सर्व सृष्टीचा एकच ईश्वर आहे आणि जो ह्या द्विपाद आणि चतुष्पाद पशु वगैरेचा धनी आहे, त्या 'सुख'स्वरूप परमेश्वराची आम्ही सर्व प्रकारें उपासना करतों.

(४) ज्याच्या सामर्थ्यानें हिमालयासारखे पर्वत झाले आणि ज्याच्या महात्म्यानें पृथ्वीसह समुद्र झाले असें म्हणतात, तसेंच ज्याच्या सामर्थ्यानें दिशा झाल्या, आणि ज्याच्या सामर्थ्यानें उपदिशा झाल्या, त्या सुखस्वरूप परमेश्वराची आम्ही सर्व प्रकारें उपासना करतों.

(५) ज्याच्यामुळें स्वर्ग सामर्थ्यवान् झाला, आणि ज्याच्यामुळें पृथ्वी दृढ झाली, ज्याच्यामुळें स्वर्ग स्थिर झाला, आणि ज्याच्यामुळें आदित्य अंतरिक्षांत स्थिर झाला, जो आकाशांत उदक निर्माण करतो, त्या सुखस्वरूप परमेश्वराची आम्ही सर्व प्रकारें उपासना करतों.

(६) शब्द करणाऱ्या, लोकांच्या संरक्षणाकरितां स्थिर केलेल्या तेजस्वी द्यावापृथ्वी मनानें ज्याला पाहातात, जेथें सूर्य उगवल्यावर शोभतो, त्या सुखस्वरूप परमेश्वराची आम्ही सर्व प्रकारें उपासना करतों.

(७) ज्या महान् अग्न्यादि सर्व जगाला उत्पन्न करणारें आणि गर्भ धारण करणारें उदक सर्व जग व्यापतें, ज्यापासून देवाचाहि प्राणभूत एक प्रजापति निर्माण झाला त्या सुखस्वरूप परमेश्वराची आम्ही सर्व प्रकारें उपासना करतों.

(८) ज्यानें यज्ञ उत्पन्न करणारें, प्रजापतीला धारण करणारें (प्रलयकालीन) उदक उत्पन्न केलें, व जो देवांतला एक मुख्य देव आहे, त्या सुखस्वरूप परमेश्वराची आम्ही सर्व प्रकारें उपासना करतों.

(९) ज्यानें पृथ्वी उत्पन्न केली आणि ज्या सत्यधर्मा प्रजापतीनें स्वर्ग उत्पन्न केला, त्यानें मला त्रास देऊं नये. ज्यानें विपुल आणि आश्चर्यकारक उदकें निर्माण केलीं, त्या सुखस्वरूप परमेश्वराची आम्ही सर्व प्रकारें उपासना करतों.

(१०) हे प्रजापते, तुझ्याशिवाय दुसरा कोणीहि उत्पन्न झालेल्या जगांत व्यापून नाहीं, ज्या इच्छेनें आम्ही तुला हवि देतों त्या आमच्या इच्छा पूर्ण होवोत. आम्हीं सर्व प्रकारच्या संपत्तीचे धनी व्हावें.

**अभ्यास**:—१. यांत ईश्वराचें जें स्वरूप वर्णिलें आहे तें थोडक्यांत लिहा. २. ईश्वरापाशीं प्रार्थना करून आर्यांनीं काय मागितलें तें सांगा.

# ३ : : सिंधूच्या खोऱ्यांतील संस्कृति

[ अलीकडे पुराणवस्तुसंशोधनाचें काम चालू आहे. त्यामध्यें भूपृष्ठाखालीं गडप झालेली संस्कृति उजेडांत आणण्यासाठीं उत्खनन करणें हा प्रमुख कार्यक्रम आहे. इ. स. १९२४ मध्यें हरप्पा व मोहेंजोदरो या गांवांजवळ जमिनीच्या खालीं २० ते ७० फूट खणल्यावर, संपन्न व सुसंस्कृत लोक राहात असलेल्या मोठ्या शहरांचे अवशेष सांपडले. मोहेंजोदरो (म्हणजे मृतांच्या टेकड्या) हें गांव सिंध प्रांतांतील लारखाना जिल्ह्यांत आहे. सिंधूचें मुख्य पात्र व नारा कालवा यांच्या दरम्यान या टेकड्या आहेत. हरप्पा हें पंजाबमध्यें आहे.

या उत्खननांत सांपडलेलीं घरें, भांडीं, दागिने, शस्त्रें, खाद्य पदार्थांचे अवशेष, स्नानघरें इत्यादींवरून या प्राचीन संस्कृतीचीं अनुमानें काढलीं जातात. कांहीं मोहरांवर चित्रलिपींत लिहिल्यासारखें आढळतें. पण या लिपीचें ज्ञान नसल्यानें तें वाचणें शक्य झालेलें नाहीं. प्रत्यक्ष लेख ज्ञात झाला नसल्यानें कांहीं सांपडलेल्या वस्तूंचीं चित्रें येथें दिलीं आहेत.]

शिवलिंग



★

मोहेंजदरो संस्कृतींत याप्रमाणें पिंडीचे आकार आढळतात. यावरून शिवपूजा तत्कालीं असावी असा अंदाज केला जातो.

★

## मातीचीं भांडीं



या भांड्यांवर वेलबुट्टी काढलेली असते. कित्येक वेळां अशाच प्रकारच्या परंतु उथळ भांड्यांत मृताची रक्षा ठेवीत असत. वेलबुट्टीच्या आकृतीवरून व ती काढण्याच्या कौशल्यावरून तत्कालीन प्रगतीची कल्पना येते. [भांड्यावरील इंग्रजी आंकडे हे संशोधकांनीं घातलेले आहेत.]

मृताचा सांगाडा



हा सांगाडा ज्या स्थितींत सांपडला त्यावरून या व्यक्तीस स्वाभाविक
मरण आलें नसावें. भूकंप किंवा अपघात यांत सांपडून जागच्या
जागीं तो मनुष्य दाबला गेला असावा असें अनुमान आहे.
या सांगाड्यावरून तत्कालीन पुरुषाची सरासरी
उंची पांच फूट साडेचार इंच असावी व
स्त्रीची सरासरी उंची चार फूट
साडेचार इंच असावी असें
निरीक्षकांचें मत आहे



**शिक्के व मुद्रा**

—हें तत्कालीन लिपींत केलेलें लेखन असावें.

—हें गेंड्याचें चित्र आहे. याचप्रमाणें वशिंड नसलेल्या व वशिंड असलेल्या बैलांचीं चित्रेंहि आढळतात, पण घोड्याचीं चित्रें फारशीं आढळत नाहींत. वेदकालीं अश्वांचा उल्लेख वारंवार आढळतो.



येथें मुख्यतः त्रिशुळधारी शिवाचें चित्र काढलेलें आहे. त्याच्या डाव्या बाजूस वाघ आहे. सिंह येथें दिसत नाहीं. शिवाच्या भोंवतीं असलेल्या चित्रसंभारावरून त्यास 'पशुपति' हें नांव शोभतें.

**असे शिक्के व मुद्रा पुष्कळ सांपडतात. ब्रेचसे शिक्के नरम दगडावर कोरलेले आहेत. कांहीं थोडे धातूवरहि कोरलेले आढळतात.**



उंची वस्त्रें धारण केलेला पुतळा

त्या काळीं कापडाचा उपयोग माहीत होता. दागदागिने अंगावर घालीत. पुरुष भव्य असून ते दाढी वाढवीत परंतु मिशा वाढवीत नसत.

या खेरीज सांडपाणी वाहून नेण्याचें चित्र सर्वत्र आढळतें. (ओतुरकर कृत हिंदुस्थानचा सोपपत्तिक इतिहास पान २४ पहा); त्यावरून त्या काळच्या नागरी संस्कृतीची कल्पना येते.

**अभ्यास**:--सिंधु संस्कृति (स्वाध्यायमाला) व विद्याविस्तर (रामनारायण रुइआ कॉलेज, मुंबई, प्रकाशन) मधील या संस्कृतीवरील लेख वाचा.

———

## ४ : : उपनिषद्कालांतील वादविवाद

[—गुरूजवळ बसून समजलेलीं (उप + नि + सद = बसणें) तीं उपनिषदें होत. वेद, त्यांचा अर्थ सांगण्याचे यत्न करणारे ब्राह्मण नांवाचे ग्रंथ, उपनिषदें व आरण्यकें यांना 'श्रुति' अशी संज्ञा आहे. वेदकालीं आद्यमानवांनीं सृष्टींतील पंचमहाभूतांची भक्तिभावानें प्रार्थना केली. उपनिषदकालांतील आर्य हे सृष्टिदेवतेबद्दलच्या आदर, आश्चर्य, भीति, इत्यादि प्राथमिक भावनांच्या पलीकडे जाऊन त्याबद्दल खोल विचार करूं लागले; तेव्हां त्यांना या पंचमहाभूतांच्या बुडाशीं असलेल्या जगन्नियंत्याचें स्वरूप स्पष्टपणें कळून आलें. ह्या तत्त्वज्ञानाचें नितांत सुंदर विवेचन उपनिषदांत पाहावयास सांपडतें.

मराठीमध्यें अलीकडच्या काळांत आचार्यभक्त कै. वि. वा. बापट यांनीं 'सुबोध उपनिषत् संग्रह' लिहून संस्कृतांतील ज्ञान मराठींत आणलें आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या प्रस्तावनेंत बापटशास्त्री लिहितात—"उपनिषदें हें सर्व तत्त्वज्ञानाचें मूळ आहे. द्वैताद्वैतादि सर्व वादांचें व सर्व पंथांचें मूळ आहे. सर्व आस्तिकनास्तिक दर्शनांची प्रवृत्ति यापासूनच झाली आहे. उपनिषदांनाच वेदान्त हें दुसरें प्रसिद्ध नांव आहे. आत्मा हा याचा विषय आहे.... उपनिषदांचा अभ्यास केल्यावाचून गीता—ब्रह्मसूत्रादि ग्रंथ बरोबर कळणें शक्य नाहीं. मी कोण, हें जगत् कसें झालें व याचा कर्ता कोण आहे, ही जिज्ञासा—ही तळमळ—उपनिषदांच्या अभ्यासानेंच शांत होते."....याच ग्रंथाच्या पृ. २३४ वर ते लिहितात. "बृहदारण्यकोपनिषदापैकीं तिसऱ्या अध्यायांत वर्णिलेला प्रसंग पुढें दिला आहे. हें उपनिषद्, फार मोठें असल्यामुळें बृहत् व अरण्यांत म्हणावयाचें असल्यामुळें 'आरण्यक' होय. कर्म व उपासना यांचें फल असा जो संसार त्याविषयीं विरक्त झालेल्या अधिकारी पुरुषाला ब्रह्मविद्येचा उपदेश करावा हा याचा हेतु आहे."

प्रत्येक उपनिषदाचा मूळ संस्कृत श्लोक व त्याचा मराठी अर्थ दिल्यानंतर केवळ मराठी समजणारांना सुसंगत अर्थ कळावा म्हणून त्यांचें सविस्तर सिंहावलोकनहि ग्रंथांत शास्त्रीबुवांनीं दिलें आहे. त्यांतूनच पुढील मजकूर घेतला आहे. पृ. ७७७, ७८८, ७८९. ]

विदेहाच्या वंशांत उत्पन्न झालेल्या जनकानें एकदां पुष्कळ दक्षिणायुक्त यज्ञ केला. त्या निमित्तानें कुरुपांचाल देशांतील मोठमोठे वेदवेत्ते एकत्र जमले होते. अनेक विद्वान् ब्राह्मणांचा तो मोठा समूह पाहून राजाला

यामध्यें अतिश्रेष्ठ प्रवचनकर्ता, ब्रह्म जाणणारा कोण आहे हें जाणण्याची इच्छा झाली. त्यासाठीं त्यानें आपल्या गोठ्यांत एक सहस्र गायींचा संघ करविला. त्यांतील प्रत्येक गायींच्या एकेका शिंगाला सोन्याचीं 'पाद' या नांवाची पांच पांच नाणीं बांधलीं होतीं. अर्थात् प्रत्येक गायोंच्या दोन्ही शिंगांना मिळून सुवर्णाचीं दहा नाणीं बांधलीं. नंतर तो त्या ब्राह्मणांस म्हणाला, "अहो पूज्य ब्राह्मणहो, तुम्हांमध्यें जो अतिशय ब्रह्मज्ञ असेल त्यानें या गायींना आपल्या घरीं न्यावें." पण त्या ब्राह्मणांतील कोणीच त्यांना नेण्यास धजेना. तेव्हां याज्ञवल्क्यानें शिष्यास त्या गायींना आपल्या घरीं नेण्यास सांगितलें. हें पाहून 'आम्ही एवढे मोठमोठे ब्रह्मज्ञ येथें असतांना हा स्वतःलाच ब्रह्मज्ञ कसा म्हणवीत आहे ?' अशा आशयानें इतर ब्राह्मण क्रुद्ध झाले.

[–त्यांत जनकाचा होता––हवनकर्ता––अश्वल म्हणून होता, त्यानें व त्यानंतर जारत्कार व आर्तभाग, उशस्त, चक्रनारायण, गार्गी यांनीं याज्ञवल्क्याला प्रश्न विचारले. तसेंच मद्रदेशांत कपिगोत्री पतंचलाच्या घरीं यज्ञशास्त्राचें अध्ययन करणाऱ्या उद्दालक अरुणीनें शंका विचारल्या. त्या सर्वांचीं समाधानकारक उत्तरें याज्ञवल्क्यानें दिलीं. ]

त्यानंतर वाचक्नवी गार्गी म्हणाली, "अहो पूज्य ब्राह्मणहो, मी काय म्हणतें तें ऐका. माझ्या मनांत या ब्राह्मणाला पुन्हा दोन प्रश्न विचारावे असें आहे. तुम्ही जर अनुमोदन देत असाल तर मी विचारतें. यानें त्यांचीं उत्तरें जर दिलीं तर याला तुम्हांपैकीं कोणीहि ब्रह्मसंबंधीं वादांत जिंकू शकणार नाहीं." तेव्हां ते ब्राह्मण म्हणाले, "विचार". ती म्हणाली "याज्ञवल्क्या, मी तुला दोन प्रश्न विचारतें. जसा काशीराजा किंवा शूरपुत्र वैदेहिराजा आपलें धनुष्य सज्ज करून दोन बाण घेऊन शत्रूच्या पुढें उभा राहतो त्याप्रमाणें मी हे दोन प्रश्न घेऊन तुझ्यापुढें आलें आहें. मला त्यांचीं उत्तरें सांग." तेव्हां "विचार" असें याज्ञवल्क्य म्हणाले. गार्गी म्हणाली, "हे मुनें द्युलोकावर, पृथ्वीच्या खालीं, मध्यें व त्रिकालीं सर्वत्र असणारें जें सूत्रसंज्ञक वायुतत्त्व तें कशामध्यें ओतप्रोत आहे ?" याज्ञवल्क्य म्हणाला, "गार्गी, तें व्यक्त जगदात्मक सूत्र अव्याकृतसंज्ञक अविद्याशबल नारायणाख्य अंतर्यामीमध्यें त्रिकालीं ओतप्रोत आहे." हें ऐकून गार्गी म्हणते "हे मुनें, तुला नमस्कार असो. तूं माझ्या या कठिण प्रश्नाचें उत्तर सहज दिलें आहेस." आतां आणखी एक प्रश्न विचारतें त्याचें उत्तर दे." याज्ञवल्क्य म्हणतो,

" ठीक आहे. विचार. "…. दुसऱ्या प्रश्नाचेंहि समर्पक उत्तर दिल्यावर गार्गी म्हणते " अहो पूज्य ब्राह्मणहो, या मुनीला नमस्कार करून तुम्ही येथून सुखरूपपणें गेलांत तर तेंच आपलें मोठें भाग्य समजा. यानें माझ्या अतिशय कठिण प्रश्नाचींहि योग्य उत्तरें दिलीं आहेत. यास्तव तुम्ही याचा पराभव करण्याचें मनांतहि आणूं नका."

**अभ्यास** :—१. उपानिषद्कालीन विद्वानांच्या सभेचें हें वर्णन आहे. प्रश्न कोणीं कोणीं विचारले ? २. जनकानें काय बक्षिस लावलें होतें ? यावरून त्या काळच्या समाजस्थितिसंबंधीं काय माहिती मिळते ?

---

## ५ : : अराजक राष्ट्राची दुःस्थिति

[ रामायण व महाभारत हीं आर्यांचीं महाकाव्यें होत. महाभारताचा रचनाकाल अनिश्चत आहे. पण कोणाच्याहि मतें तो इ. स. पूर्वी १३०० हून अलीकडे येऊं शकत नाहीं. रामायणांतील श्रीराम हा दशावतारांपैकीं विष्णूचा सातवा अवतार व महाभारतांतील श्रीकृष्ण हा आठवा अवतार होय. साहजिकच रामायणांत महाभारतापेक्षां प्राचीन कालाचें वर्णन सांपडतें. मात्र रामायण हें काव्य महाभारताच्या आधीं रचलें गेलें कीं मागाहून हें निश्चित सांगणें कठिण आहे. रामायण काव्याची रचना महाभारतानंतरची असावी असा विद्वानांचा तर्क आहे. रामायणकालांत आर्यांचें हिंदुस्थानभर वसाहती करण्याचें कार्य चालू होतें हें रामायणांत दंडकारण्यांत राहणाऱ्या अनेक ऋषींच्या आश्रमांचा जो उल्लेख आहे त्यावरून सिद्ध होतें. भारतकालांत हें काम बहुधा पुरें झालें असावें.

प्राचीन कालीं आर्यांचे आचारविचार काय होते याचें वर्णन रामायणांत आढळतें. या ग्रंथाचा लेखक वाल्मीकि यास संस्कृत भाषेमधील आद्य कवि मानतात. श्रीवाल्मीकीकृत मूळ ग्रंथाचें मराठी सुरस भाषांतर कै. काशीनाथशास्त्री लेले वाईकर यांनीं केलें असून गणेश विष्णु चिपळूणकर आणि मंडळी यांनीं इ. स. १९०३ मध्यें तें प्रसिद्ध केलें. त्याची दुसरी आवृत्ति इ. स. १९२८ मध्यें त्या संस्थेच्या चालकांनीं प्रसिद्धिली. त्यांतील आयोध्यकांड सर्ग ६७ पृ. ३५९ वरील पहिला उतारा व सर्ग ११९ पृ. ४८४ वरून दुसरा उतारा येथें दिलेला आहे. ]

...आक्रोशयुक्त, आनंदरहित व अश्रूंनीं कंठ दाटून आलेल्या लोकांनीं भरलेली अशी ती रात्र* अयोध्येमध्यें फारच लांब वाटून शेवटीं निघून गेली. तेव्हां रात्र संपून सूर्योदय झाल्यावर राज्यकार्यधुरंधर द्विज जुळून सभेमध्यें आले. मार्कंडेय, मौद्गल्य, वामदेव, कश्यप – – – द्विज अमात्यसहवर्तमान, श्रेष्ठ राजपुरोहित वसिष्ठ मुनींकडे तोंड करून बसले. आणि राज्यकार्यासंबंधानें बोलूं लागले. ते म्हणाले, " पुत्रशोकानें हा राजा मृत्यु पावल्यामुळें दुःखानें आम्हांला शंभर वर्षांसारखी झालेली ती रात्र एकदांची निघून गेली. महाराज दशरथ स्वर्गवासी झाला आहे, राम अरण्यांत गेला आहे, तेजस्वी लक्ष्मणहि रामाबरोबरच चालता झाला आहे, आणि उभयतां शत्रुतापन भरत-शत्रुघ्न कैकेय देशांतील राजधानीमध्यें रमणीय राजवाड्यांत आपल्या आजोळीं आहेत. तेव्हां इक्ष्वाकुवंशापैकीं आजच्या आज कोणीतरी राजा करावा. कारण हें आपलें राष्ट्र असेंच अराजक राहूं दिलें असतां नाश पावेल.....

"अराजक राष्ट्रामध्यें मूठभर बीदेखील कोणी पेरीत नाहीं. राज्य अराजक झालें असतां पुत्र पित्याच्या अथवा स्त्री भर्त्याच्या आधीन राहात नाहीं, अराजकामध्यें धन नाहीं, भार्याहि नाहीं हें एक मोठेंच भय आहे. मग पितापुत्ररूप आणि स्त्रीपुरुषरूप सत्याला जर ठिकाण नाहीं, तर क्रय-विक्रयरूप सत्याची गोष्ट अराजकामध्यें पाहिजे कशाला ?

"राष्ट्र अराजक झालें असतां लोक सभा भरवीत नाहींत, रम्य बागा तयार करीत नाहींत व आनंदित होऊन पुण्यसंपादक अशा धर्मशाळा वगैरेहि बांधीत नाहींत... अराजक राष्ट्रामध्यें आनंदित नट व सूत्रधार ज्यामध्यें आहेत असे राष्ट्राच्या अभ्युदयाला होणारे देवादिकांचे उत्सव आणि समाज वृद्धिंगत होत नाहींत.

"अराजक राष्ट्रामध्यें कांहीं विषयाला उद्देशून लोक वादविवाद करूं लागले असतां त्यांच्या मुद्यांचा निर्णय होत नाहीं, आणि कथाप्रिय लोकांनीं कथन केलेल्या कथांच्या योगानें कथा ऐकण्याची ज्यांना गोडी आहे अशा लोकांचें चित्तरंजन नाहींसें होतें.

---

* दशरथाच्या मृत्यूनंतरची पहिली रात्र.

"अराजक देशांत सुवर्णभूषणांनीं भूषित झालेल्या कुमारिका एकत्र जुळून सायंकाळीं बागांतून क्रीडा करण्यास जात नाहींत.

"अराजक देशांत धनिक लोक सुरक्षित नसतात, आणि शेतकी व गोरक्षण यांवर उपजीविका करणाऱ्या लोकांनाहि दार उघडें टाकून बाहेर पडतां येत नाहीं. अराजक देशांत बाण व अस्त्रें यांचा अभ्यास सुरू राहून एकसारखे बाण मारूं पाहणाऱ्या लोकांचा तलनिर्घोष ऐकण्यांत येत नाहीं. अराजक देशामध्यें दूर प्रदेशाला निघालेले उदमी पुष्कळ माल बरोबर घेऊन सुखरूप जात नाहींत. अराजक देशांत अवश्य असलेलें मिळत नाहीं, व जें मिळालें असेल त्याचें रक्षण होत नाहीं.

"राज्य अराजक झालें असतां युद्धामध्यें सेना शत्रूशीं तोंड देण्यास समर्थहि होत नाहीं. अराजक देशांत शास्त्रांत प्रवीण असलेले पुरुष वनांतून अथवा उपवनांतून बोलत उभे राहात नाहींत. अराजक देशांत नियमाने वागणारे लोक देवतांच्या पूजनाकरितां पुष्पें, मोदक व दक्षिणा देत नाहींत. आणि अराजक देशामध्यें चंदन आणि अगुरु ह्यांनीं चर्चित झालेले राजपुत्र वसंत ऋतूंतील शाल वृक्षांप्रमाणें झळकत नाहींत.

"उदकरहित जशा नद्या, तृणरहित जसें वन, आणि गोपालरहित जशा गाई, तसेंच राजरहित राष्ट्र होय. ध्वज ज्याप्रमाणें रथाची खूण आहे, धूम ज्याप्रमाणें अग्नीची खूण आहे, त्याचप्रमाणें जें राज्य चालविणारे असतात त्यांची राजा ही खूण असते. परंतु तो राजाच आतां देवलोकाला निघून गेलेला आहे. तेव्हां आतां आम्हाला कोणीहि मानणार नाहीं.

"ज्याप्रमाणें शरिराचें हिताहित पाहण्याविषयीं दृष्टि नेहमीं तयार असते, त्याचप्रमाणें सत्य आणि धर्म, आणि कुलवानांचें कुल, ह्यांचा प्रवर्तक राजाच असून माता, पिता व प्रजा यांचें पालन व हित पाहाणारा राजाच आहे. उदार आचरणानें युक्त राजा, यम, कुबेर, इंद्र, आणि महाबलाढ्य वरुण ह्यांना मागें टाकतो. अहो, बऱ्यावाईटाची व्यवस्था लावणारा राजा जर जगतामध्यें नसेल तर हें जगत् अंधःकारासारखेंच होऊन कशाचाच उमज पडणार नाहीं.

"असो. महाराज दशरथ जिवंत असतांहि, समुद्र ज्याप्रमाणें मर्यादेपाशीं आल्यावर तिचे अतिक्रमण करत नाहीं त्याचप्रमाणें आम्हीं आपल्या आज्ञेचे अतिक्रमण केलेलें नाहीं (कधींही). हे द्विजश्रेष्ठ वसिष्ठ मुने, आपण आमच्या म्हणण्याकडे लक्ष द्या, आणि इक्ष्वाकु कुलांतील एखादा राजपुत्र अथवा

दुसऱ्या कोणाला आजच्या आज ह्या राज्याचा अभिषेक करा. कारण राजा-वाचून हें राज्य अरण्यवत् झालेलें आहे."

**अभ्यास** :—१. अराजक स्थिति म्हणजे काय ? चांगला राजा असतां प्रजा किती निर्भय राहूं शकते याचें वर्णन या उताऱ्याच्या आधारानें करा. २. राजाकडून लोकांच्या कोणत्या अपेक्षा असत? ३. मराठी राज्यस्थापनेपूर्वी महाराष्ट्रांतील स्थिति कशी होती त्याचें वर्णन करा. ४.'सुराज्य' यावर लहान निबंध लिहा. ५. सुराज्य व स्वराज्याची प्राचीन कल्पना व अर्वाचीन कल्पना यांत काय फरक आहे याची चर्चा करा.

---

## ६ : : सायंकाळची सृष्टिशोभा

[ रामायणांत निसर्गाचीं अनेक सुंदर वर्णनें आहेत. त्यांतील सायं-काळचें वर्णन येथें दिलें आहे. त्याचप्रमाणें तत्कालीन शिष्टाचाराचें वर्णन यांत आलेलें आहे.

मूळ उताऱ्यांत वर्णन केलेल्याप्रमाणें रात्रीच्या आगमनाचा एक एक प्रसंग डोळ्यापुढें आणल्यास अरण्यांतील शांत रात्रीच्या आल्हाददायक चित्राशीं मन तद्रूप होतें.]

...ती मोठी कथा श्रवण केल्यावर सीतेचें मस्तकी अवघ्राण करून धर्म-वेत्त्या अनुसयेनें आपल्या हातानें तिला कवटाळून धरलें आणि ती तिला म्हणाली, "स्वयंवर कसें झालें हें तूं स्पष्ट शब्दांनीं आणि आश्चर्यकारक व मधुर वाणीनें सांगितलेंस आणि तें सर्व मीं ऐकलें. हें मधुरभाषिणी सीते, ह्या तुझ्या कथनानें मला फारच बरें वाटत आहे. परंतु आतां तेजस्वी सूर्य शुभ रात्रीला समीप आणवून अस्तास गेला आहे. सर्व दिवसभर आहारा-करितां संचार करून संध्यासमयीं निद्रेकरितां निवासस्थानांत जाऊन बस-लेल्या पक्षांचा ध्वनि कानावर येत आहे. उदकामध्यें ज्यांनीं आपलीं वल्कलें धुतलीं आहेत आणि स्नानामुळें ज्यांचीं शरीरें आर्द्र झालेलीं आहेत असे हे हातांत कलश घेतलेले मुनी एकत्र जुळून येत आहेत. ऋषींनीं विधिपूर्वक अग्निहोम दिल्यामुळें पारव्यांच्या कंठासारख्या वर्णाचा व वायूनें हालविलेला धूर दृष्टीस पडत आहे. बारीक पानांचे वृक्ष आसमंताद्भागीं सर्व बाजूंनीं अगदीं दाट झाल्यासारखे दिसत आहेत. आणि दूरचे प्रदेश दृष्टिगोचर होत-

नासे झाले आहेत. निशाचर प्राणी चोहोंकडे संचार करूं लागले आहेत. आणि हे तपोवनांतील मृग पुण्यक्षेत्ररूप आश्रम प्रदेशामध्यें पडले आहेत.

"सीते, नक्षत्रांनीं भूषित झालेली रात्र प्राप्त झाली आहे, आणि चंद्रिकारूप प्रावरणांनीं युक्त असलेला चंद्र आकाशामध्यें उदय पावलेला दिसत आहे. आतां जा, मी तुला अनुज्ञा देतें. रामाच्या शुश्रूषेमध्यें तत्पर राहा. मधुर गोष्टी सांगून तूं मलाहि संतुष्ट केलें आहेस. वत्से माझ्या समक्ष तूं अलंकार धारण कर आणि दिव्य अलंकारांनीं शोभित होऊन मला आनंद दे."

ह्याप्रमाणें अनुसयेनें सांगितल्यावर देवकन्येसमान असलेल्या सीतेनें अलंकार घातले, आणि अनुसयेच्या चरणांना मस्तकानें प्रणाम करून ती रामाकडे निघाली.

ऋषीपत्नी अनुसूयेनें प्रेमपूर्वक दिलेल्या अलंकारांनीं भूषित झालेल्या सीतेला अवलोकन करून वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या रामाला हर्ष झाला. तदनंतर ऋषीपत्नीनें वस्त्रें, भूषणें व पुष्पमाला प्रेमपूर्वक दिल्याचें सर्व वृत्त सीतेनें रामाला निवेदन केलें. तेव्हां मनुष्यलोकामध्यें अत्यंत दुर्लभ असा सीतेचा सत्कार झालेला पाहून रामाला व महारथी लक्ष्मणाला हर्ष झाला. नंतर सर्व तपस्वी जनांनीं सत्कार केलेला तो रघुनंदन प्रसन्न होऊन चंद्रासारख्या आल्हादकारक मुखानें युक्त असलेल्या पवित्र सीतेला अवलोकन करून तो त्या रात्रीं तेथेंच राहिला.

**अभ्यास :—**१. सीतेचा सत्कार कां व कसा केला ? २. श्रीरामाला कां आनंद झाला ?

---

## ७ : : धर्म-नारद संभाषण

[रामायण व महाभारत हीं दोन महाकाव्यें म्हणजे समाजांतील आबालवृद्धांच्या मनावर उच्च विचारांचा ठसा उमटविणारे, सत्कृत्यांचे परिणाम व पापांचा शेवट स्पष्ट दाखविणारे, समाजांतील बहुविध व्यक्तीस एकाच संस्कृतीचें बाळकडू पाजणारे व त्यांच्या मनाला करमणूक व बोध देणारे असे ग्रंथ आहेत. महाभारतांत सामान्यतः एक लक्ष श्लोक आहेत. व्यासानें मूळ लिहिलेलें भारत लहान असून पुढें त्यांत सौतीनें भर घालून त्यास मोठें स्वरूप दिलें. महाभारताचें

आजचें स्वरूप त्या ग्रंथास ख्रिस्ती सनाच्या तिसऱ्या शतकांत प्राप्त झालें असा कांहीं विद्वानांचा तर्क आहे. तरी निदान सुमारें नऊ हजार श्लोक बुद्धपूर्वकालीन आहेत यांत शंका नाहीं. भारताचा काल अनिश्चित असला तरी कोणाच्याहि मतें तो इ. स पू. १३००हून अलीकडे येऊं शकत नाहीं.

या ग्रंथांत व्यावहारिक शहाणपणा शिकविणारे प्रसंग व संवाद इतके आहेत कीं त्यांवरून 'व्यासोच्छिष्टं जगत्सर्वं' म्हणजे 'सर्व जगांतील शहाणपण या ग्रंथांत सांपडूं शकेल' अशी म्हण पडली आहे. लोकांच्या चालीरीति, सामाजाचे आदर्श, राजा-प्रजा यांचीं कर्तव्यें, युद्धांतील शस्त्रास्त्रें, शिक्षण इ. तत्कालीन समाजाच्या विविध अंगांची माहिती कळण्यास या ग्रंथाइतकें बहुमूल्य साधन नाहीं.

कै. चिं. वि. वैद्य यांच्या संपादकत्वाखालीं या ग्रंथाचें मराठींत भाषांतर झालें असून पूर्वीं प्रसिद्धि पावलेली प्रकाशन संस्था दामोदर सावळाराम आणि मंडळी, यांनी हें प्रकाशित केलें आहे. पुढील उतारा भाग तिसरा-सभापर्व अध्याय पांच यामधील आहे. मध्यंतरीं दिलेले अंक श्लोकांचे क्रमांक आहेत.

आपल्या बंधूसह धर्मराज सभेंत बसला असतां नारदमुनि तेथें आले. एकमेकांनीं कुशल विचारल्यानंतर पुढीलप्रमाणें नारदांनीं धर्माला प्रश्नरूपांनीं माहिती विचारून उपदेश केला. राजानें सदोदित जागृत राहून कोणतीं कृत्यें करण्यांत दक्ष असावें याचें पुढें दिलेलें तपशीलवार वर्णन मनन करण्यासारखें आहे. ]

तूं निद्रेला वश होत नाहींस ना? योग्य वेळीं तूं जागा होतोस ना? तूं अर्थशास्त्रज्ञ* आहेसच; तूं पहांटेच्या वेळी आपल्या अर्थस्थितीचा विचार करतोस ना? (३०)

विश्वासू, निर्लोभी, परंपरागत कामें करीत असलेले असे तुझें काम-करणारे आहेत ना? राजा, तुझ्या कारागारांना कामें संपलीं कोणतीं, बहुतेक पुरीं झालीं कोणतीं, कोठल्या कामाला प्रारंभ व्हावयाचा आहे, इत्यादि गोष्टी समजतात ना? वीरा, तुझ्या राज्यांतील कारणिक (शिक्षक) सर्व शास्त्रांमध्यें आणि धर्मामध्यें निपुण आहेत ना? ते सर्व कुमारांना आणि योद्धयांना (उत्तम शिक्षण देऊन) तयार करतात ना? (३४, ३५)

---

* कोषशास्त्रज्ञ, राज्याच्या खजिन्याचें शास्त्र जाणणारा.

तुझा सेनापति आनंदित, शूर, बुद्धिमान, धैर्यशाली, पवित्र, कुलिन, तुझ्यावर प्रीति करणारा आणि दक्ष आहे ना? (४८) तुझ्या सैन्यावरचे इतर अधिकारीहि सर्व प्रकारच्या युद्धांमध्यें निपुण, धैर्यवान, पवित्र, पराक्रमी असून तूं त्यांचा सत्कार करून त्यांना मान देत असतोस ना? (४९) सैन्याला शिधासामग्री आणि वेतन हीं वेळच्या वेळीं, यथायोग्य आणि देणें ठरलीं तशीं तूं देतोस ना? तींत कमी करीत नाहींस ना? (५०) भत्ता आणि वेतन सेवकांना देण्यास जर नियमित वेळेहून अधिक वेळ लागला तर ते सेवक अडचणींत आल्यानें जो अनर्थ करतात, तो फारच मोठा असतो. (५१)

मुख्यत: राजकुलांतील सत्र पुरुष तुझ्यावर अनुरक्त असून ते युद्धामध्यें तुझ्यासाठीं नेहमीं प्राण टाकण्यास सिद्ध असतात ना? (५२) युद्धविषयक अनेक कामें एकच अधिकारी सर्व बाजूंनीं आपल्या मर्जीप्रमाणें तुझ्या आज्ञेबाहेर जाऊन व कामाच्या स्वाधीन होऊन करीत नाहींत ना? (५३) जो पुरुष आपल्या पराक्रमानें उत्तम कामें करून आपल्या कामाला दाखवितो, त्याला अधिक मान, अधिक भत्ता आणि अधिक वेतन मिळतें ना? (५४) विद्येचें शिक्षण घेऊन ज्ञानसंपन्न झालेल्या पुरुषांना त्यांच्या त्यांच्या गुणांच्या योग्यतेप्रमाणें दानें देऊन तूं त्यांचा परामर्ष घेतोस ना? (५५)

भरतश्रेष्ठा, तुझ्यासाठीं मृत्यु पावलेल्या किंवा संकटांत सांपडलेल्या माणसांच्या बायकांचें तूं पोषण करतोस ना? (५६) पार्था, शत्रु भयामुळें, दुर्बळपणामुळें किंवा तूं युद्धांत जिकल्यामुळें तुझ्या आश्रयास आला असतां तूं त्याचें पुत्राप्रमाणें रक्षण करतोस ना? (५७) पृथ्वीच्या मालका, पृथ्वीवरील सर्व प्रजाजनांना तूं आई-बापाप्रमाणें वागवितोस ना? तुझ्याविषयीं त्यांच्या मनांत शंका येत नाहींत ना? (५८) भरतश्रेष्ठा, आपला शत्रु व्यसनांत गुरफटला आहे असें ऐकतांच तूं आपल्या त्रिविध बलाचा नीट बंदोबस्त करून त्याच्यावर चालून जातोस ना? (५९) शत्रुनाशना, शत्रूकडील सैन्यांतील मुख्य मुख्य अधिकाऱ्यांना त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें तूं गुप्तपणें उत्तम उत्तम वस्तु पाठवीत असतोस ना? (६२)

पार्था (युधिष्ठिरा), अगोदर आपण आपलीं इंद्रियें ताब्यांत ठेवून स्वत:ला जिकून नंतर इंद्रियें न जिकल्यामुळें प्रमत्त झालेल्या शत्रूंना तूं जिंकतोस ना? (६३) तूं शत्रूंवर चालून जाण्यापूर्वी साम, दाम, भेद, दण्ड या उपायांस यथाशास्त्र चांगल्या रीतीनें योजीत असतोस ना? (६४)

राजा, तूं आपल्या राज्याचा बळकट बंदोबस्त करून नंतर शत्रूवर चालून जातोस ना? त्यांना जिंकण्यासाठीं तूं पराक्रम करतोस ना? व जिंकल्यावर त्यांचें योग्य रीतीनें रक्षण करतोस ना? (६५) तुझें अष्टांगांनीं (रथ, हत्ती, घोडे, योद्धे, पायदळ, मजूर, हेर व मार्गदर्शक वाटाडे यांनीं) युक्त असलेले, चतुर्विध बलाचें सैन्य, शत्रूचा उच्छेद करण्यास समर्थ असून तें चांगल्या सेनापतींनीं चालविलेलें व शत्रूचा नाश करणारें आहे ना? (६६) राजा! लोभी, चोर, शत्रू किंवा कामाला नालायक अशीं माणसें तूं कामाला नेमलीं नाहींस ना? (७८)

चोर, लोभी माणसें, राजकुमार किंवा (राज) स्त्रिया यांच्यापासून किंवा खुद्द तुझ्यापासून राष्ट्राला पीडा होत नाहीं ना? शेतकरी संतुष्ट आहेत ना? (७९) तुझ्या राज्यामध्यें मोठमोठे तलाव पाण्यानें भरलेले व राज्याच्या भागाभागांत आहेत ना? तुझ्या राज्यांतील शेती केवळ पावसावर अवलंबून नाहीं ना? (८०)

भरतश्रेष्ठा, तुझ्या राज्यामध्यें धनुर्वेदशास्त्र आणि नागराच्या रक्षणाचें यंत्रशास्त्र यांचा उत्तम अभ्यास केला जातो ना? (१२३) निष्पापा! सर्व प्रकारचीं अस्त्रें, अभिचार (ब्रह्मदण्ड म्हणजे जारण, मारण, उच्चाटन, इत्यादि अभिचारप्रयोग), विषयोग इत्यादि सर्व प्रकारचे शत्रूनाशाचे उपाय तुला विदित आहेत ना? (१२४)

युधिष्ठिर म्हणाला, "महाराज जसें आपण सांगितलें तसेंच करीत जाईन." (१३०)

**अभ्यास** :—१. पुढील मुद्यांविषयीं महाभारतकालीन विचार सांगा. (१) शिक्षक व शिक्षणाचे विषय (२) सेनापति व सैनिकांचीं कर्तव्यें (३) युद्धांत मृत झालेल्यांच्या कुटुंबियांचा परामर्श (४) शत्रूशीं वर्तन कसें ठेवावें? (५) शेती व शेतकरी (६) अर्थकोश (७) राजा–प्रजा संबंध. २. आधुनिक कालांत या कल्पनांत काय कमीअधिक झालें आहे याची चर्चा करा.

---

## ८ : : स्थितप्रज्ञस्य का भाषा

[ श्रीमद्भगवद्गीता हा हिंदूंचा मुख्य धर्मग्रंथ होय. जगांत जन्माला येणाऱ्या प्रत्येक मनुष्यास अनेक प्रसंग असे येतात कीं, केव्हां कसें वागावें याविषयीं संदेह उत्पन्न होतो. त्याचें उत्तर किंवा खरें म्हणजे उत्तर ठरविण्याची रीत सांगणारा ग्रंथ म्हणजे भगवद्गीता होय. महाभारतांत हा सर्व विचार योगेश्वर श्रीकृष्ण व धनुर्धर पार्थ यांच्या संवादांत ग्रथित केलेला आहे. या संवादासच भगवद्गीता म्हणतात. सर्व उपनिषदांचें सार या ग्रंथांत ग्रथित झालें आहे असें अभ्यासकांचें मत आहे. जगांतील सर्व प्रमुख भाषांत भगवद्गीतेचें भाषांतर झालें आहे.

मराठीमधील श्रेष्ठ ग्रंथ ज्ञानेश्वरी हा गीतेचा मराठींत अर्थ सांगणारा ग्रंथ होय. लो. टिळकांनीं 'गीतारहस्य' या आपल्या ग्रंथांत याच गीतेचा अर्थ विशद केला. गीतेमध्यें स्थितप्रज्ञ मनुष्याचें वर्णन दुसऱ्या अध्यायांत श्लोक ५४ ते ७२ यांमध्यें केलें आहे. त्यांतील ५४ ते ६१ व ६७ ते ७२ या श्लोकांचा लो. टिळकांनीं केलेला अनुवाद पुढें दिला आहे. प्रारंभीं श्लोकांचे आंकडे दिले आहेत. ]

**अर्जुन म्हणाला :—**

(५४) हे केशवा! समाधिस्थ स्थितप्रज्ञ कोणाला म्हणावें? त्या स्थितप्रज्ञाचें बोलणें, बसणें व चालणें कसें असतें! (तें मला सांगा.)

**भगवान् म्हणाले :—**

(५५) हे पार्था! (मनुष्य) मनांतील सर्व काम म्हणजे वासना जेव्हां सोडतो व आपण आपल्या ठायींच संतुष्ट होऊन राहतो, तेव्हां त्याला स्थितप्रज्ञ म्हणतात.

(५६) दुःखांत ज्याच्या मनाला खेद होत नाहीं, सुखाचे ठायीं ज्याची आसक्ति नाहीं, आणि प्रीति, भय व क्रोध हीं ज्याचीं सुटलीं, त्याला स्थितप्रज्ञमुनि म्हणतात.

(५७) सर्व गोष्टींत ज्याचें मन निःसंग झालें, आणि यथाप्राप्त शुभाशुभाचा ज्याला आनंद किंवा विषादहि नाहीं, त्याची बुद्धि स्थिर झाली (म्हणावयाची).

(५८) कांसव आपले अवयव (हस्तपादादि) ज्याप्रमाणें सर्व बाजूंनीं आंखडून घेतो त्याप्रमाणें जेव्हां एखादा पुरुष इंद्रियांच्या (शब्दस्पर्शादि) विषयापासून (आपलीं) इंद्रियें आंवरून धरतो तेव्हां त्याची बुद्धि स्थिर झाली (म्हणावयाची).

(५९) निराहारी पुरुषाचे विषय सुटले, तरी (त्यांतील) रस म्हणजे गोडी ही सुटत नाहीं. पण परब्रह्माचा अनुभव आल्यावर (सर्व विषय व त्यांतील) गोडीसुद्धां म्हणजे विषय व त्यांतील गोडी हीं दोन्ही सुटतात.

(६०) कारण, केवळ (इंद्रियदमनार्थ) प्रयत्न करणाऱ्या विद्वानाचें देखील मन, हे कुंतीपुत्रा! हीं दांडगीं इंद्रियें बलात्कारानें भलतीकडे ओढून नेतात.

(६१) (म्हणून) या सर्व इंद्रियांचें संयमन करून युक्त म्हणजे योगयुक्त व मत्परायण होऊन राहावें. आपलीं इंद्रियें याप्रमाणें ज्याच्या स्वाधीन झालीं त्याची बुद्धि स्थिर झाली (म्हणावयाची).

(६७) (विषयांत) संचरणाऱ्या म्हणजे वागणाऱ्या इंद्रियांच्या मागोमाग जें मन जाऊं लागतें तेंच—पाण्यांत नौकेस जसा वारा त्याप्रमाणेंच—पुरुषाची बुद्धि हरण करीत असतें.

(६८) म्हणून हे महाबाहो अर्जुना, इंद्रियांच्या विषयापासून ज्यांचीं इंद्रियें सर्व बाजूंनीं आंवरून धरलेलीं (असतात) त्याचीच बुद्धि स्थिर झाली (म्हणावयाची).

(६९) सर्व लोकांना जी रात्र, तेथें स्थितप्रज्ञ जागृत असतो आणि सर्व प्राणिमात्र जेथें जागृत असतात, तेथें या ज्ञानवान् पुरुषास रात्र वाटत असते.

(७०) चोहोंकडून (पाण्यानें) भरत जात असतांहि ज्याची मर्यादा चळत नाहीं, अशा समुद्रांत सर्व पाणी ज्याप्रमाणें शिरत असतें, तद्वत् ज्या पुरुषांत सर्व विषय (त्याची शांति न मोडतां) प्रवेश करितात, त्यालाच (खरी) शांति मिळते. विषयाची इच्छा धरणाऱ्याला (ही शांति मिळणें शक्य) नाहीं.

(७१) सर्व काम म्हणजे आसक्ति सोडून जो पुरुष निःस्पृह होऊन (व्यवहारांत) वागतो, व ज्याला अहंकार नाहीं त्यालाच शांति मिळते!

(७२) हे पार्था! ब्राह्मी स्थिति (म्हणतात ती) हीच ही प्राप्त झाल्यावर कोणीहि मोहांत पडत नाहीं, आणि अंतकाळीं म्हणजे मरणाच्या वेळींसुद्धां या स्थितीमध्यें राहून त्याला ब्रह्मनिर्वाण म्हणजे ब्रह्मांत मिळून जाण्याच्या स्वरूपाचा मोक्ष मिळतो.

१ : :

# भारतवर्षाचें अखंडत्व

[ हिंदुस्थान हें सांस्कृतिक दृष्टीनें अखंड आहे, ही कल्पना केवळ इंग्रजी अमलांत उत्पन्न झाली असें नाहीं. इंग्रजांचें जसें या देशावर एकछत्री राज्य होतें तसें करण्याचा यत्न जुन्या राजांनीं केला. अश्वमेध यज्ञाचें स्वरूप असेंच असे. चंद्रगुप्त मौर्य, अशोक, समुद्रगुप्त, हर्ष, पुलकेशी व राष्ट्रकूट राजे या सर्वांचा प्रयत्न भारतवर्षभर एकछत्री राजकीय अंमल करण्याचा होता. त्या सर्वांच्यापेक्षां इंग्रजांना त्यांत यश अधिक आलें. परंतु यामुळें भारतवर्षाच्या एकात्मतेची कल्पना त्यांनीं दिली असें होत नाहीं. त्यांच्या एकछत्री सत्तेमुळें ती कल्पना वाढीस लागली असें फार तर म्हणतां येईल. पण त्यासाठीं इंग्रजांनीं हेतुतः कांहींच केलें नाहीं. केलेंच असलें तर हा देश सोडतांना या देशाचे स्वतंत्र तुकडे करून ते निघून गेले !

महाकाव्यें आणि पुराणें यांमधून 'भारतवर्ष एक आहे' ही कल्पना ग्रथित झालेली आहे. या महाकाव्यांच्या कालांतहि अश्वमेध करून भारतवर्षभर एकछत्री राज्य स्थापण्याचें ध्येय प्राचीन राज्यकर्त्यांचें होतें असें आढळतें. या दृष्टीनें व्हिन्सेंट स्मिथनें 'दी ऑक्सफर्ड हिस्टरी ऑफ इंडिया'च्या प्रस्तावनेंत पृ. ८–११ केलेलें विवेचन वाचनीय आहे.

पुढें विष्णु-पुराणांतील उतारा दिला आहे. (हीच कल्पना दर्शविणारीं मराठेकालीन गोविंदराव काळे व रघुनाथराव यांचीं पत्रें त्या भागांत वाचावीं.)

सर्व १८ पुराणें एकाच वेळीं रचिलीं गेलीं नाहींत. त्यांचा प्रारंभ ख्रि.पू. चौथें शतक असावा, पण त्यांना आजचें स्वरूप गुप्तकालाच्या सुमारास आलें असें विद्वान मानतात. या अठरा पुराणांत मत्स्य, वायू, विष्णू हीं प्रमुख होत. पुराणें म्हणजे इतिहास नव्हे, परंतु त्या कादंबऱ्याहि नव्हेत. सामान्य लोकांपर्यंत प्राचीन आचार-विचारांचें लोण अनेक कथांच्या द्वारां पोहोंचविण्यास पुराणांतील गोष्टींचा उपयोग होतो. त्यांत दिलेल्या राजांच्या वंशावळींचा प्राचीन इतिहासकारांस पुष्कळ उपयोग झाला आहे ]

उत्तरम् यत् समुद्रस्य
हिमाद्रेश्चैव दक्षिणम्।
वर्षं तद् भारतं नाम
भारती यत्र संततिः ।

—विष्णुपुराण २·१

समुद्राच्या उत्तरेस आणि हिमालय पर्वताच्या दक्षिणेस जो देश आहे त्यास भारत असें नांव आहे; कारण त्या प्रदेशांत भरताचे वंशज राहतात.

**अभ्यास** :–भारतवर्षाच्या सांस्कृतिक ऐक्याची प्राचीनकालीन लक्षणें सांगा. भारत आज द्विखंड असतांहि त्यांत कांहीं समान लक्षणें आढळतात का?

---

## १० : : बुद्धपूर्वकालांतील शस्त्र-विद्या

[गौतम बुद्धाच्या वचनांचें जें वर्गीकरण त्रिपिटकामध्यें दिलें आहे त्यानुसार त्याचे सुत्त (सूत्र), गेय्य, वेय्याकरण (व्याख्या), गाथा, उदान, इतिवुत्तक, **जातक**, अब्भुतधम्म, वेदल्ल असे नऊ विभाग केलेले आहेत.

जातक म्हणजे जन्मासंबंधीं. बुद्ध होण्याच्या पूर्वी गौतमाला किंवा बोधिसत्त्वाला अनेक जन्म घ्यावे लागले. बोधि म्हणजे बुद्धत्व आणि सत्त्व म्हणजे प्राणी. बोधिसत्त्व म्हणजे बुद्धत्वासाठीं प्रयत्नशील प्राणी. जातकांत बोधिसत्त्वाच्या पांचशें सत्तेचाळीस जन्मांचा उल्लेख आहे. जातकांतील कथाहि सामान्यत: पांचशेंचाळीस आहेत. जातकांना जीं शीर्षकें दिलेलीं आहेत तीं कधीं मुख्य पात्राच्या नांवावरून (बक जातक), कधीं विषयानुसार (वण्णुपथ जातक), कधीं बोधिसत्त्वानें जो जन्म घेतला त्यानुसार (मासा, हत्ती, माकड इ.) दिलेलीं आहेत.

या कथांचा संग्रह नि संपादन कोणीं केलें हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. या कथा एकाच कालीं रचलेल्या नाहींत. ख्रिस्तपूर्व पांचव्या शतकापासून ते ख्रिस्तोत्तर एक किंवा द्वितीय शतकापर्यंत त्या रचल्या असाव्या. सारांश, सध्यांच्या जातकांचें स्वरूप सुमारें दोन सहस्र वर्षांइतकें प्राचीन आहे.

या कथांत बौद्धधर्मीय आणि कधीं कधीं अबौद्ध साहित्य यांचें मिश्रण आहे. बौद्ध–अबौद्ध इतकें कडक वेगळेपण त्या काळीं कथासाहित्यांत नव्हतें. रामायण–महाभारतांतील कांहीं अंश जातकांतून

घेतला असावा असें बौद्धधर्मीय मानतात. पण हें मत निर्णायक नव्हे. 'घट' जातकांत भागवत कथा आलेली आहे. कृष्ण जन्मापासून कंसाच्या हत्येपर्यंत, चाणूर, मुष्टिक इत्यादींचा वध हा कथाभाग त्यांत आहे.

जातक कथांत पंचतंत्राचें मूळ आहे व इसापाच्या बहुतेक कथांचेंहि मूळ त्याच कथा आहेत; या सर्व कथाचें ठिकाण भारतवर्ष असलें पाहिजे, असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. प्राचीनत्व, विस्तार, उपदेश किंवा मनोरंजन या दृष्टीने हें कथासाहित्य अद्वितीय आहे. या कथांतून तत्कालीन लोकजीवनाची माहिती मिळते. उठणें, बसणें, खाणें, पिणें अशा साध्या गोष्टीपासून ते आपली राजनीति, अर्थनीति आणि आपल्या समाजाच्या संघटनेचा विस्तृत इतिहास यांत पाहावयास मिळतो. त्या काळचे जलमार्ग, स्थलमार्ग याचीहि माहिती त्यांत आलेली आहे.

भदन्त आनद कौसल्यायन यांनीं 'हिंदी जातक प्रथम खंडाला' जी विस्तृत भूमिका लिहिली आहे त्याच्या आधारें हा जातक परिचय दिलेला आहे. त्याच पुस्तकांतील 'पंचावुधजातका'चा अनुवाद पुढें दिला आहे. जातक प्रथम खंड (प्रकाशक–हिंदी साहित्य सम्मेलन प्रयोग) पृ. ३५४]

पूर्वी वाराणसीमध्यें ब्रह्मदत्त राजा राज्य करीत होता. त्याच्या राणीच्या पोटीं बोधिसत्त्वानें जन्म घेतला.

त्याच्या बारशास १०८ ब्राह्मणांना संतुष्ट केल्यावर, त्याचीं लक्षणें त्यांना विचारलीं गेलीं ....ब्राह्मण म्हणाले, "महाराज, कुमार पुण्यवान आहे, तुमच्यानंतर तो राज्य प्राप्त करील. पंच शस्त्रें चालविण्यांत प्रसिद्ध होऊन, जम्बूद्वीपांत अग्रणी गणला जाईल." ब्राह्मणांचें म्हणणें ऐकून.. त्या कुमाराचें नांव पंचावुध कुमार ठेवलें. त्याला कळूं लागल्यानंतर आणि सोळावें वर्ष लागल्यावर, राजानें बोलावून सांगितलें–"बाळ, शिल्प शीक."

"देवा, कोणाजवळ शिकूं?"

"कुमार, जा, गान्धार देशांत तक्षशिला* नगरींतील लोकप्रसिद्ध आचार्यांच्या जवळ जाऊन शिक. त्या आचार्यांना हें शुल्क दे." असें सांगून हजार मुद्रा देऊन त्यांस पाठविलें.

त्यानें तेथें जाऊन शिल्प शिकून, आचार्यांनीं दिलेलीं पांच शस्त्रें घेऊन त्यांना नमस्कार करून, तक्षशिला नगरींतून निघून, पंचहत्यारबंद होऊन

* सध्यांचें 'शाहाजीची टेरी' जिल्हा रावळपिंडी.

वाराणसीचा रस्ता धरला. रस्त्यांत तो श्लेषलोम यक्षाच्या जंगलाच्या द्वारापाशीं आला. त्याला अरण्याच्या द्वारीं पाहून मनुष्यानें अडविलें " अरे माणवक या जंगलांत प्रवेश करूं नकोस. या जंगलांत श्लेषलोम यक्ष आहे. तो ज्या कोणा माणसाला पाहतो त्याला मारून टाकतो."

बोधिसत्त्व ... निर्भय केशरसिंहाप्रमाणें जंगलांत घुसला. त्यानें जंगलांत प्रवेश केल्यावर, ताडाइतका (उंच), घराएवढा (विस्तृत), भांड्याइतके (मोठे) डोळे असलेला यक्ष बोधिसत्त्वाला म्हणाला, " कहाँ जाता है? ठहर, तू मेरा आहार है।" बोधिसत्त्वानें धमकाविलें " यक्षा, मीं (माझ्या शक्तीचा) अंदाज घेऊन येथें प्रवेश केला आहे, तूं सांभाळून माझ्याजवळ ये, मी तुला विषयुक्त बाणांनीं विद्ध करून खालीं पाडोन." त्यानें विषयुक्त बाण चढवून तो सोडला. तो यक्षाच्या अंगास चिकटला. त्यानंतर दुसरा – – – असे पन्नास बाण त्यानें सोडले. समळे यक्षाच्या अंगाला चिकटले. त्या सगळ्या बाणांची मोडतोड करून यक्ष बोधिसत्त्वाजवळ आला.

बोधिसत्त्वानें पुनः त्याला भीति दाखवून, तलवार काढून (त्याच्यावर) प्रहार केला. तेहतीस अंगुळें लांब तलवार यक्षाच्या अंगास चिकटली, तेव्हां त्यानें बर्चीचा प्रहार केला; तीहि अंगाला चिकटली. (मुद्गलाची तीच स्थिति झाली.) तेव्हां तो म्हणाला, "हे यक्षा, 'पंचायुधकुमार' हें नांव तूं ऐकलें नाहींस काय? तुझ्या अधिकारांतील जंगलांत प्रवेश करतांना मी धनुष्य इत्यादींवर भरंवसा ठेवून आलेलों नाहीं. मीं माझ्या भरंवशावर प्रवेश केला. तेव्हां तुला आज चूर्ण-विचूर्ण करून मारून टाकतों." असें मोठ्यानें गर्जून त्यानें उजव्या हातानें यक्षाला ठोसा दिला, तों त्याचा हातच चिकटला. (तीच स्थिति डावा हात, दोन्ही पाय, डोकें यांची झाली.)

तो कुमार पांच जागीं चिकटलेला, पांच जागीं बांधलेला, लटकत असतांनाहि निर्भयच होता. यक्षानें विचार केला: हा एक पुरुषसिंह आहे, साधारण मनुष्य नाहीं. माझ्यासारख्या यक्षानें पकडलें तरी हा भीत नाहीं.–– असा मनुष्य आजपर्यंत आपण पाहिला नव्हता. यक्ष म्हणाला, " हे माणवक, तूं मृत्यूला कां भीत नाहींस?" " यक्षा, मीं कां भ्यावें? जन्माला आल्यावर मरणार हें ठरलेलेंच. माझ्या काखेंत 'वज्र' आयुध आहे. तूं मला खाल्लेंस तरी तें (शस्त्र) पचवूं शकणार नाहींस. तेव्हां मेलों तर

दोघे मरूं. म्हणून मी भीत नाहीं." बोधिसत्त्वानें हें आपल्या हृदयांतील ज्ञानायुधाबद्दल सांगितलें होतें.

हें ऐकून यक्षानें विचार केला : माणवक खरें बोलतो आहे, माझा कोठा याचें तुकडाभर मांसहि पचवूं शकणार नाहीं. द्यावें याला सोडून. मृत्यूच्या भयानें तो यक्ष बोधिसत्त्वाला म्हणाला, "मनुष्या, तूं पुरुषसिंह आहेस. मी तुझें मांस खाणार नाहीं. आज तूं राहूच्या मुखांतून मुक्त झालेल्या चंद्राप्रमाणें माझ्या हातून सुटून आपल्या मित्रमंडळीस प्रसन्न करण्यास जा."

[ यानंतर बोधिसत्त्वानें यक्षाला सदाचाराच्या गोष्टी सांगून सन्मार्गानें राहण्यास सांगितलें. ]

**अभ्यास :**—१. तत्कालीन शस्त्रविद्येचें शिक्षण कोठें दिलें जाई ? शस्त्रांचे प्रकार सांगा. तलवारीची लांबी किती होती ? हीं शस्त्रें आजहि वापरलीं जातात काय ? शस्त्रबलाप्रमाणें आणखी कोणत्या बलाची आवश्यकता असते ? असें कोणतें बल किंवा शस्त्र पंचायुध कुमाराजवळ होतें ? २. प्राचीन काळीं तक्षशिला येथें विद्याभ्यासाची कोणकोणती व्यवस्था होती त्याची माहिती मिळवा. ३ जंबूद्वीप म्हणजे कोणता देश ?

---

## ११ : : समुद्रगमन

[ जातक कथांतील समुद्रगमन दर्शविणारी कांहीं वाक्यें येथें दिलीं आहेत. वाक्यापुढें जातकाचें नांव आहे. ]

१. वायूच्या लहरीप्रमाणें समुद्राच्या मध्यभागीं असलेल्या बेटापर्यंत त्यांनीं जलप्रवास केला.—**समुद्द–वणिज्य जातक**

२. चार महिने खूप दूरच्या प्रदेशापर्यंत जहाज मार्ग क्रमीत आहे, आणि आतां जणूं काय आधिदैविक सामर्थ्य प्राप्त झाल्याप्रमाणें अवघ्या एका दिवसांत बंदरास तें परत आलें. —**सुप्परक जातक**

३. एक दिवस त्यानें विचार केला 'माझी संपत्ति एकदां संपली कीं दान करण्यास माझ्याजवळ कांहींच राहणार नाहीं. ती शिल्लक आहे तोंपर्यंत एक जहाज घेऊन सुवर्णदेशास जाऊन तेथून धन आणीन.' यासाठीं त्यानें जहाज बांधविलें, त्यांत व्यापाराच्या वस्तू ठेवल्या, बायकामुलांचा निरोप घेतला, बंदराच्या दिशेनें चालून, दुपारीं तो मार्गस्थ झाला.—**संख्य जातक**

**अभ्यास** :—१ जातककालांत जहाजें कशाच्या साहाय्यानें चालत ? प्रवासाचा मुख्य हेतु काय? २. यावरून समाजस्थितिदर्शक काय अनुमानें निघतात ?

---

## १२ : : झाडूवाला 'भिक्षु' झाला

[ सुनीत या नांवाच्या बुद्ध भिक्षूनें पुढीलप्रमाणें आपलें वृत्त निवेदिलें आहे. जातिभेदामुळें त्रस्त झालेल्या खालच्या वर्गाच्या लोकांनीं बौद्ध धर्माचा स्वीकार कां केला तें त्यावरून स्पष्ट होईल. पुढील उतारा रमेशचंद्र दत्त कृत 'एन्शन्ट इंडिया' या इंग्रजी ग्रंथांतून (भाग ४ था पृ. ११०–१११) घेतला आहे. हें वर्णन बुद्ध जिवंत असतांना म्हणजे इ. स. पू. ५ व्या शतकांतील आहे.]

" मी अगदीं हलक्या कुळांत जन्माला आलों. मी अगदीं गरीब आणि गरजू होतों. मी जें काम करीत होतों तें अगदीं नीच प्रतीचें होतें. वाळलेला पालापाचोळा झाडणें हें तें काम होय. यामुळें लोक माझा तिरस्कार करीत, मला हिणवीत आणि कौतुक तर क्वचित् होई. मी मात्र अत्यंत नम्रपणानें सर्वांना मान देत असे. अशा मनःस्थितींत मगधांतील प्रमुख शहरांतील भिक्षूंच्या मेळाव्यांत मीं बुद्धाला पाहिलें. मीं माझ्या डोक्यावरचें ओझें खालीं टाकून दिलें आणि त्याला नमस्कार करण्यासाठीं धांवत गेलों. दया येऊन तो श्रेष्ठ पुरुष तेथें थांबला. मग मीं त्याच्या चरणावर डोकें ठेवलें आणि त्या श्रेष्ठ पुरुषाची प्रार्थना केली कीं "भिक्षु म्हणून माझा तुम्ही स्वीकार करा." तेव्हां मला तो उदारधी स्वामी म्हणाला, " ये, हे भिक्षु इकडे ये !!" हीच माझी भिक्षूची दीक्षा होय.

**अभ्यास** :—गौतम बुद्धाकडे सुनीत कां गेला ?

---

## १३ : : श्रमणांचीं कर्तव्यें

[ गौतम बुद्धाच्या निर्याणानंतर लवकरच बौद्ध भिक्षुकांची मोठी सभा राजगृह येथें झाली. या सभेंत बुद्धानें केलेला उपदेश एकत्र संग्रहीत करण्यांत आला. ही बौद्धांची पहिली महासभा होय. शंभर वर्षांनंतर दुसरी सभा वैशाली येथें आणि तिसरी अशोकाच्या वेळीं पाटलिपुत्र येथें झाली. या महासभांतून धार्मिक साहित्याचें संहितीकरण करण्यांत आलें. त्याचे १ धम्म, २ विनय, ३ अभिधम्म असे तीन भाग आहेत. या सर्वांस मिळून ' त्रिपिटक ' (तीन पेट्या) असें म्हणतात. धम्मपदामध्यें बुद्धानें केलेला उपदेश संग्रहीत आहे. 'विनया'मध्यें भिक्षूंच्या आचरणाचे नियम सांगितलेले आहेत आणि 'अभिधम्मांत' बौद्धांचें तत्त्वज्ञान ग्रथित केलेलें आहे. 'त्रिपिटक' पाली भाषेमध्यें लिहिलेलें आहे. या सर्वांत धम्मपदाचें महत्त्व विशेष होय. मूळ पालीमधील या ग्रंथाचें भाषांतर जगांतील अनेक भाषांमध्यें झालेलें आहे. त्यांतील कांहीं श्लोकांचा अर्थ पुढें दिलेला आहे. त्यावरून बौद्ध धर्माची शिकवण कळून येईल. प्रस्तुत भाषांतर, भिक्षु आनंद कौसल्यायन यांनीं केलेल्या हिंदी अनुवादाच्या आधारें केलेलें आहे. प्रारंभीं श्लोकांचे आंकडे आहेत. श्लोकांचा अनुवाद विषयानुसार परिच्छेद करून येथें दिला आहे ]

(१४१) ज्या मनुष्याच्या वासना शिल्लक आहेत त्याची शुद्धि लंगोटी नेसल्यानें, जटा वाढविल्यानें, चिखल (अंगास) फासल्यानें, उपवास करण्यानें, कठिण जमिनीवर झोंपण्यानें, भस्म लाविल्यानें अथवा उकिडवें बसण्यानें होत नाहीं. (१४२) अलंकार अंगावर असतांहि जर त्याचें आचरण सम्यक् असेल, तो शान्त व दान्त असेल, नियत ब्रह्मचारी असेल, तर आणि त्यानें कोणत्याहि प्राण्याला शिक्षा करण्याचें सोडून दिलें आहे तर तोच ब्राह्मण आहे, तोच श्रमण आहे आणि तोच भिक्षु आहे (१८३) कोणतेंहि पाप न करणें, पवित्र कार्य करणें, चित्त शुद्ध राखणें ही बुद्धाची शिकवण होय.

(२२०) पुष्कळ काळ विदेशांत राहून सकुशल परत आल्यावर जात, बंधु, मित्र जसें त्याचें अभिनंदन करतात, तसें या लोकांतून परलोकांत गेल्यावर पुण्यवान् पुरुषाचें पुण्य त्याचें स्वागत करतें. (२२४) सत्य बोला, क्रोध करूं नका, कोणीं मागितल्यास थोडें असलें तरी द्या, या

तीन गोष्टी केल्यास मनुष्य देवतांच्या पायाशीं जातो. (२२५) जो मुनिजन अहिंसक आहे, ज्याचा शरिरावर ताबा आहे, तो अशा स्थानास जातो कीं जेथें जाण्यानें कधीं शोक होत नाहीं.

(३१५) ज्याप्रमाणें सीमान्त देशावरील नगर आंतून आणि बाहेरून सुसज्ज असतें त्याचप्रमाणें आपलें रक्षण करावें, एक क्षणहि जाऊं देऊं नये. वेळ निघून गेली म्हणजे नरकांत पडून शोक करण्याचा प्रसंग येतो. (३२२) जगामध्यें मातृसेवा, पितृसेवा, श्रमणत्व (संन्यास) आणि निष्पाप होणें हें सुखकर होय.

(३६२) ज्याचें हात, पाय आणि वाणी यांवर नियंत्रण आहे, जो उत्तम संयमी आहे, जो आपल्यांतच मग्न आहे, जो समाधियुक्त आहे, जो एकटा राहतो, जो संतुष्ट आहे त्यास भिक्षु म्हणतात. (३९३) जटा, गोत्र किंवा जन्म यावरून ब्राह्मण ठरत नाहीं, ज्याच्यांत सत्य व धर्म आहे तोच व्यक्ति पवित्र होय आणि तोच ब्राह्मण होय.

**अभ्यास** :—१. ब्राह्मण व भिक्षु यांचीं येथें कोणतीं लक्षणें सांगितलीं आहेत? २. गीतेंतील स्थितप्रज्ञाचें वर्णन यांतील कोणत्या श्लोकांशीं जुळतें आहे ? ३. बौद्धधर्म हा स्वतंत्र धर्म आहे कीं वैदिक धर्मांत सुधारणा करणारा पंथ आहे ? या उपदेशावरून काय अनुमान निघतें ? ४. सीमेवरील नगर कसें रक्षण करतात असें यांत लिहिलें आहे ?

---

## १४ : : शिकंदरानें हत्तीदलाचा कसा पराभव केला ?

[ शिकंदर ऊर्फ अलेक्झांडर यानें हिंदुस्थानवर (इ. स. पूर्वी ३२७) स्वारी केल्यापासून युरोपांत हिंदुस्थानची विशेष माहिती होऊं लागली. त्याच्या मृत्यूनंतर मौर्य राजांच्या दरबारांत ग्रीक वकील आलेले होते. त्यांनीं येथील परिस्थितीचे वृत्तांत लिहिले आहेत. यांतील मेगॅस्थेनीसकडून पुष्कळ माहिती मिळते. त्याचें मूळ पुस्तक सांपडत नाहीं, पण त्यांतून स्ट्रॅबो, एरियन, डिडोरस, आदि ग्रीक लेखकांनीं घेतलेल्या उताऱ्यांचा संग्रह(Indika of Megasthenes & Arrian) या नांवानें प्रसिद्ध आहे. (संपादक डॉ. मॅक्रिंडल) पुढील उतारा एरियन या दुसऱ्या लेखकाचा आहे. एरियन हा ग्रीक–रोमन (Graeco-Roman) अधिकारी होता. त्यानें इ. स. च्या दुसऱ्या शतकांत

भारताचें वर्णन आणि शिकंदराच्या स्वारीचें विवेचनात्मक वृत्त लिहिलें. अलेक्झांडरच्या अधिकाऱ्यांपैकीं लॅगोसचा मुलगा टॉलेमी (Ptolemy) आणि त्याचे सहकारी यांच्या माहितीवर एरियननें आपला ग्रंथ रचिला असल्यानें, समकालीन वृत्तांताचें महत्त्व त्यास आहे. पुरु राजाच्या सैन्याचा पराभव कसा केला गेला ह्याचें वृत्त पुढें दिलें आहे.]

लहान परिघांत कोंडले गेल्यानें हत्तींनीं शत्रूंची व मित्रांचीहि खूप नासाडी केली. पुढें मागें पळतांना किंवा गोल फिरतांना त्यांच्या पायाखालीं जें सांपडलें त्यांस त्यांनीं तुडविलें. याचा परिणाम म्हणून घोडदळाचा चुराडा झाला, कारण तेंहि हत्तीभोंवतीं असलेल्या थोड्या जागेंत कोंडलें गेलें होतें. कित्येक माहूत मारले गेले होते, कांहीं हत्ती जखमी झाले होते, थकल्यामुळें आणि माहुतांच्या मृत्यूमुळें युद्धांतील एका बाजूस ते राहिनात. झालेल्या वेदनांमुळें घाबरून ते शत्रुमित्रांवर (वाट फुटेल तिकडे जाऊन) घसरले व त्यांना पायतळीं तुडविलें आणि सर्व रीतीनें संहार केला. परंतु मॅसिडोनियनांना (मागें) मैदान मोकळें असल्यानें वाटेल तशी हालचाल करतां येई. हत्तींचा हल्ला आला कीं ते बाजूला सरत, आणि हत्ती परतले कीं त्यांचा पाटलाग करून बाणांच्या वर्षावानें त्यांस जर्जर करीत. भारतीय सैन्य या पशूंच्या मध्येंच होतें, त्यामुळें तें (हत्तींच्या क्रोधास) फार मोठ्या प्रमाणांत बळीं पडलें!

जेव्हां हत्ती अगदीं थकून गेले आणि त्यांचा हल्ला करण्याचा कांहीं उपयोग होईना, तेव्हां जहाजें जशीं तीराला येतात त्याप्रमाणें ते शत्रूकडे तोंड करून ओरडत ओरडत मागें मागें परतूं लागले. या वेळीं शिकंदरनें शत्रूला चोहों बाजूंनीं घोडदळानें वेढलें, आणि शक्य तितक्या सांघिक फळीनें शत्रूवर हल्ला करण्यास पायदळास आज्ञा केली. यामुळें झालेल्या चकमकींत भारतीयांचें बहुतेक घोडदळ खलास झालें. तीच पाळी भारतीय पायदळावर आली, कारण सर्व बाजूंनीं मॅसिडोनियन आंत आंत येत चालले होते.

यामुळें अलेक्झांडरच्या घोडदळाच्या वेढ्यांतून जेथें मोकळी जागा सांपडेल तेथून भारतीय सैनिक पळ काढूं लागले.

## १५ : : पाटलिपुत्राचा विस्तार

[ मेगॅस्थिनीसनें पाटलिपुत्र नगरासंबंधीं पुढील वर्णन लिहिलें आहे. ]

शोण आणि गंगा नदीच्या संगमावर पाटलिपुत्र शहर वसलें आहे. गंगा ही मोठ्या नद्यांपैकीं असून शोणचा क्रमांकहि तिसरा लागेल. पाटलिपुत्र हें मोठें नगर आहे. त्याची जास्तींत जास्त लांबी ९॥ मैल व रुंदी १$\frac{3}{4}$ मैल आहे. नगराच्या भोंवतीं ६०६ फूट रुंदीचा व ३० फूट खोलीचा खंदक आहे. शहराच्या तटास ५७० बुरुज व ५० प्रवेशद्वारें आहेत.

**अभ्यास** :—१. प्राचीन इतिहासाची माहिती ग्रीस देशांत सांपडते आणि आपल्याकडे कां सांपडत नाहीं ? २. पोरसला हत्तींचा उपयोग कां झाला नाहीं ?

---

## १६ : : सेल्यूकस व चंद्रगुप्त मौर्य

[ शिकंदराच्या मृत्यूनंतर सेल्यूकस हा आशियांतील ग्रीक साम्राज्याचा मुख्य झाला. त्याचा व चंद्रगुप्ताचा स्नेहसंबंध जडला, त्या काळाला अनुलक्षून पुढील उतारा आहे. याचा मूळ लेखक ऑगस्टस हा रोमन सम्राटांच्या वेळचा (इ. स. १४) आहे. त्याचा उतारा जस्टिन यानें आपल्या ग्रंथांत दिला. जस्टिन हा पांचव्या शतकांत होऊन गेला असें मानतात.—दि इंडियन ॲन्टिक्वेरी, व्हॉल्यूम ४, पृ. ११४]

मॅसिडोनियाच्या राज्याची विभागणी शिकंदराच्या मृत्यूनंतर झाली. त्यांतील पूर्वेकडील भागांतील राज्यकर्त्यांशीं सेल्यूकसनें पुष्कळ युद्धें केलीं. प्रथम त्यानें बाबिलोनिया जिंकलें. या विजयानें सामर्थ्य वाढल्यानें त्यानें बॅक्ट्रिया ताब्यांत आणलें. त्यानंतर तो हिंदुस्थानापर्यंत पोहोंचला.

तेथील लोकांनीं आपल्या मानेवरील गुलामगिरीचें जूं झुगारण्यासाठीं, शिकंदरनें नेमलेल्या अधिकाऱ्यांना ठार केलें होतें. चंद्रगुप्तानें या देशास स्वतंत्र केलें, परंतु विजय मिळतांच स्वातंत्र्याचें रूपांतर त्यानें गुलामगिरींत केलें. ज्या लोकांना परकीयांच्या दास्यत्वांतून त्यानें मुक्त केलें त्यांवरच तो स्वतः जुलूम करूं लागला. अशा रीतीनें राजपद मिळविलेल्या चंद्रगुप्ताच्या आधीन ज्या काळीं हिंदुस्थान होता त्या काळीं सेल्यूकसनें चंद्रगुप्ताशीं करार केला.

पूर्वेकडील साम्राज्याची (याप्रमाणें) व्यवस्था लावून अन्टिओकसच्या विरुद्ध उद्भवलेल्या युद्धांत तो गुंतला

**अभ्यास** :—चंद्रगुप्त मौर्याविषयीं जस्टिनचें मत काय आहे ? हें मत ग्राह्य मानतां येईल काय ? 'हो' अगर 'न' कारास कारणें द्या.

---

## १७ : : मौर्यकालीन राजाची दिनचर्या

[ महाभारतांत राजधर्म प्रकरणांत आणि इतरत्रहि राजनीतिसंबंधी चर्चा आलेली आहे. मनुस्मृति आदि ग्रंथांतहि त्यास महत्त्वाचें स्थान आहे. यानंतरचा परंतु प्राचीन कालचा राजनीतिशास्त्रावरील महत्त्वाचा ग्रंथ म्हटला म्हणजे ख्रि. पू. ३२५ च्या सुमारास रचिलेला 'कौटिलीय अर्थशास्त्र' होय. यापूर्वी अर्थशास्त्रावर सतरा ग्रंथकार झाले, असे या पुस्तकांतील उल्लेखावरून दिसतें. परंतु ते ग्रंथ उपलब्ध नाहींत.

या पुस्तकाचा कर्ता कुटिलपुत्र चाणक्य हा चंद्रगुप्त मौर्याच्या दरबारीं मुख्य सल्लागार होता. तथापि याबद्दल कांहीं विद्वान् शंकित आहेत. गुप्ताच्या पदरचा ग्रीक वकील मेगॅस्थेनीसनें या ग्रंथाचा उल्लेख केला नाहीं असा मद्दा त्यांच्याकडून पुढें मांडला जातो. परंतु तो प्रबळ दिसत नाहीं. कारण मेगॅस्थेनीसचें स्वतःचें सर्व लेखन आतां उपलब्ध नाहीं, त्याचे कांहीं त्रुटित उतारे सांपडतात. तेवढ्यावरून असें अनुमान काढणें चूक होय. चंद्रगुप्ताच्या दरबारींच हा कौटिल्य होता हें सप्रमाण सिद्ध करण्याचें कार्य कौटलीय अर्थशास्त्राचे मराठी अनुवादक श्री.ज.स. करंदीकर व रा. हिवरगांवकर यांनीं आपल्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत केलें आहे. या ग्रंथांतूनच अध्याय १९मधून पुढील उतारा घेतला आहे.

या ग्रंथांत, गांवें वसविणें (अ. २२) आयुधागाराध्यक्ष, शस्त्रांचीं नांवें (अ. ३९) विवाहसंबंध इत्यादि अनेक चांगलीं प्रकरणें आहेत, तीं अभ्यासूंनीं अवश्य वाचावींत. ]

राजा उद्योगी असला म्हणजे चाकरहि उद्योगी होतात. राजाच्या हातून दुर्लक्ष होऊं लागल्यास चाकरहि दुर्लक्ष करतात व राज्याचा विघात करतात.....

घटका–पात्रांच्या साहचानें किंवा सांवली मोजून दिवस व रात्र यांचे आठ आठ भाग करावे...दिवसाच्या पहिल्या भागांत राज्यांतील बंदोबस्ताची

हालहवाल व जमाखर्च ऐकावा. दुसऱ्या भागांत नागरिकांच्या तक्रारी ऐकाव्या. तिसऱ्या भागांत स्नान व भोजन करावें व अभ्यास करावा. चवथ्या विभागांत वसुलीचा स्वीकार करावा व निरनिराळ्या खात्यांतील अध्यक्षांच्या भेटी घ्याव्या. पांचव्या भागांत पत्रें पाठवून मंत्रिपरिषदेची सल्लामसलत घ्यावी व गुप्त हेरांनीं आणलेल्या महत्त्वाच्या बातम्या ऐकाव्या. सहाव्या विभागांत स्वच्छंद विहार करावा किंवा मसलत करावी. सातव्या विभागांत हत्ती, घोडे, रथ व योद्धे यांची पाहणी करावी. आठव्या विभागांत सेनापतीबरोबर युद्धचर्चा करावी.

संध्याकाळ झाल्याबरोबर संध्या करावी....रात्रीच्या पहिल्या भागांत गुप्त हेरांची भेट घ्यावी. (तिसऱ्या, चवथ्या, पांचव्या-सहाव्यामध्यें गीत-वाद्य श्रवण, शयन, शास्त्रचिंतन व) सातव्या भागांत मसलत करावी व गुप्त हेरांना कामें सांगून त्यांची रवानगी करावी. आठव्या भागांत ऋत्विज, आचार्य, पुरोहित यांचेकडून स्वस्तिवाचन करून घ्यावें; नंतर राजवैद्य, बल्लवाधिकारी, ज्योतिषी यांची भेट घ्यावी, सवत्स धेनूला व बैलाला प्रदक्षिणा करून दरबारला जावें, किंवा आपल्या शक्तीप्रमाणें अहोरात्राचे कमजास्त भाग करून त्याप्रमाणें कार्य करावें.

दरबारांत गेल्यावर अर्जदारांना आंत येण्यास मोकळीक द्यावी .... राजानें देवस्थानें, आश्रम, पुण्यस्थानें, रोगी, व्यसनी यांचीं कामें ...पाहावींत.

उद्योग, यज्ञ, न्यायदान, द्रव्यदान, निःपक्षपाती आचरण व यज्ञांत अवभृतस्नान हीं राजाचीं व्रतें आहेत.

प्रजासुखे सुखं राज्ञः प्रजानां च हिते हितम् ।
नात्मप्रियं हितं राज्ञः प्रजानां तु प्रियं हितम् ॥

(प्रजासुख हेंच राजाचें सुख. प्रजेचें हित हेच राजाचे हित. स्वतःच्या इच्छेची तृप्ति करण्यांत त्याचें हित नसतें, तर प्रजेच्या इच्छेप्रमाणें वागण्यांत त्याचें हित असतें.)

**अभ्यास** :—१. मौर्यकालीन राजाचा एक दिवसाचा आदर्श कार्यक्रम सांगा. २. 'राजा'चा मुख्य हेतु काय? याप्रमाणें वागणाऱ्या कांहीं प्राचीन राजांचीं नांवें लिहा. ३. राजाचीं व्रतें कोणतीं? राजांनीं कोणत्या महत्त्वाच्या गोष्टीकडे लक्ष दिलें पाहिजे. ४. 'मनूनें सांगितलेलीं राजाचीं कर्तव्यें' (पुढील उतारा क्रमांक २४) व हा उतारा यांच्यांतील साम्यभेद दाखवा.

## १८ : : अशोकाच्या चौदा आज्ञा

[ अशोक हा मगधावर राज्य स्थापणाऱ्या चंद्रगुप्त मौर्याचा नातू होय. तो राज्यावर आला तेव्हांच उत्तर हिंदुस्थान व दक्षिण हिंदुस्थानांतील पुष्कळ भाग मौर्यांच्या सत्तेखाली आलेला होता. कलिंग देश अशोकानें जिंकला. अशोकाच्या कारकीर्दीचा काल ख्रि. पू. २७३ ते २३७ आहे.

प्रजेंत स्नेहभाव वाढावा, दया आणि अहिंसा यांचा प्रचार व्हावा म्हणून त्यानें आपल्या चौदा आज्ञा, जागोजाग, सोप्या भाषेंत कोरून ठेविल्या आहेत. त्याच्या शिलालेखाचे गिरिलेख, स्तंभलेख व गुहालेख असे तीन भाग करतां येतील. ह्या लेखांतून त्यानें सामान्य लोकांस आज्ञा व अधिकाऱ्यांस सूचना केलेल्या आहेत. बहुतेक लेखांतून एखाद्या विशिष्ट धर्मपथाचा उपदेश करण्याऐवजीं मानव धर्माच्या सामान्य नीतितत्त्वांचा पुरस्कार केलेला आहे.

त्याचे लेख देशाच्या चारी भागांत आढळतात. पेशावरजवळ शहाबादगड येथें, ठाणें जिल्ह्यांत सोपारा गांवीं, काठेवाडमध्यें गिरनार या ठिकाणीं, ओरिसा प्रांतांत जगन्नाथपुरीनजीक धौली या गांवीं व दक्षिणेस गंजम जिल्ह्यांत जावगड येथें या आज्ञा पाहावयास सांपडतात.

गिरनारच्या लेखांचा (चौदाहि आज्ञांचा) अनुवाद डॉ. श्री. व्यं. केतकर यांनीं मराठींत केला आहे. त्यांतील १२ व १३ व्या शासनांचा व धौलीच्या लेखाचा अनुवाद येथें दिला आहे. (यांतील कांहीं श्लोकांचा अर्थ स्पष्टपणें लागत नाहीं). प्राचीन महाराष्ट्र, पृ. ३५०–३५३ व पृ. ३६५–३६७ ]

(क) राजा देवप्रिय प्रियदर्शी सर्व संप्रदायांना मान देतो. संन्याशी आणि गृहस्थाश्रमी ह्या दोघांनाहि मान देतो. तो राजा दान व नाना तऱ्हेनें पूजा व सत्कार करून मान देतो.

(ख) परंतु हा देवप्रिय राजा दान किंवा सत्कार ह्यांना सर्व संप्रदायांची सारवृद्धी (तत्त्वांची जोपासना) इतकें महत्त्व देत नाहीं.

(ग) परंतु सर्व संप्रदायांची सारवृद्धि पुष्कळ मार्गांनीं होऊं शकेल.

(घ) परंतु त्याचें मूल म्हणजे आपल्या स्वतःच्या वाचेवर नियंत्रण (वचिगुप्ति) म्हणजे संप्रदायाची स्तुति न करणें, परसंप्रदायाची अवास्तव

निंदा न करणें किंवा ती अप्रासंगिक तरी न करणें किंवा प्रसंगामुळें करावी लागल्यास थोडी करणें हें होय.

(ङ) परंतु अन्य संप्रदायाचासुद्धां वाजवी सत्कार केलाच पाहिजे.

(च) जर एखादा ह्याप्रमाणें आचरण करील तर तो स्वपंथाची उन्नति करील व परपंथाला उपकृत करील.

(छ) परंतु जर एखादा ह्याविरुद्ध वर्तन करील तर तो स्वपंथ नष्ट करून परपंथावर अपकार करील.

(ज) जो कोणी आपल्या संप्रदायाची पूजा करतो, आणि परसंप्रदायाची निंदा करतो तो हें सर्व आपल्या संप्रदायावरील भक्तीनें करतो. आणि त्यास वाटतें कीं, मीं आपला संप्रदाय उद्दीपित केला; तो तर तसें करतांना आपल्या संप्रदायाचाच घात करतो.

(झ) तर मग समवाय हीच चांगली गोष्ट आहे. (कां कीं) एकमेकांचे धर्म एकमेकांनीं ऐकावेत व मानावेत.

(ञ) देवानांप्रियाची इच्छा अशी आहे कीं, सर्वच संप्रदाय बहुश्रुत आणि कल्याणपर असोत.

(ट) जे तेथें (आपल्या मतावर) प्रसन्न आहेत त्यांना असें सांगावयाचें कीं,

(ठ) देवानांप्रिय जितका सर्व मतांच्या मूलभूत तत्त्वांच्या पुरस्कारास (सारवृद्धीस) मान देतो तितका दान किंवा पूजा यांस मान देत नाहीं.

(ड) या कामासाठीं पुष्कळच (अधिकारी) आहेत. धर्मासाठीं महामात्र, स्त्रियांवरील महामात्र, व्रजांचे तपासनीस व इतर अधिकारी (निकाय).

(ढ) आणि याचें फळ असें आहे कीं, याच्या योगानें स्वतःच्या संप्रदायाची वृद्धि होते आणि धर्माचें दीपन होतें.

**अभ्यास**:—विरुद्ध मताच्या लोकांशीं कसें वागावें, असें अशोकानें सांगितलें आहे? असें वागण्यानें आपल्या पंथाचा तोटा होतो काय?

**[शासन १२ वें]**

---

## १९ शासन १३ वें

(क) [ देवानांप्रिय प्रियदर्शी याच्या अभिषेकास आठ वर्षें झालीं असतां ] कलिंग [ जिंकला गेला. ]

(ख) लाखापर्यंत तेथें मारले गेले आणि किती तरी पट मेले.

(ग) त्यानंतर आतां कलिंग लाभल्यावर तीव्र धर्मवाय (धर्माभ्यास) [ झाला आणि देवानांप्रियाच्या ठायीं धर्मकामता आणि धर्मानुवृत्ति स्थापित झाली. ]

(घ) [ कलिंग जिंकल्यावर ] देवानांप्रियास [ पश्चात्ताप झाला ]

(ङ) लोकांचा अपवाद [ हद्दपारी ] पुष्कळच झाला. हा देवानांप्रियास दुःखद झाला.

(च) पण पुढील गोष्टीबद्दल देवानांप्रियास अधिकच दुःख होतें.

(छ) जे तेथें राहत होते अशा ब्राह्मण आणि श्रमण व इतर [ शुश्रूषेस योग्य अशा संप्रदाय यांच्या ठायीं,........शुश्रूषा ] आईबाप यांच्या ठायीं शुश्रूषा, गुरुशुश्रूषा, मित्र, संस्तत आणि सहाय्य आणि ज्ञाति यांची आणि दास अथवा अभिरक्तांचें (प्रेम करणारांचे) निर्यातिन.

(ज) ज्ञाती (मित्र, आप्त इ. मंडळी ) व्यसनांत सांपडली त्यांच्या योगानें (ज्यांची ज्ञाति ) त्यांना देखील दुःख होतें.

(झ) हें सर्वांनाच भोगावें लागतें [ आणि देवप्रियास याबद्दल खेद होतो ].

(ञ) हे निकाय [ असा देश नाहीं कीं जेथें ब्राह्मण, श्रमण हे वर्ग नाहींत. ] यवनांखेरीज इतरत्र तेथें माणसांत एकाहि मताला आसक्ति (प्रसाद) नाहीं.

(ट) म्हणून जे मेले आणि जे हाकलून दिले गेले, एकशतांश आणि एकसहस्रांश जनतेचा विभाग आणि देवानांप्रियास दुःख होत आहे.

(ठ) आणि देवानांप्रियास असें वाटतें कीं, ज्यानें त्याला दुःख दिले आहे त्यासहि क्षमा व्हावी.

(ड) देवानांप्रियाच्या राज्यांत जीं अरण्यें आहेंत तेथील लोकांस देखील तो शांत करतो आणि वळवितो.

(ढ) देवानांप्रियास जें सामर्थ्य आहे तें त्याला पश्चात्ताप झाला

तरी कायम आहे. तें त्यांस शासन करण्याचें सामर्थ्य त्यांना कळविलें जातें. अशाकरितां कीं त्यांना आपल्या अपराधांबद्दल लाज वाटावी आणि त्यांस मृत्यु येऊं नये.

(ण) कां कीं अपराध झाला असतांहि देवानांप्रिय सर्वांविषयीं अहिंसा, संयम आणि निःपक्षपातीपणा यांचा अवलंब करू इच्छितो.

(त) आणि हाच जय तो खरा जय आहे असें देवानांप्रिय मानतो.

(थ) आणि हा जय देवानांप्रियानें वारंवार मिळविला आहे. हा शेजाऱ्यांवर मिळविला आहे आणि त्याचप्रमाणें जे सहा हजार योजनांवर राहतात--जेथें यवन राजा अंतियोक राज्य करीत आहे--जेथें अंतियोकापलीकडे चार राजे आहेत म्हणजे तुरमाय नांवाचा, अतिकिनि नांवाचा, मग नांवाचा आणि अलिकसुंदर नांवाचा आणि दक्षिणेकडे चोड, पांड्य, ताम्रपणीपर्यंत.

(द) त्याचप्रमाणें या राजाच्या राज्यांत योनांमध्यें आणि कांबोजांमध्यें, नभकांमध्यें आणि नभितांमध्यें, योजांमध्ये आणि पितनिकांमध्यें, आंध्रांमध्यें आणि पलिदांमध्यें—सर्वत्र लोक देवानांप्रियाचें धर्मशिक्षण घेत आहेत.

(ध) जेथें देवानांप्रियाचे दूत जात नाहींत तेथें देखील देवानांप्रियाचीं धर्मकर्तव्यें आणि शासनें ऐकून लोक धर्माचरण करीत आहेत.

(न) हा जय सर्वत्र मिळविला आहे. हा वारंवार मिळविला आहे आणि तो संतोषाची भावना उत्पन्न करीत आहे.

(प) धर्माच्या योगानें जो विजय उत्पन्न होतो त्याच्या योगानेंच मला समाधान उत्पन्न होतें.

(फ) पण या संतोषाचें महत्त्व देखील थोडेंच आहे.

(ब) देवानांप्रियास वाटतें कीं परलोकीं प्राप्त होणारें फल अधिक मोठें आहे.

(भ) आणि ज्या हेतूनें पुढील धर्मलिपि लिहिली जात आहे, तो हा कीं माझे जे पुत्रपौत्र होतील त्यांनीं नवीन विजयांचा विचार करूं नये आणि जर विजयांची इच्छा झालीच तर दया आणि हलक्या शिक्षा त्यांनीं द्याव्या आणि धर्मविजय तोच खरा विजय समजावा.

(म) हाच विजय इहलोकीं आणि परलोकीं फलदायी होतो.

(य) सर्व वासनांच्या त्यागामध्यें त्यांनीं आनंद मानावा आणि धर्माचरणांत आनंद मानावा.

(र) कारण हें धर्माचरण येथें व इतरत्र फलदायी होई.

**अभ्यास** :--१. तेराव्या शासनानुसार खरा विजय कोणता ? असा विजय कोणकोणत्या भागावर अशोकानें मिळविला आहे ? २. कलिंग विजयानंतर अशोकास कोणतें दुःख झालें होतें ? ३. अशोकाच्या समकालीन कांहीं परकीय राजांचीं नांवें सांगा. 'यवन' याचा अर्थ काय ?

---

## २० : : धौली येथील लेख

(क) देवप्रियाच्या वचनानें तोसलि येथील महामात्र जे नगराचे न्यायाधीश आहेत त्यांस कळविलें जात आहे कीं,

(ख) जें मी योग्य म्हणून मानतों तें मी अनेक उपायांनीं घडवून आणतों.

(ग) आणि हें (लिखित) तुम्हाला सूचना करण्यासाठी योजलेल्या उपायांतील मुख्य आहे.

(घ) कां कीं तुम्ही हजारों मनुष्यांशीं त्यांचें प्रेम संपादन करून घेण्यासाठीं गुंतले आहांत.

(ङ) सर्व लोक मला अपत्यासमान आहेत.

(च) आणि मी आपल्या अपत्यांसाठीं हें इच्छितों कीं, त्यांच्या इहलोकींच्या आणि पारलोकिकच्या कल्याणांची तरतूद व्हावी; इतर मनुष्यांविषयीं देखील मी तेंच इच्छितों.

(छ) माझे हे हेतु किती दूरवर पसरले आहेत हें आपणांस ठाऊक नाहीं काय ?

(ज) कोणा विशिष्ट व्यक्तीला हें समजतें आणि त्यालादेखील हें अंशेंकरून समजतें, पुरें समजत नाहीं.

(झ) तुमची जरी तरतूद करून ठेवली आहे तरीहि ऐका,

(ञ) असें होतें कीं, राजव्यवहारांत कोणातरी एकाला बंदिवास अगर कठोर वागणूक प्राप्त होते.

(ट) जर कोणीं दंड चुकविण्याचा हुकूमनामा मिळविला आणि इतरांची शिक्षा चालू राहिली.

(ठ) अशा प्रसंगीं तुम्हीं या सर्वांशीं समतेनें (म्हणजे पक्षपात न करतां) वागण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

(ड) परंतु पुढील स्वभावामुळें मनुष्याकडून योग्य वागणूक होत नाहीं. ते स्वभाव म्हटले म्हणजे असूया, राग, क्रूरता, घाई, आळस आणि थकवा हे होत.

(ढ) तर तुम्हीं हे स्वभाव आपल्या ठायीं उत्पन्न होऊं नयेत म्हणून प्रयत्न केला पाहिजे.

(ण) या सर्व गोष्टींच्या मागें क्रोधाचा व घाईचा अभाव हीं पाहिजेत.

(त) जो थकला आहे तो चढूं शकणार नाहीं; परंतु प्रत्येकानें हाललें पाहिजे चाललें पाहिजे आणि पुढें गेलें पाहिजे.

(थ) जो इकडे लक्ष देईल त्यानें तुम्हांला सांगितलें पाहिजे कीं तुम्ही आनृण्य जोडा, आणि देवप्रियाची आज्ञा अशी अशी आहे.

(द) याचें अवलंबन अत्यंत फलदायी आहे आणि अनवलंबन हें मोठें अनिष्ट आहे.

(ध) कां कीं जर कोणी याचें अवलंबन चुकवील तर स्वर्गप्राप्ति होणार नाहीं व राज (प्रीति) लाभ देखील होणार नाहीं.

(न) कां कीं जर कोणी आपलें कर्तव्य चुकवील तर माझें मन प्रसन्न कसें होईल ?

(प) पण जर तुम्ही याचें अवलंबन कराल तर स्वर्ग मिळवाल आणि तुम्ही माझ्या ऋणापासून मुक्त व्हाल.

(फ) हे शासन (लिपि) सर्वांनीं तिष्य नक्षत्राच्या प्रसंगीं ऐकावें.

(ब) आणि तिष्य नक्षत्र असतां हें प्रत्येकानें आणि अनेकदां ऐकत जावें.

(भ) आणि जर तुम्ही असें वागाल तर तुम्ही आपलें कर्तव्य करूं शकाल.

(म) पुढील हेतूंसाठीं ही लिपि येथें लिहिली आहे, (कीं) नगराच्या न्यायाधीशांनीं यासाठीं नेहमीं प्रयत्न करावा म्हणून आणि गैरवाजवी बंधनें उत्पन्न होऊं नयेत आणि लोकांना कठोर रीतीनें वागविलें जाऊं नये म्हणून,

(य) आणि या हेतूच्या सिद्धीसाठीं मी दर पांच वर्षांनीं असा (एक

महामात्र) पाठवीन कीं जो फार कठोर नसेल किंवा भीषण नसेल तर सौम्य असेल, तो हें पाहील कीं न्यायाचे अधिकारी मीं जें शासन घालून दिलें आहे त्यांप्रमाणें वागत आहेत कीं नाहींत.

(र) तसेंच उज्जयिनीहून त्याच हेतूसाठीं दर कुमार त्याच प्रकारचा एक अधिकारी पाठवील, असा हेतु कीं निरीक्षणाशिवाय तीन वर्षेंदेखील जाऊं नयेत.

(ल) त्याच्याप्रमाणें तक्षशिलेहूनदेखील एक अधिकारी पाठविला जाईल.

(व) जेव्हां हे महामात्र दौऱ्यावर निघतील तेव्हां ते स्वतःचें कर्तव्य न दुर्लक्षितां, न्यायाधीश राजाज्ञेप्रमाणें काम करीत आहेत किंवा नाहीं हें पाहतील.

**अभ्यास** :—राज्यव्यवस्थेसंबंधीं कोणत्या सूचना या लेखांत आहेत? महामात्रांचीं कामें कोणती? त्यांनीं लोकांना कसें वागवावें?

**विशेष अभ्यास** : हे तीन लेख वाचून अशोकासंबंधीं पुढील माहिती लिहा. १ पूजेसंबंधीं कर्तव्याची कल्पना. २ परकीय सत्तेशी वागण्याची रीत. ३ धर्माची जाणीव. ४ धर्मलिपि लिहिण्याचीं कारणें. ५ कलिंग विजय. ६ परमतसहिष्णुता. ७ अशोकाची योग्यता.

---

## २१ : : शातवाहनासंबंधीं लेख

[ "नाना घाटांतील हे लेख अक्षरांच्या ठेवणीवरून खि. पू. २०० ते २५०च्या सुमारास कोरले गेले असावेत असें बहुतेक संशोधकांचें मत आहे. .... या लेखाच्या अर्थीकरणाकडे व्हावेत तसे परिश्रम अद्याप झालेले नाहींत. संशोधक साइक्स, डॉ. फरांके, स्टीव्हन्सन भगवानलाल इंद्रजी यांनीं असे प्रयत्न केले तरीदेखील कांहीं भागांचा अर्थ अजून लागत नाहीं.

प्रस्तुत नाना घाटाचें लिखाण अनेक तऱ्हांनीं अत्यंत महत्त्वाचें आहे. यांतील अनेक शब्द असे आहेत कीं ज्यांवर स्वतंत्र भाष्य करतां येईल.

नाना घाटाची जागा मोठी महत्त्वाची आहे. कारण आज कोंकणांतून पुणें जिल्ह्यांत उतरावयास किंवा नाशिककडे जावयास हा घाट महत्त्वाचा आहे. मुरबाडहून नाना घाटांत जावयाचें आणि तेथून जुन्नरला जावयाचें, हा क्रम सध्यांहि चालू आहे. अजून जुन्नरच्या बाजारांत ठाणें जिल्ह्यांतला माल नाना घाटांतून येतो. या घाटांतून मुरबाडकडे

जावयाचें तें सोपाऱ्याचें बंदर गांठण्याकरितां. हा प्राचीन काळचा व्यापाराचा रस्ता होता. नाना घाट शातवाहनांच्या ताब्यांत होता, एवढेंच नव्हे तर, ती त्यांची महत्त्वाची जागा होती."

वरील माहिती ही डॉ. केतकर यांच्या विवेचनावरून सारांशानें दिली आहे. जिज्ञासूंनीं 'प्राचीन महाराष्ट्र' पृ. ४०१ ते ४११ पहावीं.

नाना घाटांतील एकूण लेख ९ आहेत. त्यांपैकीं कांही लेख पुढें दिले आहेत. या लेखांच्या बरोबर मूर्ति होत्या त्या आज भग्न झालेल्या आहेत. लेखांचा मराठी अनुवाद डॉ. केतकरकृत आहे. ]

(१) ॐ प्रजापतीला नमस्कार असो.

नमस्कार धर्माला, इंद्राला, संकर्षण वासुदेव यांना आणि चंद्रसूर्यांना. महिमावतांना.

चारहि लोकपालांना (म्हणजे) यम, वरुण, कुबेर, वासव यांना नमस्कार.

(५) नागश्रेष्ठाच्या (दयिति = दयिता) स्त्रीचें, महिनाभर उपवास करणारीचें, गृहतापसीचें, ब्रह्मचर्याचें आचरण जिनें केलें अशीचें, दीक्षा, व्रत, यज्ञ यांत कुशल आहे तिचें, यज्ञांत धूप आणि सुगंध जिनें हुत केले आहेत तिचें.

(९) (पुंड) रिक यज्ञ दक्षिणेसाठीं दिल्या ११००० अश्व १००० प्रसर्पक....

(१४) गाई २००००....भगल.

दशरात्र यज्ञ जेथें दक्षिणा दिली गाई १०००१.

गर्गातिरात्र यज्ञ जेथें दक्षिणा......प्रसर्पकांस दिलेलीं वस्त्रें ३०१.

गवामयन यज्ञ जेथें दक्षिणा दिली गाई ११०१.

लेख ३ राजा सिमुक शातवाहन श्रीमान् याचा.

लेख ४ देवी नायनिका राजा श्री शातकर्णी यात्री इचा.

लेख ५ कुमार भाय...

लेख ६ महारठि त्र्यणकयिर.

लेख ७ कुमार हकुसिरि

लेख ८ कुमार सातवाहन

**अभ्यास**:—१. कोणत्या यज्ञांचीं नांवें या लेखांत आहेत ? दक्षिणा कोणत्या स्वरूपांत दिली आहे. २. कोणत्या राजासंबंधीं हा लेख असावा असें अनुमान करतां येतें ?

## २२ : : पहिल्या शतकांतील गणित

### भूर्जपत्रावर नफ्यातोट्याचीं उदाहरणें

[ पेशावर जिल्ह्यांतील मार्दन (Marden) तालुक्यांत बक्षाली गांवीं जीर्ण भूर्जपत्रें सांपडलीं. मार्दन ते बक्षाली रस्त्याच्या कडेस एके ठिकाणीं कांहीं मातीचीं टेकाडें आहेत. तेथें एक गांव होतें तें उध्वस्त झालें. य पैकीं एका टेकडींतील दगड काढीत असतांना हीं भूर्जपत्रें सांपडलीं. त्या ठिकाणीं तिकोनी दगड (Diva), काळ्या मातीचा एक लोटा इत्यादि वस्तू सांपडल्या. तेथून हीं भूर्जपत्रें हलविण्यांत आलीं. ही हलवाहलव करतांना भूर्जपत्रें खराब झालीं. भूर्जपत्रांवर शारदा लिपींत हें लेखन केलेलें आहे. अशीं ७० पृष्ठें सांपडलीं. पुष्कळ जागीं तीं जीर्ण झालेलीं आहेत. तरीसुद्धां में वाचता येत आहे त्यावरून चांगली माहिती मिळते. सध्यां तीं पत्रें ऑक्सफर्ड येथील बोडियन (Bodian Library) ग्रंथालयांत आहेत. G. R. Kaye यांनीं त्यांचें प्रथम संपादन केलें. त्यांच्या मतें याचा लेखनकाल १२ वें शतक असावा. हें मत पूर्वग्रहदूषित असून चुकीचें आहे असें प्रा. गुर्जर यांना वाटतें.

लेखनाची भाषा (संस्कृत–प्राकृत मिश्र), दिनार आणि द्राम (dramma) या नाण्यांचा उल्लेख, + या चिन्हाचा उणें दाखविण्यास उपयोग, घनमूळ काढण्याच्या पद्धतीचा अनुल्लेख इत्यादींवरून या भूर्जपत्रांचा लेखनकाल ख्रि. पू. २०० ते इ. स. २०० पर्यन्त ठरतो, असें प्रा. गुर्जर यांनीं सिद्ध केलें आहे. (Ancient Indian Mathematics & Vedha by Prof. L. V. Gurjar पृ. ४९–६० पहा.)

या लेखामध्यें त्रैराशिक, नफातोटा, सोन्यांतील हिणकसपणा काढण्याची रीत, ५ अव्यक्तें असलेलीं रेखात्मक समीकरणें, वर्गसमीकरणें, वर्गमूळ, गणितश्रेणी, मिश्रश्रेणी, वर्गकुट्टे इत्यादि प्रकारचीं उदाहरणें आहेत. त्यांतून पुढें एक उदाहरण दिलें आहे. ]

(Verse 61 ) सूत्रम् ॥

(विक्र) येन क्रयं भाज्यं रूपहीनं पुनर्भजेत् ।
(लाभेन) गुणयेत्तत्र नीवी भवति नत्रच ॥

उदा. ॥ द्विभिः क्रिणाति यस्सप्त विक्रिणाति त्रिभिषट् ।
अष्टादश भवेल्लाभ का (नीवी तत्र) कथ्यताम् ॥

| ७ | ६ | १८ | लाभ | करणम् ।---वि ।--- |
|---|---|---|---|---|
| २ | ३ | १ | | |

**अर्थ**—विक्रीच्या दरानें खरेदीच्या दरास भागा. एक उणे करा. त्यानें पुन: एकास भागा, त्यास नफ्यानें गुणा म्हणजे खरेदींत गुंतविलेलें भांडवल मिळेल.

$$\text{भांडवल} = \frac{१}{\left(\frac{\text{खरेदीचा दर}}{\text{विक्रीचा दर}}\right) - १} \times \text{नफा}$$

उदाहरण: एक जण २ ला ७ आणतो, आणि ३ ला ६ विकतो. तर १८ हा नफा असेल तर भांडवल काढा.

---

## २३ : : कनिष्कानें मरण ओढवून घेतलें!

[ कुशान टोळयांपैकीं कनिष्क हा पराक्रमी राजा होय. हा राजपदावर नक्की केव्हां आला या घटनेबद्दल संशोधकांत एकमत नाहीं. हा काल ख्रि. पू-५७–५८ ते ख्रि.नतर ७८ पर्यंतचा आहे. कांहींच्या मतें त्याचा काल इ. स. च्या तिसऱ्या शतकापर्यंत पुढें जातो.

कनिष्काची राजधानी पुरुषपूर (पेशावर) होती. प्रारंभींचें राज्य म्हणजे प्राचीन गांधार देश. पुढें पाटलिपुत्रापर्यंत त्याचें राज्य पसरलें. पश्चिम सीमेवर पर्शियन व रोमन साम्राज्याचा प्रदेश असून पूर्वेस चिनी साम्राज्य होतें. त्यानें चौथी बुद्धधर्मपरिषद श्रीनगर येथें भरविली. तो महायान पंथाचा पुरस्कर्ता होता. महाकवि अश्वघोष व आयुर्वेदाचा आचार्य चरक हे प्रसिद्ध विद्वान् कनिष्काच्या राजसभेंत होते.

डॉ. सिल्व्हन लेव्ही यांनीं कनिष्काच्या मृत्यूची दंतकथा प्रकाशित केली आहे. तिचें रूपांतर पुढें दिलें आहे. मूळ कथा श्रीधर्मपीटिके-मध्यें आहे. ]

कनिष्काच्या पदरीं माथर नांवाचा प्रधान होता. तो मोठा कल्पक व चतुर होता. एक दिवस तो कनिष्काला म्हणाला, " महाराज, तुम्ही जर या चाकराच्या सल्ल्याप्रमाणें वागाल तर सर्व जगाचे तुम्ही धनी व्हाल. तुम्हांस सगळे शरण येतील आणि आठहि प्रांत तुमच्या गुणावर लुब्ध होतील. दासाच्या या शब्दांवर विचार करा, मात्र यांतील एकहि शब्द

दुसऱ्यास सांगूं नका. " राजानें उत्तर दिलें, " प्रधानजी तुमचें म्हणणें मान्य आहे. तुम्ही सांगाल त्याप्रमाणें मी वागेन. "

कांहीं दिवसांनीं त्या मंत्र्यानें कुशल सेनापतींना बोलाविलें व त्यांना चतुरंग सेना दिली. त्यामुळें, जिकडे जिकडे राजा स्वारी करी तिकडे तिकडे लोक त्यांस नमस्कार करूं लागले. गारांच्या वर्षावापुढें ज्याप्रमाणें वनस्पति वांकतात, त्याप्रमाणें तीनहि प्रांतांतील लोक त्याच्यापुढें नमून वागूं लागले. कनिष्काच्या घोड्यांच्या टापेखालीं जें येई तें वाकें किंवा मोडे. अशा स्थितींत राजा ( कांहीं जणांजवळ ) म्हणाला: " मीं तीन प्रांत जिंकले, सगळे जण माझ्या आश्रयाला येत आहेत. परंतु उत्तरेकडील प्रांत तेवढा अद्याप माझ्या पकडींत आलेला नाहीं. तो प्रांत मीं जिंकला म्हणजे मग मी लढाई बंद करीन, अगदीं संधि आली तरी मी कोणावरहि हल्ला करणार नाहीं. या कामीं यश येण्याचा अचूक मार्ग अजून मला सांपडला नाहीं. "

राजाचें हें बोलणें लोकांना कळलें, तेव्हां ते एकत्र जमले व विचार-विनिमय करूं लागले. ते म्हणूं लागले, " हा राजा अधाशी, क्रूर आणि अविवेकी आहे. त्याच्या स्वाऱ्या आणि सतत चाललेले विजय यामुळें त्याचे सेवकहि थकलेले आहेत. तरीसुद्धां त्याला समाधान नाहीं तें नाहींच. चारहि दिशांवर अंमल गाजविण्याची आकांक्षा त्याच्यांत उत्पन्न झाली आहे. आजच त्याच्या राज्याच्या दूर दूर सीमेवर सैनिकी तळ आहेत, आणि यामुळें आमचे नातलग आमच्यापासून फार दूर गेले आहेत. आपण कांहीं तरी करून या राजाच्या तावडींतून सुटका करून घेतली पाहिजे. असें केलें तरच आपणांस सु मिळेल."

यानंतर कांहीं दिवसांनीं राजा कनिष्क आजारी पडला असतां कट-वाल्यांनीं त्याच्या अंगावर पांघरूण घातलें व एक जण त्याच्या छातीवर बसला. त्याच क्षणीं राजा मरण पावला.

**अभ्यास :** —१. दंतकथा म्हणजे काय ? प्रस्तुत दंतकथेंत सत्य काय असावें याचा अंदाज करा. २. अशा कांहीं दंतकथा संग्रहीत करा.

---

## २४ : : मनूनें सांगितलेलीं राजाचीं कर्तव्यें

[मनुस्मृति ही मळांत भृगू ऋषींनीं लिहिलेली असून तींत मागाहून पुष्कळ भर पडल्यासारखी वाटते. मूळ मनुस्मृतीचा रचनाकाल इ. पूर्व २०० असावा. या ग्रंथाला आजचें स्वरूप इ. स. च्या दुसऱ्या शतकांत प्राप्त झालें असें वेबरचें मत आहे. बौद्धधर्माच्या प्रसारामुळें वर्णांचा उच्चनीच भाव व रक्ताची शुद्धाशुद्धता यांचें महत्त्व नाहीसें झालें, त्याचें पुनरुज्जीवन व्हावें असा मनुस्मृतीचा प्रयत्न दिसतो. समाजांतील निरनिराळ्या वर्गांचीं कर्तव्यें या ग्रंथांत विशद करून सांगितलीं आहेत. ७व्या अध्यायांत 'राजधर्मान् प्रवक्ष्यामि' असें म्हणून 'राजाचीं कर्तव्यें' सांगितलीं आहेत. त्यांतील ३२ ते ३९ श्लोकांचा अनुवाद पुढें दिलेला आहे. 'मनुस्मृति' (संपादक प्राणजीवन शर्मा, आवृत्ति १९१३, पृ. २४०-२४१ च्या आधारें.]

(३२) स्वतःच्या राष्ट्रांत न्यायानुकूल वर्तन करणारा, शत्रु लोकांना अत्यंत कडक शासन करणारा, सुहृज्जनाविषयीं केव्हांहि कुटिल वर्तन न करणारा नि स्निग्ध (स्नेहशील) ब्राह्मणांना क्षमा करणारा असा तो नृपति असावा.

(३३) वरीलप्रमाणें वर्तन ठेवणाऱ्या, अत्यंत कमी प्रमाणांत कोश (सम्पत्ति) असलेल्या नृपतीचीहि कीर्ति पाण्यांत टाकलेल्या तेलाच्या थेंबाप्रमाणें जगांत विस्तार पावते.

(३४) आपापल्या परीनें आपापल्या धर्मांचीं आचरणें करणाऱ्या सर्व वर्णांचा नि आश्रमांचा (म्हणजे त्या त्या वर्णांतील नि आश्रमांतील लोकांचा) राजा हा अभिरक्षिता म्हणजे संरक्षण करणारा म्हणून नेमण्यांत आला आहे.

(३६) प्रजाजनांचें रक्षण करणाऱ्या त्या राजानें भृत्यजनांसकट जें कांहीं 'कर्तव्य' म्हणून करावयाचें तें क्रमानें मी येथें तुम्हांस सांगणार आहे.

(३७) सकाळीं उठल्यावर तिन्ही वेदांत प्रवीण, विद्वान् अशा ब्राह्मणांच्या सन्निध राजानें जावें, त्यांचा सल्ला घ्यावा, नि ते जें कांहीं कर म्हणून सांगतील तें त्याप्रमाणें करावें.

(३८) वेदज्ञानांत पारंगत, वयानें वृद्ध नि आचरणानें पवित्र अशा विप्रांच्या सान्निध्यांत सदैव राहावें. याप्रमाणें वृद्ध जनांच्या सान्निध्यांत (नि त्यांच्या शासनांत) राहणाऱ्या (राजा) ची पूजा राक्षस लोक (म्हणजे प्रतिपक्षी लोक) देखील सदोदित करीत असतात.

(३९) आधींच विनीत असलेल्या राजानें त्या लोकांपासून पुनरपि विनय शिकावे. कारण विनयशील अशा राजाचा विनाश केव्हांहि होत नाहीं (विनय = संपूर्ण लोकाचार नि शास्त्राचार.)

**अभ्यास** :–'उतारा क्र. ७, १७ व २४ (प्रस्तुतचा) वाचून 'राजाचीं कर्तव्यें' यावर निबंध लिहा. त्यांत मोगल किंवा मराठे राजे यांच्यासबंधीं उदाहरणें द्या.

---

## २५ : : सम्राट् समुद्रगुप्ताचा पराक्रम

[हा गुप्तकालीन शिलास्तंभ सध्यां अलाहाबाद येथील किल्ल्यांत ठेविलेला आहे. या शहरापासून २८ मैल अंतरावर असणाऱ्या कोसल (प्राचीन कौशाम्बी) येथें तो प्राचीन काळीं उभारलेला असावा. कारण कौशाम्बीच्या प्रांत धिकाऱ्याना उद्देशून कांहीं मजकूर या स्तंभावर अशोकानें खोदविलेला आहे. पुढें दिलेला लेख याच स्तंभावर कोरलेला आहे. हा महत्त्वाचा लेख प्रथम इ.स. १८३४ मध्यें (I. A. S. B. Vol. III p. 118 ff मध्यें) प्रसिद्ध करण्यांत आला.

प्रस्तुत लेखांत समुद्रगुप्ताच्या विजयाचें वर्णन आहे. साहजिकच त्यांत भारतवर्षांतील देशविभाग, राजे आणि लोकसमूह (इ. स. ४ थ्या शतकांतील) यांचे उल्लेख आहेत. या प्रांताचीं आजचीं अंदाजीं नांवें टीपेंत दिलीं आहेत.

या लेखाचा काल समुद्रगुप्ताचा दिग्विजय संपून अश्वमेधयज्ञ होण्यापूर्वींचा म्हणजे अंदाजें इ. स. ३५० असावा असें आंतील वर्णनावरून अनुमान करावें लागतें. प्रत्यक्ष कालनिर्देश त्यांत नाहीं. प्रारंभींचा थोडासा भाग अस्पष्ट झाल्यानें वाचतां आलेला नाहीं. समुद्रगुप्ताच्या राजसभेंतील संधिविग्रहिक, कुमारामात्य आणि महादंडनायक अशा मंत्रिपदावर असलेल्या हरिषेण नांवाच्या अधिकाऱ्यानें संस्कृतांत हा लेख रचलेला आहे. गद्यपद्यमय ७५ ओळी खोदलेल्या आहेत. संस्कृत भाषेंतील काव्य या दृष्टीनेंहि हें लेखन चांगलें साधलेलें आहे. श्री.द.ब.डिसकळकर एम्.ए. यानीं संपादिलेल्या 'सिलेक्शन्स फ्रॉम संस्कृत अिन्स्क्रिप्शन्स्' (१९२५) मधील क्र. ३ च्या आधारें पुढील भाषांतर केलेलें आहे.

काव्य प्रकारापैकीं प्रस्तुतचा लेख हा चंपूकाव्य (गद्यपद्यमिश्र रचना) आहे. त्यांत प्रारभीचे आठ श्लोक, त्यानंतर येणारा दीर्घ परिच्छेद आणि शेवटचा श्लोक, हें सर्व भलें लांबलचक वाक्य आहे. या वाक्यांत अनेक विशेषणवाक्यें आहेत. 'ज्यानें (यः)' असें केलें त्या

(तस्य समुद्रगुप्तस्य) समुद्रगुप्ताचें कीर्तिगान हा स्तंभ करतो असें अखेरीस म्हटलें आहे. अर्थ चट्दिशीं लक्षांत यावा म्हणून भाषांतरांत या विशेषण वाक्यांच्या जागीं शुद्ध वाक्यें दिलीं असून 'समुद्रगुप्तानें' अमुक अमुक केलें असें लिहिलें आहे. ]

..........राजसभेंतील सभासद उत्सुक झाले आहेत, अशा स्थितींत पित्याचें अंतःकरण भरून आलें, कानावरचे केस उभे झाले, आणि डोळ्यांत अश्रृ डबडबून आले. प्रेमभरानें व्याकुळ होऊन त्यानें (आपल्या अनेक पुत्रांपैकीं केवळ) समुद्रगुप्ताकडे दृष्टि फेंकली, आणि त्यास आलिंगन देऊन तो म्हणाला, "तूंच योग्य आहेस, तूंच या समस्त भूमीचें पालन कर."

............(म्हणून) चंद्राप्रमाणें त्याची कीर्ति दूरवर पसरलेली आहे. वस्तूच्या मूलगामी तत्त्वाचें भेदन करणारें ज्ञान, सद्गुणी लोकांच्या मार्गावर अधिष्ठित, कवित्वाला आदर्श असणारें काव्य करणें आदि गुण त्याच्याजवळ आहेत. असा कोणता गुण आहे कीं जो त्याच्याजवळ नाहीं? गुणवान् विद्वानांचें ध्यानस्थान तो एकमात्र आहे.

......तो शंभर प्रकारचीं युद्धें करण्यांत कुशल (असून) 'स्वभुजपराक्रम' हाच त्याचा सहाय्यक आहे. पराक्रम हेंच त्याचें वैशिष्टच. त्याच्या शरीरावर परशु, बाण, भाले, शक्ति, प्रास, तलवार, तोमर, भिंदिपाल,......वैतिस्तिका आदि शस्त्रांनीं शंभर व्रण झाल्यानें तें (शरीर) अधिक शोभिवंत दिसतें.

....दक्षिणापथांतील (पुढील) राज्यें जिकल्यानें, (कांहीं) राजे बदलल्यानें अथवा (पूर्वींच्यावर) कृपा दृष्टि ठेवल्यानें त्याच्या प्रतापाची कीर्ति वाढली आहे. कोसल (सिरपूर मध्यप्रांत) देशाचा महेन्द्र, महाकांतारचा[1] व्याघ्रराज, केरळचा मण्टराज, पैंष्टपुरचा महेन्द्र,[2] गिरिकुट्टरचा स्वामिदत्त, एरण्डपल्लचा दमन, कांचीचा विष्णुगुप्त, अवमुक्तचा नीलराज, वेंगीचा (एलीर तालुक्यांतील वागी किंवा पेशवागी) हस्तिवर्मा, पालक्काचा उग्रसेन, देवराष्ट्रचा[3] कुबेर, कौस्थलपुरचा धनंजय प्रभृति.

रुद्रदेव, मतिल, नागदत्त, चन्द्रवर्मा, गणपतिनाग, नागसेन, अच्युत, नन्दिन्, बलिवर्मा, आदि आर्यावर्तांतील पुष्कळ राजांचा त्वरेनें पराभव केल्यानें त्याचें सामर्थ्य वाढलें आहे; अरण्यराज्यावर त्यानें स्वामित्व प्रस्थापिलें आहे.

---

१ छत्तीसगढ संस्थानें, २ पीठपुरम्, (जि. गोदावरी, मद्रास इलाखा) ३ महाराष्ट्र किंवा देवगिरी. (पुढील पृष्ठावर चालू)

सीमेवरील समतट, डवाक[४] कामरुप[५] नेपाळ, कर्तुपुर[६] आदि आणि माळव[७] अर्जूनायन[८] यौधेय[९] माद्रक[१०] अभीर, प्रार्जुन[११] सनकानीक, काक, खरपरीक आदि राज्यें करभार देऊन, नजराणे देऊन आणि आज्ञापालन करून त्याच्या सम्राटपदास मान देतात. पूर्वी ज्यांना घालवून दिलें अशा अनेक राजवंशाची प्रतिष्ठापना त्यानें केली आहे.

दैवपुत्र, शाही[१२] शाहानुशाहि शक, मुरुण्ड आणि सिंहल आदि द्वीपस्थ लोकांनीं त्याच्याकडे आत्मसमर्पण, कन्यादान, उपायन (नजराणे) दिलीं, आणि गरुडमुद्रांकित प्रार्थनापत्रांतून 'आमच्या प्रदेशाचें शासन करण्यास संमती द्या' अशी याचना केली. (ती त्यानें मान्य केली )..... ..........तो दीनांचा कनवाळू आणि पीडितांचा उद्धारकर्ता .....आहे.

देवगुरु बृहस्पतीला त्यानें आपल्या तीक्ष्ण आणि विदग्धबुद्धीनें (तसेंच) तुंबर आणि नारदांना गांधर्वलालित्यानें लाजविलें आहे.

विद्वानांनीं चिंतन करावें अशी काव्यरचना केल्यानें 'कविराज' ही उपाधि त्यानें सार्थ केली आहे. ..................

श्रीगुप्तांचा नातू घटोत्कच, त्यांचा नातू श्रीचंद्रगुप्त आणि लिच्छवीचें दौहित्र महादेवी कुमारदेवी यांचा, महाराज श्रीसमुद्रगुप्त, हा पुत्र होय. ...... या नरेशाचा संधिविग्रहिक, कुमारामात्य आणि महादंडनायक हरिषेण यानें रचलेलें हें काव्य भूतमात्रांचें कल्याण करण्यास उपयोगी होवो.

**अभ्यास** :—१. राजाच्या मृत्यूनंतर त्याच्या मुलांपैकीं राजपदावर कोणीं यावें याविषयींची गुप्तकालीन पद्धति कोणती असावी हें प्रथम परिच्छेद वाचून सांगा. २. समुद्रगुप्ताच्या अंगीं कोणते गुण होते असें या लेखांत सांगितलें आहे? ३. प्राचीन कालीन शस्त्रास्त्रांचीं नांवें प्रस्तुत लेखांत आहेत. तत्कालीन प्रमुख शस्त्रांची नि आधुनिक शस्त्रांची यादी तयार करा. ४. शस्त्रांच्या जखमांनीं वीरपुरुषास शोभा येते हा विचार तुम्हांस कितपत पटतो ? ५. समुद्रगुप्तकालीन विविध देशांचीं नांवें एकत्र करून त्यांतील आजहि सहज ओळखतां येतील अशा नांवाखालीं रेघ ओढा, अगर भारताचा नकाशा काढून ते प्रदेश त्यांत दाखवा. ६. समुद्रगुप्ताच्या राज्याच्या सीमा कोणत्या ?

---

४ डाक्का, ५ आसाम, ६ कर्तारपूर, जालंदर जिल्हा ७ माळवा, ८ जयपूर, अलवार, ९ सतलज-यमुनेमधील प्रदेश १० सियालकोट ११ नरसिंहपूर-(मध्यप्रांत), १२ काबूल नदीचें खोरें नि पंजाब या भागाचे राजे

## २६ : दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या राज्यांतील लोकांची राहाणी

[ भारतवर्षांत बौद्धधर्माचा अभ्यास करण्यासाठीं अनेक कष्ट सोसून चिनी यात्रेकरू प्राचीन काळीं येत. अशांपैकीं फा-हैन हा या देशांत इ. स. ३९९-४१४ पर्यंत प्रवास करीत होता. त्यानें स्वदेशीं गेल्यावर आपलें प्रवासवर्णन लिहिलें. त्याचें इंग्रजी भाषांतर जेम्स लेग (Legge) कृत 'फाहैन्स ट्रॅव्हल्स इन इंडिया अँड सीलोन,' या नांवानें प्रसिद्ध आहे. त्यांतील पृ. ४२-४३वरील उताऱ्याचा मराठी अनुवाद पुढें दिला आहे.

प्रस्तुतचें वर्णन दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या वेळचे म्हणजे समुद्रगुप्ताच्या मुलाच्या वेळचें आहे. याच्याच कारकीर्दींत गुप्तसाम्राज्य पश्चिम समुद्रापर्यंत वाढलें, आणि याच्याच काळीं हूण टोळचांचा उपद्रव भारताला पोहोंचूं लागला. ]

......येथून दक्षिणेकडील प्रदेशास मध्यराज्य असें नांव आहे. या ठिकाणीं थंडी आणि उष्णताहि समप्रमाणांत आहेत. येथें बर्फहि पडत नाहीं अथवा धुकेंहि नसतें. लोकसंख्या पुष्कळ आहे पण ती सुखी आहे. लोकांना आपल्या घराण्यांची नोंद करावी लागत नाहीं, किंवा न्यायाधीशा- (मॅजिस्ट्रेट) पुढें उपस्थित व्हावें लागत नाहीं. राजाच्या जमिनी जे कसतात त्यांना आपल्या नफ्याचा कांहीं अंश राजास द्यावा लागतो......फांशी किंवा इतर शारीरिक शिक्षा न देतां राजा राज्य करतो. अपराध्यांना परिस्थिती- प्रमाणें कमी किंवा अधिक प्रमाणांत दंड केला जातो. पुनः पुनः बंड केलेल्यांना सुद्धां त्यांचा उजवा हात कापणें एवढीच शिक्षा केली जाते. राजसंरक्षक आणि सेवक यांना पगार दिला जातो. सबंध देशभर लोक कोणत्याहि प्राण्याची हत्या करीत नाहींत, मादक दारू पीत नाहींत; आणि कांदे किंवा लसूणहि खात नाहींत. याला अपवाद म्हणजे फक्त चांडाळांचा. हे चांडाळ म्हणजे दुष्ट लोक, ते इतरांपासून दूर राहतात. ते जेव्हां शहरांत किंवा बाजारांत प्रवेश करितात; तेव्हां एक लांकडी काठी वाजवून आपण येत असल्याचें सूचित करतात. त्या- मुळें लोक त्यांना टाळतात. त्यांच्याशीं जनतेचा संपर्क येत नाहीं. या प्रदेशांत लोक डुकरें आणि कोंबड्या पाळीत नाहींत, जिवंत जनावरें विकीत नाहींत; बाजारांत खाटिकांचीं दुकानें नाहींत किंवा मादक पेयाचे व्यापारी नाहींत. वस्तूंच्या खरेदी विक्रीसाठीं ते कवड्यांचा उपयोग करितात. केवळ चांडाळ हे कोळ्याचा नि शिकाऱ्याचा धंदा करतात व मांस विकतात.

**अभ्यास** :---दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या काळच्या शिक्षा, लोकांचें खाणेंपिणें, राजाचे कर यासंबंधींची माहिती थोडक्यांत लिहा.

---

## २७ : कलिंग देशाचा राजा पराक्रमी श्रीखारवेल

[ कलिंगाचा राजा श्री खारवेल याच्या कारकीर्दीची माहिती देणारा भुवनेश्वरजवळील हाथी गुंफेंतील हा लेख होय. मगधावरील शुंग राजाचा पराभव या श्रीखारवेलानें केला, असा उल्लेख या शिलालेखांत आहे. या डोंगरावर १६५ मौर्यशकांत हा लेख कोरविला असा एका ओळीचा अर्थ कांहीं संशोधक करितात. डॉ. श्री. व्यं. केतकरांच्या मतेंहि खारवेल–लेखकाल ख्रि. पू. १७० धरण्यास हरकत नाहीं. ते लिहितात "खारवेलचा हा लेख भारतीय इतिहासांतील अत्यंत महत्त्वाच्या लेखांपैकीं समजला जातो. जैन संप्रदायाच्या इतिहासांत याला महत्त्व आहे. शातकर्णीच्या इतिहासांत हा महत्त्वाचा आहे.........नंदकालीन गोष्टींच्या उत्तरकालीन आठवणी गोळा करितांना खारवेलाचा पुरावा अत्यंत महत्त्वाचा समजला जातो." मूळ लेखाच्या डॉ. केतकरकृत अनुवादांतून (प्राचीन महाराष्ट्र, पृष्ठ ४१६ ते ४१८.) पुढील अवतरणें दिलीं आहेत. या लेखाचा जयस्वालकृत इंग्रजी अनुवाद Journal of the Bihar and Orissa Research Society Vol. III Pt. 4 मध्यें पहावा.]

ओळ पहिली

अर्हतांना नमस्कार असो. सर्व सिद्धांना नमस्कार असो. ज्यावर प्रशस्त अशीं शुभ लक्षणें आहेत, जो चाऱ्ही दिशांकडे पसरलेल्या आपल्या राज्याचा जणूं काय आधारदाता स्थाणूच आहे, जो चेदिराजाच्या वंशाची वृद्धि करणारा आहे अशा ह्या आर्य महाराज कालिंगाधिपति श्रीक्षारवेल महामेघवाहनानें

ओळ दुसरी

पंधरा वर्षें, सुंदर आणि गवताप्रमाणें कोवळ्या अशा यानें कुमारक्रीडा केल्या, आणि नंतर लेखनशास्त्र, रूप (?)* गणनाशास्त्र, व्यवहारशास्त्र, विधिशास्त्र इत्यादि शास्त्रांत विशारद होऊन सर्व विद्यांनीं भूषित होत्साता नऊ वर्षें

* नाण्याचें शास्त्र (जयस्वाल)

युवराजपद भोगिता झाला, आणि चोवीस वर्षें पूर्ण होतांच ज्यानें आपल्या वाढत्या तारुण्यांत वेनराजासारखें जयसंपादन चालविलें होतें अशा त्यास

ओळ तिसरी

........महाराज्याभिषेक झाला.

ओळ चवथी

दुसऱ्याच वर्षी शातकर्णीला[1] न जुमानतां त्यानें पश्चिम दिशेकडे हय, गज, नर, रथ इत्यादि बरेंच सैन्य पाठविलें. आणि कृष्णवेण्णंकडे गेलेल्या सेनेनें मूषिक नगरीचा नाश केला.

ओळ सहावी

पांचव्या वर्षी, नंदानें तीनशें वर्षांपूर्वी खणलेला कालवा तनसुलिय रस्त्यापासून..त्यानें राजधानींत आणला. सहाव्या वर्षी..अभिषिक्त झाल्यावर –

ओळ सातवी

सर्व दुःखितांना आपलें साहाय्य देऊन शतावधि, सहस्रावधि अशा पौरांवर आणि जानपदावर[2] त्यानें अनेक अनुग्रह केले.

आणि आठव्या वर्षी आपल्या मोठ्या सेनेनें जिचे मोठे तट आहेत अशा गोरथगिरीचा[3]......

ओळ आठवी

नाश करून राजगृह–राजाला[4] पीडा करता झाला कीं जो खारवेलाच्या आगमनाची वार्ता ऐकतांच आपलें सर्व सैन्य आणि सैन्यवाहिनी सोडून..... मथुरेला चालता झाला.

ओळ बारावी

..........मगधाचा राजा बृहस्पतिमित्र याला पदवंदन करावयास लाविलें.

ओळ तेरावी

पांड्य राजापासून घोडे, हत्ती, रत्नें आणि माणिकें इत्यादि शेकडो मुक्तामणि रत्नें त्यानें हरण केलीं.

---

१. हा राजा शालिवाहन शातकर्णी होय. (पं. जयचंद विद्यालंकार)
२. पौर आणि जानपद ही शहराचीं आणि गांवांचीं अधिकारी मंडळें होत. यांना अधिकार देऊन अनुगृहीत केलें असा अर्थ. (जयस्वाल).
३. बर्धन टेकडी (बेगलर)
४. मगधाची अतिप्राचीन राजधानी–तेथील राजाला

ओळ पंधरावी

सर्व सुकृत श्रमणांच्याकरितां, सुविहित असलेले शास्त्रदृष्टीचे ज्ञाते आणि तपऋषि अशांकरतां संघायतन निर्माण केलें.

ओळ सोळावी*

आणि मुरिय काल उलटल्यावर तो सटीक ६४ अंगें† करविता झाला

ओळ सतरावी

विशेष गुणांमध्यें पारंगत होत्साता सर्व पंथांना मान देणारा, सर्व देवायतनांना सुशोभित करणारा, ज्याचें रथचक्र अप्रतिहत आहे असा, आपल्या प्रवृत्तचक्र (वाढलेल्या) राज्याचा पुढारी (चक्रधुर) आणि राज्याचें संरक्षण करणारा (गुप्तचक्र) जो राजर्षिवंशकुलामधून उत्पन्न झाला आहे असा महाविजय श्रीखारवेल (होय).

**अभ्यास** :—श्रीखारवेलाचें समकालीन राजे कोणते असावे? खारवेलाचे कांहीं पराक्रम सांगा.

---

## २८ : : : अजंठ्याचीं लेणीं

[ वेरूळ येथें डोंगरांत लेणीं कोरलेलीं आहेत. हीं लेणीं म्हणजे जणूं प्रचंड घरें व देवळें आहेत. अजंठा येथील लेण्यांमध्यें कोरलेल्या भिंतींवर अत्युत्तम रंगीत चित्रें काढलेलीं आहेत. हीं चित्रें एकाच वेळीं काढलेलीं नाहींत; ख्रिस्तपूर्व तीनशें वर्षांपासून ख्रिस्त शकाच्या सहाव्या शतकापर्यंत तीं कोरली गेलीं आहेत. अशोक, गुप्त व हर्षवर्धन हे महान् राजे या काळांत होऊन गेले. इतक्या वर्षांनंतरहि 'टिकलेले रंग', 'बाह्य रेषेचें सौंदर्य', 'भावनिदर्शनाची हातोटी' यांमुळें या चित्रांनीं जगास मोहिलें आहे. गौतम बुद्धाच्या पूर्वजन्मींच्या ज्या कथा जातकांत आहेत त्या गोष्टींचें चित्रण अनेक चित्रांतून केलेलें आहे. या चित्रावरून या हजार वर्षांत लोक कसें वागत, घरें कशीं बांधीत, लग्नसंस्कार कोणत्या रीतीनें करीत, त्यांच्या गाड्या, रथ कसले असत, ते शस्त्रें कोणतीं वापरीत, वस्त्रें कोणतीं परिधान करीत याची कांहींशी माहिती मिळते.

अजंठ्याच्या चित्रासंबधीं सटीक व सचित्र माहिती श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांनीं लिहिलेल्या 'अजंठा' या पुस्तकांत 'जिज्ञासूं'ना पाहावयास मिळेल. ]

---

* 'मुरीयकालाचीं १६४ वर्षें उलटल्यानंतर' असाहि अर्थ या ओळीचा लावण्यांत येतो. † अंग = जैनांचे तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ.

मृत्युशय्येवर पडलेली राजस्त्री



अजंठा येथील चित्रकलेचा उत्कृष्ट नमुना —खुलासा पुढील पृष्ठावर पहा

मृत्यूशय्येवरील राजस्त्री ( मागील चित्राचा खुलासा )

कोणी राजा आपल्या स्त्रीवर राज्य सोपवून बुद्ध भिक्षु झाला. त्याची राणी विरहानें खंगून खंगून मरण्याच्या पंथास लागली आहे. तिच्या थोरल्या मुलीनें तिला सावरून धरली आहे. धाकटी मुलगी आपली आई आतां थोड्या घटकांची सोबतीण आहे, अशा दुःखित चेहऱ्यानें तिजकडे पहात आहे. मरण-समयीं पतीचें दर्शन नाहीं तें नाहीं निदान त्याच्या राजमुकुटाचें तरी दर्शन घ्यावें या हेतूनें दोन सेवकांकडून तो राजमुकुट आणविला आहे. पण त्याकडे पहावयास पापणी उघडण्याचें देखील तिला आतां सामर्थ्य राहिलें नाहीं. कोणी दासी विंझण्यानें मंद असा वारा घालीत आहे. वर गच्चीवर वैद्यबुवा कांहीं औषधाचा घट घेऊन जात आहेत. त्यास कोणी कांहीं उपाय आहे का म्हणून विचारीत आहे. वैद्यही 'फार तर दोन घटकांची सोबतीण' अशा अर्थाचा हात करीत आहे.

—श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधीकृत 'अजंठा' पृ. ५४

---

## २९ : : : शक राजा रुद्रदामन यानें बांधलेला गिरनारचा सुदर्शन तलाव

[ राजन् महाक्षत्रप रुद्रदामन याचा जुनागड येथील शिलालेख. मध्य आशियांतील शक किंवा सिथियन लोकांची जमात अनेक ठिकाणीं वसाहती करीत व तेथून उच्चाटन होत, इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांत पश्चिम हिंदुस्थानांत येऊन थडकली. तिनें सुराष्ट्र ऊर्फ गुजराथेंत राज्य स्थापिलें. त्यांच्यांतील रुद्रदामन नांवाच्या राजानें माळवा व बाजूचा प्रदेश या प्रांतावर अधिराज्य स्थापन केलें. हे आपणास 'सत्रप' किंवा 'क्षत्रप' म्हणवीत व स्वतःस त्या वेळीं इराणांत राज्य करीत असलेल्या पार्थियन राजांचे सुभेदार समजत असत. या क्षत्रपांच्या शाखांपैकीं सुराष्ट्राच्या दक्षिणेस, पश्चिम किनाऱ्यावर राज्य करणाऱ्या शाखेचा शालिवाहनानें पराभव केला. परंतु रुद्र-

दामनची उज्जयिनी येथील शाखा इ. स. च्या चौथ्या शतकापर्यंत अस्तित्वांत होती. पुढें गुप्त राजांनीं याहि शाखेचा पराभव केला.

प्रस्तुतच्या शिलालेखांत काठेवाडांत गिरनार पर्वतानजीकच्या सुदर्शन नामक तलावाची दुरुस्ती झाल्याची नोंद आहे. हा तलाव प्रारंभीं मौर्य सम्राट चंद्रगुप्त याचा काठेवाड प्रांताचा सुभेदार वैश्य पुष्यगुप्त यानें बांधला. पुढें अशोकाच्या कारकीर्दीत तुशास्प नांवाच्या यवन (पारशी ?) सुभेदारानें त्यांतून कालवे काढून पाणी दूरवर पोहोंचविण्याची व्यवस्था केली. कालांतरानें हा तलाव नादुरुस्त झाला. त्याच्या दुरुस्तीचें काम रुद्रदामनच्या कारकीर्दीत, अमात्य सुविशाखा हा काठेवाडचा सुभेदार असतां, त्यानें पार पाडलें. ही गोष्ट खालील शिलालेखांत सांगितली आहे. खेरीज रुद्रदामननें दक्षिणचा राजा शातकर्णी याचा पराभव केल्याचें वृत्तहि या शिलालेखांत नोंदलेलें आढळतें.

हा शिलालेख संस्कृत भाषेंत आहे. त्यांतील निवडक भागाचें भाषांतर पुढें दिलें आहे.

गिरिनार येथील हा सुदर्शन तलाव एका बाजूनें पर्वताच्या कडयासारखी तटाची बळकट बांधणी करून व दुसऱ्या बाजूनें निसर्गदत्त बंधाऱ्याचा उपयोग करून तयार केला आहे. त्यास पाट काढलेला आहे व गाळ काढून टाकण्याची व्यवस्था केली आहे. हा आतां सुस्थितींत आहे. महाक्षत्रप रुद्रदामन याच्या वयाच्या बहात्तराव्या वर्षीं मार्गशीर्ष व. १स तो बांधून पुरा झाला.]

पूर्वीं महावृष्टि झाली व त्यामुळें ऊर्जयत पर्वताच्या पायथ्याशीं वाहणारे पलाशिनी, सुवर्णसिकता इत्यादि प्रवाह एवढे तुडुंब वाहून चालले कीं त्यानें सर्व सृष्टि जणूं काय सागरमय झाली. एरव्हीं बंधाऱ्याचा बंदोबस्त पक्का होता. परंतु त्या वेळीं एवढें वादळ झालें कीं, तलावांतील पाणी अगदीं घुसळून निघालें. त्या तुफानाचा जोर एवढा कीं त्यानें चराचर सृष्टीच्या अखेरच्या प्रलयप्रसंगाची आठवण करून दिली. बंधारा फुटून वाहून जाणाऱ्या पाण्याचा जोर एवढा कीं त्यांत झाडें, दगड, छोटे बुरुज, मुद्दाम उंच बांधलेलीं आसऱ्याचीं ठिकाणें सर्व धडाधड कोसळून प्रवाहांत वहात गेलीं. या निसर्गप्रकोपानें सुमारें ४७५ हात (एक हात = १८ इंच) लांब तितकेंच रुंद व ७५ हात खोल एवढें मोठें भगदाड पडलें व त्या भागांतील पाणी वाहून जाऊन तळाचा वालुकामय प्रदेश भेसूर स्वरूपांत उघडा पडला. ....

ज्याचा सर्व जातींच्या लोकांनीं आश्रय घेतला होता, ज्यानें रणांगणाखेरीज इतरत्र मनुष्याची हत्या करावयाची नाहीं अशी प्रतिज्ञा करून ती पाळली, ज्यानें प्रतिपक्षावर ठीक हल्ले चढविण्यास कधीं कमी केलें नाहीं, पण ज्यानें शरणागतांस अभयच दिलें, जो पूर्वपश्चिम भागांतील आकरावंती, अनुपप्रदेश, आनर्त, सौराष्ट्र, श्वभ्र, मरु, कच्छ, सिंधुसौवीर, कुकुर, अपरान्त आणि निषाद, हे प्रदेश जिंकून त्याचा स्वामी झालेला होता, ज्याच्या राज्यांतील खेडीं, शहरें व बाजारवस्ती यांना कधीं चोराचिलटांचा, सर्पश्वापदांचा किंवा रोगराईचा उपद्रव झाला नाहीं, ज्यावर सर्व प्रजा अनुरक्त होती, ज्यानें युधेयांशीं लढाई करून त्यांना शरण आणलें, ज्यानें दक्षिणपथाचा शातकर्णी राजा याचा उघड युद्धांत दोनदां पराभव करूनहि, तो निकट संबंधीं असल्यानें त्याचा नाश केला नाहीं व या उदारपणामुळें ज्याची कीर्ति सर्वत्र पसरली, ज्यानें पदच्युत राजांना पुनः सिंहासनावर बसविलें, जो यथार्थ हस्तामुळें, (दानामुळें) धर्माला प्रिय झाला आहे, ज्यानें व्याकरण, संगीत, तर्क इत्यादि शास्त्रांवर प्रभुत्व मिळविलें आहे, ज्यानें हय, गज, रथ, खड्ग, ढाल इत्यादींचा वापर करण्यांत व द्वंद्वयुद्धांत प्रावीण्य मिळविलें आहे, ज्यानें दानधर्मामुळें कीर्ति मिळविली आहे, अनेक ठिकाणच्या खंडण्या व जकाती आल्यामुळें ज्याचा खजिना तुडुंब भरलेला आहे, ज्यानें सभासमयाला उचित अशा गद्यपद्याची अलंकार लालित्यपूर्ण रचना करण्यांत कौशल्य संपादन केलें आहे, ज्याची स्थिति, गति, आकृति, उंची, शक्ति, उत्साह, भाषण इत्यादि त्यास शोभादायक झालीं आहेत, ज्यानें महाक्षत्रप असें नांव स्वतः मिळविलें आहे, देशोदेशींच्या राजकन्यांच्या स्वयंवरप्रसंगीं ज्याच्या गळ्यांत पुष्पमाला येऊन पडल्या आहेत, अशा रुद्रदामनानें हजार वर्षपर्यंत गायी ब्राह्मणांचें रक्षण व्हावें, स्वतःचें पुण्य व कीर्ति वाढवावी या हेतूनें पूर्वीच्या तिप्पट लांबीरुंदीचा, बळकटीचा व दिसण्यांत भव्य व सुंदर असा बंधारा थोडक्या वेळांत बांधविला व असें करतांना प्रजेवर कराचा त्रासदायक बोजा पडणार नाहीं व प्रजेपैकीं कुणालाच वेठबिगार करावी लागणार नाहीं याची दक्षता घेतली. पहिल्या प्रथम एवढें मोठें काम कसें पार पडेल याची चिंता वाटून रुद्रदामनच्या प्रधानांनीं त्यास विरोध केला व आतां तलाव कसचा बांधला जातो या विचारानें प्रजा शोकग्रस्त झाली,

तेव्हां रुद्रदामननें पह्लवांपैकीं कुलैपाचा पुत्र सुविशाखा यास सौराष्ट्र व आनर्त प्रदेशाचा सुभेदार नेमलें. त्यानें आपल्या निःस्पृह, सचोटीच्या, क्षमशील व कर्तृत्ववान् कारभारानें प्रजेचें प्रेम सपादन केले व अखेर रुद्रदामनाच्या अनुज्ञेप्रमाणें बंधारा बांधण्याचें काम हातीं घेऊन तें पुरें केलें.

[ या वर्णनांत रुद्रदामनला लावलेलीं पुष्कळ विशेषणें अतिशयोक्तिपूर्ण असण्याचा संभव आहे. पण जेथें तपशीलाचा उल्लेख करून विधान केलेलें असतें तेथें तें ऐतिहासिक सत्य असण्याचा संभव अधिक. वरील उदाहरणांत त्यानें व्याकरण, संगीत, तर्क इत्यादि शास्त्रांवर प्रभुत्व मिळविलें आहे हें विशेषण अतिशयोक्तीचें असेल पण 'दक्षिणपथ शातकर्णीचा दोनदां पराभव केला' हें विधान काल्पनिक असण्याचा संभव कमी.

हा संस्कृत शिलालेख जागजागीं तुटलेला व अस्पष्ट असा आहे. तेथील अक्षरन् अक्षर लावून वाचण्यासाठीं पं. भगवानलाल इंद्राजी, डॉ. बुल्हर वगैरे अनेक विद्वानांचे श्रम व संशोधनशक्ति खर्चीं पडली. आपले महाराष्ट्रांतील डॉ. भांडारकर यांनींहि हें कार्य केलें. अशा शिलालेखांचे ठसे उमटवून त्यांचे फोटो काढून, त्यांचें रोमन लिपींत लिप्यन्तर करून त्यावर टीका लिहून व प्रारंभीं प्रस्ताव परिचय करून ते एपिग्राफिका इंडिकाच्या अनेक खंडांतून प्रसिद्ध झाले आहेत. भारताचा प्राचीन इतिहास संगतवार जुळविण्यासाठीं या पंडितांचे प्राथमिक श्रम खर्चीं पडले म्हणूनच तें काम इतकें सुगम झालें.]

**अभ्यास**:— १ सुदर्शन तलावाची माहिती तीन परिच्छेदांत तुमच्या भाषेंत लिहा. २. शक मूळचे कोठले ? रुद्रदामनसंबंधीं दहा ओळी लिहा.

---

## ३० : : : हर्ष राज्यश्रीच्या शोधास निघतो

[ वत्स कुळांत कुबेर नांवाच्या सद्गुणी विद्वान् ब्राह्मणास अच्युत, ईशान, हर आणि पाशुपत असे चार मुलगे होते. त्यांतील पाशुपताला अर्थपति नांवाचा मुलगा झाला. अर्थपतीला अकरा मुलगे होते. त्यांपैकीं एक चित्रभानु होय. त्याच्या मुलाचें नांव बाण.

बाण अगदीं लहान असतांच त्याची आई वारली व बापानें त्याचें प्रेमानें पालन केलें. चौदाव्या वर्षी त्याचा बापहि वारला आणि बाण

पोरका झाला. लहानपणीं बाण फार हूड होता. त्यानें पुष्कळ पर्यटन केलें. या फिरस्त्याच्या आयुष्यांत त्याला ज्ञान व अनुभव हीं मिळालीं. जेव्हां तो पुन्हां ब्राह्मणाधिवास (प्रीतिकूट) येथें परत आला, तेव्हां हर्ष राजाचा भाऊ कृष्णराज (बहुधा चुलतभाऊ) याकडून बोलावणें घेऊन एक दूत त्याच्याकडे आला.

बाणासंबंधीं हर्षाचें मन पूर्वग्रहदूषित होतें, तरी बाणानें अजिरावती येथें हर्षाची भेट घेतली. कालांतरानें हर्षानें बाणावर मोठा कृपाप्रसाद केला. यामुळें बाणावर 'श्री'ची कृपा झाली. सरस्वतीची कृपा त्यावर होतीच. बाणानें 'हर्षचरित' व 'कादंबरी' हे दोन ग्रंथ लिहिले. पण ते दोन्ही अपुरे ठेवून त्यानें इहलोक सोडला. भूषण नांवाच्या त्याच्या मुलानें एक वर्षाच्या आंत 'कादंबरी' हा ग्रंथ पुरा केला.

चिनी प्रवासी ह्युएन-त्संग किंवा युवान च्वांग हिंदुस्थानांत ६२९ ते ६४५ या काळांत आला होता. त्यानें लिहिलेलें हर्षाचें वर्णन व बाणानें केलेलें वर्णन हीं एकमेकांस पूरक आहेत. बाणाच्या लेखनांत व्यक्तिदर्शन आहे, तर ह्यूएन-त्संग हा तत्कालीन परिस्थितीवर विशेष प्रकाश पाडतो.

हर्षाचा जन्म इ. स. ५९० त झाला. इ. स. ६०६ मध्यें तो सर्व उत्तर भारताचा अधिपति झाला. ६४७ मध्यें हर्षाचा मृत्यु झाला. बाणाचा काळ सातव्या शतकाच्या पूर्वार्धांत येतो. पुढील उतारा हर्षचरितांतील सप्तम उच्छ्वासांतील आहे.]

घोड्यावर बसून कपडे मलिन झालेल्या स्थितींत भण्डी इतर कुलपुत्रांना बरोबर घेऊन राजवाड्याच्या दाराशीं आला आणि घोड्यावरून उतरून खालीं मान घालून राजवाड्यांत शिरला. राजा दिसतांच दुरूनच रडत रडत राजाच्या पायां पडला.

राजा हर्षानें त्याला उठवलें व गाढ आलिंगन दिलें. (नंतर) फार कालपर्यंत तो धाय मोकलून रडला. थोडा दुःखभार हलका झाल्यावर तो पुन्हां आपल्या आसनावर बसला. भण्डीनें तोंड धुतल्यावर राजानें तोंड धुतलें. थोडा वेळ गेल्यावर भावाच्या मृत्यूची हकीकत त्यानें विचारली. भण्डीनें जशी घडली तशी सर्व हकीकत सांगितली. नंतर राजा पुन्हां म्हणाला, "राज्यश्रीसंबंधींची हकीकत काय?" त्यावर भण्डी सांगूं लागला, "महाराज राजा राज्यवर्धन देवलोकाप्रत गेल्यावर गुप्त नांवाच्या (राजानें) कुशस्थळ

घेतल्यावर देवी राज्यश्री कैदेंतून सुटून परिवारासह विन्ध्य पर्वताच्य अरण्यांत गेली, अशी लोकांकडून वातमी ऐकली. तिच्या शोधासाठीं पुष्कळसे लोक पाठविले असून अद्याप कोणीच परत आले नाहींत." हें ऐकून राजा (हर्ष) म्हणाला "दुसरे लोक पाठविण्यापासून काय उपयोग ? ज्या ठिकाणीं ती (राज्यश्री) असेल तिकडे बाकी सर्व कामें टाकून मी स्वतःच जाईन. आपणहि थोडें सैन्य घेऊन गौड देशाच्या रोखानें निघावें." ....

दुसरे दिवशीं पहाटेच भण्डी राजाजवळ जाऊन म्हणाला, 'महाराज, राज्यवर्धनानें आपल्या बाहुबलानें मिळविलेलें (जिकलेलें), राजभोग्य वस्तूंसह असलेलें मालव देशाच्या राजाचें सैन्य आपण पहावें.' 'तसें करा.' (ठीक आहे) असें राजानें सांगितल्यावर (समृद्ध सामग्रीनें युक्त असें) तें सैन्य राजास दाखविण्यांत आलें. राजानें त्याची पाहणी करून योग्य त्या अधिकाऱ्यांना सर्व वस्तूंचा स्वीकार करण्याचा आदेश दिला.

दुसरे दिवशीं घोड्यावर बसून बहिणीच्या शोधार्थ तो निघाला व मुक्काम करीत करीत विंध्याटवीमध्यें पोहोंचला.

[कथासंदर्भ : विंध्याटवीमध्यें दिवाकर मित्र नांवाच्या बौद्ध भिक्षूची व हर्षाची गांठ पडली. कोणी एक स्त्री अग्निप्रवेश करण्याच्या बेतांत आहे अशी बातमी त्यानें तेथें ऐकली. लगेच ती आपली बहीणच असावी असें मनांत येऊन हर्ष भिक्षूसह तिकडे निघाला. विलापाचे आवाज ऐकून ते त्या रोखें जातात तोंच अग्नींत प्रवेश करण्याच्या बेतांत असलेली राज्यश्री त्यांना आढळली. ]

**अभ्यास** :—१. बाणभट्टाची माहिती सांगा. २. हर्ष स्वतःच बहिणीच्या शोधार्थ कां निघाला ? ३. वरील वृत्तांतांत ज्या राजांचीं व गांवांचीं नांवें आलीं आहेत त्यांची यादी करा.

---

## ३१ : : : नालन्दा विद्यापीठाचें वैभव

[ह्युएन-त्संग हा एक चिनी विद्वान् होय. इ.स. ६३० त हा आपल्या देशांत बौद्ध धर्माचा अभ्यास करण्यासाठीं आला. तत्कालीन चिनी राजाकडून त्यास स्वदेश सोडण्यास परवानगी मिळाली नव्हती, परंतु निराश न होतां धर्मजिज्ञासेमुळें तो तिबेटमार्गें भारतवर्षांत येण्यास

निघाला. वाटेंत सरकारी नाकीं चुकविण्यासाठीं अधिक आडवळणाची वाट त्यास शोधावी लागली. कांहीं कांहीं वेळेस तर अन्नपाणी न मिळाल्यामुळें किंवा नैसर्गिक आपत्तीमुळें प्रवासांतच त्याचा शेवट होण्याचा काळ प्राप्त झाला होता. अथांग अशा मरुभूमींतून प्रवास करीत असतां त्याच्या स्वतःच्या सावलीशिवाय या यात्रेकरूला अन्य कोणीहि वाटाड्या नव्हता. पण बुद्धाच्या आशीर्वादानें तो आपल्या अंगीकृत कार्यांत यशस्वी झाला. भारतवर्षांत त्याचें चांगलें स्वागत झालें. तत्कालीन सम्राट् हर्ष व पुलकेशी यांनीं त्याची योग्यता ओळखून त्याचा मोठा आदरसत्कार केला. हर्षाच्या राजसभेंत व त्याच्या राज्यांतच ह्युएन-त्संगानें अनेक वर्षें घालविलीं. सुप्रसिद्ध नालन्दा विद्यापीठांत तो दोन वर्षें मुख्यतः विज्ञानवादाच्या अध्ययनासाठीं राहिला होता.

भारतवर्षांत १५ वर्षें त्यानें यात्रा केली. महाराष्ट्रांतहि तो येऊन गेला. या संचारांत त्यानें राजकीय, सामाजिक, धार्मिक, माहिती गोळा केली. त्याच्या आधारें स्वदेशांत परतल्यावर त्यानें 'पश्चिमदेश-कथा' नांवाचा ग्रंथ लिहिला, त्याचे १२ भाग आहेत. वॅटर्सननें या ग्रंथाचा इंग्रजींत अनुवाद केला.

मराठीमध्येंहि, 'भगवान् बुद्धासाठीं' नांवाचें पुस्तक श्री. शंकरराव देवांनीं लिहिलें आहे. त्यांत त्यांनीं फा-हैन, ह्युएन-त्संग आणि इतर अनेक भिक्षु हे भगवान् बुद्धाच्या प्रेमामुळें या देशांत कसे आले याचें चांगलें वर्णन दिलें आहे. तत्कालीन समाजस्थिति कळण्यास या पुस्तकाचा उपयोग होतो. याच पुस्तकांतील पृ. १३२-३३ वरील उतारा पुढें दिला आहे. तो मुळांत ह्युएन-त्संगानेंच लिहिलेला आहे.

'नालन्दा' नांवासंबंधीं पुढीलप्रमाणें माहती या पुस्तकांत श्री. देवांनीं दिली आहे. "बुद्धगयेच्या वायव्येला नालंदा नगरी होती. ही खरोखरी मठनगरी होती. येथें पूर्वीं एक आंवळीवन होतें; त्यांतील तळ्यांत राहणाऱ्या नागाचें नांव नालन्दा असें होतें म्हणून या शहराला नालन्दा असें नांव पडलें अशी आख्यायिका आहे. परंतु सत्यकथा अशी आहे कीं, तथागत (गौतम बुद्ध) पूर्वकाळीं या प्रदेशांत बोधिसत्त्वाचें जीवन घालवीत असतांना या भागांतील एका मोठ्या राज्याचा अधिपति बनला व त्यानें आपली राजधानी या जागेवर स्थापन केली. भूतमात्रासंबंधीं दयेनें प्रेरित होऊन तो त्यांना नेहमीं साहाय्य करी. तो

जें किंवा जेवढें देई तें त्याला कधींच पुरेंसें वाटत नसे अगर पुरें होत नसे. म्हणून नालन्दा हा शब्द न + अलम् + दा ('न' म्हणजे नाहीं, 'अलम्' म्हणजे 'पुरें' व 'दा' म्हणजे देणें,) यांचा मिळून बनला आहे." या व्युत्पत्तीबद्दल अधिक शोध केला पाहिजे.]

" भारतांतील मठांची संख्या आजहि हजारोंनीं मोजतां येईल. परंतु विस्तार, भव्यता, उंची व श्रीमंती या बाबतींत येथील मठांची सर दुसऱ्या कोणत्याहि मठाला येणार नाहीं. मठांत राहणाऱ्या व बाहेरून येणाऱ्या भिक्षूंची संख्या नेहमीं दहा हजारांपर्यंत असते; हे सर्व भिक्षु महायान पंथी आहेत. अठरा पंथांचे अनुयायी येथें एकत्रित झाले आहेत. येथें सामान्य ग्रंथापासून वेद व तत्सम अन्य ग्रंथ, त्याचप्रमाणें वैद्यकीय ग्रंथ व गणित शास्त्रापर्यंत अनेक विषयांचा अभ्यास होतो. मठांत शंभर व्यासपीठें आहेत व शिष्य आपल्या गुरूचे पाठ व प्रवचनें निष्ठेनें श्रवण करतात व आपल्या आयुष्याचा एक क्षणहि ते वांया दवडीत नाहींत.

" या सुचरित लोकांचें जीवन स्वाभाविकच व्रती, संयमी व नियमनिष्ठ आहे. या गोष्टीचा एकच पुरावा म्हणजे या मठाच्या सातशें शतकांच्या दीर्घ आयुष्यांत एकहि शिस्तभंग करणारा भिक्षु येथें निघाला नाहीं. भारतांतील सर्व लोक या मठांतील भिक्षूंना मानतात व अनुसरतात. निरनिराळ्या धर्मविषयांवरील चर्चेला दिवस पुरा पडत नाहीं. प्रातःकालापासून सायंकालापर्यंत येथें धर्मचर्चेचा अखंड वाग्यज्ञ सुरू असतो. लहानथोर एकमेकांना मोकळ्या मनानें मदत करतात. जे त्रिपिटकांतील प्रश्नांवर चर्चा करूं शकत नाहींत त्यांना येथें कमी लेखलें जातें व लज्जेनें ते आपलें तोंड लपवितात. याच कारणासाठीं वादविवादांत शीघ्र नांव मिळवूं इच्छिणारे निरनिराळ्या देशांतील असंख्य विद्वान् या विद्यापीठांत येतात व आपल्या शंकांचें समाधान करून घेतल्यानंतर आपल्या पांडित्याच्या अनंतजलधारांनीं भारताची बौद्धिक भूमि समृद्ध करतात. या देशांत या मठाची कीर्ति इतकी पसरलेली आहे व तो इतकी मान्यता पावला आहे कीं, पुष्कळ लोक आपण नालन्दाचे विद्यार्थी आहोंत असा बहाणा करून ते जनतेपासून मान मिळवितात.

"येथील राजाच्या मनांत या मठाबद्दल अत्यादर असून तो त्यांतील भिक्षूंना मोठ्या बहुमानानें वागवितो. मठांतील भिक्षूंच्या योगक्षेमासाठीं त्यानें शंभर गांवांचें उत्पन्न बाजूला काढून ठेविलें आहे. प्रतिदिनीं दोनशें

कुटुंबें नियमीतपणें शेंकडों मण भात व मोठ्या प्रमाणावर लोणी व दूध यांचा या मठाला पुरवठा करतात. त्यामुळें विद्यार्थ्यांना चरितार्था-साठीं कोणापाशीं कसलीहि याचना करावी लागत नाहीं. त्यांच्या सर्व गरजा अनायासें भागतात. येथील लोकांची अभ्यासांतील प्रगति व यश यांचें बव्हंशीं श्रेय राजाच्या औदार्याला आहे."

**अभ्यास** :—१. नालन्दा म्हणजे काय? २. कोणत्या शास्त्रांचा अभ्यास या विद्यापीठांत होत असे ? ३. या विद्यापीठांत शिकण्यास येण्याचीं मुख्य कारणें सांगा. ४. विद्यापीठांचा खर्च कसा चालत असे ?

---

## ३२ : : : उदार नृपति हर्ष

[प्रस्तुतचा लेख एकाच १९"×१३" या आकाराच्या तांब्याच्या पत्र्यावर कोरलेला आहे. शहाजहानपूरपासून ४५ मैलांवरील बाणसखेडा येथें हा ताम्रलेख ख्रिस्ताब्द १८९४ मध्यें सांपडला. सध्यां लख-नौच्या प्रांतिक प्रदर्शिनींत तो सुरक्षित आहे. सम्राट हर्षानें वर्धमान् कोटीतळावरून हें दानपत्र काढलें. त्यांत मर्कटसागर या गांवाचें (अंग विषयांतील व पश्चिम पथांतील) दान दोन ब्राह्मणांना केलेलें आहे. संवत २२ म्हणजे हर्ष राजा राज्यावर आल्यापासूनचें २२ वें वर्ष, म्हणजे ख्रिस्तवर्ष ६२८ होय. शेवटीं दिलेली राजाची स्वाक्षरीं हुबेहूब खोदली असावी असें दिसतें.

लेख कोणी जुळविला त्याचें नांव त्यांत नाहीं. बाणाच्या सम-कालीन तो असल्यानें लांबच लांब समासांनीं युक्त असा हा लेख आहे यांत आश्चर्य नाहीं. शेवटच्या दोन ओळी हर्षानें रचिलेल्या असाव्या.

प्रस्तुतचा अनुवाद, हा 'संस्कृत इन्स्क्रिप्शन्स भाग १, संपादक. श्री.डी. बी.डिकसळकर,'या पुस्तकांतील उतारा नं.११च्या आधारें केला आहे.]

--**उतारा पुढील पृष्ठावर पहा**--

**अभ्यास** :-- १. 'हर्ष हा दानशूर होता' असें दर्शविणारीं या लेखांतील वाक्यें सांगा. श्रीमंतीचें लक्षण त्याच्या मतें कोणतें ? २ हर्षास माता-पित्याप्रमाणें वडील बंधु वंदनीय कां वाटे ? ३ तत्कालीन आर्यांचा आदर्श कोणता होता हें तीनचार वाक्यांत सांगा.

## उदार नृपति हर्ष याचा लेख

.........सर्वांस माहीत व्हावे कीं (माझे) वडील परमभट्टारक महाराजाधिराज **प्रभाकरवर्धन** आणि मातोश्री भट्टारिका महादेवी यशोमतिदेवी आणि आदरणीय बंधु परमभट्टारक महाराजाधिराज राज्यवर्धन यांचे धर्मप्रेमवर्धन करण्यासाठीं माझ्याकडून उपर्युक्त (मर्कटसागर) ग्राम....अग्रहार-म्हणून.. यावच्चंद्र-दिवाकरौ, राजकर आणि अन्य कर यापासून मुक्त, भारद्वाजगोत्री ..भालचंद्र आणि भद्रस्वामी या ब्राह्मणांस दिलेलें आहे. हें जाणून ग्रामस्थानीं..आमच्या आज्ञेनुसार या (ब्राह्मणां) ना नेहमीचे वजन, मापन, सुवर्ण करमणूक यावरील कर द्यावे, यांची योग्य सेवा आणि सन्मान करावा.....

आमच्या कुलाची उदार परंपरा अनुसरणारांनीं आणि इतरांनींहि या दानास अनुमोदन द्यावें. पाण्यांतील बुडबुड्याप्रमाणें किंवा विजेप्रमाणें चंचल असणाऱ्या लक्ष्मीचें पारितोषिक म्हणजेच परयशपरिपालन व दान.

**कर्मणा मनसा वाचा कर्तव्यं प्राणिभिर्हितं । हर्षेणैतत्समाख्यातं धर्मार्जनमनुत्तमम् ॥**

....संवत् २२, कार्तिक वद्य १.



स्व ह स्तो म म म हा रा जा धि रा ज श्री ह र्ष स्य

## ३३ : : : महाराष्ट्राचा अधिपति पुलकेशी

[ चालुक्यकालीन लेखांपैकीं राजा पुलकेशी यांच्यासंबंधीं माहिती देणारा एहोळी येथील शिलालेख महत्त्वाचा आहे. सत्याश्रय पुलकेशी हा हर्षाच्या समकालीन राजा होय. हा प्रस्तुतचा शिलालेख इ. स. ६३४ चा आहे. या लेखांत एकूण ३७ श्लोक आहेत. अनुष्टुप, इंद्रवज्रा, शार्दूलविक्रीडित, आर्या, मंदाक्रान्ता, वसंततिलका इ. अनेक वृत्तांमध्यें हे श्लोक रचलेले आहेत. यांतील निवडक श्लोकांचा अर्थ पुढें दिला आहे. कंसांतील आंकडे श्लोकांचा क्रमांक दर्शवितात. मूळ लेख 'एपिग्राफिया इंडिका,' व्हॉ. ६ ले. नं. १ चा आहे.

कै. डॉ. श्री. व्यं केतकर यांनीं या लेखाचें मराठी भाषांतर 'प्राचीन महाराष्ट्र' या पुस्तकांत पृ. ४६० वर दिलें आहे, त्याच्या आधारें पुढील उतारा दिला आहे. दुसरा उतारा ह्युएन-त्संगाचा असून 'भगवान् बुद्धासाठीं'* या पुस्तकांतून पृ. १४३–५४ वरून तो घेतला आहे. ]

(३) शूर आणि विद्वान् यांचेवर देगण्या व बहुमान एकसारखा अर्पण करणारा जो सत्याश्रय त्याचा सतत विजय असो !

(२०) कोंकण प्रांतांत त्याच्या आदेशांत वागणाऱ्या सैन्यरूपी पर्वतप्राय लाटांनीं शत्रूच्या सैन्याच्या एकाद्या डबक्यांतील हलणाऱ्या तरंगा प्रमाणें मौर्यसमृद्धीला खालीं बसविलें.

(२१) जेव्हां त्या अमितप्रभानें[1] पश्चिमसमुद्र–लक्ष्मी जी पुरी तीस वेढा दिला, त्या वेळीं त्याचीं शेंकडों जहाजें रांगेंत उभे राहिलेल्या मदोन्मत्त हत्ती-प्रमाणें दिसत होतीं. मेघांच्या पटलांनीं आकीर्ण झालेलें आकाश नूतन कमलांनीं युक्त अशा समुद्राप्रमाणें दिसत होतें व समुद्र आकाशाप्रमाणें दिसत होता.

(२२) त्याचे प्रतापामुळें वश झालेले लाट¶, मालव, गुर्जर वगैरे राजे शरण आलेल्यांनीं कसें वागावें याचेच जणु काय आचार्य झाले.

(२३) अपरिमित मोठेपणा आणि सामंतसेना यांचे मुगुटमणि असलेल्या, शेंकडो बलवान राजांच्या मुगुटांतील रत्नांनीं ज्याचे चरणकमल व्यापले होते, आणि युद्धांत पडलेल्या गजेंद्राच्या सैन्यामुळें जो जुगुप्सा[2] विषय झाला होता, अशा हर्षास त्यानें विगलितहर्ष केलें.

---

* उतारा ३१ ची प्रस्तावना पहा. १. अत्यंत तेजस्वी असलेल्या त्या (राजानें) ¶ गुजराथचा पूवभाग २. जुगुप्सा–निर्भत्सना, दोष देणें.

(२४) जेव्हां तो आपल्या असंख्य सैनिकांसह राज्य करीत होता, त्या वेळीं विंध्याच्या आसपासचा प्रदेश, जो रेवा नदीच्या विविध वाळूचे तटांनीं सुशोभित होता, त्यास कांहीं न करतां विंध्यसमीपता प्राप्त झाली. आपल्या तेजाच्या मोठेपणानें तो जास्त शोभला.

(२५) ज्यानें तिन्ही शक्त्या विधियुक्त काबीज केल्या आहेत, आणि त्यामुळें जो इंद्रतुल्य दिसत आहे, ज्याच्या उच्च घराण्यांतील जन्मामुळें व इतर उत्कृष्ट गुणांमुळें आणि ज्याच्या इच्छाशक्तीनें ९९ हजार खेडीं असलेल्या तिन्ही महाराष्ट्रांवर आपलें आधिपत्य मिळविलें,

(३१) त्यानें चोल, केरळ, पांड्य, इत्यादि नृपतींस वैभवास आणलें व पल्लव सैन्यरूपी धुक्यास आपल्या सहस्ररश्मिवत् सूर्याच्या किरणांनीं घालवून दिलें.

(३५) तेव्हां हें भव्य, मोठेपणाचें आगर, जिनेंद्रमंदिर तिन्ही समुद्रापर्यंत राज्य करणाऱ्या सत्याश्रयाचे अत्यंत मर्जीतील अशा हुशार रविकीर्तीनें बांधलें.

---

## ३४ : : : पुलकेशीचें औदार्य

[ ह्युएन-त्संगानें पुलकेशीचें केलेलें वर्णन 'भगवान बुद्धासाठीं' या पुस्तकांत १५३–१५४ वर आहे, तें येथें दिलेलें आहे. पुस्तकाचा अधिक परिचय पृ. ६० वर पहा. ]

"हा राजा उदारमतवादी असून दूरदर्शी आहे. त्याच्या औदार्याचें व दातृत्वाचें क्षेत्र फार मोठें आहे. त्याची प्रजा राजनिष्ठ असून त्याची तत्परतेनें सेवा करणारी आहे. खऱ्या योद्धयाला शोभेल अशीच त्याची अभिरुचि व रसिकता असून तो युद्धांत जयाला सर्वांत अधिक महत्त्व देतो. याच कारणास्तव त्याच्या राज्यांतील पायदळ व घोडदळ अति दक्ष व सदा सुसज्जित असतें. लष्करी शिस्तीची कडक अंमलबजावणी केली जाते. लढाईच्या प्रारंभीं हे सैनिक उन्मत्त होईपर्यंत मद्य प्राशन करतात व मग त्यांच्यापैकीं हातांत भाला घेतलेला एकेक शिपाई शत्रूच्या दहा हजार

सेनेला भारी असतो. या स्थितींत त्याच्या मार्गांत येणाऱ्या एखाद्या माणसाची त्यानें कत्तल केली तर कायदा त्याला शासन करीत नाहीं. जेव्हां युद्धासाठीं सेना चालूं लागते तेव्हां हे शूर शिपाई दुंदुभीच्या सैन्याच्या आघाडीला चालतात. त्याचप्रमाणें महाराष्ट्राचा हा सम्राट आपल्या हत्तीखान्यांत हजारों हत्ती युद्धासाठीं तयार ठेवतो. लढाईचा क्षण समीप आला कीं, या हत्तींना दारू पाजण्यांत येतें; आणि मग मद्यानें मत्त झालेले हे मातंग शत्रुसेनेवर प्रपाताप्रमाणें सोडले जातात. या स्थितींत जें जें म्हणून त्यांच्या पुढें येईल त्याचा ते चक्काचूर करून टाकतात...

"सांप्रत सम्राट हर्ष पूर्व टोंकापासून पश्चिम टोंकापर्यंत विजयी आहे. त्यानें दूरदूरच्या लोकांना वश केलें आहे, शेजारच्या मुलुखाचे राजे त्याच्या भयानें कापतात. परंतु एक महाराष्ट्राचे लोक मात्र त्याला शरण गेलेले नाहींत. हर्षानें बाकीच्या सर्व भारतांतील सेनेचें सेनापतीत्व स्वीकारून अनेक वेळां या लोकांवर स्वारी केली आहे पण त्यांचा प्रतिकारभंग तो कधींच करूं शकला नाहीं."

**अभ्यासः**—१. लेखांक ३३ व ३४ वाचून पुलकेशीची पुढील मुद्यासंबंधीं माहिती द्याः-(१)स्वभाव,(२)सैन्य, (३)आरमार,(४) पराक्रम, (५)योग्यता.

---

## ३५ : : : शंकराचार्यांच्या मतें गीतेचें प्रयोजन

[बौद्धधर्माचा पाडाव झाल्यावर भरतखंडाच्या चारहि कोपऱ्यांत वैदिक धर्माची ध्वजा लावणारा पुरुष शंकराचार्य होय. मलबार प्रांतांत पूर्णा नदीच्या तीरावर कालटी ग्रामी एका नंबुद्री ब्राह्मणाच्या कुळांत त्यांचा जन्म झाला (शके ७१० वैशाख शु १०). त्यांना अवघें ३२ वर्षांचें आयुष्य लाभलें. तेवढ्यांत त्यांनीं काशी येथील पंडितांशीं वाद करून त्यांना जिंकलें. उपनिषदें, गीता व वेदान्तसूत्रें या प्रस्थानत्रयींवर भाष्य लिहिलें, तेंच सुप्रसिद्ध शांकरभाष्य होय. या भाष्यामुळें जुन्या वैदिक संस्कृतीची परंपरा पुनरुज्जीवित होऊन तिचा भारतीय जीवनांतील धागा अखंड राहिला. शंकराचार्यांनीं आठव्या शतकापर्यंत अखंड अशी आणून पोहोंचविलेली परंपरा तेराव्या शतकांत ज्ञानेश्वरांनीं व विसाव्या शतकांत टिळकांनीं महाराष्ट्रांत पुनरुज्जीवित

केली. सारांश, भारतीयांचें आध्यात्मिक जीवन गीता ग्रंथावरील टीकाप्रतिटीकांतून व्यक्त होत आहे. मात्र कुणाहि एका टीकाकाराला संपूर्ण प्रमाण मानण्याचा प्रघात नसल्यानें धर्मग्रंथ एक ठेवूनहि सांप्रदायिकांचा संकुचितपणा वैदिक धर्माच्या अनुयायांत आलेला नाहीं. असो.

शंकराचार्यांनीं ग्रंथलेखन केल्यावर कर्ममार्गी कुमारील भट्टाचे शिष्य मंडनमिश्र यांचा वादांत पराभव केला व शेवटीं सबंध हिंदुस्थानभर प्रवास करून उत्तरेस बद्रीकेदार, पूर्वेस जगन्नाथपुरी, दक्षिणेस श्रृंगेरी व पश्चिमेस द्वारका या ठिकाणीं शंकराचार्यांचीं पीठें स्थापन केलीं. इतक्या लहान वयांत एवढें मोठें विधायक कार्य दुसऱ्या कोणी क्वचितच केलें असेल! त्यांच्या लेखनाचा नमुना म्हणून पुढील अनुवादित उतारा देत आहों.––'श्रीमद्भगवद्गीता––भाष्यार्थ' संपादक–आचार्य विष्णुशास्त्रीबापट, उपोद्घात पृष्ठ २ ते ५ पहा. गीताभाष्याचे प्रारंभीं गीतेचें प्रयोजन सांगतांना शंकराचार्य लिहितात :]

"वेदोक्त धर्म दोन प्रकारचा आहे. एक प्रवृत्ति लक्षण व दुसरा निवृत्ति लक्षण. जो जगाच्या स्थितीचें कारण, प्राण्यांच्या साक्षात् अभ्युदयाचें व मोक्षाचें कारण तो धर्म होय. पुरुषार्थाची इच्छा करणाऱ्या ब्राह्मणादि वर्णांकडून व ब्रह्मचारी–गृहस्थाश्रमी इत्यादि आश्रमींकडून अनुष्ठान केला जाणारा जो तो धर्म होय.

"दीर्घकालानें त्या धर्माचें अनुष्ठान करणाऱ्यांमध्यें विषयतृष्णेचा उद्भव झाल्यामुळें कमी होत जाणारा विवेक व विज्ञान यांना कारण होणाऱ्या अधर्माकडून धर्माचा पराभव होऊं लागला असतां, व अधर्माची वृद्धि होऊं लागली असतां जगाच्या स्थितीचें परिपालन करणारा आदिकर्ता नारायण नांवाचा विष्णु भूलोकाच्या ब्रह्माचें म्हणजे ब्राह्मणत्वाचें रक्षण करण्यासाठीं देवकीच्या ठिकाणीं वसुदेवापासून अंशानें उत्पन्न झाला, हें प्रसिद्ध आहे. ब्राह्मण्याच्या रक्षणाचें कारण असें कीं ब्राह्मणत्वाचें रक्षण केल्यानें वैदिकधर्म सुरक्षित राहील. कारण वर्णभेद व आश्रमभेद ब्राह्मणाच्या आधीन आहेत...... त्याला (नारायणाला) कोणतेंहि फळ संपादन करावयाचें नसलें तरी भूतांवर अनुग्रह करण्याच्या इच्छेनें प्रवृत्ति व निवृत्ति अशा दोन प्रकारचा वैदिकधर्म त्यानें शोक व मोह यांच्या महासागरांत निमग्न झालेल्या अर्जुनाला

उपदेशिला. कारण गुणांनीं श्रेष्ठ असलेल्या लोकांकडून स्वीकारलेला व अनुष्ठान केला जाणारा धर्म वृद्धि पावेल म्हणून तो अर्जुनालाच उपदेशिला.* भगवानांनीं उपदेश केलेला हा धर्म सर्वज्ञ पूज्यवेदव्यासांनीं गीता या नांवाच्या सातशें श्लोकांच्या प्रबंधांत ग्रथित केला."

**अभ्यास** :--शंकराचार्यांच्या मतें श्रीकृष्णानें अर्जुनास गीता कां सांगितली तें लिहा.

---

## ३६ : : : राष्ट्रकूटांचा कृष्णराज याचें दानपत्र

[बादामीच्या चालुक्यांचा पराभव करून राष्ट्रकूट घराणें इ.स. च्या आठव्या शतकांत उदयास आलें. प्राचीन काळांतील दक्षिणेंतील राजघराण्यांपैकीं हें घराणें महत्त्वाचें होय. श्रीकृष्णाच्या यदुकुलांत आपला जन्म झाला असें राष्ट्रकूट राजे मानीत. (मान्यखेट) मालखेड ही त्यांची राजधानी होती. इतिहासास माहीत असलेला त्यांचा मूळ पुरुष दंतिदुर्ग होय (इ. स. ७५०). या घराण्यांत दुसरा गोविंद, तिसरा अमोघवर्ष, तिसरा कृष्ण हे विशेष पराक्रमी राजे झाले. त्याचें राज्य सुमारें २२५ वर्षें टिकलें. हे अधिपति स्वतःस रट्ट किंवा रठ्ठ म्हणवीत. त्यांचें राज्य मुख्यतः महाराष्ट्रांत होतें, पण ते वारंवार उत्तरेंत स्वाऱ्या करीत व त्यांत ते यशस्वी होत. तिसऱ्या कृष्णाचें साम्राज्य कांची-तंजावरापासून माळवा-मध्यहिंदुस्थानपर्यंत पसरलें होतें.

प्रस्तुतचा ताम्रपट सातारा जिल्ह्यांतील कऱ्हाड येथें एका जुन्या घराचा पाया खणीत असतां सांपडला. या लेखांत राष्ट्रकूट घराण्याची वंशावळ प्रारंभीं दिलेली आहे. देवळी 'वर्धा' येथेंहि राष्ट्रकूटांचे ताम्रपट सांपडले, त्यांत हीच वंशावळ शब्दशः लिहिलेली आहे. प्रस्तुतचा लेख हा त्यानंतर १८ वर्षांनीं कोरलेला आहे. या लेखांतील कांहीं भाग पुढें भाषांतरित केलेला आहे. त्याचा लेखनकाल इ.स. ९५९ आहे. मूळ लेख 'एपिग्राफिया इंडिका' खंड ४ पृ.२८६–२९० पहा.]

---

*. अर्जुन हा त्या वेळच्या लोकांत मान्यता पावलेला होता. त्यानें आचरिलेला धर्म सर्वच आचरतील हा भावार्थ.

ॐ .... मुरारीच्या करपल्लवाचा विजय असो ......

कुमुदिनीनाथ (चंद्र) आहे..... त्याच्यापासून क्षितिपालवंश उत्पन्न झाला..... दुग्धसिंधूप्रमाणें (असलेल्या त्या वंशांत) मण्यांच्या माळेप्रमाणें यदुवंश निर्माण झाला..... याच वंशांत पुराणपुरुषानें (कृष्णानें) अवतार घेतला..... त्या वंशांतील शूर व कीर्तिमान राजपुत्र 'तुंग' या नांवानें ओळखले जाऊं लागले. त्याच वंशांत, शत्रूच्या हत्तींचा संहार ज्यांनीं केला असा पृथ्वीतलाचा भूषण 'रट्ट' उत्पन्न झाला; आणि त्याच्यानंतर त्याचा पुत्र राष्ट्रकूट याच्या नांवावरून (तो वंश) राष्ट्रकूट म्हणून जगांत प्रसिद्धीस आला .......

रट्टांचें सामर्थ्य टिकवावें अशी सामंतांनीं विनंति केल्यावरून जगत्तुंगाचा पुत्र अमोघवर्ष (या) वीरसिंहासनावर बसला.....तो धर्मामध्यें मनु, युद्धांत कार्तिवीर्य, लोकांचें मन आकर्षण करण्यांत दिलीप होता. उच्च स्थानावर असूनहि तो वृद्धाबरोबर नम्रतेनें वागे.

.... परमेश्वरा ( शिवा ) ला .... शक्तिधर स्वामी कुमार झाला त्याप्रमाणें या भूपतीला श्रीकृष्णराज हा पुत्र झाला.....

पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत व हिमालयापासून सिंहलद्वीपापर्यंत† असलेले सामंत, दण्डभयानें त्याला नमस्कार करीत. मात्र श्रीकृष्णराज आपल्या पित्याच्या आज्ञेंत असे.

( राज्याभिषेकानंतर )

चोलांचें उन्मूलन करून त्यांची भूमि आपल्या आश्रितांना दिली; चेर, पांड्य, सिंहल, या मंडलाधीश्वरांना त्यानें सामंत केलें; (या रीतीनें) दक्षिण दिग्विजय करून कीर्तिलतांकुरदर्शक स्तंभहि रामेश्वर येथें त्यानें उभारला.

परम भट्टारक महाराजाधिराज परमेश्वर श्रीमत् अकालवर्षदेव श्रीमत् वल्लभ* नरेंद्रदेव हा, राष्ट्रपति, विषयपति, ग्रामकूट, पुढारी, आणि संबंधी लोकांना आज्ञा करतो :

''सर्वांना विदित व्हावें कीं दक्षिण विभागांत माझ्या आश्रितांना

---

† भारताची प्राचीन सीमा येथें सहज सूचित झाली आहे.

*कृष्णराजालाच अकालवर्षदेव आणि वल्लभ असेंहि म्हणत.

जीवननिर्वाह मिळवून देण्यासाठीं, मंडलेश्वरांचें सर्वस्व ताब्यांत घेण्यासाठीं, कालप्रियगण्डमार्तण्ड, कृष्णेश्वर यांचीं मंदिरें उभारण्यासाठीं मेलपाटी[१] येथें माझ्या विजयी सैन्याचा तळ असतांना ¶शके ८८०–कालयुक्त संवत्सर फाल्गुन वद्य त्रयोदशी बुधवारीं, मी करहाट[२] विषयांतील कल्लि द्वादशकांपैकीं कंकें[३] नांवाचें गांव तेथें असलेल्या वृक्षाच्या रांगासकट, हिरण्यादेय, ........... सर्वोत्पत्तिसहित महातपस्वी, सकलसिद्धांत जाणणाऱ्या ईशान शिवाचार्यांचें शिष्य गगनशिव यांस, जो करहाटांतील वल्कलेश्वराचा स्थानपति आहे, आणि जो करंजखे (गांवा)हून आलेला आहे, त्यांस कार्तिकी पूर्णिमेस ठरविल्याप्रमाणें सर्व तपस्व्यांना आसन आणि वस्त्रें देण्यासाठीं यावच्चंद्र दिवाकरौ हें दान देण्यांत येत आहे.

या (गांवाच्या) पूर्वेस *कन्हवन्ना नदी, दक्षिणेस पेंदुरें[४] (गांव) पश्चिमेस आढें[५] नांवाचें ग्राम, उत्तरेस तीच कन्हवन्ना नदी......आहे. गगनशिवास कंके गांवांत शेती करतांना, करवितांना त्याचा उपयोग करतांना किंवा करवितांना कोणीहि अडथळा आणू नये.

जो अडथळा करील तो पंचमहापातकें ओढवून घेईल कारण असें म्हटलेलें आहे कीं,

षष्टिवर्षसहस्राणि स्वर्गे तिष्ठति भूमिदः ।
आच्छेत्ता चानुमन्ता च तान्येव नरके वसेत् ॥

......... योस्यग्मानें खोदिलें.

**अभ्यास :**—१. कृष्णराजाला आणखी कोणतीं नांवें होतीं ? त्यानें कोणते पराक्रम केले ? २. हें दानपत्र कशासाठीं दिलें आहे? त्यांत उल्लेखिलेल्या गांवांचीं आजचीं नांवें काय असावींत ?

---

१. बहुधा मेलपाटी ता. चित्तूर जि. उत्तर अर्काट ¶बुधवार९ मार्च इ. स. ९५९ २. कऱ्हाड. ३ सध्याचे कंकी
*कृष्णावेण्णाचें अपभ्रष्टरूप (कै. भांडारकर) ४ पांढुर, ५ आढी

## ३७ : : : काश्मीरच्या हर्षाची कथा

[ महाकवि कल्हण यानें 'राजतरंगिणी' हा ग्रंथ संस्कृत भाषेंत इ.स. ११४८-४९ मध्यें लिहिला. (तरंग १ श्लोक ५२ व तरंग८श्लोक३४००). या संस्कृत ग्रंथाचें मराठी भाषांतर धारचे कै. मा. व्यं. लेले यांनीं सर ऑरियल स्टीनकृत इंग्रजी भाषांतर व मूळ ग्रंथ यांवरून केलें व तें पुण्याच्या चित्रशाळेनें इ.स. १९२९ मध्यें प्रकाशित केलें. भाषांतरकार श्री. लेले प्रस्तावनेंत लिहितात, "सर्व संस्कृत वाङमयांत ज्याला इतिहास हें नांव बऱ्याच अंशानें लागू करतां येईल असा राजतरंगिणी हा एकच सर्वमान्य व सुप्रसिद्ध ग्रंथ आहे, असें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. .....या इतिहासाचा प्राचीन, पौराणिक व दंतकथात्मक भाग, अर्थातच संकलित व कमी विश्वसनीय आहे. मधील कालाचा भाग त्याच्याहून जास्त विस्तृत व विश्वसनीय आणि ग्रंथकर्त्याच्या कालापूर्वींच्या ५००–६००वर्षांचा (भाग) चांगलाच तपशीलवार, विश्वसनीय आणि राजकीय व सामाजिक स्थितीच्या वाचनीय वर्णनानें भरलेला आहे."

या ग्रंथाच्या शुद्ध प्रतीचें संशोधन करणारे व तिला प्रकाशांत आणणारे डॉ. स्टीन यांनींहि म्हटलें आहे कीं "या राजतरंगिणी ग्रंथाची योग्यता मध्ययुगीन पाश्चात्य ऐतिहासिक ग्रंथ आणि मुसलमानी तवारीखी यांच्यापेक्षां कमी नाहीं. ..... लेखकानें केलेलें वर्णन निव्वळ स्तुतिपाठकाच्या तऱ्हेचें केलेलें नसून त्रयस्थपणाचें व इतिहासलेखकाच्या धर्तीचें आहे. ...हा ग्रंथ कल्हणानें काव्य म्हणून लिहिला आहे, इतिहास म्हणून नव्हे... कल्हणाच्या अंगीं ऐतिहासिक दृष्टीला आवश्यक असा विवेचकपणा नव्हता ... या ग्रंथाच्या शेवटच्या आठव्या तरंगांतील माहिती विशेष तपशीलवार व विश्वसनीय आहे."

कालगणनेच्या दृष्टीनेंहि डॉक्टर महाशयांचा निष्कर्ष पुढीलप्रमाणें आहे.... १ पहिल्या तरंगांतील कालगणना विश्वसनीय नाहीं, कारण ती केवळ पौराणिक दंतकथा व काल्पनिक अनुमानावरून दिलेली आहे. दुसऱ्या आणि तिसऱ्या तरंगांतील कालगणनेचाहि बहुतेक तोच प्रकार आहे. २. चौथ्या तरंगांतील कालगणनेंत पंचवीस वर्षांचा फरक आहे. ३. शेवटच्या भागांतील म्हणजे तरंग ५ ते ८ मधील राजांच्या कारकीर्दीची कालगणना तपशीलवार व विश्वसनीय आहे.

डॉ. स्टीन म्हणतात कीं कल्हण हा पक्का शैव असूनसुद्धां त्यानें 'या ग्रंथांत बौद्धमताविषयीं दाखविलेली सहानुभूति चमत्कारिक वाटते'

वास्तविक यांत चमत्कारिक असें कांहीं नाहीं. हिंदुस्थानांत धार्मिक मतवैचित्र्याबाबत उदारपणा सर्वांच्या अंगवळणीं पडलेला व प्रसिद्ध आहे. कल्हण हाहि त्यास अपवाद नाहीं इतकेंच.

कै. लेले कृत भाषांतरांतून तरंग आठव्यांतील पृ. २१४-१५ व २६१-६२ वरील मजकूर पुढें दिला आहे. त्यांत ज्या हर्षाचें वर्णन केलें आहे त्याचा मृत्यु इ. स. ११००त झाला. मृत्युसमयीं त्याचें वय ४२ वर्षांचें होतें. या हर्षाचा सातव्या शतकांतील कनोजच्या हर्षाशीं कांहीं संबंध नाहीं हें सांगणें नकोच. ]

आमच्या या कथेंत ( राजतरंगिणींत ) येथवर पुष्कळशा राजांचें बरें वाईट वर्णन होत आलें आहे. पण दुर्दैवानें बुद्धीला अगम्य अशा प्रसंगाला ही कथा येऊन पोहोचली आहे. या हर्ष राजाच्या कथेंत सर्व तऱ्हेच्या सत्प्रयत्नांचा उदय तसेंच ते सारे प्रयत्न व्यर्थ गेल्याचेंहि वर्णन करावें लागणार. सर्व प्रकारचे विचारपूर्वक ठरविलेले बेत, तसाच त्या बेतामध्यें राजकारण व राजनीति यांचा अभाव दिसून येतो. तिच्यांत राजसत्तेचें अतिरिक्त निदर्शन, तसेंच व्यवस्थितपणाकडे आत्यंतिक दुर्लक्ष झालेलें दिसतें. ती कथा आत्यंतिक औदार्य व त्याबरोबर परस्वाच्या अपहाराची पराकाष्ठा यांनीं भरलेली आहे. तिच्यांत अत्यंत कारुण्य तसेंच क्रौर्यातिशय पाहण्यांत येतो..... ती सर्व बाजूंनीं स्पृहणीय, तरी तितकीच निंद्य,आणि सर्वथा वंद्य तितकीच तिरस्करणीय आहे...... ती कमनीय तितकीच अपकीर्तीमुळें वीट वाटण्याजोगी आहे...

हर्षानें पूर्वापार रिवाज व संस्था चालू राहण्यासाठीं वडिलांच्या वेळेच्या मंत्र्यांनाच अधिकार व कामें दिलीं. तो स्वतःच्या सेवकांच्या नादीं फारसा लागला नाहीं. त्यानें कंदर्प व मदन यांना अनुक्रमें द्वाराधिकारी व कंपनापति नेमून विजयसिंह वगैरेंनाहि त्यांच्यात्यांच्या योग्य कामें दिलीं. त्याचा राग शांत झाल्यावर त्यानें प्रशस्तकलश वगैरे मंत्र्यांना बंधमुक्त करून त्यांना पूर्वीचीच मोठाली कामें दिलीं. फक्त नोनक मंत्री व धात्रेय बंधु यांचे अगणित अपकार ध्यानांत आणून त्यानें त्या दोघांनाहि सुळावर देवविलें. तरी पुढें प्रसंग-विशेषीं, संकटसमयीं व बिकट कामांत त्याला त्या बुद्धिवान् व स्वामिभक्त नोनकाचें स्मरण होऊन पश्चात्ताप होत असे. योग्य माणसांच्या हातून अपकार घडलेला असला तरी त्याचा प्रसंगीं उपयोग होत असतो. घर जाळणाऱ्या अग्नीवरसुद्धां स्वयंपाक करून घेतां येतो (पृ.२१४–१५)

## हर्षाचा शेवट

हर्षदेव भुकेनें कासावीस झाला होता. त्याची प्रयागानें पुष्कळशी प्रार्थना केली. तेव्हां दारुण पुत्रशोकग्रस्त असतांनाहि त्यानें थोडेसे अन्नग्रहण करण्याचें कबूल केलें. पक्षाचें पिल्लं वरचेवर घरट्यांतून खायला आणणाऱ्या माता-पित्याची वाट पाहात बाहेर डोकावत असतें, त्याप्रमाणें तो भिक्षेकरी केव्हां खावयाला आणतो म्हणून प्रयाग वरचेवर खिडकींतून बाहेर पहात होता. इतक्यांत त्या कुटीभोंवतीं शिपायांनीं वेढा दिलेला दिसला आणि अंगणाच्या दाराचा अडसर काढण्याचा आवाज त्याला ऐकूं आला. हा विश्वासघात करणारा तो भिक्षेकरीहि त्या शिपायांमध्यें होता. तो मुक्ताला बाहेर बोलावीत होता. यावर त्यानें दाराची फळी उघडली आणि राजानें मुक्ताला बाहेर पाठविलें व न भितां कमरेची लहान सुरी काढून हातांत घेतली. तोंवर एक धाडशी शिपाई नागवी तलवार हातांत घेऊन मोठ्या ऐटीनें चालून आला. त्यानें अंगांत कवच घातलें होतें. तशा त्या कुटीच्या अडचणीच्या जागेंतहि राजानें त्याच्यावर हल्ला करून त्याला खालीं पाडलें, पण कृपाळूपणानें त्याला ठार केलें नाहीं...... दुसरा एक शिपाई झोपडीच्या छप्परांतून आंत उतरत आणि तिसरा वर चढत होता. राजा शस्त्र उगारून त्या पहिल्या शिपायाच्या पाठीवर वीरासनांत उभा असलेला पाहून त्यांची गाळण झाली व ते खालीं पडले. त्या वेळीं राजा हातांत दंड धारण करून रुरु दैत्याच्या पाठीवर उभ्या असलेल्या चामुंडेसारखा शोभत होता.

राजाचें हें शेवटचें लढणें वीरांचा सिंहनाद, रणवाद्यांचा उत्साहदायक शब्द किंवा उन्मत्त शस्त्रास्त्रांचा खणखणाट वगैरेंनीं शोभिवंत झालें नाहीं. उलट कांहीं शस्त्रधारी डामर हळूच त्या कुटींत शिरले व....त्या कोंडलेल्या राजाभोंवतीं गोळा झाले. पुढें आणखी एक जण छप्परांतून आंत उतरला आणि त्यानें प्रयागाच्या खांद्यावर व डोक्यावर जोरानें वार करून राजावरहि एकदम हल्ला केला आणि राजानें केलेला वार कांहींसा वांचवीत त्यानें राजाच्या छातींत दोन वेळां खंजीर खुपसला. त्याबरोबर राजानें 'महेश्वर महेश्वर' असें म्हटलें व तो छिन्नमूल वृक्षाप्रमाणें मरून पडला. तो चक्रवर्ती राजा असतांना, त्याला एखाद्या पळून जाऊन घरांत लपून बसलेल्या चोराप्रमाणें मरण आलें.

**अभ्यास**: १ राजतरंगिणींतील आठवा तरंग वाचा. २. हर्षाच्या कथेबद्दल कल्हणाचें काय विचार होते ?

## ३८ : : : भास्कराचार्यांचीं समीकरणें

[भारतीय गणित शास्त्रज्ञांमध्यें भास्कराचार्यांचें स्थान श्रेष्ठ आहे. त्याचा विवेचन पद्धति तार्किक असूनहि सोपी आहे. प्राचीन पद्धतीप्रमाणें त्यांचें लेखन छंदबद्ध आहे पण त्यांतहि कवीची कल्पकता दृष्टीस पडते. काटकोनत्रिकोण, गोलांचें क्षेत्रफळ, विमूलचा (surds) सिद्धांत व विमूलाचीं उदाहरणें सोडविण्याची पद्धति त्यानें जगास दिला. त्याचप्रमाणें बीजगणितामध्येंहि कुट्टक (indeterminate problems of the first degree and of the second degree) वर्गकुट्टक, मिश्र कुट्टकें सोडविण्याच्या पद्धति त्यानें बाराव्या शतकांत लिहिल्या. पाश्चात्यांनीं त्याच पद्धति पुनः सतराव्या शतकांत जगापुढें मांडल्या. $ax^2 + 1 = y^2$ याला जें 'पेलचें समीकरण' म्हणतात, त्याऐवजीं भास्करचें समीकरण म्हणावयास हवें, असें गणिताचे प्रसिद्ध प्राध्यापक श्री. एल् व्ही. गुर्जर यांचें म्हणणें आहे. पहा--Ancient Indian Mathematics & Vedha पृ. १०४-१०७ व १३७]

### वर्तुळाचें क्षेत्रफळ व गोलाचें घनफळ

वृत्तक्षेत्रे परिधि गुणितव्यासपादः फलं तत् ।
क्षुण्णं वेदैरुपरि परितः कन्दुकस्येव जालम् ।
गोलस्यैवं तदपिच फलम् पृष्ठजं व्यासनिघ्नम
षड्भिर्भक्तं भवति नियतं गोलगर्भं घनाख्यम् ॥

पहिल्या ओळींत वर्तुळाचें क्षेत्रफळ दिलें आहे.

$$(\text{परिघ}) \times \frac{1}{4}\ (\text{व्यास}) = 2\pi r \times \frac{2r}{4} = \pi r^2$$

दुसऱ्या ओळींत गोलाच्या पृष्ठभागाचें क्षेत्रफळ खालीलप्रमाणें दिलें आहे :

$$= (\text{मोठ्या वर्तुळाचें क्षेत्रफळ}) \times 4$$

$$= 4\pi r^2\ (\text{वेद म्हणजे } 4)$$

यांतील $r$ ही गोलाची त्रिज्या आहे.

तिसऱ्या व चौथ्या ओळींत गोलाचें घनफळ सांगितलें आहे :

$$\frac{(\text{गोलाचा पृष्ठभाग}) \times (\text{व्यास})}{6} = \frac{4\pi r^2 \times 2r}{6}$$

$$= \frac{4}{3}\pi r^3$$

## ३९ : : : राजपुतांची उत्पत्ति

[ पृथ्वीराजरासो हें महाकाव्य हिंदी भाषेच्या प्रारंभिक कालांतील होय. प्राकृत भाषेचें स्वरूप नि हिंदीची सुरुवात यांचें मिश्रण त्यांत आढळतें. या काव्याचा कवि चन्द हा पृथ्वीराज चव्हाण या सम्राटाचा स्नेही. त्याचें हें काव्य शौर्यप्रधान नि वीररसात्मक आहे. सात हजार श्लोक मीं रचलें असें चंद कवि म्हणतो आणि उपलब्ध प्रतींत १६३०० आहेत. या काव्यांत नंतर पुष्कळच भर पडली आहे. अर्थात् हें काव्य ऐतिहासिक मानणें अवघड आहे असें विद्वानांचें मत बनत चाललें होतें, परंतु अलीकडे सात हजारच छंद असलेली म्हणजे मूळांत चन्दकवीनें रचिलीं एवढीं कवनें असलेली एक प्रत सांपडली आहे. पृथ्वीराजानंतरच्या अनेक घटनांचें वर्णन पूर्वींच्या प्रतींत असल्यानें काव्याची ऐतिहासिक योग्यता कमी होत होती. हा आक्षिप्तभाग या प्रतींत नाहीं. पंजाब युनिव्हर्सिटीचे उपकुलगुरु वूलनर साहेब एम्. ए. (ऑक्सफर्ड), डी लिट. (पंजाब) यांच्या उत्तेजनानें, नव्या सांपडलेल्या प्रतीचा हिंदी अनुवाद करण्याचें कार्य सोलन संस्थानचे राजगुरु साहित्याचार्य पं. मथुराप्रसाद दीक्षित यांनीं सुरू केलेलें आहे.

याच ग्रंथांतून पहिल्या समयांत किंवा सर्गांत राजपुत राजांची उत्पत्ति यज्ञकुंडांतील अग्नापासून झाली असें सांगणारें वर्णन आहे. तें पुढें दिले आहे. राजपुतांची उत्पत्ति कशी झाली याबद्दल जीं भिन्नभिन्न मतें आहेत, तीं प्रा. ओतूरकरकृत हिंदुस्थानचा सोपपत्तिक इतिहास पृ. ८७–८८ वर पहावीं ]

ऋषिराज वशिष्ठांनीं मंत्रजप करून राक्षसांपासून यज्ञ निर्वेध रहावा म्हणून परमेश्वराची प्रार्थना केली.

तेव्हां अग्निकुंडांतून प्रतिहार नांवाचा पुरुष प्रकट झाला व तो यज्ञाच्या द्वारावर जाऊन उभा राहिला. नंतर ज्यानें ब्रह्मचर्यव्रत धारण केलें होतें असा चालुक्य नांवाचा दुसरा पुरुष प्रकट झाला. त्यानंतर अत्यधिक शौर्यशाली **पवार** नांवाचा तिसरा पुरुष प्रकट झाला. ऋषि वशिष्ठानें त्याला 'परमार' शब्दानें आमंत्रित केलें, कारण शत्रूला मारणारा सर्वोत्तम वीर तो होता. त्या तिघांनीं राक्षसाशीं अनुपम संग्राम केला.

"पुनः वशिष्ठांनीं ध्यान केलें तेव्हां प्रचंड चार भुजा, चार मुख, रक्तवर्ण,

उन्नतशरीराचा एक पुरुष अग्निकुंडांतून उत्पन्न झाला; तो अग्नीप्रमाणें तेजस्वी होता. त्याचें नांव चहुवान (चव्हाण) होय. या चव्हाणानें ब्राह्मणांचें रक्षण केलें नि याच वंशांत पृथ्वीराज उत्पन्न झाला."

**अभ्यास :—टीपा लिहा :** १. पृथ्वीराजरासो. २. राजपुतांच्या उत्पत्ती-संबंधीं भिन्न मतें.

---

## ४० : : : अकराव्या शतकांतील लोकस्थिति

[अल्-बिरूनीचें संपूर्ण नांव अबू रहन महम्मद इब्न अहमद अल्-बिरूनी हें होय. हा गणिती व तत्त्वज्ञानी म्हणून प्रसिद्ध आहे. खुरासान प्रांतांत खिवा येथें तो जन्मला. गज्नीच्या महमदानें तो प्रांत इ. स. १०१७ त जिकला तेव्हां तेथील राजाबरोबर त्याच्या सल्लागारांपैकीं एक म्हणून अल्-बिरूनीस गज्नीला नेलें. तेथें कांहीं दिवस त्यांस राजकीय कैदी म्हणून राहावें लागलें असावें. महमुदानें जेव्हां हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या त्यां वेळीं त्याच्या बरोबर अल्-बिरूनी या देशांत आला असा संशोधकांचा तर्क आहे. स्वदेशीं परतल्यावर अरबी भाषत त्यानें 'तहकीक–इ–हिंद' (हिंदुस्थानसंबंधीं चौकशी) हा ग्रंथ लिहिला. तो इ स. १०४८ त मृत्यु पावला. वरील ग्रंथाच्या प्रस्तावनेंत तो लिहितो : "परकीयांचा धर्म अथवा चालीरीति यांचें सत्य व यथातथ्य वर्णन करणारे लेखक अगदीं थोडे आढळतात. पण शास्त्रीय दृष्टीनें ग्रंथ लिहिणारांनीं ही सत्यदृष्टि सोडून चालणार नाहीं...माझें पुस्तक म्हणजे केवळ जें घडलें त्याचें इतिवृत्त होय." या ग्रंथाचा इंग्रजी अनुवाद डॉ. एडवर्ड सचौ (Sachau) यांनीं '**अल्बिरूनीज इंडिया**' या नांवानें इ. स. १८८८ मध्यें प्रकाशित केला. त्यानींहि अल्-बिरूनीच्या सत्यप्रतीची वाखाणणी केली आहे. आपल्यास 'चक्षुर्वैसत्यं' अशी हकीकत लिहितां यावी म्हणून अल्-बिरूनीनें या देशांतील वास्तव्याचा उपयोग येथील माहिती मिळवि यासाठीं केला. त्यासाठीं तो संस्कृत भाषा शिकला. त्यानें आपल्या पुस्तकांत आधार म्हणून भगवदगीता, ब्रह्मसिद्धांत, विष्णु, वायु, मत्स्य, आदि पुराणें आणि अन्य ग्रंथांतील उतारे दिले आहेत. विद्वान् व अविद्वान् अशा हिंदूंशीं चर्चा करून त्याला जी माहिती मिळाली तीहि त्यानें ग्रथित केली आहे. परकीयांस माहिती देण्यास हिंदू नाखूष असतात असा

त्यानें आपला अनुभव वर्णिला आहे. बनारससारख्या तत्कालीन विद्येच्या केंद्री जाण्याची संधि त्यास मिळालेली दिसत नाहीं. तरीहि भारतांतील धर्म, तत्त्वज्ञान, वाङ्मय, भूगोल, खगोलशास्त्राचें ज्ञान, चालीरीति कायदे यांची इ. स. १०३० च्या सुमाराची माहिती तो ग्रथित करूं शकला आहे. विशेषतः त्यानें दिलेली हिंदुस्थानची भौगोलिक माहिती इतकी महत्त्वाची आहे कीं त्यावरून 'हिंदुस्थानचा दहाव्या शतकांतील भूगोल' या विषयावर निश्चितपणें एक उपयुक्त टिपण करतां येईल. मात्र राजकीय घटनांची माहिती त्याच्या ग्रंथावरून मिळूं शकत नाहीं.

अल्-बिरूनी धर्मानें मुसलमान होता. तथापि हिंदु लोकांच्या तत्त्वज्ञानाबद्दल व विशेषतः श्रीगीतेंतील 'आत्म्याचें अविनाशित्व' आदि सिद्धांत त्यास पटले असून त्यानें त्याची स्तुति केली आहे. प्रसंगोपात्त अनेक गोष्टींची निंदाहि त्याच्या पुस्तकांत आहे. 'तत्कालीन परकीयानें त्याच्या देशांतील इस्लामी वाचकासाठीं केलेलें भारताचें वर्णन' या दृष्टीनें हें सगळें पुस्तक इतिहासाच्या अभ्यासूंनीं वाचण्यासारखें आहे.

प्रस्तुत पुस्तकांतील प्रकरण एकचा कांहीं भाग, प्रकरण सत्तावन व भूगोलविषयक उल्लेख असे तीन उतारे, येथें दिले आहेत. यासाठीं डॉ. सचौच्या पुस्तकांतील (१९१४ची आवृत्ति) भाग १ पृ. १७–२६ व भाग २ पृ. १४९ व भाग १ पृ. २६१ पहावें.]

## प्रकरण १

### वृत्तांत सांगण्याच्या दृष्टीनें

### प्रास्ताविक म्हणून हिंदूंविषयीं सामान्य माहिती

हिंदुस्थानसंबंधीं कोणतीहि माहिती (आपणास) समजण्यास का अवघड जाते याची पूर्ण कल्पना या विषयाचा प्रारंभ करण्यापूर्वीं आपणांस होणें आवश्यक आहे ........ वाचकांनीं हें ध्यानांत ठेवावें कीं हिंदु हे आपणांहून प्रत्येक बाबतींत पूर्णपणें निराळे आहेत.

....प्रथम भाषेचा उल्लेख करतों. अर्थात् इतर राष्ट्रांच्या बाबतींतहि हा भेद असतो. (हिंदूंची) भाषा ही शब्द व प्रत्यय यांच्या बाबतींत खूप समृद्ध व विकासक्षम(of enormous range)आहे ....... त्यांच्या भाषेचीं दोन रूपें आढळतात : सामान्य लोकांच्या बोलण्याचालण्यांत असणारें 'प्राकृत' हें एक रूप. दुसरें रूप म्हणजे वरिष्ठ वर्गांत व सुशिक्षितांत प्रचलित असलेलें सुसंस्कृत

व व्याकरणाच्या नियमांनीं बांधलेलें; यालाच संस्कृत भाषा म्हणतात. या भाषेंतील कांहीं ध्वनींचे उच्चार अरेबी व फारसी सारखे नाहींत; किंवा जवळजवळचेहि वाटत नाहींत. आपल्या जिभेनें त्याचे उच्चार करणेंच कठिण ...... आपल्या भाषेंत (लिपींत) तो उच्चार लिहून व्यक्त करणेंहि अत्यंत अवघड. संस्कृतांत शब्दांच्या मध्यंतरीं स्वर न येतां दोन किंवा तीन व्यंजनांनीं अनेक शब्दांचा आरंभ होतो.

....हिंदूचे शास्त्रीय ग्रंथ छंदोबद्ध असतात .. त्यामुळें शब्दजाल वाढतें.

दुसरा फरक म्हणजे धर्माचा. त्यांना ज्याबद्दल श्रद्धा आहे त्याबद्दल आम्हाला नाहीं, तसेंच त्याच्या उलटहि .....सर्व परकीयांविरुध्द (वागतांना) त्यांचा धर्माभिमान जागृत होतो. ते त्यांना 'म्लेंच्छ'–अपवित्र–मानतात, व त्यांच्याशीं विवाह, रोटीव्यवहार अथवा पानव्यवहार करणें किंवा अन्यरीतीनें संबंध ठेवणें निषिद्ध मानतात. असें केल्यानें आपण अपवित्र होऊं अशी त्यांची समजूत आहे. नेहमींच्या व्यवहारांत, अस्वच्छ किंवा अपवित्र झालेली वस्तु पुन्हाः शुद्ध करून घेण्याची मनुष्य इच्छा करतो. पण एकदां अपवित्र झालेली वस्तु पुन्हा शुद्ध करावी आणि ती परत मिळवावी अशी हिंदूंची कधींच इच्छा नसते. त्यांच्या धर्माचे नाहींत अशा माणसाचे (परकीयांचे)—मग तो त्यांच्या धर्माकडे आकृष्ट होत असला तरीहि—स्वागत करण्याची त्यांना मनाई आहे. यामुळें त्यांच्याशीं परिचय करणें अगदीं अशक्य होतें. त्यांच्यांत आणि आमच्यांत (परिचय येण्याच्या आड) हा फारच मोठा खंदक आहे.

तिसरी गोष्ट म्हणजे त्यांच्या व आपल्या सगळ्या चालीरीति आणि रुढीमध्यें इतका फरक आहे कीं, आपला पोशाख, वागणें, आचार यांमुळें त्यांचीं मुलें आपणांस भितात. आपण पिशाच्च योनींतील आहों व आपल्या कृति अयोग्य आणि बेडौल आहेत असें त्यांना वाटूं लागतें. अर्थात् ओघा-ओघानें व न्यायाच्या दृष्टीनें आपल्याला हें मान्य केलें पाहिजे कीं, परक्यासंबंधींची अशी वृत्ति आपण व हिंदूंमध्येंच आहे असें नसून सर्व राष्ट्रांतून दुसऱ्या राष्ट्रांबद्दल ती आढळते.

हिंदू आणि परराष्ट्रीयांतील भिन्नत्व आणखी वाढलें याचें कारण श्रमण वर्ग ( बौद्धधर्मगुरु ). सामान्यतः ते ब्राह्मणांचा द्वेष करतात, पण आपल्या-पेक्षां त्यांना ते ब्राह्मणच जवळचे वाटतात. खुरासान, इराक, सिरिया इ.

सर्व स्थानांत झरतुष्टानें आपला धर्म स्थापल्यानें बौद्ध धर्माची तेथून हकालपट्टी झाली.....त्यानंतर इस्लामचें आगमन झालें. हिंदुस्थानवर त्यांच्या स्वाऱ्या सुरू झाल्या आणि परकीयांबद्दलचा तिटकारा हिंदूंमध्यें आणखी वाढला.....

( या स्वाऱ्यांच्या प्रसंगानें ) त्यांच्या हृदयांत (आपल्याबद्दल) कायमची घृणा ठाण देऊन बसली (आहे.)....गझनीच्या महंमदानें तर या देशाची समृद्धि उध्वस्त केली, आश्चर्यकारक पराक्रम केले, पण त्यामुळें धूलिकणासारखी हिंदूंची सर्व दिशांकडे दाणादाण झाली ..... अर्थातच एकंदर मुसलमानांबद्दल त्यांच्या मनांत अत्यंत तिरस्कार मुरलेला असतो.

पांचवें कारण—जें सांगणें म्हणजे उपरोध केल्यासारखें वाटेल—तें म्हणजे त्यांच्या राष्ट्रीय स्वभावाचीं वैशिष्टयें. त्यांच्यांत तीं (लक्षणें) रुजलेलीं आहेत आणि प्रत्येकाला तीं दिसूं शकतात. आपण एवढेंच म्हणूं कीं, ज्याला औषध नाहीं असा 'मर्खपणा' हाच एक आजार आहे. हिंदूंचा असा विश्वास आहे कीं, जगांत त्यांच्या देशाखेरीज दुसरा देश नाहीं, त्यांच्यासारखें राष्ट्र नाहीं, त्यांच्यासारखे राजे, त्यांच्यासारखा धर्म, विज्ञान अन्यत्र नाहीं. ते तापट, पोकळ अभिमानी, आपणास शहाणे समजणारे, आणि जडबुद्धीचे आहेत. त्यांचा स्वभावच असा आहे कीं, आपल्याला जें माहीत आहे तें दुसऱ्यास सांगूं नये. त्यांच्या त्यांच्यांतसुद्धां परजातीयांपासून तें (ज्ञान) लपवून ठेवण्याची ते पराकाष्ठा करतील. अर्थातच परराष्ट्रीयांच्या बाबतींत सांगावयासच नको.. ....ते जर प्रवास करतील आणि दुसऱ्या राष्ट्रांशीं मिसळतील तर त्यांची ही वृत्ति लवकर पालटेल, कारण ते जितके (आज) संकुचित वृत्तीचे आहेत तितके त्यांचे पूर्वज नव्हते.

**अभ्यास**:—१ हिंदूंची भाषा, धर्म, चालीरीति, परकीयांसंबंधीं तिटकारा, अहंकार यांसंबंधीं अल्बिरूनीनें जें सांगितलें त्यांत तथ्यांश असेल काय ? आजच्या स्थितीशीं त्याच्या विचारांची तुलना करा.

---

## प्रकरण ५७ वें

## दान आणि आपली मिळकत मनुष्यानें कशी खर्च करावी यासंबंधीं

प्रत्येक दिवशीं देतां येईल तेवढें दान त्यांनीं देणें आवश्यक आहे.-- ..एक वर्ष नव्हे, तर एक महिनाहि ते लोक पैसे जवळ ठेवीत नाहींत.

........ प्रजेची संपत्ति, त्यांचीं मुलेंबाळें यांचें रक्षण करतो म्हणून राजाला ते (शेतकरी) उत्पन्नाचा एक षष्ठांश देतात. सामान्य लोकांनाहि तोच नियम लागू आहे, पण आपली संपत्ति सांगतांना ते नेहमीं खोटें बोलतील आणि फसवतील .....

कर दिल्यानंतर उरलेली प्राप्ति कशी खर्चावी यासंबंधीं भिन्न मतें आहेत. कांहीं जण प्राप्तीचा नववा हिस्सा दानासाठीं ठेवतात; कारण ते प्राप्तीचे तीन वाटे करतात–एक हिस्सा हृदयाची चिंता दूर करण्यासाठीं शिल्लक ठेवण्यासाठीं, दुसरा हिस्सा व्यापार नफा मिळविण्यासाठीं आणि तिसऱ्या हिश्श्याच्या तिसरा हिस्सा (म्हणजे प्राप्तीच्या एक नवमांश हिस्सा) दानांत खर्च करण्यासाठीं म्हणून ते बाजूला काढून ठेवतात.

कांहीं जण प्राप्तीचे चार भाग करतात. एक भाग साधारण खर्च, दुसरा भाग मनौदार्यदर्शक व आदर्श कार्यासाठीं, तिसरा दान आणि चौथा भाग शिल्लक म्हणून.—पण तोहि ( हा चौथा भागहि ) तीन वर्षेपर्यंत होणाऱ्या साधारण खर्चापेक्षां अधिक असून चालणार नाहीं. जर शिल्लक टाकावयाचा एकचतुर्थांश भाग हा या रकमेपेक्षां जास्त झाला, तर तेवढा जास्त भाग दानांत खर्च केला जातो.

बेसुमार व्याज घेऊन (Usury) सावकारी करणें किंवा व्याज घेणें हें नियमबाह्य आहे. व्याज घेतल्यास भांडवल ज्या मानानें वाढेल त्या प्रमाणांत त्यानें पाप केलें असें होईल. शूद्रांना फक्त व्याज घेण्याची परवानगी आहे. पण तेंहि त्यानें भांडवलाच्या $\frac{१}{५०}$ पेक्षां जास्त घेऊं नये (म्हणजे शें. २ पेक्षां जास्त दर घेतां येत नाहीं).

**अभ्यास:**—आज यासंबंधीं काय व्यवहार चालू आहे? आज आपण प्रगत आहों कां पूर्वीं होतों?

---

## भूगोलविषयक माहिती

सरसुत (सरसुती = सरस्वती) नदी सोमनाथाच्या पूर्वेस समुद्रास मिळते. यमुना नदी कनोजच्या पुढें गंगेस मिळते. कनोज हें त्या नदीच्या (गंगेच्या) पश्चिमेस आहे. सरस्वती व गंगा यांचेमध्यें आणखी एक नदी आहे. ही नदी तुर्मुंझ व पूर्वेकडील टेकड्यांवरून नैऋत्य दिशेकडे वहात जाऊन. बहरूच (भडोच) जवळ समुद्रास मिळते. भडोच हें सोमनाथ-

च्या पूर्वेस साठ योजनें अंतरावर आहे. पुढें गंगा, रहाब, कुही व सरयु या बारी शहराजवळ एकत्र मिळतात. हिंदूंचा असा समज आहे कीं, गंगा ही स्वर्गातून मृत्युलोकावर आली, तेथें ती सप्तप्रवाहांत वाहूं लागली व त्यापैकीं मध्यवर्ती प्रवाहास तेवढें गंगा हें नांव प्राप्त झालें आहे.

---

## ४१ : : : यादवकालीन दानपत्र

[ चालुक्य घराण्यानंतर प्रसिद्धीस आलेलें राजघराणें म्हणजे यादवांचें होय. बाराव्या शतकांत हें राजघराणें प्रतिष्ठा पावलें व इ. स. १३१८त मुसलमानांच्या स्वाऱ्यांमुळें तें नष्ट झालें. या घराण्यात सिंधाण नांवाचा पराक्रमी राजा होऊन गेला. तो इ. स. १२१० मध्यें गादीवर आला. त्याच्या कारकीर्दींतील दानपत्रांतील कांहीं भाग पुढें दिला आहे. एपिग्राफिया इंडिका भा. १, पृ. ३४४–४६ ]

ॐ गणपतये नमः। प्रसिद्ध भास्कराचार्यांचा विजय असो. (हे आचार्य) पूज्यपाद, भट्टसिद्धांताचे विशेष अध्ययन केलेले, सांख्य-शास्त्रांत अद्वितीय, तंत्र-शास्त्रांत स्वतंत्र विचार करणारे, वेदांचे परिपूर्ण ज्ञाते, यंत्रकलेमध्यें श्रेष्ठ होते..

ज्या वंशांत भयभीत धरणीला वांचविण्यासाठी विष्णूचा अवतार झाला त्या कीर्तिमान यदुवंशाचें कल्याण असो.....(या वंशांतील विद्यमान राजा) सिंधाण यानें चांगदेवास (या नांवाच्या गृहस्थास) आपला मुख्य ज्योतिषी (खगोलज्ञ) नेमलें आहे. त्यानें भास्कराचार्यांच्या ग्रंथाचा अभ्यास करण्यासाठीं महाविद्यालय स्थापलें आहे. सिद्धांतशिरोमणीचें आणि भास्कराचार्य आणि त्यांच्या घराण्यांतील इतरांनीं लिहिलेल्या तत्त्वांचें अध्ययन (येथें) व्हावें हा मुख्य हेतु आहे.

या महाविद्यालयास जमीन आणि इतर जें दान शौदेव आणि हेमाद्रिदेव (मांडलिक राजे) यांनीं दिलें आहे, (त्यामुळें) धार्मिक गुणांची वाढ होणार असल्यानें नंतर येण्याऱ्या राजकर्त्यांनीहि त्याचें रक्षण करावें.

शुभास्तु. शके ११२८ प्रभवनाम संवत्सर, श्रावण पौर्णिमेस, ग्रहणकालीं प्रसिद्ध शौदेवानें सर्व लोकांसमक्ष आपल्या गुरूनें स्थापित केलेल्या विद्यालयाला (गुरूच्या) हातावर पाणी सोडून हीं उत्पन्नाचीं साधनें दान दिलीं आहेत.

**अभ्यास** :—१ या दानपत्रांतील शक कोणता? त्याचा सन काय येतो? २. भास्कराचार्यांबद्दल तत्कालीनांना इतका आदर कां वाटत होता?

---

## ४२ : : : नांदगांवचा अर्धमराठी शिलालेख

[ प्रस्तुत लेख सहा ओळींचा असून त्यानें २ फूट ५ इं. रुंद व ९ इंच उंच इतकी जागा व्यापली आहे. लेखाच्या आरंभींचा भाग संस्कृतांत असून नंतरचा मराठींत आहे. 'ख' बद्दल 'ष' चा उपयोग केला आहे. लेखाचा काल शक ११७७ आनंद संवत्सर (इ. स. १२५५–५६) आहे. त्यांत श्रीमत् प्रौढ-प्रताप चक्रवर्ती श्रीकान्हिरदेव (कृष्ण देवराव यादव) याचा उल्लेख आहे.

नांदगांव हें खेडें वऱ्हाडांत अमरावतीच्या ईशान्येस २० मलांवर वसलें आहे. गांवाबाहेर एका टेकडीवर खंडेश्वर, देवी व नरसिंह या तीन देवतांचा मिळून एक समान सभामंडप आहे. या देवालयाच्या बाहेरच्या भिंतीवर प्रस्तुत शिलालेख कोरलेला आहे.

खंडेश्वराच्या देवळांत लाखोली किंवा लक्ष फुलें देवाला वाहण्याकरितां ज्यांनीं गद्याण नामक नाणीं दिलीं त्या दहा लोकांचीं नांवें लेखांत आलीं आहेत. गद्याण नांवाचें सोन्याचें नाणें त्या वेळीं महाराष्ट्रांत प्रचलित होतें. तें ४८ गुंज वजनाचें किंवा अधेलीच्या वजनाचें सोन्याचें नाणें होतें असें दिसतें. लेखांत ग १ असें म्हटलें आहे, त्याचा अर्थ गद्याण १, होय.

पूर्वींचीं नाणीं, परंपरा व यादवकालीन मराठी भाषेची कांहीं कल्पना येण्यासाठीं हा लेख येथें दिला आहे. त्यांतील सहा ओळी दर्शविण्यासाठीं प्रारंभीं कंसांत आंकडा घातला आहे.

ही सर्व माहिती, भा. इ. सं. मंडळ, त्रैमासिक वर्ष २८ अंक १–२, पृष्ठ ८ ते ११ वर विस्तारानें दिलेली आहे.]

(१) ओं स्वस्ति [:*] श्री सकु ११७७ आनंदसंवत्सरेअद्येह श्रीमत् प्रौढप्रताप-चक्रवर्ती श्रीका--

(२) न्हिरदेवविजयराज्ये तत्पादपद्मोपजीवी समस्तभरभारनिरूपित श्रीपांचो–

(३) लिनि..तन्निरूपिवितद्रवीडी वडवो[1] श्रीसोमदेवदत्त लाषौलिए ग वडउ पं १॥

(४) डितें दत्त लाषौए ग१ [।*] आसुगिनायकें दत्त लाषौलिए[2] ग १ [।*] ढों

(५) ढिए दत्त लाषौलिए ग ? [।*] भोपतिनायकें दत्त लाषौए ग [।*] धनैएं दत्त लाषौलिए ग १ [।*]

(६) [ना] गैएं [द] त्त लाषौए ग १ [।*] प्रति (?) श्रीठाकुरें दत्त लाषौलिए ग १ [।*] ढोंडदाऊ दत्त द्वि लाषौए [।*]

अभ्यास :—१. लाखोली देणाऱ्यांचीं नांवें सांगा व गद्याणासंबंधीं माहिती लिहा.
२. सर्व लेख आजच्या मराठींत लिहिण्याचा यत्न करा.

---

१. वडवा – पुजारी. २. लाखोली.

## भाग २ रा

# मुसलमानी अंमल

## १ : मुहम्मद कासीमचा वकील दाहीर राजास भेटतो

[चचनामा :—हा ग्रंथ मूळ अरबी भाषेंत कोणीं लिहिला तें अज्ञात आहे. इ. स. १२१६ चे सुमारास मुहम्मद अली बिन हमीद यानें त्याचें पर्शियन भाषेंत भाषांतर केलें.

"चच" नांवाच्या ब्राह्मण राजानें सिंध प्रांत जिंकून घेतला. यानंतर कांहीं वर्षांनीं चचचा मुलगा दाहीर राज्यावर आला. त्यावर मुहम्मद कासीमनें स्वारी केली. या घडामोडीची तपशीलवार हकीकत या ग्रंथांत आहे. 'चचनाम्या'मध्यें सिंध प्रांतांतील प्राचीन ग्रामनामें त्याच्या अरबी स्वरूपांत आढळतात. 'एखादा संस्कृत व अरबी जाणणारा पंडित चचनाम्याचें अध्ययन करील तर सिंध प्रांताचा आठव्या शतकांतील भूगोल उपलब्ध होईल' असें एल्‌फिन्स्टननें म्हटलें आहे. ( इलियट व डौसन, खंड १ ला, पृ. १३७. ) या ग्रंथास तारीख-इ-सिंध असेंहि म्हणतात. पुढील उतारा दाहीर राजाकडे मुहम्मद कासीमनें वकील पाठविला त्या प्रसंगाचा आहे. मुहम्मद कासीमनें सिंध प्रांतावर इ. स. ७११ त स्वारी केली.]

जेव्हां ते उभयता 'वकील' दाहीर राजाकडे भेटावयास आले तेव्हां त्यांच्यापैकीं मौलाना इस्लामी यानें रीतीप्रमाणें दाहीर राजापुढें आपलें मस्तक नमविलें नाहीं किंवा कांहीं आदरनिदर्शक भाव व्यक्त केला नाहीं. [ हा मौलाना इस्लामी धर्मांतर करण्यापूर्वी देवल गांवच्या हिंदूंचा प्रमुख होता.] दाहिरानें त्यांस ओळखलें व विचारलें कीं, 'तुम्ही नेहमींप्रमाणें आदरपूर्वक वंदन कां केलें नाहीं ? तुम्हांस कोणीं तसें करण्यास मना केलें आहे काय ?' त्यावर मौलानानें उत्तर दिलें, 'मी जेव्हां तुमचा प्रजाजन होतों तेव्हां आपल्या आज्ञापालनाचे सर्व नियम मीं पाळावे हें युक्तच होतें; परंतु आतां तर मी इस्लामधर्म स्वीकारला आणि इस्लामी राजाचा प्रजाजनहि झालों, अशा स्थितींत मी एका काफिरापुढें मस्तक नमवावें, अशी कशी अपेक्षा

करतां ?' त्यावर दाहीर म्हणाला, 'तूं जर वकील म्हणून आला नसतास तर तुझ्या या भाषणाबद्दल तुला मृत्यूचीच शिक्षा फर्मावली असती !' त्यावर मौलानानें उत्तर दिलें, 'तुम्हीं मला ठार मारलें तर अरबांचें विशेष नुकसान होणार नाहीं, परंतु ते माझ्या मृत्यूचा सूड मात्र उगवतील व या कृत्याबद्दल तुमच्यापासून दंड वसूल करतील.'

**अभ्यास**:—१. मौलाना इस्लामीनें दाहीरला नमस्कार कां केला नाहीं? २. दाहीरनें मौलाना इस्लामीला शिक्षा कां केली नाहीं ? ३. भिन्न भिन्न राजांचे वकील परदरबारीं गेले तर त्यांना वागविण्याचे सामान्य संकेत कोणते त्यांची माहिती करून घ्या.

---

## २ : : पेशावरच्या मैदानावर सुलतान महमूद व राजा जयपाळ यांचें युद्ध

[ पुढील उतारा अल्-उत्बीकृत 'तारीख-इ-यामिनी' या ग्रंथांतून घेतला आहे. गझनीचा सुलतान महमुद हा याचे पदरीं होता. तो स्वतः हिंदुस्थानांत आलेला दिसत नाहीं, पण त्याला महमुदाचे बेत चांगले माहीत होते. त्याच्या ग्रंथांत इ स. १०२० पर्यंतच्या महमुदाच्या स्वाऱ्यांची हकीकत तपशीलानें आढळून येते. अल्-उत्बीचा ग्रंथ हिंदुस्थानच्या माहितीपेक्षां महमुदाच्या संकल्प-विचारावर विश्वसनीय प्रकाश पाडतो.–इ. व डौ. व्हॉ. २, पृ. २४.]

प्रथम सिजिस्तानकडे जाण्याचा सुलतान महमुदाचा विचार होता. परंतु त्याआधीं हिंदूंविरुद्ध धर्मयुद्ध करण्याचा विचार त्यास अधिक पसंत पडला. आपल्या सल्लागारांचा सल्ला घेण्याच्या आधींच त्यानें शस्त्रास्त्रें वाटलीं. धर्माची ध्वजा फडकवावी, न्यायाचा प्रसार करावा, सत्याचें तेज पसरवावें नि ईश्वरी कृपा संपादावी असा त्याचा हेतु होता. सुलतान हिंदकडे निघाला तो ईश्वरावर पूर्ण विसंबून. ईश्वरानें आपल्या प्रकाशानें त्यास मार्ग दाखविला आणि त्याच्याच सामर्थ्यावर सर्व स्वाऱ्यांत त्याला विजय मिळाला. पेशावरला पोहोंचल्यावर त्यानें शहराबाहेर तळ ठोकला. तेथें

त्यास कळलें कीं ईश्वराचा शत्रु आणि हिंदचा राजा जयपाळ यानें विरोध करण्याचा निर्धार केला असून युद्धभूमीवर भवितव्याशीं मुकाबला करण्यासाठीं म्हणून त्यानें बरीच मजल मारली आहे.

सैन्यांतील गुलाम, योद्धे, घोडे आणि हत्ती यांचीं नोंदपुस्तकें त्यानें पाहिलीं आणि त्यांतून १५०० घोडेस्वार, इतर माणसें नि अधिकारी निवडले ......ज्यांची निवड झाली नाहीं त्या सर्वांस सैन्याबरोबर येण्यास त्यानें बंदी केली. हे निवडक सैनिक म्हणजे साक्षात् जंगलचे सिंह किंवा विजनवासी मृगदैत्यच होते.

......राक्षसी काफर आपल्या संख्येच्या व शस्त्रांच्या बळानें गर्विष्ठ होऊन सामोरा आला. त्याच्याजवळ १२,००० घोडेस्वार ३०,००० पायदळ व ३०० हत्ती इतकें सैन्य होतें. त्यांच्या वजनाखालींच जणूं पृथ्वी चेंगरली जात होती. पण त्यानें असा विचार केला नाहीं कीं ईश्वराच्या प्रेरणेनें लहान सैन्यसुद्धां मोठ्या सैन्याची धूळधाण उडवूं शकतें.

......सुलतानानें त्याला अधिक वेळ दिला नाहीं. ईश्वराच्या मित्रानें युद्धास एकदम सुरुवात केली. त्यानें आपल्या शत्रूविरुद्ध बाण, तलवार, भाला यांचा उपयोग करून लूट व जाळपोळ करण्यासहि सुरुवात केली. यामुळें जागृत होऊन हिंदूंनीहि धुमश्चक्रीचें युद्ध सुरू केलें. या वेळीं हिंदूंनीं आपल्या घोडेस्वारांच्या रांगा व्यवस्थित करून रणवाद्यें वाजविलीं. एकामागून एक असे रांगेंत उभे राहून हत्तींनीं चाल सुरू केली.

......काळ्या ढगांतील विजेप्रमाणें तलवारी चमकूं लागल्या. रक्तांचे पाट वाहूं लागले. खुदाच्या खिदमतगारांनीं हट्टी विरोधकांचा पूर्णपणें धुव्वा उडविला. दुपार होण्यापूर्वींच मुसलमानांनीं काफिरांचा सूड घेतलेला होता. १५,००० लोकांना त्यांनीं ठार मारलें.

......ईश्वराचा शत्रु जो जयपाळ, तो आणि त्याचीं मुलें, नातू व सरदार यांना दोरांनीं बांधून सुलतानासमोर उभें करण्यांत आलें. कांहींचे हात मागें बांधले होते तर कांहींच्या मानेवर ठोसे मारले जात होते. जयपाळाच्या गळ्यामध्यें २० लक्ष दिनार[1] किंमतीचा सुवर्णमय आणि रत्नजडित हार होता तो काढून घेण्यांत आला. इतर सर्व कैद्यांच्या

१. सोन्याचें नाणें.

गळ्यांतीलहि असेच मौल्यवान् हार काढून घेतले. त्या सर्वांची किंमत जयपाळाच्या हाराच्या दुप्पट होती.

ईश्वरानें आपल्या साथीदारांना अमर्याद लूट तर दिलीच; परंतु सुंदर स्त्रिया व पुरुष मिळून पांच हजार गुलामहि दिले. अशा तऱ्हेनें ईश्वरकृपेनें लूट करून आणि विजय मिळवून जगन्नियंत्याला धन्यवाद देत सुलतान आपल्या तळावर परत आला. कारण सर्वसमर्थ ईश्वरानें खुरासान प्रांतापेक्षां हिंद देशांतील अधिक सुपीक, अधिक विस्तृत अशा प्रांतावर त्याला विजय दिला होता. हें प्रसिद्ध व पराक्रमशाली युद्ध ३९२ हिजरी तारीख ८ गुरुवार रोजीं झालें. (२७ नोव्हेंबर १००१)

**अभ्यास**:—१. हिंदुस्थानवर स्वारी करण्यांत सुलतान महमुदाचे काय हेतु होते ? २. युद्धापूर्वीं त्यानें काय काळजी घेतली ? ३. पराभवानंतर या युद्धांत जयपाळाची काय स्थिति झाली ? त्याचें सैन्य इतकें मोठें असून पराभव कां झाला ? ४. यानंतर महमुदानें आपल्या देशावर किती स्वाऱ्या केल्या ? ५. अल्-उत्ब्च्या मतें ईश्वराचे शत्रु नि मित्र कोण होते ? त्यानें असें कां लिहिलें ?

---

## ३ : : : महमुदाच्या नाण्यावर नागरी लिपि

[सुलतान महमूद गझनवीनें हिंदुस्थानांतील प्रजेसाठीं जें नाणें पाडलें होतें त्यावर नागरी लिपींत आणि संस्कृत भाषेत पुढील मजकूर दिला होता.]*

" अव्यक्तमेकं मुहम्मद अवतार, नृपति महमूद अयं टंको महमूदपुरे घटे हतो, जिनायन संवत–"

**याचा अर्थ पुढीलप्रमाणें :–**

"एक अव्यक्त ( ला इलाह इल्लिलाह ), अवतार मुहम्मूद ( मुहम्मद रसूल इल्लाह) राजा महमूद याच्याकडून हें नाणें महमूदपूर (लाहोर)

---

*पं. जयचंद विद्यालंकार यांच्या इतिहासप्रवेश पुस्तकांत पृष्ठ २१६ वर हें अवतरण दिलें आहे.

४]

च्या टांकसाळींत पाडलें गेलें. जिन हजरत यांच्या आयना (पलायन) चा हिजरी संवत......"

**अभ्यास** :—१. सुलतानानें आपल्या नाण्यांवर वरील मजकूर नागरी लिपींत कां खोदविला ? २. त्या वेळच्या भारतीयांच्या भाषा कोणत्या होत्या ? या भाषा कोणत्या लिपींत लिहिल्या जात ?

---

## ४ : : : सोमनाथाची अधांत्री मूर्ति

[ पुढील उतारा झकरिया–अल्–काझविनी म्हणजे काझविनी गांवचा झकरिया याच्या लेखनांतून घेतला आहे. याचें इतिहासविषयक लेखन इतक्या योग्यतेचें आहे कीं, रोमन इतिहासकार प्लीनी याचेबरोबर त्याची तुलना करतात. झकरिया हा इराणांत इ. स. १२६३ चे सुमारास होऊन गेला. तो हिंदुस्थानांत आलेला नव्हता. त्यानें इतरांच्या ग्रंथांवरून आपलें लेखन केलें आहे. इलियट ॲन्ड डौसन व्हॉ.१ पृ. ९४]

..ती (सोमनाथाची मूर्ति) मंदिराच्या मध्यभागीं अधांत्री म्हणजे कोठेंहि आधार नसलेली होती. हिंदु तिला फार पूज्य मानीत. सोमनाथाची ती मूर्ति पाहिल्यावर प्रत्येकास आश्चर्याचा धक्काच बसे, मग तो पाहणारा हिंदु असो वा मुसलमान असो. ग्रहणाचे वेळीं तेथें हिंदूंची लाखावर यात्रा भरत असे.

गझनीच्या महमुदानें ती मूर्ति पाहून आपल्या सहकाऱ्यांस विचारलें 'तुम्हांस काय वाटतें ?' ते म्हणाले 'या मूर्तीला नक्की कोठें तरी गुप्त आधार असलाच पाहिजे.' यावर सुलतानानें वर खालीं सर्वत्र चांचपून कोठें असा आधार आहे कीं काय तें पाहण्यास सांगितलें. पण आधार आढळेना. यावर एका खिजमतगारानें कल्पना काढली कीं, ती मूर्ति लोखंडाची असावी आणि वरचें छत व बाजूचा भाग हे लोहचुंबकाचे असावेत. मंदिराचें बांधकाम करणारानें एकंदरींत अशी योजना केली असावी कीं, मूर्तीस सर्व बाजूंनीं सारखेंच आकर्षण असावें, म्हणजे ती सर्वत्र सारखीच आकर्षिली जाऊन अखेर अधांत्री टिकून राहील. त्याच्या या म्हणण्यास कोणीं पाठिंबा

दिला तर कोणीं त्याचें म्हणणें अमान्य केलें. अखेर सुलतानाची परवानगी घेऊन छताचे कांहीं दगड काढावयाचें ठरलें. दोन दगड काढल्याबरोबर मूर्ति एका बाजूस कलली! आणखी दोन काढतांच ती आणखी त्या बाजूस कलली! व पुन्हा आणखी दगड काढतांच ती अधांत्री मूर्ति जमिनीवर आली!!

**अभ्यास** :—१. तत्कालीन बांधकामाच्या कौशल्याविषयीं आपणास काय माहिती मिळते? २. अधांत्री मूर्ति ठेवणाराचें कौतुक करावें कीं ती जमिनीवर पाडणाराचें कौतुक करावें? सकारण सांगा. ३. भारतीय लोक पूर्वीइतके आजहि भाविक आहेत काय?

---

## ५ : : : पृथ्वीराजाचा जय आणि पराजय

[तबकत-इ-नासिरी या ग्रंथाचा लेखक मिन्हाजुस् सिराज हा इ. स. १२२७ चे सुमारास हिंदुस्थानांत आला. तो कांहीं दिवस अल्तमशचे पदरीं होता. सुलताना रेझियाची कारकीर्दहि त्यानें पाहिली. त्यानंतर तो इ. स. १२४२ चे सुमारास बंगालमध्यें लखनौती येथें राहिला. तेथून तो दोन वर्षांनीं दिल्लीस आल्यावर त्यास नासिरिया विद्यालयाच्या मुख्याध्यापकाची जागा मिळाली. सुलताना रेझियानंतर आलेल्या नासिरुद्दीनच्या पदरीं राहून त्यानें बरेंच लेखन केलें असल्यानें त्यानें आपल्या ग्रंथास तबकत-इ-नासिरी हें नांव दिलें आहे. या काळासंबंधींच्या इतिहास–लेखकास तबकत-इ-नासिरी हा ग्रंथ विश्वसनीय व आधारभूत वाटतो. प्रस्तुतचा उतारा याच ग्रंथांतून घेतला आहे. इ. व डौ. व्हॉ. २ पृ. २९५ पहा. पुढचा उतारा क्र. ६ हा त्याच ग्रंथांतील पृ. ३३२ वरचा आहे.]

सुलतान महंमद घोरीनें पृथ्वीराजास[१] तरायन[२] येथें तोंड दिलें. हिंदुस्थानांतील सर्व राजे पृथ्वीराजाच्या बाजूनें होते.[३]

दिल्लीचा गोविंदराज ज्या हत्तीवर आरूढ झाला होता त्यावर एका

१. पृथ्वीराजास लेखक 'रायकोलाह' किंवा 'पिठुरा' असें म्हणतो.

२. तरायन शब्दाऐवजीं फिरिस्ता 'नरायन' असा शब्द वापरतो. तरायन स्थानेश्वराचे दक्षिणेस १३ मैलांवर सरस्वतीचे कांठीं आहे.

३. वरील विधान हें लेखकाचें सर्वसाधारण विधान आहे. त्यांतील बिनचूकपणा गृहीत धरतां येणार नाहीं

हातांत भाला घेऊन सुलतानानें हल्ला केला. गोविंदराजहि सज्ज होताच; आणि मग जणूं प्रति रस्तुमच भासणाऱ्या त्या सुलतानानें मृगराजाच्या आविर्भावानें रायाच्या तोंडांत भाला खुपसला आणि त्याचे दोन दांत त्याच्याच घशांत घातले. रायानेंहि उलट प्रतिकार करून शत्रूच्या दंडावर मोठी जखम केली. सुलतानानें आपला घोडा मागें घेतला, आणि जरा बाजूस गेला. घोड्याच्या पाठीवर बसतां येणेंहि अशक्य झालें इतका त्या जखमेमुळें त्यास त्रास होत होता. मुसलमानी सैन्य पळूं लागलें. कोणी कोणाचें ऐकेना अशी स्थिति झाली. सुलतान खालीं पडत असतांना चाणाक्ष व तरुण खिलजीनें त्याच्या घोड्यावर उडी मारून त्यास सांवरलें आणि लढाईच्या धुमश्चक्रींतून त्यास दूर नेलें.

सुलतान दिसेनासा होतांच मुसलमानी सैन्यांत एकच हाहाःकार उडाला. विजयी सैन्याकडून चाललेला पाठलाग थांबेपर्यंत तें सैन्य पळत होतें. घोरप्रान्तांतील कांहीं सरदार नि तरुण सैनिक यांनीं जाणलें कीं, सिंहाची छाती असलेला हा खिलजी तरुण आपला पुढारी आहे. तो दिसतांच ते त्याच्याभोंवतीं जमा झाले; आणि भाल्याचा कामचलाऊ मेणा बनवून सुलतानाला त्यांनीं त्यांतूनच स्नानस्थलापर्यंत नेलें. त्याला पाहून सैन्याला थोडासा धीर आला आणि सुलतानाच्या मनांतील मुसलमानी धर्माबद्दलची श्रद्धा अधिक स्थिर झाली. चोहोंकडे विखुरलेलें सैन्य त्यानें एकत्र केलें; आणि तो इस्लाम प्रदेशाकडे परत गेला. सरहिंद येथील किल्ल्यांत त्यानें काजी तुघलक यांस ठेवलें. पृथ्वीराजानें पुढें चाल करून या किल्ल्यास वेढा घातला. हा वेढा तेरा महिने चालू होता.

* * *

पुढील वर्षीं नवीन सैन्य तयार करून आपल्या पराभवाचा सूड घेण्यासाठीं सुलतान हिंदुस्थानांत आला. तोलखच्या डोंगराळ प्रदेशांतील विश्वासू व प्रमुख व्यक्तींपैकीं एक व्यक्ति या सैन्यांत होती. तिनें मला असें सांगितलें कीं, एकूण सैन्यांत १,२०,००० चिलखती घोडेस्वार होते. सरहिंदच्या किल्ल्यापाशीं सुलतान पोहोंचण्यापूर्वीं तो किल्ला शरण गेलेला होता!

तराईच्या जवळच शत्रूचा तळ होता. सुलतानानें आपली युद्धयोजना आखली. त्यानें सैन्यांतील मुख्य भाग, निशाणें, तंबू, हत्ती व कित्येक सैनिक

मागें ठेविलें व शांतपणें तो पुढें पुढें चालू लागला. बिनचिलखती व अवजड साहित्य जवळ नसलेल्या १०,००० घोडेस्वारांच्या चार तुकडया करण्यांत येऊन शत्रूवर मागून, पुढून, डाव्या व उजव्या म्हणजे सर्व बाजूंनीं बाणांचा वर्षाव करून शत्रूला भंडावून सोडण्याचा हुकूम त्यानें दिला. शत्रूसैन्य एकत्रित होईल तेव्हां या तुकडयांनीं एकमेकांस साहाय्य करून त्यावर जोराचा हल्ला करावा अशी योजना होती. या युक्त्यांनीं काफिरांची हानि झाली. त्यांच्यावर ईश्वरानें आम्हांस जय दिला आणि ते पळूं लागले!

पिठुरा हत्तीवरून खालीं उतरला व घोडयावर स्वार होऊन भरधांव निघाला. पण सरसुती (सरस्वती) जवळ त्यास पकडून नरकास पाठविण्यांत आलें. दिल्लीचा गोविंदराज लढाईंत मारला गेला. त्याच्या पडलेल्या दोन दांतांवरून त्याचें मुंडकें सुलतानानें ओळखलें. राजधानी अजमीर, शिवालिक टेकडया, हन्सी, सरसुती व इतर जिल्हे सुलतानाच्या ताब्यांत आले. हा विजय हिजरी ५८८ (इ. स. ११९२) मध्यें त्यास मिळाला.

**अभ्यास** :—१. महंमूद घोरी यास कोणीं सांवरलें? तो वांचल्यानें त्याच्यावर नि सैन्याच्या मनावर काय परिणाम झाला? २. कोणत्या युक्तीनें पृथ्वीराजावर महमुदानें विजय मिळविला? ३. तरायनाला हीं जीं दोन युद्धें झालीं त्यांचें वर्णन तुमच्या भाषेंत करा.

---

## ६ : : : सुलताना रझियाची योग्यता

सुलताना रझिया थोर राजकर्ती होती. ती शहाणी, न्यायी व उदार असून तिचें वर्तन राज्याला उपकारक असे. न्याय द्यावा, प्रजेचें रक्षण करावें व सैन्याच्या अग्रभागीं राहावें हा तिचा देहस्वभाव होता. सारांश, राजाला शोभणारे सर्व गुण तिच्यांत होते, परंतु ती स्त्री देहांत जन्माला आली म्हणून (तिच्या भोंवतालच्या) पुरुषांच्या मतें हे तिचे सर्व गुण व्यर्थ होते! तिचे वडील जिवंत असतांना तिनें आपला अधिकार उत्तम प्रकारें चालविला होता. तिची आई राजाची पट्टराणी होती. 'कुश्क-इ-फिरोझी' येथील मुख्य राजवाडयांत ती राहात असे. सुलतानानें तिचें शौर्य व अधिकार गाजविण्याची ढब ओळखली होती. मुलगी असल्यानें ती सार्वजनिक जीवनांत

क्वचितच वावरत असे. तरीसुद्धां ग्वाल्हेरचा विजय मिळवून परत आल्यावर सुलतानानें मुख्य सूत्रचालक मंत्र्याला बोलाविलें व त्याला तिचें नांव भावी राज्याचा वारस म्हणून नोंदण्यास सांगितलें. हें फर्मान पूर्ण होण्यापूर्वी राजाच्या सलगींतले सरकारी नोकर त्याच्याकडे गेले व म्हणाले "राजपदाला योग्य मुलें राजास असतांना एका मुसलमानी सिंहासनावर मुलीस बसविणें यांत कोणता शहाणपणा आहे ? यामुळें कोणता फायदा होणार आहे ? या सर्व प्रश्नांसंबंधीं आम्हांस उत्पन्न झालेली आशंका दूर करावी." त्यावर सुलतान म्हणाला, "माझीं तरुण मुलें तारुण्यांतील सुखांत रंगून गेलीं आहेत. त्यांच्यापैकीं कोणाचेहि अंगीं राजकर्त्याचे गुण नाहींत. या प्रदेशावर राज्य करण्याला ते नालायक आहेत. माझ्या मृत्यूनंतर तुम्हांस असें आढळेल कीं, माझ्या मुलीखेरीज राज्याला योग्य मार्गदर्शक दुसरा कोणीहि नाहीं."

राजाचेंच मत योग्य होतें असें सर्वांना नंतर मान्य करावें लागलें.

**अभ्यास :**—१. सुलताना रझियाच्या अंगीं राज्यकर्त्यास लागणारे सर्व गुण होते, हें विधान सिद्ध करा. २. कांहीं भारतीय व विदेशी स्त्री राजकर्त्रींचीं नांवें सांगा.

---

# ७ : अलाउद्दिनाचे राज्यव्यवस्थेचे व दारुबंदीचे प्रयोग

[फिरोज तुघ्लखाच्या कारकीर्दीत होऊन गेलेल्या झियाउद्दीन बर्नी या लेखकानें तारीख-इ-फिरोजशाही हा ग्रंथ लिहिला आहे. शम्स-इ-सिराज या लेखकानें याच नांवाचा दुसरा एक ग्रंथ लिहिला आहे. झियाउद्दीन यानें तबकत-इ-नसिरी या ग्रंथाचे अखेरीपासून प्रारंभ करून फिरोजच्या कारकीर्दीच्या पहिल्या सहा वर्षांपर्यंत म्हणजे सुमारें इ. स. १३५७ पर्यंत हकीकत आणून ठेविली आहे. त्याची इतिहासाची कल्पना व्यापक आहे. त्यांत राज्यव्यवस्था, युद्धें व पुढीलांस बोध हे सांपडावे, असें तो म्हणतो. तो अगदीं प्रारंभापासून इतिहास लिहिणार होता. पण तबकत-इ-नासिरी हा ग्रंथ त्याच्या पाहण्यांत आल्यावर त्यानें विचार केला कीं, आपण आणखी कांहीं निराळें लिहून अभ्यासकांना आंदेशा उत्पन्न कशाला करावा ? हें सर्व झियाउद्दीनानें लिहिलें असलें तरी तो मोठा विश्वसनीय लेखक नाहीं. फेरिस्तानें आपला ग्रंथ

लिहितांना याचा आधार घेतला, पण दुसरेहि आधार घेतले आहेत. दरबारांत सुलतानाच्या आश्रयाला बसून लिहिणारा हा लेखक महंमद तुघ्लखाचीं दुष्कृत्यें स्पष्टपणें कशीं सांगेल? इ. व डौ. व्हॉ. ३, पृ. १७९]

........नंतर बंडाळी थांबविण्याकडे सुलतानानें लक्ष देण्यास सुरुवात केली. पहिला उपाय म्हणूस त्यानें मालमत्ता जप्त करण्याचें योजिलें. मिरासी हक्कानें, दानपत्रानें अगर धार्मिक कारणासाठीं जो जमीनजुमला दिला गेला असेल तो लेखणीच्या फटकाऱ्यानें त्यानें सरकारजमा केला! शक्य त्या उपायांनीं लोकांकडून तो पैसे उकळूं लागला. ह्या कारणानें स्वतःच्या रक्षणास लागणारा पैसा मिळविण्यांत लोक इतके गुंतले कीं, बंडाळीचा प्रादुर्भावच अशक्य झाला.

नंतर अलाउद्दिनानें गुप्त पोलिसांचें सर्वत्र असें जाळें पसरलें कीं, लोकांनीं चांगलें अगर वाईट कांहीं केलें तरी तें त्यास तेव्हांच समजे. सरदार दरकदारांच्या घरांत काय चाललें आहे याचीहि माहिती त्यास मिळे, व त्या-बरहुकूम तो त्यांना जाब विचारी. हा ससेमिरा इतका कडक होता कीं, मनसब-दारांना आपल्या घरांत एकमेकांकडे खुणा करून बोलण्याचा प्रसंग येई. रात्रं-दिवस त्यांना आपल्यावरील गुप्त पहाऱ्याची दहशत वाटे. सार्वजनिक ठिकाणीं ज्या गोष्टी घडत त्याबद्दल तर ताबडतोब चौकशी होऊन शिक्षा केली जाई.

तिसरा उपाय म्हणजे दारू पिणें वा विकणें, अफू, गांजा ओढणें, द्यूत खेळणें इत्यादि गोष्टींना आपल्या राज्यांत त्यानें बंदी केली. सुलतानानें स्वतःच्या मद्यविलासाचीं सर्व उपकरणें मोडून तोडून फेकून दिलीं व स्वतःहि दारू पिणें सोडलें. चोरून दारू पिणारे, गाळणारे व विकणारे यांना शोधून काढण्यास त्यानें तपासनीस नेमले. दारू हातीं लागल्यास ती हत्तींना पाजावी, अपराध्यांना फटक्यांची शिक्षा द्यावी, तुरुंगांत टाकावें, किंवा जमिनींत खड्डे खणून त्यांत रुतवून ठेवावें असा प्रकार चाले. या शिक्षेच्या भीतीनें कित्येकांनीं दारू पिणें सोडून दिलें.

**अभ्यास :**—१. दारुबंदी करण्यासाठीं अलाउद्दिनानें कोणते उपाय योजले? त्यासाठीं सध्यांचें सरकार काय उपाय योजीत आहे? २. अलाउद्दिनानें प्रजेची बंडखोरवृत्ति कशी ताब्यांत आणली? हे उपाय योग्य कीं अयोग्य यावर चर्चा करा.

---

## ८ : : : महम्मद तघ्लखाचा स्वभाव

[ इब्न बतुता हा मोरोक्कोमधील टॅन्जीर्सचा रहिवासी. शेख अबदुल्ला मुहम्मद हें त्याचें मूळचें नांव. 'इब्न बतुता' हें नांव त्याला मागाहून मिळालें. त्यानें इस्लामचीं पवित्र स्थळें पाहण्याच्या उद्देशानें त्रिखंडांत प्रवास केला. तो इ. स. १३३३ त १२ सप्टेंबरला हिंदुस्थानांत आला व इ. स. १३४२ पर्यंत या देशांत होता. येथें त्यानें नुसता प्रवासच नव्हे तर आणखीहि बऱ्याच घालमेली केल्या. त्यास महम्मद तघ्लखाचे पदरीं न्यायाधीशाची जागा मिळाली. तें काम त्यानें चोख बजावलें. खेरीज त्यास सुलतानानें अनेक देणग्याहि दिल्या. आफ्रिकेस गेल्यावर त्यानें आपल्या टिपणावरून प्रवासवृत्त व इतिहास लिहिला. त्यांत शम्सुद्दिन इल्तमशपासून हकीकत आली आहे.

" याचें लेखन निःस्पृह म्हणून विश्वसनीय आहे " हे एल्फिन्स्टनचें म्हणणें खरें आहे. पण कित्येक वेळां त्यानें विश्वसनीय म्हणून मानलेल्या हकीकती तितक्या खरोखर विश्वसनीय नाहींत, कारण त्या केवळ तत्कालीन समजावर आधारलेल्या आहेत. इ. व डौ. ऱ्हॉ. ३ पृ. ६१]

(१)

सुलतानाची नम्रता, न्यायी वृत्ति, गरीबांवरील कृपा आणि आश्चर्यकारक औदार्य याबद्दल जें कांहीं सांगितलें तें लक्षांत घेऊनहि असें म्हणावेंसें वाटतें कीं, त्याच्या मनाचा ओढा रक्तपात करण्याकडे विशेष होता. त्याच्या राजवाड्याच्या दाराशीं एखादें प्रेत पडलें नाहीं, असें क्वचितच घडत असे पुष्कळ वेळेस मीं असें पाहिलें आहे कीं, राजद्वाराशीं पुष्कळ लोकांचा संहार करण्यांत आलेला आहे आणि त्यांचीं प्रेतें तेथें तशींच पडलेलीं आहेत! एक दिवस मी तेथून जात असतां माझा घोडा थबकला. मी पाहूं लागलों तों मला असें आढळलें कीं, जमिनीवर एक फिकट गोळा पडलेला आहे. तीन तुकडे झालेलें तें धड मनुष्याचें होतें. लहान अपराधासाठीं मोठ्या गुन्ह्याला योग्य अशी शिक्षा राजा देत असे. असें करतांना विद्वान्, न्यायी किंवा प्रसिद्ध व्यक्तींचा तो मुलाहिजा ठेवीत नसे. प्रत्येक दिवशीं शेंकडों लोकांना साखळदंडानें बांधून राजसभेंत उभें केलें जाई, त्यांचे हात मानेशीं जखडले जात, आणि पायांत बेडी घातली जाई. कांहींचा वध केला जात असे. इतरांचा छळ होई किंवा त्यांना फटक्यांनीं झोडपण्यांत येत असे. त्यानें आपल्या भावाचें

मस्तक तोडलें होतें आणि वहिवाटीनुसार त्याचें शव तीन दिवसपर्यंत जमिनीवर टाकून देण्यांत आलें होतें !

ज्या एका गोष्टीबद्दल सुलतानाला विशेष दोष दिला जातो ती म्हणजे दिल्लीच्या नागरिकांवर आपलीं घरेंदारें सोडून (दौलताबादेस ) जाण्याची त्यानें केलेली सक्ति. त्याचें कारण असें होतें कीं, तेथील लोक पत्रें लिहून सुलतानावर शिव्याशापांचा वर्षाव करीत आणि रात्रींच्या वेळीं असले कागदाचे तुकडे दरबारांत फेंकून देत ! तेव्हां त्यानें दिल्ली शहरच उध्वस्त करण्याचें ठरविलें ! त्यानें घरें विकत घेतलीं आणि तेथील लोकांना देवगिरीस घालविलें. जेव्हां त्यांनीं विरोध सुरू केला, तेव्हां त्यानें दवंडी पिटवून असें जाहीर केलें कीं, "तीन दिवसांनंतर दिल्लींत एकहि माणूस दिसला तर पहा." याप्रमाणें पुष्कळ लोक दिल्ली सोडून गेले. कांहीं घरांत लपून राहिले होते त्यांना हुसकावून लावण्यांत आलें. त्याच्या गुलामांना एक लंगडा व एक आंधळा मनुष्य रस्त्यांत सांपडला, त्याला दोघांना सुलतानापुढें उभें करण्यांत आलें ! लंगड्या माणसावर भडिमार यंत्रांतून (Catapult) वर्षाव करण्यांत आला व आंधळ्या माणसाला दौलताबादेला फरफटत नेण्यांत आलें. हा प्रवास चाळीस दिवसांचा होता. रस्त्यानें त्याचे तुकडे तुकडे झाले; शेवटीं त्याची एक तंगडी दौलताबादेस पोहोंचली.

सर्व नागरिकांनीं आपापली चीजवस्तु टाकून देऊन शहर खालीं केलें, त्यामुळें ती दिल्ली नगरी पूर्णपणें निर्मनुष्य झाली. एका विश्वासू माणसानें मला सांगितलें आहे कीं, (अशा कालांत) एके दिवशीं संध्याकाळीं सुलतान आपल्या राजवाड्याच्या गच्चीवर गेला व तेथून त्यानें दिल्ली शहरांत पाहिलें. शहरांतून कोठेंहि अग्नि, धूर किंवा प्रकाश बाहेर येतांना दिसत नव्हता. हें पाहून तो म्हणाला " आतां माझा आत्मा शांत झाला आणि माझें मनहि संतुष्ट झालें ! " कांहीं दिवसांनीं भिन्न भिन्न प्रांतांतील लोकांस त्यानें पत्रें पाठवून दिल्लीस राहण्यास बोलाविलें. त्यांनीं आपापलीं ठिकाणें उजाड केलीं व ते तेथें आले, परंतु त्यामुळें दिल्ली शहर भरूं शकलें नाहीं. कारण तें शहरच विस्तीर्ण आहे. खरोखर जगांतील मोठ्या शहरांपैकीं हें एक होय. आम्ही जेव्हां तेथें आलों तेव्हां हें शहर ओसाड, उध्वस्त झालेलें आणि अगदीं तुरळक वस्ती असलेलें असें आढळलें.

(२)

दिल्ली राजवाड्यांत आमचें स्वागत झाल्यावर दुसऱ्या दिवशीं आम्हांपैकीं प्रत्येकास दरबारच्या पागेंतून घोडे देण्यांत आले. खोगीर व जिनाखेरीज विविध अलंकारांनीं ते नटविलेले होते. सुलतानहि आमच्या समवेत घोड्यावर बसला. सुलतानाच्या डोक्यावर रत्नजडित छत्र धरलेलें होतें. त्याच्यापुढें 'वर्षाव यंत्रें' ( Catapults ) हत्तीच्या पाठीवर चालविलीं होतीं. सुलतान जेव्हां राजधानीजवळ आला तेव्हां या यंत्रांतून गरीब लोकांसाठीं सोन्याचांदीच्या नाण्यांचा सडा पाडण्यांत येऊं लागला. राजवाड्यांत प्रवेश करीपर्यंत हा प्रकार चालू होता.

सुलतानाची आई 'मलिका-इ-दुनिया' 'जगाची मालकीण' या नांवानें ओळखली जाते. ती फार उदार असून प्रवाशांसाठीं तिनें सरायाहि बांधलेल्या आहेत. ती आंधळी आहे. तिचा पुत्र तिचा मोठा आदरसन्मान करतो. दर वर्षीं ती त्याच्याबरोबर कोठें तरी प्रवासास जाते, तोहि तिच्याकडे जाऊन कांहीं दिवस राहतो. ती त्याच्याकडे जेव्हां येई तेव्हां ती पालखींत असतांनाच सुलतान आपल्या सिंहासनावरून खालीं उतरून सामोरा जाऊन तिचें स्वागत करी व तिच्या चरणांवर डोकें ठेवी.

**अभ्यास** :—१. महंमद तघ्लखाची पुढील मुद्याला धरून माहिती द्या—(अ) त्याचे शिक्षा देण्याचे प्रकार (आ) राजधानी बदलण्याचें एक कारण (इ) मातृभक्ति. २. महंमदानें आपली दैनंदिनी (डायरी) लिहिली असती तर या उताऱ्यांतील प्रसंग त्यानें कसे वर्णिले असते तें लिहा.

---

## ९ : : : फिरोज तघ्लखचें आत्मकथन

[ फुतुहत्-इ-फिरोजशाही या अवघ्या ३२ पृष्ठांच्या लेखांत फिरोज तुघ्लखानें निर्व्याज मनानें आपलें धोरण स्पष्ट करून सांगितलें आहे. या लेखाची मूळ प्रत सांपडत नाहीं. जी सांपडते ती इ. स. १७२६ तील नक्कल होय. फिरोजशाहाला आपलें वागणें सद्धर्माचें आहे असें वाटे व त्यास स्वतःच्या वागणुकीबद्दल मोठा अभिमान वाटत असे, असें या लेखावरून दिसतें. प्रस्तुत उतारा प्रा. माटेकृत 'आपापलें हितगुज'

या पुस्तकाच्या पृ. १७९ वरील आहे. याचें मूळ इ. डौ. व्हॉ. ३, पृ. ३८० वर पहा.]

हिंदूंनीं व मूर्तिपूजकांनीं आम्हीं कानाडोळा करावा म्हणून कर भरण्याचें पत्करलें होतें आणि आपल्याला कसला उपसर्ग लागूं नये म्हणून जिजिया कर भरण्याचेंहि मान्य केलें होतें. पुढें या लोकांनीं शहरांत व आजूबाजूस नवीं देवळें बांधावयास आरंभ केला. महंमदी धर्माच्या अगदीं विरुद्ध हें काम झालें. त्याचें तर असें सांगणें आहे कीं, असलीं देवळें होऊं देतां कामा नये. दैवी इच्छा प्रमाण धरून मीं हीं मंदिरें पाडून टाकिलीं आणि काफिरशाहीचे पुढारी, कीं जे लोकांना पातकास प्रवृत्त करीत, त्यांना ठार मारून टाकलें व सटरफटर लोकांना फटकेमार दिला. शेवटीं हा घाणेरडा प्रकार बंद पडला. उदाहरणादाखल सांगतों :--मल्लू नांवाच्या खेड्यांत एक तळें आहे, याला ते कुंड म्हणतात. येथें देवळें बांधलेलीं होतीं. विशेष प्रकारच्या दिवशीं सशस्त्र होऊन आणि घोड्यावर बसून हिंदु लोक तेथें जात असत. त्यांचीं बायका-मुलें पालखींतून किंवा गाड्यांतून जात व ते हजारोंनीं जमत व मूर्तींची पूजा करीत. या अनाचाराकडे इतका कानाडोळा झाला कीं, बनिया लोकांनीं आपापल्या गोण्या भरून तेथें न्याव्या व बाजार थाटावा आणि माल विकावा असा प्रकार सुरू झाला. आपण कोण, काय हें विसरून केवळ पैका मिळावा म्हणून कांहीं मुसलमानहि तेथें जमूं लागले. हें वर्तमान कळतांच माझ्या धर्मबुद्धिप्रमाणें मला वाटलें कीं, इस्लामी धर्माची अप्रतिष्ठा करणारें आणि निंदास्पद असें हें कृत्य थांबविलेंच पाहिजे. मग जत्रेच्या दिवशीं मी जातीनेंच तेथें गेलों व हुकूम दिला कीं, या लोकांचे पुढारी आणि या गलिच्छ प्रकाराचे पुरस्कर्ते यांना ठार मारावें. सरसकट हिंदु लोकांना कांहीं कडक शासन करण्यास मीं प्रतिबंध केला; पण मीं त्यांचीं देवळें उलथून टाकलीं आणि त्यांच्या जागीं मशिदी बांधल्या. देवाच्या दयेनें मूर्तिपूजक आणि काफिर लोक मूर्तींची पूजा करीत असत तेथेंच आज मुसलमान खऱ्या देवाची आराधना करीत आहेत.

**अभ्यास :**—चर्चा करा : 'आजच्या नीतिनियमान्वयें जुन्या पुरुषांची योग्यता ठरविणें कसें अयोग्य आहे तें ह्या आत्मगत लेखावरून स्पष्ट होतें.'

---

## १० : : : दंगेखोर काफर कैद्यांची कत्तल

[ तैमूरचें आत्मचरित्र (मल्फुझत्-इ-तैमुरी) या ग्रंथांत तैमूरच्या ७ व्या वर्षापासून ते ७४ व्या वर्षापर्यंतची हकीकत आहे. ' **शाबानच्या** १७ व्या तारखेस ( १९ मार्च १४०५ रोजीं ) माझी शुद्ध गेली व देवाधीन झालों. ' असा त्याच्या मृत्यूचा उल्लेख त्याच्याच आत्मचरित्रांत आहे, हें मोठें विचित्र वाटेल व कित्येकांनीं तेवढ्यावरून त्या आत्मचरित्राच्या विश्वसनीयतेबद्दल शंका व्यक्त केली आहे. पण ' माझ्या कृत्यांची हकीकत माझ्या अंतापर्यंत जणू काय मी कथन करीत आहें अशी लिहावी.' अशी त्याची आज्ञा होती. मूळ चघताई तुर्की भाषेंतील ग्रंथ अबुताले बहुसेनी यानें इ. स. १६२८ त फारसीमध्यें भाषांतर करून शहाजहान यास अर्पण केला. या आत्मचरित्रांत व तैमूरच्या मृत्यूनंतर ३० वर्षांनीं शरफुद्दिन यज्दी यानें लिहिलेल्या झफरनाम्यांत ( तैमूर विजयग्रंथांत ) मोठें साम्य आहे. यावरून तमूरचें मूळ आत्मचरित्र तेव्हांच उपलब्ध असलें पाहिजे असें म्हणतां येईल. मोगल बादशाह बाबर व जहांगीर यांनींहि आत्मचरित्रें लिहिलीं. त्याच घराण्याचा मूळ पुरुष तैमूर हा होय. इ. व डॉ. व्हॉ. ३ पृ ४३६.]

हिंदुस्थानांत प्रवेश केल्यापासून आतांपर्यंत आम्हीं जवळजवळ लाख हिंदु गिरफदार केले असून ते सर्व या वेळेस छावणीमध्यें होते. काल शत्रूंनीं आम्हावर चाल केली तेव्हां त्यांनीं आनंदप्रदर्शन केलें. आम्हांस शिव्या-शाप देण्यास प्रारंभ केला, आणि शत्रूच्या जयाची बातमी येऊन पोहोंचतांच आमच्या तंबू-राहुट्यांना आगी लावून शत्रूला साह्य करण्याची त्यांनीं सिद्धता केली. यावर मीं माझ्या अमीरांचा सल्ला विचारला असतां त्यांनीं सुचविलें कीं, (दिल्लीजवळ होणाऱ्या) महत्त्वाच्या युद्धाचे वेळीं सामानांनीं भरलेल्या आपल्या छावणींत हे एक लाख कैदी ठेवणें धोक्याचें आहे आणि त्यांना सोडून देणें हें तर नियमाविरुद्ध आहे; सारांश, त्या सर्वांना तलवारीच्या भक्ष्यस्थानीं देण्याखेरीज दुसरा मार्गच नाहीं ! हे शब्द मीं ऐकले तेव्हां ते मला युद्धनीतीस धरून आहेत असें वाटलें, आणि मीं त्वरित हुकूम दिला कीं, छावणींत असें जाहीर करा कीं, ज्या ज्या सैनिकांजवळ काफर कैदी असतील त्यांनीं त्या कैद्यांना ठार मारलें पाहिजे; तसें न केलें तर त्या सैनिकाचा वध होईल व त्याची मालमत्ता गुन्हा हुडकून काढणारास मिळेल. हा हुकूम

इस्लामच्या सैनिकांना मिळतांच त्यांनीं आपल्या तलवारी म्यानाबाहेर काढल्या व कैद्यांचा शिरच्छेद केला. त्या दिवशीं एक लाख काफर मूर्तिपूजकांचा वध करण्यांत आला. आमच्यांतील एका विद्वान् मंत्र्यानें त्याच्या सबंध आयुष्यांत एक चिमणीहि मारली नव्हती, पण त्यानें देखील त्या दिवशीं आपल्या तलवारीनें त्याच्याजवळच्या १५ कैद्यांचा वध केला.

**अभ्यास**–:–तैमूरची आज्ञा युद्धनीतीस धरून होती काय ? चर्चा करा.

---

## ११ : : : शिकंदर लोदीचा स्वभाव

['तारीख–इ–दाऊदी' या ग्रंथाच्या लेखकासंबंधीं फार थोडी माहिती मिळते. त्याचें नांव अबदुल्ला. या ग्रंथांत सुलतान 'बहलोल लोदी'पासून लेखकानें सुरुवात करून ते इ. स. १५७५त खानजहानाच्या आज्ञेवरून दाऊदखानाचा शिरच्छेद झाला येथपर्यंत हकीकत दिली आहे. इतिहास म्हणजे नुसत्या राजांच्या कारकीर्दी नव्हेत तर तें शास्त्र आहे, त्यानें बुद्धीचा विकास होतो व शहाण्यास मार्गदर्शन होतें असें यानें म्हटलें आहे. पण त्यानें केलेल्या लेखनांत कालोल्लेख कमी असून ऐकीव दंतकथांचा सुकाळ आहे. एकंदरींत इतिहास या दृष्टीनें या ग्रंथाची विश्वसनीयता कमीच. पुढील उतारा त्याच्या लेखनाचा एक नमुना आहे. एलियट डौसन व्हॉ. ४ पृ. ४३४.]

शिकंदर लोदी हा विख्यात सुलतान आपल्या अंगच्या औदार्य, परामर्ष घेणें व सभ्यता या गुणांबद्दल फार प्रसिद्ध होता. मनानें धार्मिक, दिसण्यांत देखणा, परमेश्वराविषयीं भावनिष्ठ व आपल्या लोकांना परोपकारी असें त्याचें वर्णन करतां येईल. तो वृत्तीनें न्यायी व धैर्यशाली असून न्यायाच्या कामांत तो दांडगे व दुर्बळ यांच्यांत भेदभाव करीत नसे. पुढें येणाऱ्या पुराव्याचें तो समतोल दृष्टीनें परीक्षण करी आणि मगच खटल्याचा निकाल देई. प्रजेस सुखी करण्याचा त्याचा सतत प्रयत्न चालू असे. तो रात्रभर जागा राहून गरिबांचीं गाऱ्हाणीं ऐके, राज्यकारभाराची व्यवस्था करी, फर्मान काढणें किंवा पत्रें लिहिणें हीं कामेंहि करी.

त्याच्याबरोबर सतरा विद्वान् आणि सभ्य पुरुष नेहमीं असत. मध्य-

रात्रीनंतर तो जेवत असे आणि त्या वेळीं हे सतरा विद्वान् आपले हात धुऊन त्याच्यासमोर बसत. त्यांच्यापुढेंहि जेवणाचीं ताटें ठेविलीं जात. आणि त्या प्रसंगीं सुलतान भोजन करी, पण सतरा विद्वानांस त्याच्यासमोर भोजनाची मनाई असे. राजाचें जेवण झालें म्हणजे ते आपआपलीं ताटें घेऊन घरीं जात आणि तेथें जेवीत. कांहीं म्हणतात कीं, 'आपली प्रकृति चांगली राहावी म्हणून राजा गुप्तपणें दारू पितो.'

प्रत्येक कामाची वेळ ठरलेली असे. एकदां सुरू झालेली वहिवाट तो कधींहि बदलत नसे. जर सुलतानानें एखादें पेय किंवा खाद्य पदार्थ एकदां कोणाला दिला असेल तर पुढील भेटींत त्यांत तो फरक करीत नसे. जोनपूरचा एक प्रसिद्ध मनुष्य त्याच्याकडे उन्हाळ्यांत प्रथम आला. त्यानें त्यास भोजनप्रसंगीं, थंड वाटावें व तहान भागावी म्हणून सरबताच्या सहा सुरया दिल्या. पुढें जेव्हां तो हिंवाळ्यांत त्याजकडे आला तेव्हांहि त्याच्यापुढें सहा सुरया सरबत आलें. सुलतान आपल्या सरदारांशीं आणि थोर माणसांशीं प्रथमदर्शनीं जसा वागला असेल तसाच अनेक वर्षांनंतरहि वागे. तो मितभाषणी होता. अवांतर गोष्टी टाळून मुद्द्यापुरतें बोलत असे. त्याच्या लक्षांत फार जुन्या गोष्टी राहात. त्याच्या कारकीर्दींत एकंदर व्यवहार शांततेनें, प्रामाणिकपणानें नि सरधोपटपद्धतीनें चालत.

**अभ्यास** :—या उताऱ्यावरून तुम्हांला शिकंदराची जी माहिती मिळते ती पुढील मुद्द्यांनुसार लिहा : (१) दिनचर्या, (२) अतिथि–अभ्यागतांशीं वागणें, (३) भोजन करण्याची रीत.

---

## १२ : : अहमदशाह बहमनी (इ. स. १४२२-१४३४)

[ प्रस्तुतचा उतारा 'फिरिस्ता' या विख्यात ग्रंथकारानें लिहिलेल्या तारीख–इ-इब्राहिमी या ग्रंथांतून घेतला आहे. या ग्रंथास 'नौरसनामा' असेंहि नांव आहे. विजापूरचा इब्राहिम आदिलशाह याचे पदरीं असतांना फिरिस्तानें हा ग्रंथ लिहून संपविला म्हणून पहिलें नांव पडलें. 'नौरसनामा' हें नांव इब्राहिमनें इ. स. १५९९ त बांधलेल्या नौरस या नव्या राजधानीच्या नांवावरून पडलें. या ग्रंथाचें मेजर

जनरल ब्रिग्जनें एलिफन्स्टनच्या सूचनेवरून इंग्रजींत चार खंडांत भाषांतर केलें आहे. फिरिस्ताच्या ग्रंथांत गजनीच्या सुलतानापासून ते फिरिस्ताच्या समकालीन घडामोडीपर्यंतची हकीकत १२ भागांत आली आहे. बाराव्या भागाचें नांव 'हिंदुस्थानांतील संत' असें आहे. त्याचें भाषांतर ब्रिग्जनें केलेलें नाहीं. शेवटच्या पुरवणींत हिंदुस्थानचें हवापाणी व भूगोल यासंबंधीं माहिती आहे.

फिरिस्ताचें सबंध नांव महम्मद कासीम हिंदुशाह फ़िरिस्ता. हा कास्पियन समुद्राचे कांठीं अस्तराबाद येथें इ. स. १५७० सालीं जन्मला. हा तरुणवयांतच बापाबरोबर हिंदुस्थानांत आला. कांहीं दिवस अहमदनगर येथें निजामशाहींत नोकरी केल्यावर ती इ. स. १५८९मध्यें सोडून विजापूरच्या आदिलशाहाचे पदरीं नोकरीस राहिला. बेगम सुलतानाचें अकबरपुत्र दानियालबरोबर लग्न झालें. तिला पोंचविण्यासाठीं हा खानदेशांत बऱ्हाणपूरापर्यंत गेला होता. कारण बऱ्हाणपूर ही मोगलांची दक्षिणेंतील राजधानी होती. पुढें अकबराचे मृत्यूनंतर आदिलशाहातर्फे तो जहांगिराकडे दुखवटचाचा संदेश घेऊन गेला व लाहोर येथें त्यानें त्याची भेट घेतली. तेथून तो पूर्वेस बहारमधील रोठस मार्गानें दक्षिणेंत आला असें दिसतें. त्यानें एक वेळ बदक्षानपर्यंतहि प्रवास केला होता. त्याच्या मृत्यूचा सन अनिश्चित आहे. परंतु त्यानें आपला इतिहास इ. स. १६२४ पर्यंत आणून सोडला आहे. दिल्लीच्या मुख्य राजवंशजांखेरीज इतर छोटया मुसलमानी राजघराण्यांची हकीकत सांगण्यास फिरिस्ताच्या इतिहासासारखा उपयुक्त आधार उपलब्ध नाहीं. इ. व डौ. व्हॉ. ६ पृ. २०६. ]

हिंदूंची राजधानी जिंकण्यासाठीं न थांबतां अहमदशाहानें खुल्या प्रदेशावर हल्ला केला. तो जेथें गेला तेथें त्याचा चुलता व पूर्वाधिकारी महम्मदशाह आणि विजयनगरचें राज्य यांच्यांत झालेला करार मोडून त्यानें पुरुष, स्त्रिया व मुलें यांना निर्दयतेनें ठार केलें. ठार केलेल्यांची संख्या वीस सहस्रांपर्यंत गेली कीं तो तेथें तीन दिवस थांबे आणि या रक्तमय प्रसंगाबद्दल आनंदोत्सव करी. मूर्ति असलेलीं देवळें त्यानें फोडलीं आणि ब्राह्मणांचीं महाविद्यालयें उध्वस्त केलीं. या सगळ्या धार्मिक इमारतींचा नाश आणि देवतांचा अपमान झालेला पाहून पांच हजार हिंदूंचा एक गट एकत्र आला आणि त्यांनीं प्रतिज्ञा केली कीं, या दुःखाचें मूळ जो राजा त्याला ठार करण्याचे यत्नांत आपण प्राण अर्पण करूं..........

हिजरी ८२९ मध्यें (इ.स.१४२८) स्वसैन्याला विरोधून मजबूत स्थळें ताब्यांत ठेवणाऱ्या माहूरच्या बंडखोर जमीनदारावर अहमदशाह चालून गेला. बंडखोर लवकरच शरण आला. तो आपल्या हातांत येतांच क्षमा करण्याचें दिलेलें वचन मोडून अहमदशाहानें त्याला त्याच्या पांच किंवा सहा हजार अनुयायांसकट ठार केलें. तसेंच पकडलेल्या स्त्रिया आणि मुलें यांना सत्यधर्म स्वीकारण्याची सक्ति केली. या स्वारींत कुल्लम येथील हिऱ्याची खाण त्याच्या ताब्यांत आली. या भागांतील मूर्तींचीं पुष्कळ मंदिरें त्यानें जमीनदोस्त केलीं, व त्या जागेवर मशिदी बांधल्या. तेथें धार्मिक कार्यासाठीं तेल-दिवा लावतां यावा म्हणून कांहीं जमिनी त्या कार्यास त्यानें लावून दिल्या

**अभ्यास** :—१. तत्कालिन इस्लामी धर्मप्रधान राजकारणासंबंधानें काय म्हणतां येईल ? २. 'राजाला ठार करण्याच्या यत्नांत आपण प्राण अर्पण करूं' असें हिंदु कां म्हणूं लागले ?

---

# १३ : : : विजयनगरचें समाजदर्शन

[ निकोल-दी-कोंती हा ख्रिस्त शक १४२० च्या सुमारास विजयनगर येथें येऊन गेला. इब्नबतूतानंतरच्या सुमारें ८०–९० वर्षांच्या काळांत अन्य कोणा परकीय प्रवाशानें विजयनगरविषयीं कांहीं लिहून ठेवलेलें आढळत नाहीं. युरोपियन प्रवाशांपैकीं ज्यांनीं ज्यांनीं विजयनगरासंबंधीं लिहून ठेवलेलें आज उपलब्ध आहे व ज्ञात आहे, त्या सर्वांत कोंती हा पहिलाच होय.

कोंती हा देशजातीनें इटालिअन. व्हेनिसमधील घरंदाज कुळांत त्याचा जन्म झाला. लहान वयांतच त्याचा दमास्कस येथील व्यापारी उलाढालींत शिरकाव झाला होता. तो फारसी भाषाहि शिकला. देश पाहण्यासाठीं पूर्वेकडील देशांत त्यानें २५ वर्षें सपत्नीक प्रवास केला. पोपच्या आज्ञेवरून त्यानें आपलें प्रवासवृत्त निवेदिलें. तें मूळ लॅटिन भाषेंत आहे. त्यांतील आपल्याला जरूर असलेल्या भागाचें इंग्रजी रूपांतर 'हॅक्ल्यूइट' मंडळाच्या 'इंडिया इन् दि फिफ्टीन्थ सेंचरी' ह्या पुस्तकांत मिळतें. कोंतीची विजयनगरसंबंधींची साक्ष उच्च मोलाची आहे. कोंती विजयनगरचा उच्चार 'बिझेनेगलिया' असा करतो. प्रस्तुतचा उतारा 'विजयनगर स्मारक ग्रंथ' पृ. २५२ यांतून घेतला आहे. ]

कोंती सांगतो कीं, नगरचा घेर साठ मैल असून त्याचे तट पर्वता-एवढे उंच बांधलेले आहेत. नगरांत शस्त्र धारण करूं शकणारीं नव्वद सहस्र माणसें आहेत. राजाला १२००० स्त्रिया असून मिरवणुकीच्या वेळीं त्यांची विशेष व्यवस्था केलेली असे.... ४००० स्त्रिया मोठ्या आकर्षक रीतीनें सज्ज होत्सात्या घोड्यांवर आरूढ झालेल्या असत.

तेथील देवाच्या रथाची वार्षिक मिरवणूक व त्या वेळीं स्वेच्छेनें करण्यांत येणारे देहयज्ञ व त्यांचे भिन्न प्रकार; वर्षप्रतिपदा, महानवमी, दीपावली व होळीचा रंग हे सण व ते साजरे करण्याचे उत्सव, मिरवणु-आदि सार्वजनिक प्रकार; कोर्टाचे व्यवहार व न्यायनिवाडा करण्याकरितां अवलंबिण्यांत येणाऱ्या तप्त दिव्यांच्या निरनिराळ्या रीति इत्यादि गोष्टींचें त्यानें सविस्तर वर्णन केलेलें आहे. लढाईच्या प्रसंगीं वापरण्यांत येणाऱ्या आयुधांत दगडी गोळे (Ballistae) व भडिमार यंत्रें (Bombardas) यांचा त्यानें विशेषत्वानें उल्लेख केलेला आहे. येथील लोक सर्व युरोपि-यनांना फरँक म्हणून संबोधीत व त्यांच्या अरेरावी वागणुकीमुळें त्यांच्या-विषयीं येथें काय समज प्रचलित झाला होता त्याविषयीं कोंती लिहितो " आम्ही आम्हालाच मात्र दोन डोळे असून इतर राष्ट्रांतील लोक आंधळे आहेत व हिंदु लोक एकडोळे आहेत असें म्हणतों, कारण आम्ही स्वतः सर्व राष्ट्रांमध्यें शहाणपणांत श्रेष्ठ आहों असें समजतों अशी आमच्याविषयीं त्यांच्यांत बोलवा आहे. "

---

## १४ : : : विजयनगरचें वैभव

[खालील उताऱ्याचा लेखक अबदुल रज्झाक हा हिरात येथें इ. स. १४१३ जन्मला. हा इरांक-तुराणचा बादशाह व तैमूरचा वंशज शाहरुख यांच्यातर्फे वकील म्हणून विजयनगरला इ. स. १४४३ सालीं आला. त्या वेळीं विजयनगरला दुसरा देवराय राज्य करीत होता. यानें तैमूर व शाहरुख यांच्या काळचा इतिहास लिहिला आहे. रज्झाक हा सुसंस्कृत व राज्यव्यवहार जाणणारा होता. या प्रवासाचें त्यानें लिहिलेलें वृत्त 'हॅक्ल्यूइट' मंडळाच्या 'पंधराव्या शतकांतील हिंदुस्थान'
२० ]

( India in the Fifteenth Century ) या पुस्तकांत इंग्रजींत रूपांतरित करून दिलेलें आहे. रज्झाक हा वकील म्हणून आलेला असल्यानें त्याचा थेट राजापर्यंत प्रवेश सहजच झाला. अर्थात् त्यानें लिहिलेल्या गोष्टी त्यानें जातीनें पाहिल्या आहेत. इ. व डौ. व्हॉ. ४ पृ. ८९ व पृ. १०६ पहा ]

" विजयनगर हें अशा प्रकारचें शहर आहे कीं, (माझ्या) डोळ्यांतील बाहुलीनें त्याच्यासारखें स्थान अद्यापि कधींच पाहिलेलें नाहीं व ज्ञानाच्या कानानें त्याच्यासारखें साऱ्या पृथ्वींतहि कांहीं असल्याचें कधीं एकलेलें नाहीं. त्याची बांधणी अशी आहे कीं, एकांत एक अशा सात तटांच्या भिंती त्यास आहेत. बाहेरील तटाच्या भोंवतीं पन्नास यार्डापर्यंत मोकळें मैदान ( esplanade ) आहे, त्यामध्यें माणसाच्या उंचीइतकी एकावर एक दगड टाकून रचाई केली आहे; त्यापैकीं निम्मा भाग जमिनींत पुरलेला आहे आणि निम्मा भाग वर आहे. त्यामुळें कितीहि धीट पादचारी किंवा घोडेस्वार असला तरी तो बाहेरील तटबंदीपर्यंत सहजासहजीं जाऊं शकत नाहीं. तटाच्या उत्तरद्वारापासून दक्षिणद्वारापर्यंतचें अंतर खूप आहे, तितकेंच अंतर पूर्व-पश्चिम द्वारामध्यें आहे. पहिल्या, दुसऱ्या आणि तिसऱ्या तटबंदीमध्यें मशागत केलेलीं शेतें, बागा आणि घरें आहेत. तिसऱ्यापासून सातव्या तटापर्यंत दुकानें आणि बाजार यांची गर्दी आहे.

"राजवाड्यापाशीं एकमेकांसमोर असे चार बाजार आहेत. उत्तरेस जें आहे तें रायाचें निवासस्थान किंवा सम्राटांचा प्रासाद होय. प्रत्येक बाजाराच्या अग्रभागीं भव्य कमानदार छत घातलेली वाट आणि विशाल गॅलरी आहे, परंतु त्या सर्वांपेक्षां राजवाडा अधिक भव्य आहे. बाजार खूप रुंद आणि लांब असून, आपल्या दुकानापुढें उंच कठडे असतांनाहि दोन्ही बाजूंना फुलें विकणारे फुलें विकूं शकतात. सुगंधित, मधुर नि ताजीं पुष्पें नगरांत केव्हांहि मिळतात किंबहुना तीं आवश्यक आहेत असें मानलें जातें. नागरिक त्याशिवाय राहूंच शकत नाहींत. निरनिराळी कला किंवा उद्योगसंघाचे व्यापारी आपलीं दुकानें जवळजवळ ठेवतात. मोतीवाले आपले मोती, लाल, हिरे, पाचू, प्रकटपणें बाजारांत विकतात."

**अभ्यास:**—हे दोन्ही उतारे वाचून पुढील प्रश्नांचीं उत्तरें द्या
१. विजयनगरचा घेर केवढा होता ? त्याला किती तट होते ? राज-

प्रासाद कोठें बांधलेला होता? बाजाराची व्यवस्था कशी होती? (२) तत्कालीन हिंदूंचे मोठे सण कोणते? (३) युरेपियनांबद्दल विजयनगरांतील लोकांना काय वाटत असे? (४) 'विजयनगरचें वैभव' यावर दोन परिच्छेद लिहा.

---

## १५ : : बाबरच्या आत्मचरित्रांतील तीन प्रसंग

[ बाबरचें आत्मचरित्र, त्याचा पूर्वज तैमूर व वंशज जहांगीर यांच्या आत्मचरित्रांहून अधिक योग्यतेचें आहे. तैमूरच्या लेखनांतील श्रद्धाळूपणा हा कृत्रिम भासतो. जहांगीरचें लेखन आत्मप्रौढीचें आहे. इंग्रज लेखक, 'हा ग्रंथ सीझरच्या आत्मचरित्राप्रमाणें सुरस' आहे असें म्हणतात. पण स्वतःच्या राजेपणाचा विसर पडून विषयाशीं समरस होऊन लिहिण्यांत बाबर सीझरहून अधिक वरचढ ठरेल असेंहि त्याचें मत आहे. हें आत्मचरित्र मूळ तुर्की भाषेंत असून त्याचें फारसी भाषांतर प्रथम अकबरास इ. स. १५९० त समर्पण करण्यांत आलें. या ग्रंथाचें गुणग्रहण व त्यांतील एक उत्कृष्ट उतारा हिंदुस्थानच्या सोपपत्तिक इतिहासांत (पृ. १७६) दिला आहे. बाबरचें आत्मचरित्र संपूर्ण नाहीं. त्यांत इ. स. १५०३-४, इ. स. १५०८-१९ आणि इ. स. १५२० ते २५ हे काळाचे दुवे तुटलेले आहेत. पुढील उतारे या आत्मचरित्रांतून घेतलेले आहेत. ]

### (१) हिंदुस्थानावर स्वारी करण्याचा विचार

......शेवटीं सरदारमंडळांत असें ठरविण्यांत आलें कीं, हिंदुस्थानवर स्वारी करावी. साबान ( हिजरी ९१० सन १५०५ जानेवारी ) महिन्यांत म्हणजे सूर्य कर्क राशीमध्यें असतांना आम्ही काबूलहून हिंदुस्थानांत यावयास निघालों. सहा टप्प्यांत अदिनापूर येथें येऊन पोहोंचलों. यापूर्वी मीं कधींच उष्ण प्रदेश किंवा हिंदुस्थानची सरहद्द पाहिली नव्हती. निंगनहार येथें मीं नवीनच जग पाहिलें. निराळेंच गवत, निराळीं झाडें, निराळे प्राणी व पक्षी, फिरत्या टोळ्यांच्या वेगळ्या चालीरीति इत्यादि पाहून आम्हास आश्चर्य वाटलें, खरोखरच आश्चर्य वाटण्यासारखी स्थिति होतीहि.

१५०४ मध्यें काबूल घेतल्यापासून माझ्या मनांत हिंदुस्थान घेण्याचें

होतें. माझ्या सरदारांना माझा बेत रुचला नाहीं व बंधूनींहि विरोध केला म्हणून मी थबकलों. यामुळें हिंदुस्थानांतील प्रदेश माझ्या स्वारीच्या सपाटयांतून वांचले. अखेरीस सर्व अडचणी दूर झाल्या. मला कोणी विरोधक उरला नाहीं. ९२५ हिजरी ( इ. स. १५१९ ) मध्यें आम्ही सैन्यासह निघालों. तोफा डागून बजौर घेतलें. तेथील दोन तीन गढयांतून लोकांची कत्तल करीत आम्हीं भिरा येथें गेलों. तेथें आम्हीं हल्ला केला नाहीं किंवा जाळपोळहि केली नाहीं, मात्र नागरिकांवर कर लादला. जमलेला पैसा सैनिकांस वाटला आणि काबूलला परतलों. तेव्हांपासून आतां ( इ. स. १५२६ ) पर्यंत हिंदुस्थानची पाठ आम्हीं सोडली नाहीं. पांच वेळां त्यावर स्वाऱ्या केल्या. पांचव्या प्रसंगीं ईश्वरानें दया केली. सुलतान इब्राहिमसारख्या बलशाली शत्रूचा पराभव केला, आणि हिंदुस्थानांत आमची सत्ता स्थापन झाली.

* * *

## (२) बाबरचें हिंदुस्थानसंबंधींचें मत

हिंदुस्थान हा देश सकृद्दर्शनीं आवडण्यासारखा नाहीं. तेथील नागरिक दिसण्यांत रुबाबदार किंवा सुरूप नाहींत; सामाजिक जीवनांतील मजा लूटण्याची त्यांना कल्पना नाहीं; त्यांच्या ठिकाणीं प्रज्ञेचा अभाव आहे. विश्वांतील विविधतेंतून साम्य काढण्याचें कौशल्य नाहीं, शिष्टाचार नाहीं, स्वभावाचा गोडपणा नाहीं, सहानुभूतीची संवेदना नाहीं, कल्पकतेचा वकूब नाहीं, यांत्रिक शोधांत गति नाहीं, कारागिरीचें ज्ञान किंवा कौशल्य नाहीं. सोयिस्कर घरें, रुचकर फळें, बर्फ किंवा थंडगार पाणी हीं तेथें एकंदरींत दुर्मिळच आहेत. तेथील बाजारहि यथातथाच. तेथें मिळतें काय यापेक्षां मिळत नाहीं काय हेंच हवें तर विचारून घ्या, (कारण बाजारांत आहेच काय मुळीं !) सार्वजनिक स्नानगृहें, उच्च शिक्षणाचीं विद्यालयें हीं आढळणार नाहींत. इतकेंच काय, पण मेणाचा दिवा किंवा मेणबत्तीचा तुकडा देखील नाहीं. रात्रीं तुम्हाला लिहीत किंवा वाचीतच बसावयाचें असेल तर जळती मशाल पेटवून ती हातांत घेऊन उभ्या असलेल्या अर्धनग्न कळकट नोकराचें सान्निध्य तुम्हास सहन केलें पाहिजे !

* * *

## (३) कानव्हाच्या समरभूमीवर बाबरचें भाषण

माझ्या सैनिकांतील बेदिली व निरुत्साह पाहून मीं एक कल्पना लढविली. बेग व अधिकारी या सर्वांची एक सभा मीं बोलाविली आणि त्यांना सांगितलें :--

" शिपाई हो ! कोणाहि मनुष्यास मरण चुकत नाहीं, फक्त ईश्वर अमर आहे. जीवनसौख्याचें जेवण जेवणारानें अखेर मृत्यूचा पेला ओठाला लावलाच पाहिजे ! आयुष्याच्या धर्मशाळेंत उतरला त्याला एक दिवस तरी हा दुखःनिवास सोडणें आहेच. असें जर आहे तर मग अपमानानें जगण्या-पेक्षां सन्मानानें मरण पत्करणें काय वाईट ?

**कीर्तीसवें जधीं ये मृत्यू मला सुखाचा**
**होता सुकीर्ति माझी ना पाड जीविताचा**

ईश्वरानें कृपाळूपणें आपल्याला अशी संधि दिली आहे कीं, "आपण मेलों तर गाझी होऊं, विजयी झालों तर त्याचेंच कार्य अधिक चालवूं. तर मग जीवांत जीव आहे तोंपर्यंत शत्रूला पाठ दाखविणार नाहीं व रणांगणांतून पळ काढणार नाहीं, अशी आपण प्रत्येकानें शपथ घेऊं या. "

हे शब्द माझ्या तोंडून बाहेर पडतात तोंच लहानथोर सरदार शिपाई या सर्वांनीं कुराणावर हात ठेवून (शिकस्तीनें लढण्याच्या) शपथा घेतल्या.

**अभ्यास :--** १. इ. स. १५०५ पर्यंत बाबरनें हिंदुस्थानवर स्वारी कां केली नाहीं ? तैमूरसारखी कत्तल न करतांहि त्यानें पैसा कसा मिळविला ? २. हिंदुस्थानबद्दल बाबरचें प्रथमदर्शनीं काय मत झालें ? त्याच्याशीं लोक असे कां वागले असतील ? त्याचें म्हणणें कितपत यथार्थ दिसतें ? आज काय स्थिति आहे ? ३. सैन्यांतील असंतोष दूर करण्यासाठीं बाबरनें काय उपदेश केला ? त्याचा परिणाम काय झाला ? जीवनमरणाचें हें तत्त्वज्ञान तुम्हाला पटतें काय ?

---

## १६ : : : हुमायूनचा स्वभाव

[पुढील उतारा मिर्झा हैदर कृत तारीख–इ–रशिदी या ग्रंथांतून घेतला आहे. मिर्झा हैदर हा बाबरचा मावसभाऊ. हुमायून-शेरशाहाची गंगेवर जी लढाई झाली (इ. स. १५४०) तींत तो हजर होता. हुमायूनवर त्याचें फार प्रेम होतें. त्यानें पुढें कामरानच्या विरुद्ध हुमायुनास संकटांत साह्यहि केलें; पण हुमायूनचें दुर्दैव अशा जिव्हाळ्याच्या मित्रयत्नास पुरून उरणारे होतें. पुढें मिर्झा हैदरनें हुमायूनचा नाद सोडला व आपण अवघ्या ४००० स्वारांनिशीं स्वारी करून काश्मीरचा सुलतान बनला.

तारीख––इ––रशिदी हा ग्रंथ कसोशीनें लिहिलेला असून त्यांत मध्य आशियांतील घडामोडींचें बरेंच व हिंदुस्थानांतील त्रोटक वर्णन आलें आहे. बाबरच्या आत्मचरित्रास तो पूरक असा असून या दोहोंवरून तत्कालीन इतिहास समजण्यास फार मदत होते. इ. व डौ. व्हॉ. ५ पृ. १२७ पहा.]

हुमायून हा बाबराच्या सर्व पुत्रांत ज्येष्ठ व सुप्रसिद्ध होता. नैसर्गिक बुद्धिमत्ता व चांगुलपणा त्याच्याइतका फारच थोडया लोकांच्या ठिकाणी मला आढळला; परंतु हलक्या लोकांच्या नादीं लागून त्याला कांहीं व्यसनें लागलीं आहेत; त्यांपैकींच अफू खाणें हें एक होय. बादशाहाच्या ज्या अनेक दोषांचा बभ्रा झाला आहे, त्याचें मूळहि या अफूच्या व्यसनांतच शोधावें लागेल. असें असलें तरी जन्मतःच त्याला चांगल्या गुणांची देणगी मिळालेली होती यांत संशय नाहीं. रणांत शूर, मित्रांत आनंदी आणि फार उदार असें त्याचें वर्णन करतां येईल. त्याला लव्याजम्याची आणि दरबारी थाटाची मात्र फार आवड असे. ज्या काळांत मीं आग्र्यास त्याच्याकडे नोकरी पत्करली तो त्याचा पडता काळ होता. लोक म्हणत, सध्यांचा त्याचा थाट त्याच्या पूर्ववैभवाच्या मानानें कांहींच नव्हे! अशा स्थितींतहि गंगेवरील लढाई जेव्हां झाली तेव्हां त्याच्या खाजगी नोकरींत १७००० लोक होते. यावरून त्याच्या बाकीच्या सरंजामाची कल्पना येईल.

बादशाहाची आणि माझी चांगली गट्टी होती. तो मला 'दोस्त' असें म्हणत असे. कागदोपत्रींहि त्याच नांवानें बादशाहा माझा उल्लेख करी आणि सल्लागार मंडळाच्या सभेंतहि मला त्याच नांवानें संबोधी.

## २७ : : : हुमायूनचा वनवास व प्रेमविवाह

[गुलबदन ही बाबराची मुलगी. ही इ. स. १५८१ च्या सुमारास अकबराचे कारकीर्दीत मक्केस प्रवासास निघाली. तिनें आपल्या आठवणी लिहिल्या आहेत. मिसेस ए. एच्. बीव्हरिज यांनीं या आठवणी इंग्रजींत अनुवादित केल्या. या अनुवादावरून पुढील उतारा अनुवादित केला आहे.]

हमीदा बानू बेगमेसंबंधीं बादशहानें विचारले "ही कोण आहे ?" त्यानें उत्तर दिलें, "ही मीर बाबा दोस्त यांची मुलगी."

...... त्या दिवसांत हमीदा बानू बेगम ही मिर्झा हिंदालच्या महालांत पुष्कळ वेळां येत असे. दुसऱ्या दिवशीं आपल्या आईला भेटण्यास बादशाह आला असतां तो म्हणाला, "मीर बाबा दोस्तांचा आणि आपला आप्तसंबंध आहे. तुम्हीं त्याच्या मुलीचा विवाह माझ्याशीं लावावा हें योग्य होय." मिर्झा हिंदालनें कित्येक अडचणी पुढें मांडल्या आणि नंतर म्हणाला, "या मुलीला मी माझी बहीण किंवा मुलगी मानतों. तुम्ही आहांत बादशाह. परमेश्वर करो व असा प्रसंग न येवो कीं, जेव्हां तुम्ही तिला विभक्त ठेवून पुरेशी नेमणूक देऊं नये व मीं तिच्या उपाधीची चिंता करीत बसावें."

शेरशाहानें पराभव केल्यामुळें बादशाह दीन झालेला होता, त्याला हें बोलणें लागलें, म्हणून तो रागावून उठून चालता झाला. तेव्हां माझ्या आईनें त्यास पत्र पाठविलें "पूर्वीपासून मुलीचें मन वळविण्याचा प्रयत्न मुलीची आई करीत आहे. थोड्याशा शब्दामुळें तुम्हीं रागावून निघून जावें याबद्दल आश्चर्य वाटतें." हुमायूननें उत्तर लिहिलें, "तुमचें पत्र वाचून बरें वाटलें. मन वळविण्याचे जे यत्न तुम्ही कराल त्यांना माझा पाठिंबा आहे. कांहीं नक्त नेमणुकीबद्दल त्यांनीं जें लिहिलें तें त्यांच्या इच्छेनुरूप केलें जाईल. माझे डोळे आतां तिकडल्या रस्त्याला लागलेले आहेत."

आणखी कांहीं दिवसांनंतर पुन्हां तो आईकडे आला व म्हणाला "कोणाला तरी पाठवून हमीदा बानु बेगमला बोलवा." तिनें बोलावणें पाठविलें पण बेगम आली नाहीं. तिनें निरोप पाठविला, "माझा सन्मान करण्याकरितां बोलावलें असेल तर तो पूर्वीच झालेला आहे. मीं पुन्हां कां यावें ?... राजाची एकदां भेट घेणें हें कर्तव्य आहे. दुसऱ्यांदा भेटण्याची मनाई असते.

सबब मी येणार नाहीं...." चाळीस दिवसपर्यंत बेगमनें वादविवाद केला तरी बादशाहाची विनंति मान्य करावी हें तिला पटेना. शेवटीं माझी आई राणी दिलदार बेगम तिला म्हणाली "तूं कोणाशीं तरी लग्न करणारच ना? मग राजापेक्षां अधिक कोण चांगला आहे?" बेगम म्हणाली, "होय, मी कोणाशीं तरी लग्न करणार आहे. पण तो मनुष्य असा असेल कीं, ज्याच्याशीं मला समानतेनें बोलतां येईल. ज्याच्या पायाशींहि आपण पोहोंचूं शकणार नाहीं असा तो नसेल" माझ्या आईनें तिला पुष्कळ समजाविलें.

शेवटीं पुष्कळशा चर्चेनंतर ती कबूल झाली..... सप्टेंबर १५४१ मध्यें बादशाहानें योग्य मुहूर्त पाहून मीर आबूल बाबाला हा विवाह लावण्यास सांगितलें. मीरला त्यानें हुंड्यादाखल दोन लक्षांचें नाणें रोख दिलें. विवाहानंतर तीन दिवस पत्र (patr) येथें राहून तो 'बक्खर' कडे बोटीनें रवाना झाला.

**अभ्यास**:--१. दोन्ही उतारे वाचून हुमायूनचे गुण-दोष वर्णन करा. २. राज्यकर्ता या नात्यानें त्याच्या स्वभावामुळें त्याला कोणता त्रास झाला?

---

## १८ : : शेरशाहाची शेतकऱ्यांबद्दलची काळजी

[तारीख-इ-शेरशाही हा ग्रंथ अकबराच्या आज्ञेवरून आब्बासखान शेरवानी यानें लिहिला. लेखनकाल–बहुधा इ. स.१५७९. हा ग्रंथ अपूर्ण स्थितींत उपलब्ध आहे. लेखकानें त्यांत ठिकठिकाणीं शेरशाह सर्व प्रसंग स्वतः वर्णन करीत आहे असें दाखविलें आहे. प्रस्तुतचा व पुढील हे दोन्ही उतारे या ग्रंथांतील आहेत. सोळाव्या शतकाचे अखेरीस अफगाणिस्थानच्या सुलतानाचा सविस्तर इतिहास लिहिणारा अहमद यादगर यानें आब्बासखानाच्या ग्रंथाचा उपयोग केला आहे. त्यास त्याच्या ग्रंथाची संपूर्ण प्रत उपलब्ध होती असें दिसतें. इ. व डौ. व्हॉ. ४ पृ. ३०१.]

आपल्या जहागिरीची व्यवस्था पाहण्यास प्रारंभ केला त्या वेळीं त्यानें (शेरशाहानें) सांगितलें कीं ज्यांच्या श्रमावर जिल्ह्यांची भरभराट अवलंबून आहे अशा किसानांना, गांवपाटलांना आणि गांवचे हिशेब ठेवणाऱ्या पटवाऱ्यांना (कुलकर्ण्यांना) माझ्यापुढें बोलवा.

हे लोक जमल्यावर शेरशाहानें सैन्यासहि बोलाविलें. त्यांना तो म्हणाला .... " गरीब शेतकऱ्यावर शेती अवलंबून आहे हें मी चांगलें जाणतों; त्यांची स्थिति वाईट असेल तर ते कांहींच उत्पादन करणार नाहींत, परंतु ते सुस्थितींत असतील तर ते पुष्कळ उत्पन्न काढतील. शेतकऱ्यांकडून वसुली करतांना काय जुलूमजबरदस्ती तुम्ही करतां तें मला माहीत आहे; म्हणूनच मोजणीच्या प्रमाणांत सरकारदेणें आणि सारा गोळा करण्याचा मेहनताना मीं ठरवून दिला आहे. तुम्हीं जर ठरल्यापेक्षां अधिक वसुली केलीत तर तर ती तुमच्या हिशेबांत तुम्हाला धरतां येणार नाहीं.

" जमिनीची मोजणी करण्याच्या वेळीं शेतकऱ्याला सहानुभूति दाखविणें व प्रत्यक्ष उत्पादनाला त्यास समर्थ करणें हें राज्यकर्त्याला योग्य आहे. परंतु सरकारदेणें देण्याची वेळ येते तेव्हां मात्र त्यानें कुठलीहि सवलत न देतां कडक रीतीनें सारा गोळा केला पाहिजे. त्याला जर असें आढळलें कीं, किसान देण्याची टाळाटाळ करीत आहेत तर त्यानें त्यांचा छळ असा करावा कीं इतरांनीं त्याजपासून बोध घ्यावा."

मग तो शेतकऱ्यांना म्हणाला "तुमच्या ज्या कांहीं तक्रारी असतील त्या तुम्ही नेहमीं माझ्यापुढें मांडा. तुमच्यावर कोणाकडूनहि मी जुलूम होऊं देणार नाहीं ."

सर्व लोक गेल्यावर आपल्या अधिकाऱ्यांना फरीद (शेरशाह) म्हणाला, "उन्नतीचें मूळ शेतकरी होत. मी त्यांना उत्तेजन देऊन परत पाठविलें आहे. त्यांच्यावर कोणी जुलूम जबरदस्ती करतो कीं काय यावर माझें लक्ष राहील, कारण बेकायदा वागणुकीपासून बिचाऱ्या शेतकऱ्यांचें जर राज्यकर्ता रक्षण करूं शकत नसेल तर त्यानें त्यांच्याकडून सारा गोळा करणें म्हणजे शुद्ध जुलूम होय."

---

## १९ : : : सुराजगडचें युद्ध

एक प्रहर रात्र उरली असतां शेरखानानें खंदकांतून ( entrenchment ) सैनिकांना बाहेर आणून सेना सिद्ध केली. पहाटेची प्रार्थना झाल्यावर तो स्वतः बाहेर आला आणि सरदारांना म्हणाला, "शत्रूच्या सैन्यांत पुष्कळ हत्ती, तोफा आणि खूप पायदळ आहे. त्याच्याशीं आपण अशा रीतीनें युद्ध केलें पाहिजे कीं, त्यांना मूळची व्यवस्था ठेवणें अशक्य व्हावें. पायदळ आणि तोफांपासून बंगालच्या घोडदळाला दूर नेलें पाहिजे, आणि घोडे नि हत्ती यांची अशी गल्लत केली पाहिजे कीं, त्यांच्या व्यवस्थेंत विस्कळितपणा उत्पन्न व्हावा. बंगाल्यांचा पराभव करण्याची मीं एक योजना तयार केली आहे. आपणास दिसतो त्या उंचवटयापलीकडे माझ्या सैन्याचा पुष्कळसा भाग मी नेईन आणि हल्ला करण्यासाठीं कांहीं अनुभवी नि कुशल घोडेस्वारांना ठेवीन. आतां ते अगदीं पूर्वीच्या पद्धतीनें व पराभव होणार नाहीं अशा विश्वासानें लढतील. मी माझी निवडक सेना त्यांच्यावर नेईन. बाणांची एक फैर झाडली कीं, ती परत् लागेल. खूप सैन्य आहे तेव्हां जय मिळणारच या भरंवशावर शत्रु राहील. त्याला वाटेल कीं अफगाण पळूं लागले, आणि अधीरतेनें पायदळ आणि तोफा यांना तेथेंच टाकून शक्य त्या शीघ्रतेनें शत्रु (आमच्या मागें ) लागेल. (साहजिकच) युद्धाच्या ठरलेल्या योजनेंत अव्यवस्था नि गोंधळ निर्माण होईल. मग उंचवटयापलीकडे लपविलेल्या माझ्या सेनेला मी पुढें आणीन आणि ती शत्रूवर हल्ला करील. पायदळ नि तोफा यांचा आधार नाहींसा झाल्यावर बंगाली घोडदळ अफगाणी घोडदळाला तोंड देऊं शकणार नाहीं. मला आशा वाटते कीं, ईश्वरी कृपेनें त्यांच्या सैन्याची धूळधाण होईल व त्यांस पळ काढावा लागेल.

[**संदर्भ** :--शेरशाहाच्या अपेक्षेप्रमाणें घडून आलें, त्याचा मोठा विजय झाला. या वेळीं बंगालचा सुलतान महमूद नांवाचा होता. ही लढाई शेरशाहाच्या आयुष्यांतील महत्त्वाची घटना होय. इ. स. १५३३.]

**अभ्यास** :--"राज्यकर्ता व सेनापति होण्यास शेरशाह सर्वथैव योग्य होता," हें विधान वरील उताऱ्यांच्या मदतीनें सिद्ध करा. कांहीं मुद्दे : सारा आकारणी नि वसुलीचें धोरण; सैन्याचें कर्तव्य; युद्धांतील हिकमती.

---

## २० : : : राणी दुर्गावतीचें बलिदान

[ प्रस्तुतचा उतारा तारीख–इ–अल्फी या ग्रंथांतील आहे. अकबर बादशाहानें इस्लामी देशांचा इतिहास हिजरी १ ते १००० पर्यंतच्या काळांतील लिहिला जाण्यासाठीं अनेक विद्वानांची योजना केली. तरी या ग्रंथांतील बराच भाग ठठ्ठा येथील मौलाना अहमद यानें लिहिलेला आहे. मौलाना अहमद हा शिया व बदाउनी हा सुनी असल्यानें बदाउनी त्याच्याबद्दल फार प्रतिकूल लिहितो. इ. स. १५९१ त मिर्झा फुलाद यानें मुल्ला अहमद याला बादशाहानें बोलाविणें पाठविलें आहे असें सांगून मध्यरात्रीं घराबाहेर काढलें व त्याचा खून केला. हा प्रकार लाहोर येथें घडला. फुलादला अकबरानें मृत्यूची शिक्षा दिली. पण ते असो. अहमदशाहाच्या अकाली मृत्यूनें त्याचें इतिहासाचें काम अपुरें राहिलें तें असफखानानें पुरें केलें व बदाउनीनें त्यावर हात फिरविला. यांत इ. स. ६२२ पासून इ. स. १५९२ पर्यंतचा इतिहास आला आहे. इस्लामी धर्म त्याच्या स्थापनेपासून १००० वर्षेंच टिकणार, अशी अकबराची कल्पना होती. अलफ् म्हणजे हजार, यावरून या ग्रंथास 'तारीख–इ–अल्फी' हें नांव पडलें. प्रस्तुत ग्रंथांत निरनिराळ्या देशांची हकीकत सालवार लिहिली असल्यामुळें त्यांतून एखाद्या देशाची हकीकत स्वतंत्रपणें संगतवार समजून घेणें फार कठिण जातें. सुमारें २०।२१ ओळींचीं चार हजार पृष्ठें भरतील एवढा हा ग्रंथ मोठा आहे. तारीख–इ–अकबरी व तारीख–इ–अल्फी या दोन ग्रंथांत बरेंच साम्य आहे. इ. व डौ. व्हॉ. ५ पृ. १५० व १६९.]

[ **कथासंदर्भ**:––सध्यांच्या मध्यप्रांताचा उत्तर भाग म्हणजे गोंडवन. त्याची तत्कालीन राजधानी चौरागढ ही सध्यां नरसिंगपूर जिल्ह्यांत आहे. स्वतःचा लहान मुलगा बीर नारायण याची पालनकर्ती म्हणून राणी दुर्गावती या गोंड राज्याचा राज्यकारभार पाहूं लागली. प्रस्तुतच्या युद्धापूर्वीं १५ वर्षें ही घटना घडली. मुलगा मोठा झाला तरी राज्यकारभार पूर्णत्वानें तिच्याकडेच होता. २०००० चांगलें घोडदळ आणि १००० हत्ती राणीजवळ सुसज्ज होते. मोगलांकडील बाजबहादर याच्यावर तिनें अनेक विजय मिळविले होते.]

* * *

असफखान पदवी मिळालेला पण मूळचा ख्वाजा अब्दुल मस्जीद यांस 'कारा'चें अधिकारीपद देण्यांत आलेलें होतें. तेथील कारभारहि त्यानें

चांगल्या रीतीनें पाहिलेला होता. त्याच्या कामगिरीपैकीं 'गढा'ची विजयप्राप्ति ही महत्त्वाची घटना होय. हा प्रदेश म्हणजे अरण्यें आणि टेकड्या यांनीं भरलेला. इस्लामच्या उदयापासून हिंदुस्थानच्या कोणाहि राज्यकर्त्यानें हा प्रांत जिंकला नव्हता.

या वेळीं तेथील कारभार राणी दुर्गावती पाहात होती. प्रजेची तिच्यावर भक्ति व विश्वास होता. निमित्तें काढून अनेक वेळेस आपले दूत त्या राज्यांत आसफखानानें पाठविले आणि जेव्हां त्या प्रदेशाचीं वैशिष्टचें, परिस्थिति, राणीजवळील पैसा इ. समजून आलें तेव्हां त्या प्रदेशावर त्यानें सैनिकी स्वारी केली. ५०० हत्ती आणि २० हजार घोडेस्वारांसह युद्ध करण्यास राणी सामोरी आली. दोन्ही सैन्यांनीं आपली पराकाष्ठा केली. घोडेस्वारांच्या अग्रभागीं असलेल्या राणीस एक बाण लागला. त्या थोर स्त्रीनें जेव्हां पाहिलें कीं, आपणांस आतां कैद केलें जाणार तेव्हां तिनें माहुताजवळील सुरा घेऊन आपल्या पोटांत खुपसला नि ती गतप्राण झाली. असफखानास विजय मिळाला. चौरागढापर्यंत हल्ला करून तेथें तो थांबला. राणीच्या मुलानें किल्ला लढविला. पण त्याच दिवशीं खानानें तोहि सर केला. राजपुत्र त्या लढाईंत घोड्यांच्या टापांखालीं मरण पावला. इतकीं रत्नें, सोनें, चांदी आणि इतर वस्तु लुटण्यांत आल्या कीं, त्यांच्या दशांशाचा अंदाज बांधणेंहि कठिण आहे. सगळ्या लुटीपैकीं आसफखानानें केवळ १५ हत्ती दरबारांत पाठविले, बाकी सर्व चीजवस्त स्वत:जवळच ठेवली.

**अभ्यास :—**१. राज्य जिंकण्यासाठीं स्वारी करण्यापूर्वी शत्रूची कोणती माहिती मिळवावी लागते? ही मिळविण्याचीं कांहीं साधनें सांगा. २. राणी दुर्गावतीचें कर्तृत्व कोणतें? तिनें सुरा खुपसून जीव दिला हें योग्य झालें असें तुम्हांस वाटतें कां? कारणें सांगा. स्त्रियांनीं रणांगणांतून शस्त्रयुद्ध केल्याचीं भारतीय इतिहासांतील आतांपर्यंतचीं २–३ उदाहरणें सांगा. ३. स्वाध्यायमालेच्या पुस्तकांतील 'राणी दुर्गावती' हें पुस्तक वाचा.

## २१ : : : सारा आकारणींत सुधारणा

[ऐने अकबरी हा ग्रंथ अबुल फझल यानें लिहिला. अबुल फझलचा जन्म १४–१–१५५१ रोजीं झाला व तो १२–८–१६०२ रोजीं मारला गेला. यानें 'अकबरनामा' या नांवाचा एक बडा ग्रंथ लिहिला. ऐने अकबरी हा त्या ग्रंथाचा तिसरा भाग समजला जातो. पण ऐने अकबरींतील राज्यव्यवस्थेच्या तपशीलवार माहितीमुळें या ग्रंथास स्वतंत्र महत्त्व आहे. गृहव्यवस्था, सैन्यव्यवस्था व साम्राज्यव्यवस्था असे ऐने अकबरीचे तीन भाग आहेत. पण गृहव्यवस्था या शब्दानें त्यांतील मजकुराचा नीट बोध होत नाहीं. कारण या पहिल्याच भागांत टांकसाळी, हत्तीखाना, वस्तूंचे बाजारभाव, लेखन व रंगकला इत्यादींसंबंधीं इतकी तपशीलवार माहिती आढळते कीं, सोळाव्या शतकाचा हिंदुस्थानचा सामाजिक इतिहास लिहिणाऱ्यानें हें ज्ञानभांडार अवश्य लुटावें. अकबरास धर्मविषयक अन्तर्ज्ञान होतें असें अबुल फझल मानतो. पण तो लिहितो कीं, 'त्यासंबंधींचें योग्य शब्दांत कोण वर्णन करूं शकेल व कोणी केलें तरी तें वाचून समजणारा कोण आहे? तरी या भानगडींत पडण्यापेक्षां मी त्याचा (अकबराचा) ऐहिक मोठेपणा ध्यानांत येण्याजोग्या गोष्टी तेवढ्या सांगतो.' असें म्हणून त्यानें ऐने अकबरीस सुरुवात केली आहे. (ऐने अकबरी, ब्लॅकमनचें भाषांतर, अबुल फझलची प्रस्तावना पृ. १० पहा.)

'अकबरनामा' या ग्रंथाच्या पहिल्या भागांत तैमूर ते बाबरपर्यंतची त्रोटक हकीकत आहे. यानंतर हुमायूनची सविस्तर हकीकत आणि अकबराच्या कारकीर्दीच्या शेहेचाळीस वर्षांची सालवार हकीकत दुसऱ्या भागांत आली आहे. तीच पुढें इनायतुल्ला मुहिबअली यानें अकबराच्या मृत्यूपर्यंत आणून सोडली आहे.

अबुल फझलची भाषा कृत्रिम आहे. अकबराच्या दोषांवर त्यांत पांघरूण घालण्याचा प्रयत्न आहे असें म्हणणें वावगें होणार नाहीं. कदाचित् भाषेच्या अलंकारकृत्रिमतेनें भाषेस तसें स्वरूप आलें असेंहि म्हणतां येईल. मात्र अबुल फझलच्या लेखनांत जाणूनबुजून सत्यापलाप नाहीं. प्रसंगीं त्याची भाषा इतकी जोरदार आहे कीं, बुखाऱ्याचा सुलतान अबदुल्ल म्हणतो कीं, मला अकबराच्या बाणापेक्षां अबुल फजलच्या शरसंधानाचें अधिक भय वाटतें. इलियट डौसन व्हॉ. ६ पृ. ५ पहा.

अबुल फझल हा अकबराच्या राजनीतीला व्यापक तत्त्वज्ञानाची बैठक पुरविणारा थोर पुरुष होऊन गेला यांत शंका नाहीं.]

या अमरकीर्ती बादशाहाच्या कारकीर्दीच्या सुरुवातीपासून बुद्धिमान् व निर्लोभी पुरुष, उत्साही व अनुभवी लोकांच्या सहकार्यानें दरवर्षी बाजारभाव पाहून ते बादशाहाकडे कळवीत असत. नंतर देशांतील पिकांचें घाऊक उत्पन्न अजमावून व त्यांच्या किंमतीचा अंदाज करून ते सरकारी कराचे दर ठरवीत असत.

परंतु या पद्धतींत पुष्कळच अडचणी होत्या. एकंदर करआकारणी अंदाजानें होई, क्षणिक लहरीनें करांत वाढ केली जाई, लांच आणि स्वार्थ यांच्या अनुरोधानें आकारणींत फरकहि होई. मुजफरखान आणि राजा तोडरमल यांच्या देखरेखीखालीं कारकीर्दीच्या १५ व्या वर्षी सरकारी कराची फेरवांटणी करण्यांत आली होती. पूर्वीपेक्षां जरी ही आकारणी कमी होती तरी देखील अंदाज व प्रत्यक्ष उत्पन्न या दोहोंत फारच फरक पडला. साम्राज्याचा जसजसा विस्तार होऊं लागला, तसतसे चालू भाव निश्चित करणें हें अधिक कठिण होऊं लागलें आणि या प्रकरणीं लागणाऱ्या उशिरामुळें फार गैरसोयी वाढल्या. शेतकरी तक्रार करीत कीं खूप आकारणी केली, आणि सरकारनें जमा केलेल्या साऱ्याची रक्कम पाहून जमीनदारांचा तिळपापड उडे. बादशाहानें या अडचणींवर उपाय म्हणून १० वर्षांची कायम साराआकारणी ठरविली. यासाठीं आपल्या कारकीर्दीच्या १५ व्या वर्षापासून २४ व्या वर्षाअखेर (इ. स. १५७०–१५८०) जी काय साराआकारणी झाली त्याची त्यानें मोजदाद केली व तिचा एकदशांश हा सारा ठरवून दिला.

ही मोजदाद करतांना त्याला विसाव्या ते चोविसाव्या वर्षांचे साऱ्याचे विश्वसनीय आकडे मिळाले. पण तत्पूर्वीच्या पांच वर्षांचे आकडे मिळविण्यासाठीं त्याला स्थानिक प्रतिष्ठितांच्या शब्दांवर विश्वासावें लागलें. दर वर्षाचें उत्तम पीक व दहा वर्षांतील उत्तम पिकाचें वर्ष हीं लक्षांत घेऊन आकारणी ठरविली गेली.

**अभ्यास** :—१. साराआकारणी ही जमिनीची मोजणी करून ठरवावी हें तत्त्व प्रथम कोणत्या मुसलमान राजानें सुरू केलें? साराआकारणींत अन्याय होऊं नये म्हणून अकबरानें कोणती काळजी घेतली ? त्याला कोणत्या अडचणी आल्या ? २. सरकारला सारा घेण्याचा अधिकार कां पोहोंचतो याची तात्त्विक चर्चा करा.

---

## २२ : : : अकबरकालीन आग्र्याचें वैभव

[ प्रस्तुतचा उतारा राल्फ फिच या इंग्रज प्रवाशानें लिहिलेल्या वृत्तांतून घेतलेला आहे. इंग्लंडहून हिंदुस्थानकडे प्रथमच चार प्रवासी इ. स. १५८३ च्या फेब्रुवारींत टायगर नांवाच्या जहाजांत बसून निघाले. त्यांचीं नांवें न्यूबरी, फिच्, लीडस् व स्टोरी. हे सर्व भूमध्य समुद्रांतून सीरियांत आलेप्पो येथें आले व तेथून बसरा व तेथून ऑर्म्झला पोहोंचले. तेथें पोर्तुगीजांनीं त्यांस व्यापारी मत्सरामुळें अटक केली व गोव्यास नेलें. त्यांची १५८३ च्या वर्ष अखेरीस सुटका झाली. पुढील त्रास वांचविण्यासाठीं ते पळून विजापुरास गेले. तेथून गोवळकोंडा, बऱ्हाणपूर, उज्जनी या मार्गानें आग्र्यास पोहोंचले. अकबर त्या वेळीं फत्तेपूर शिक्री येथें होता. तेथें बादशाहाची व त्यांची भेट झाली किंवा नाहीं तें कळत नाहीं. पण फिच हा एकटाच तेथून बंगालकडे निघाला. तेथून तो कुचबिहार, चितगांवपासून मलाक्कापर्यंत पोहोंचला. तेथें सात आठवडे राहून परत पेगूवरून बंगालकडे आला. तेथून तो समुद्रमार्गें कोचीन व गोवा येथें आला. बऱ्याच अडचणींतून अखेर १५९१ च्या एप्रिलांत आठ वर्षांनीं लंडनला पोहोंचला. इंग्लंडमधून १५८३ त निघण्यापूर्वीं त्यानें मृत्युपत्र केलें होतें. बरींच वर्षें इंग्लंडमध्यें त्याचे कांहींच वृत्त न कळल्यानें तो मेला असें समजून त्याच्या मृत्युपत्राची अंमलबजावणीहि झालेली होती !

फिचचें प्रवासवृत्त प्रथम रिचर्ड हॅक्लुइट (१५९८–१६००) यांनीं 'प्रिन्सिपल नॅव्हिगेटर' या पुस्तकांत प्रसिद्ध केलें. हें प्रवासवृत्त अत्यंत त्रोटक आहे. कारण फिचला लेखनाचा सराव नव्हता व त्यानें रोजनिशीहि लिहून ठेवली नव्हती. जें कांहीं आठवलें तें त्यानें लिहून काढलें व लिहितांना पूर्वीच्या फेडरिक या इटालिअन प्रवाशाच्या वृत्ताला धरून लेखन केलें आहे. हा फेडरिक इ. स. १५६३ मध्यें हिंदुस्थानांत आला होता. इंग्लंडच्या पहिल्या प्रवाशानें लिहून ठेवलेलें प्रवासवृत्त या दृष्टीनें यास महत्त्व आहे. 'अर्ली ट्रॅव्हल्स इन् इंडिया, संपादक विल्यम फॉस्टर, ऑक्सफर्ड प्रेस' या ग्रंथांत अशा इंग्रज प्रवाशांचीं प्रवासवृत्तें वाचावयास मिळतील. (उतारा–कित्ता पृ. १७)]

आग्रा हें शहर फार मोठें आहे, तेथें पुष्कळ वस्ती आहे. रस्तेहि चांगले रुंद व फरसबंद आहेत. शहराच्या जवळून चांगली नदी वाहते. ही नदी पुढें बंगालच्या उपसागरास मिळते. या शहरास सभोंवतीं खंदक अस-

लेला एक मजबूत किल्ला आहे. या शहरांत पुष्कळ मुसलमान व हिंदु राहतात. राजाचें नांव जलालुद्दीन अकबर असें आहे. लोक त्याला साधारणपणें 'बडा मोगल' असें म्हणतात.

तेथून आम्ही फत्तेपूरला गेलों. या ठिकाणीं राजाचा दरबार भरतो. आग्र्यापेक्षां हें शहर विस्तीर्ण आहे. परंतु घरें व रस्ते मात्र तितके स्वच्छ नाहींत. येथेंहि मुसलमान व हिंदूंची वस्ती पुष्कळ आहे.

आग्रा व फत्तेपूर येथील लोक सांगतात कीं, राजाजवळ एक हजार हत्ती, ३० हजार घोडे, १४०० हरणें, कांहीं चित्ते, वाघ, रेडे (युद्धांत उपयोगी पडावेत म्हणून) याशिवाय कोंबडे, बगळे इत्यादि (प्राणी) आहेत.

ज्या ठिकाणीं राजाचा मोठा दरबार भरतो त्यास ते लोक 'दरीखाना' [ राजवाडा ] असें म्हणतात.

आग्रा आणि फत्तेपूर हीं दोन शहरें मोठीं आहेत. या दोहोंपैकीं कोणतेंहि शहर* लंडनपेक्षां अधिक विस्तीर्ण आणि लोकवस्तीनें भरगच्च असें आहे. आग्रा आणि फत्तेपूर यांमधील अंतर बारा मैल आहे. हा सर्व रस्ता दुकानांनीं भरलेला आहे. रस्त्यानें जातांना जणूं काय आपण शहरांतच आहोंत असें वाटतें.

येथील नागरिकांजवळ सुंदर वाहनें आहेत. कित्येकांवर खोदकाम केलेलें असतें व सोन्याचा मुलामा दिलेला असतो. या वाहनांना दोन चाकें असून इंग्लंडांतील आपल्या मोठ्या आकाराच्या कुत्र्याएवढ्या दोन लहान बैलांनीं हीं वाहनें ओढलीं जातात.

या ठिकाणीं इराणहून व हिंदुस्थानच्या बाहेरील इतर देशांतून आलेले पुष्कळ व्यापारी आहेत. रेशीम, कापड, मोतीं, हिरे, पाचू आणि अन्य मौल्यवान् रत्नांचा व्यापार येथें चालतो.

**अभ्यास** :—१. तत्कालीन लंडनपेक्षां आग्रा व फत्तेपूर ही शहरें कोणत्या बाबतींत श्रेष्ठ होती ? आजची स्थिति काय आहे ? २. मोगलकालीन

---

* 'इ. स. १५८० मध्यें लंडनची लोकसंख्या १,२३०३४ आणि इ.स. १५९३ ते ९५ मध्यें १,५२४७८ होती. व्हिन्सेंट स्मिथच्या म्हणण्याप्रमाणें फत्तेपूरची लोकसंख्या सन १५८५ मध्यें सुमारें दोन लक्ष असावी.'
— प्रा. एस्. आर्. शर्मा–दि क्रेसन्ट इन् इंडिया, पृ. ३८३.

वाहनांची काय माहिती फिच सांगतो ? ३. तत्कालीन इतर प्रवाशांची माहिती सांगा. ४. तुम्ही राहता त्या अगर जवळच्या तत्कालीन शहराचा विस्तार, लोकसंख्या वगैरे माहिती मिळविण्याचा यत्न करा.

---

## धर्मजिज्ञासू अकबर

–उतारे क्रमांक २३, २४, २५, २६, २७, हे एकाच विषयावर समकालीन पण भिन्नवृत्तीच्या लेखकांचे आहेत. सम्राट अकबराच्या मनांत सर्व धर्मांतील तत्त्वांबद्दल आदर कसा निर्माण झाला हें त्याचा मित्र व सल्लागार अबुल फजल आणि त्याच्यावर टीका करणारा बदाउनी यांनीं लिहिलेल्या लिखाणांतून स्पष्ट होईल. याचा प्रत्यक्ष परिणाम म्हणजे २७ व्या उताऱ्यांत अकबराचे उद्योग आणि दिन–इ–इलाही धर्माची स्थापना होय.

---

### २३ : : : ईश्वरपूजनाचा दिवाणखाना

[ प्रस्तुतचा उतारा निझामउद्दीन अहंमद बक्षीकृत 'तबकत
–इ–अकबरी' या ग्रंथांतून घेतला आहे. हा निझामुद्दीन अकबराचे
कारकीर्दींत इ. स. १५९४ चे सुमारास मृत्यु पावला. अकबराच्या
कारकीर्दींत त्यानें गुजराथचे सुभ्यावर बक्षीगिरीचें काम केलें. इ. स.
९५८ पासून ते इ. स. १५९३ पर्यंतच्या काळाचा सर्व हिंदुस्थानचा
इतिहास उपलब्ध नाहीं. तो लिहावा म्हणून यानें तबकत–इ–अकबरी
हा ग्रंथ लिहिला असें त्यानें म्हटलें आहे. तबकत–इ–अकबरी या
ग्रंथास तारीख–इ–निझामी असेंहि त्याच्या कर्त्यावरून नांव पडलें
आहे. अबुल फजलकृत अकबरनामा व तबकत या ग्रंथांत ठिकठिकाणीं
तपशिलांत वेगळेपण दिसून येतें. त्यांतील सत्य शोधून काढणें
हें वाचकांचें काम आहे. समकालीन लेखक बदाउनी याचें निझाम-
उद्दीनवर फार प्रेम होतें. फिरिस्त्यासारख्या पुढील लेखकांस तबकत–
इ–अकबरीचा फार उपयोग झालेला आहे. 'प्रांताप्रांताचा इति-
हास लिहून झाला, पण सर्व हिंदुस्थानचा—कीं जो सुदैवानें आज
एका बादशाहाच्या अंमलाखालीं आहे—त्याचा इतिहास लिहावा हा
त्याचा उद्देश त्यानें स्पष्टपणें व्यक्त केला आहे. यावरून तत्कालीन
इस्लामी लेखकासहि हिंदुस्थानच्या एकत्वाबद्दल संशय नव्हता असें
म्हणतां येतें. इ. डौ. व्हॉ. ५ पृ. १७७ पहा. ]
३६]

तरुणपणापासूनच बादशाहाला विद्वान् आणि प्रतिभावान् लोकांच्या सहवासांत राहण्यांत तसेंच बुद्धिमान् लोकांच्या सभा भरविण्यांत आनंद वाटत असे. अशा लोकांना तो अत्यंत सन्मानानें वागवी. त्यांनीं चालविलेल्या वादविवादांतील बारीक मुद्यांची चर्चा--मग हे मुद्दे शास्त्र, प्राचीन किंवा अर्वाचीन इतिहास, धर्म आणि पंथ, यांपैकीं असोत—तो लक्षपूर्वक ऐकत असे. या श्रवणभक्तीचाहि त्यास फायदा झाला.

९८२ हिजरीच्या शेवटीं म्हणजे त्याच्या कारकीर्दीच्या विसाव्या वर्षीं अजमीरहून परत आल्यावर त्यानें आपल्या कुशल वास्तुशास्त्रज्ञांना फत्तेपूर शिक्री येथील राजबागेमध्यें एक मंदिर उभारण्याची आज्ञा केली. या मंदिरांत केवळ पवित्र लोक म्हणजे सुप्रसिद्ध सय्यद, उलेमा, शेख यांनाच प्रवेश मिळावयाचा होता. स्थापत्यशास्त्रज्ञांनीं चार दिवाणखाने असलेली इमारत योजिली. जेव्हां ती पूर्ण झाली तेव्हां तेथें प्रत्येक शुक्रवारच्या पवित्र रात्रीं बुद्धिमान् लोकांच्या संगतींत बादशाह पहांटेपर्यंत बसत असे. या लोकांची सरमिसळ न करितां सय्यदांना पश्चिमेकडील भागांत आणि उलेमांना दक्षिणेकडे, शेख व तत्त्वज्ञानी लोकांना उलेमाच्या पलीकडे बसण्याची व्यवस्था असे. पूर्वेकडील भागांत दरबारचे अधिकारी नि सरदार बसत. प्रत्येक विभागांत राजा जाई व विद्वानांचीं संभावना करी. ही विद्वान् मंडळी आपल्यामधूनच विशेष योग्य लोकांची निवड करून त्यांना राजाकडे पाठवीत व राजा त्यांना ओंजळीनें पैसे देई; ज्यांना अशा तऱ्हेनें प्रवेश मिळत नसे ते या इबादतखान्याच्या बाहेर प्रत्येक शुक्रवारीं रांगा करून बसत. बादशाह त्यांचाहि योग्य परामर्ष घेत असे. दुपारपर्यंत हें कार्य चाले. त्यानंतरचा दान-धर्म तो आपल्या नोकरावर सोंपवी.

---

## २४ : : : धर्मसभेंतील वर्दळीचा वादविवाद

[ अकबरनाम्यांतील उतारा, इ. डौ. व्हॉ. ६ पृ. ५९ ]

अकबर परत फत्तेपूर शिक्रीला आला, तेव्हां पुन्हा दर शुक्रवारीं रात्रीं धर्मचर्चेचा दीप राजगृहांत प्रकाशमान झाला. ३ ऑक्टोबर १५७८ रोजीं ही एकान्तवासाची राजधानी पुनः चार लोक आल्यानें गजबजली व

तेथील चर्चेत अनेक तत्त्वज्ञांचें पांडित्य कसास लागलें. त्या राजगृहांत जमलेल्यांत सुफी, ज्ञानी, वक्ते, वकील, सुन्नी, शिया, ब्राह्मण, यति, जैन, चार्वाक, ख्रिश्चन, ज्यू, सेबियन, झरतुष्ट्रपंथी किंबहुना प्रत्येक पंथाचे विद्वान् होते.

निःपक्षपाती भूपति सिंहासनावर बसलेला पाहून सर्वांस मोठा आनंद झाला.

प्रत्येकानें निर्भयपणें आपले सिद्धांत व मुद्दे मांडले. वादविवाद लांबला, वातावरण गरम झालें....

एका रात्रीं या इबादतखान्यांत पेदर रोडोल्फ हजर होता. ख्रिस्ती धर्मोपदेशकांत त्याची कोणी बरोबरी करील असा नव्हता. धर्मांध लोक आपलें टीकास्त्र चालविण्यास तेथें सज्ज होतेच. त्यांनीं त्याच्यावर हल्ला चढविला. आपली जुनी चर्पटपंजरी चालवून पूर्वीचेच सिद्धांत त्यांनीं पुनः पुढें मांडले. त्यांनीं सत्यान्वेषणाची खटपटहि केली नाहीं. त्यांच्या विधानांच्या चिंधड्या उडविण्यांत आल्या व अखेर ते शरमून निष्प्रभ झाले. तेव्हां त्यांनीं 'गॉस्पेल' मधील परस्पर विसंगत मुद्द्यावर चढाई केली; परंतु त्यांना आपलें म्हणणें सिद्ध करून विरोधकांना गप्प बसवितां आलें नाहीं.

अगदीं शांतपणानें व आत्मविश्वासानें पेदरनें सर्व मुद्द्यांना उत्तरें दिलीं. तो म्हणाला, " आमच्या धर्मग्रंथाबद्दल या लोकांचीं जर अशीं मतें असतील व त्यांना जर कुराण तेवढेंच ईश्वरप्रणीत सत्य वाटत असेल तर त्यांना माझें असें आव्हान आहे कीं, अग्नि पेटवा आणि आम्ही आपला धर्मग्रंथ बायबल घेऊं, उलेमांनीं आपल्या स्वतःच्या हातांत स्वतःचें धर्मपुस्तक घ्यावें व दोघांनीं या दिव्यांतून जावें; म्हणजे सत्य आपोआप बाहेर पडेल. " कृष्णहृदयी हलकट वावदूकांना ही सूचना आवडली नाहीं, आणि ते तावातावानें बोलूं लागले. घाबरटपणा आणि ही अरेरावी निःपक्षपाती राजाच्या मनाला बोंचली.

खोल विचार करून चिकित्सक वृत्तीनें तो म्हणाला, " लोकांना असें वाटतें कीं, मनांत विश्वास नसतांहि वरवर इस्लामचा धर्म पाळला तरीसुद्धां त्यांचा फायदा होईल. माझ्या सामर्थ्याच्या जोरावर कित्येक हिंदूंना मी माझ्या पूर्वजांचा धर्म स्वीकारण्यास भाग पाडलें; परंतु आतां ज्ञान-

किरणांनीं माझें मन प्रकाशित झाल्यामुळें माझी अशी खात्री झाली आहे कीं, अज्ञानतमाचा नाश करणाऱ्या मशालीखेरीज एकहि पाऊल पुढें टाकतां येणार नाहीं.....आपण पारखून घेतलेली जी श्रद्धा तीच खरी लाभकारक होत असते. धर्मग्रंथांतील शब्द घोकणें किंवा राजभयानें जमिनीवर लोटांगण घालणें म्हणजे ईश्वराप्रत जाणें नव्हे."

---

## २५ : : अकबर व चित्रकार

[ ऐनें अकबरींतील प्रस्तुतचा उतारा लेनपूलकृत 'मेडिव्हल इंडिया' पृ. ७६ वरून येथें दिला आहे. ]

आपल्या अनेक सहकाऱ्यांबरोबर खेळीमेळीनें चर्चा करीत असतां एक दिवस बादशाह अकबर म्हणाला, " कांहीं जण चित्रकलेचा द्वेष करतात, पण मला अशा लोकांचाच राग येतो. मला तर असें वाटतें कीं, ईश्वराला ओळखण्याचें एक विशेष साधन चित्रकाराजवळ असतें. कोठल्याहि जीवित वस्तूचें चित्र रेखाटत असतांना व आपल्या कुंचल्यानें एकेक अवयव रंगवीत असतांना चित्रकारास त्या चित्रास सजीवतां आणतां येत नाहीं, याची जाणीव तीव्रतेनें होते. अशा तऱ्हेनें जीवनदात्या परमेश्वराबद्दल विचार करणें त्याला भाग पडतें व साहजिकच त्यास त्याचें अधिक ज्ञान होतें."

---

## २६ : : : अकबर अधार्मिक बनत चालला

### बदाउनीची तक्रार : अकबराचा धर्मावरील विश्वास उडत चालला !

[ बदाउनी हा अकबराचे पदरीं होता. त्यानें गज्नीच्या सुलतानापासून अकबराचे कारकीर्दीतील इ. स. १५९५ पर्यंतच्या काळचा इतिहास लिहिला आहे. हा इ. स. १५४० मध्यें जन्मला व इ. स. १६१५ त मृत्यु पावला. बदाउनीच्या इतिहासांत मुख्य भर मोगलांच्या हकीकतीवरच आहे. एकंदर ४०० पृष्ठांत सुमारें ६५ पृष्ठें बाबर ते अकबर व सुमारें २०० हून अधिक खास अकबराची कार-

कीर्द यांनीं व्यापली आहे. बाकीच्या सुमारें १३५ पृष्ठांत त्यानें पूर्वींचा इतिहास आवरला आहे. याच्या ग्रंथाचें नांव 'मुनाखबुत तबारीक' यास तवारीख–इ–बदाउनी असेंहि म्हणतात. याचें मूळ नांव अबदुल कादर, तो बदाउन गांवचा म्हणून बदाउनी हें नांव त्यास पडलें. यानें महाभारताच्या १८ पर्वांपैकीं दोन पर्वांचे व रामायणांतील कांहीं भागांचें भाषांतर केलें आहे. अकबराच्या कारकीर्दींत फैजीच्या हाताखालीं एक बडें विद्याखातेंच होतें. तेथें हा काम करी, पण तो फजल–फैजीबंधूंचा द्वेष्टा होता. कारण त्याच्या मतें ते कट्टरपणें मुसलमानी धर्मावर विश्वास ठेवीत नसत. बदाउनीच्या लेखनांत ठिकठिकाणीं अकबरावर कठोर टीका असली तरी अकबराच्या पदरच्या दरबारी लेखकांच्या भोंगळ स्तुतीपेक्षां या टीकापर लेखनापासूनच अकबर अधिक यथार्थतेनें समजून येतो. इ. व डौ. व्हॉ. ५ पृ. ४७७ व ५२७–५३१. ]

हिजरी ९८३ मध्यें (इ. स. १६७४) इबादतखान्याचें काम पूर्ण झालें. तो बांधला जाण्याचें कारण असें :—अलीकडच्या काळांत बादशाहाला पुष्कळ विजय मिळाले ; त्याला कोणी शत्रूहि उरला नाहीं. साधु लोकांच्या संगतीची त्याला आवड उत्पन्न झाली होतीच. पैगंबराचें सांगणें आणि कुराण याविषयीं तो चर्चा करी; तसेंच सूफी सिद्धांत, शास्त्र आणि तत्त्वज्ञान यांच्या चर्चेंतहि तो आस्थापूर्वक भाग घेई. रात्रीच्या रात्री तो परमेश्वर व त्यास आळविण्याचे मार्ग यासंबंधींच्या चिंतनांत घालवी. सृष्टिकर्त्याबद्दलच्या आदरानें त्याचें हृदय भरून येई, आणि कृतज्ञतापूर्वक कित्येक दिवशीं सकाळच्या वेळेस राजवाडयाजवळील एकान्त भागीं एका शिळेवर (बसून) तो ईश्वराची करुणा भाकी. उषःकालच्या या प्रार्थनेनें तो आशीर्वाद मिळवी.

. . . . . . जमलेले विद्वान् लोक आपल्या जिव्हारूपी तलवारीनीं एकमेकांस एकदम छाटून टाकीत, आणि आपल्या व्यतिरिक्त इतर पंथीयांना 'काफर' आणि 'चुकीच्या मार्गांनीं चाललेले' असें म्हणत.

कांहींतरी नावीन्य पाहिजे अशा बुद्धीनें कांहीं जण मोठचा कौशल्यानें शंका कुशंका काढीत. यामुळें जें चुकीचें तें बरोबर आणि जें बरोबर तें चुकीचें असें भासवीत. सत्याच्या शोधास निघालेल्या राजाला चांगली धारणाशक्ति होती. पण त्यांच्या भोंवतीं अधार्मिक नि हलक्या प्रवृत्तीचे लोक जमले होते. शंकावर शंका निघत. शेवटीं त्याचा सत्य शोधाचा हेतु विफल

४० ]

होई. त्यामुळें (त्याचा) सद्धर्मावरील विश्वास उडूं लागला आणि धर्म-नियमांच्या मर्यादा ढासळून गेल्या. ५–६ वर्षांच्या अवधींत इस्लामाचें एकहि लक्षण बादशाहांत उरलें नाहीं.

निरनिराळ्या देशांतून विविध धर्मांचे अभ्यासक दरबारीं येत. त्यांच्याशीं राजा संभाषण करी. रात्रंदिवस ते लोक चर्चा आणि शोध या-खेरीज कांहीं करीत नसत. त्यानें त्यांपैकीं प्रत्येकाची विशेषतः मुस्लिमेतरांचीं मतें जमविलीं व त्यांतील त्याला ग्राह्य तेवढीं ठेवून बाकीचीं ( त्याच्या मनाविरुद्ध होतीं तीं ) त्यानें त्याज्य ठरविलीं. लहानपणापासून धर्माच्या अनेकविध पंथोपपंथांतून त्याचें आयुष्य गेलें होतें. त्यानें स्वतःच्या तीक्ष्ण बुद्धीनें पुस्तकांतील ज्ञान संपादन केलें होतें. हळूहळू त्याच्या मनाला असें वाटूं लागलें कीं, सर्व धर्मांत सूज्ञ माणसें आहेत. अशा तऱ्हेनें जर सगळीकडे एकच सत्य सांपडलें तर तें केवळ एकाच धर्मांत किंवा सहस्र वर्षेंहि न झालेल्या केवळ इस्लाम धर्मांतच आहे हें म्हणणें कितपत संयुक्तिक असूं शकेल?

सामानी ( साधु, संन्यासी ) व ब्राह्मण यांच्याशीं तो खाजगी चर्चा करी. त्यांची विद्वत्ता व आत्मिक बळ यामुळें बादशाहाचें मन स्थिर वृत्तीचें झालें. (साहजिकच) कुणाच्या शंकाकुशंकांमुळें त्याचें चित्त विचलित होत नसे.....हिजरी ९८६ मध्यें ( इ. स. १५७७ ) युरोपांतील मिश-नरी, ज्यांना पादरी असें म्हटलें जातें, तसेंच ज्यांच्या मुख्यास पोप असें म्हण-तात,.....ते बादशाहाकडे आले. राजानें शहाजादा मुरादला त्या धर्मांतील कांहीं तत्त्वें आदरपूर्वक शिकण्यास सांगितलें आणि अबुल फजलला त्याच्या ईश्वरी संदेशाचें भाषांतर करण्यास सांगितलें. ( प्रार्थनेच्या ) प्रारंभीं बिस्मिल्ला म्हणण्याऐवजीं ‘हे झीजस आणि हे ख्रिस्ता’ असें म्हणण्यास आरंभ झाला.

* * *

त्या द्वाड बिरबलनें बादशाहाच्या मनांत असें भरवून दिलें कीं सूर्याची पूजा राजानें केली पाहिजे; कारण सूर्यामुळेंच प्रकाश मिळतो, त्याच्यामुळेंच धान्य, फळें, इ. खाद्य वस्तु पृथ्वी निर्माण करूं शकते आणि अशा तऱ्हेनें मानवी जीवनाचा तोच आधार आहे. त्यानें असेंहि सुचविलें कीं पश्चिमेकडे तोंड करून (दरबारांत) न बसतां पूर्वेकडे तोंड केलें पाहिजे, कारण त्या

दिशेस सूर्योदय होतो. दरबारांतील कित्येक विद्वानांनीं त्यास पाठिंबा दिला आणि सांगितलें कीं, सूर्य हा राजाचा मित्र आहे, कारण तो आपल्या गतीनें संवत्सरें व युग ठरवितो. अकबरानें सूर्यपूजा करण्याचें व नवरोझचा सण साजरा करण्याचें हेंच कारण घडलें. त्या त्या दिवसाचे स्वामी असे जे ग्रह असतील त्यांना अनुकूल अशा रंगाचा पोशाख तो करी व सूर्यदेवतेची कृपा व्हावी म्हणून तो कांहीं हिंदु पद्धतीचें मंत्रहि पुटपुटत असे. गोहत्या व गोमांस-भक्षण त्यानें बंद केलें. तरुणपणापासून राजपूत स्त्रियांच्या भावनांना मान देण्याकरितां तो होमवहन करीत असे. परंतु राज्यारोहणाच्या २५ व्या वर्षीं झालेल्या नवरोझच्या सणाच्या दिवशीं त्यानें जाहीर रीत्या होम केला व सूर्यास साष्टांग नमस्कार घातला. सायंकाळीं जेव्हां दिवे लागले, तेव्हां आदरार्थ दरबारांतील सर्व समाजास उठून उभे रहावें लागलें. एके दिवशीं तो हिंदू-प्रमाणें कपाळास गंध लावूनच दरबारांत आला. त्या वेळीं त्यानें मनगटांत रत्नजडित अनंत बांधला होता. अशा रीतीनें सद्धर्माला विरोधी व तिरस्कार करणारे, पण इतर धर्मांनीं पुरस्कारिलेले असे आचार त्याला नेमके पटत व तो ते आचरणांत आणी. प्रारंभीं त्याचा तिकडे नुसता कल होता, पण पुढें तर त्या त्या धार्मिक तत्त्वावर त्याचा अढळ विश्वास बसत गेला.

---

## २७ : : : अकबरानें केलेले नवीन नियम

[प्रा. शर्माकृत 'क्रेसेंट इन इंडिया' भा. २ पृ. ४०९–४१० वर बदौनिच्या दिलेल्या उताऱ्यांतून हीं निवडक कलमें दिलीं आहेत.]

(५)

बादशाहाच्या हुकुमानें गोमांस खाण्यास बंदी करण्यांत आली. इतकेंच नव्हे तर गोमांसाचा स्पर्शहि अपवित्र मानण्यांत आला. याचें खरें कारण असें आहे कीं, हिंदु स्त्रियांच्या सहवासांत तरुणपणापासून राहिल्यामुळें त्यास गाय पवित्र वाटूं लागली. जनानखान्यांतील हिंदु स्त्रियांचा पगडा त्याच्या मनावर इतका होता कीं, त्यानें गोमांस, कांदे, लसूण खाण्याचें बंद केलें. याच कारणानें त्यानें दाढी ठेवण्याचें बंद केलें.

(७)

क्रूस दाखविणें, ख्रिस्त्यांप्रमाणें घंटा वाजविणें......अशा बालिश गोष्टी येथें नित्य घडूं लागल्या.

(८)

स्वतःच्या चुलतघराण्यांतील किंवा आप्तांतील मुलीशीं विवाह करण्यास बंदी करण्यांत आली...............सोळा वर्षांच्या आंत मुलांनीं व १४ वर्षांच्या आंत मुलींनीं लग्न करूं नये. पुरुषानें एकापेक्षां अधिक स्त्रियांशीं लग्न करूं नये, अपवाद म्हणजे मूल होत नसेल तरच. विधवांना पुर्नविवाह करण्याची इच्छा असल्यास हिंदूंच्या कल्पनाविरुद्ध तें असलें तरी परवानगी देण्यांत आली.

(९)

हिंदु स्त्रीला सती जावयाचें असल्यास तिला अडथळा करूं नये पण नसल्यास सक्ति करूं नये.

(१०)

बादशाहानें ठरविलें कीं तरुण असतांना जबरदस्तीनें जे हिंदू मुसलमान झाले असतील त्यांना आपल्या पूर्वींच्या धर्मांत परत जाण्यास परवानगी मिळावी. तसेंच कोणाहि मनुष्यास त्याच्या धर्मकार्यांत अडथळा केला जाऊं नये. कोणासहि त्याला वाटल्यास धर्म बदलण्याची परवानगी असावी. जर एखाद्या हिंदु स्त्रीनें मुसलमानाशीं विवाह केला आणि धर्म बदलला तर त्याच्याकडून तिला जबरदस्तीनें परत आणून तिच्या हिंदु कुटुंबांत परत द्यावी. ( याचप्रमाणें एखाद्या मुसलमान स्त्रीनें हिंदूशीं विवाह केला तरीहि करावें )--कोणालाहि मूर्तिमंदिरें, अग्निमंदिरें, प्रार्थनामंदिरें अगर चर्च बांधण्याची इच्छा असल्यास त्यास अटकाव करूं नये.

**अभ्यास :**--१. अकबरानें इबादतखाना कां बांधला? २ 'पेदर रोडोल्फ'नें सांगितलेलें दिव्य करण्याचें इतरांनीं नाकारलें हें योग्य कां अयोग्य? विरोधकांच्या नकाराचा बादशाहाच्या मनावर काय परिणाम झाला? ३ वरवरचें धर्मपालन निरुपयोगी आहे असें अकबरास कां वाटलें? ४. अकबराच्या मतें चित्रकलेचा फायदा कोणता? त्याच्या मनांत ईश्वरविषयक विचार चालले होते म्हणून चित्रकलेंतहि तोच संदेश त्यास मिळाला हें म्हणणें कितपत खरें आहे? ५. 'सद्धर्मा' वरील अकबराचा विश्वास कसा उडाला असें बदाउनी सांगतो. ६. 'सत्य' सर्व धर्मांत आहे हें अकबराच्या लक्षांत

केव्हां आलें ? ७. हिंदू धर्माचा पगडा त्याच्या मनावर बसला हें कोणत्या उदाहरणांनीं बदाउनीनें सिद्ध केलें आहे ? ८. 'या सर्वांचा परिणाम त्याच्या वृत्तींत दिसून येतो' हें २६ वा उतारा वाचून सिद्ध करा. ९ 'धर्मजिज्ञासु अकबर' यावर मुद्देसूद तीन परिच्छेद लिहा.

---

## २८ : : : सोळाव्या शतकांतील समाजस्थिति

[संत तुलसीदास हा हिंदी भाषी संतकवि १६ व्या शतकांत होऊन गेला. तीर्थयात्रेच्या निमित्तानें रामेश्वरापर्यंत त्यानें प्रवास केला होता. तुलसीदासानें संस्कृत भाषेंत ग्रंथ न रचितां लोकभाषेंत म्हणजे हिंदींत चौदा ग्रंथ लिहिले. लोकभाषेबद्दल तो म्हणतो:—

**का भाषा, का संस्कृत, भाव चाहिये साँच**
**काम जो आवे [1]कामरी क्या ले करे कमांच[2]**

आपल्याकडील महाराष्ट्रीय संतांप्रमाणेंच लोकवाणीचा हा अभिमान उल्लेखनीय होय.

त्यानें चौदा ग्रंथ लिहिले, त्यांत 'रामचरितमानस' नि 'विनय-पत्रिका' हे प्रमुख होत. रामचरितमानस म्हणजे रामायण. रामचरित्र सांगत असतांच शील, सदाचार, पावित्र्याची थोरवी, लोकसंग्रहवृत्ति यांचें महत्त्व त्यानें सांगितलें. तत्कालीन समाजाचें मनोगत त्यानें व्यक्त केलें म्हणून त्यास प्रातिनिधिक कवि मानतात. परकीय राजे अस-तांहि आपल्या धर्मावर अढळ श्रद्धा ठेवण्याची शक्ति त्यानें समाजांत निर्माण केली. त्याचा रामचरितमानस हा ग्रंथ आबालवृद्धांस परिचित आहे. उत्तरेंत घरोघर हें रामायण श्रद्धेनें आजहि वाचलें जातें. राम-भक्तीचा प्रचार त्यामुळें फार झाला.

विनयपत्रिकेंत परमेश्वराची त्यानें अनेक प्रकारें प्रार्थना करून स्वतःचा उद्धार करा अशी विनवणी केली आहे. या ग्रंथांतील क्रमांक १३९ चें पद्य पुढें दिलें आहे. त्यांत कलियुगाचें वर्णन करतां करतांच सभोंव-तालच्या तत्कालीन समाजाचें वर्णन त्यानें केलेलें आहे असें हिंदी-भाषी म्हणतात.

तुलसीदास हा इ. स. १६२४ सालीं मृत्यु पावला.]

---

१. कांबळे, घोंगडी. २. एक प्रकारचे रेशमी कापड.

हे दीनदयाळा, पाप, दारिद्र्य आणि दुःख या त्रिविध तापानें पृथ्वी होरपळली आहे. ब्राह्मण हे ईश्वरस्वरूप आहेत असें वेदांचें वचन आहे; परंतु आज (काय दिसत आहे) हेच ब्राह्मण रागीट, लोभी व गर्विष्ठ झालेले आहेत.

त्याच प्रकारें क्षत्रियवर्ग. हा वर्ग, अन्याय, अत्याचार, व्यभिचार इत्यादि अनाचार आचरीत आहे. जिकडेतिकडे नास्तिकवाद पसरला आहे.

वर्णाश्रमधर्माचा नाश होत आहे. लोक पाखंडी झालेले असून पापरत आहेत.

शांति, सत्य यांना मान नाहीं. कपट वाढलें व साधूंना त्रास होऊं लागला आहे; परंतु दुष्ट लोकांना सुख प्राप्त झालें आहे. परमार्थाच्या नांवाखालीं स्वार्थसाधनच होऊं लागलें आहे. कलियुगाचा प्रताप कोठवर वर्णावा? हे प्रभो थोडा क्रुद्ध होऊन या कलीला जरा धाक दाखव. तूं नुसतें बोट वर केलेंस तरी तो निःसत्त्व होईल.

हे परमेश्वरा, न्याय कर, नाहींतर पृथ्वीवरील आनंद नष्ट होईल

**अभ्यास:—** १. तुलसीदासाच्या सुमारास तुकाराम–रामदास होऊन गेले. त्यांनींहि वर्णाश्रमाची दुःस्थिति वर्णिली आहे. (मराठे कालांतील उतारे वाचा.) हें दोन्ही उतारे वाचून १५७५ ते १६२५ या काळांतील समाज-स्थितीचें त्रोटक वर्णन करा.

---

## २९ : : : जहांगीरच्या आज्ञा

[ प्रस्तुतचा उतारा मूळचा 'जहांगीरच्या आठवणी' या ग्रंथांतला रोजर्स आणि बीव्हरीज यांनी त्या ग्रंथाचा अनुवाद केला आहे. त्यांतील उतारा लेनपूलकृत 'मेडीव्हल इंडिया' पृ. ८३–८४ वर आहे, तो येथें अनुवादित करून दिला आहे.

'जहांगीरचें आत्मचरित्र अथवा आठवणी' या नांवानें दोन तीन भाषांतरित ग्रंथ उपलब्ध आहेत. भाषांतराची भिन्नता लक्षांत घेतलीत री या ग्रंथांचें मूळ एक नसलें पाहिजे हें स्पष्ट दिसतें. खरा प्रकार असा आहे कीं, या बादशाहानें लिहिलेलीं प्रथमपुरुषी आत्मचरित्रें हीबहुधा लेखकांकडून लिहविलेलीं (आत्म) चरित्रें आहेत. असें दिसतें कीं, जहांगीरनें आपल्या

कारकीर्दीचें टिपण करण्यास एकाहून अधिक अधिकाऱ्यांची नेमणूक केली असली पाहिजे. इलीयट डौसनचा ग्रंथ खंड ६ पृ. २५१ वर या आत्मचरित्राची चिकित्सक छाननी आहे. तसेंच जहांगीरच्या आज्ञांचें चिकित्सक परीक्षण करून त्यांतील बढाईखोरपणाहि उघडकीस आणला आहे (कित्ता पृ.४९३पहा). उदाहरणार्थ, पहिल्या आज्ञेंत 'प्रत्येक जहागीरदारानें..... स्वतःच्या फायद्यासाठीं बसविलेल्या जकातीस बंदी करण्यांत आली,' असें लिहिलें आहे. पण यांत जहांगीरनें नवें कांहीं केलें नसून त्याच्या बापाच्या वेळचा प्रघात पुढें चालू ठेवला एवढेंच. अर्थात् हा प्रघात पुढें चालू ठेवण्याची दक्षता ठेवण्याचें श्रेय तरी जहांगीरला मिळतें यांत वाद नाहीं.]

राज्यारोहणानंतर पहिली आज्ञा केली कीं, न्यायशृंखला बांधा, म्हणजे न्यायखात्यांतील मंडळींनीं न्याय देण्यास दिरंगाई केली किंवा ढोंगीपणा केला, तर त्रस्त झालेल्या व्यक्तीस माझें लक्ष वेधण्याकरितां साखळी ओढतां यावी.

सर्व राज्यभर अंमलांत याव्या म्हणून वागणुकीबद्दल मीं बारा आज्ञा केल्या:

(१) प्रत्येक प्रांताच्या किंवा जिल्ह्याच्या जहागीरदारानें स्वतःच्या फायद्यासाठीं बसविलेल्या जकातीस बंदी करण्यांत आली.

(२) ज्या रस्त्यावरून रहदारी कमी आणि चोऱ्या जास्त होतात अशा ठिकाणीं आरामगृहें, मशिदी, विहिरी, इत्यादि जहागीरदारांनीं बांधाव्या. यायोगानें लोकांना तेथें कायमची वस्ती करण्यास उत्तेजन मिळेल.

(३) व्यापाऱ्यांच्या परवानगीशिवाय त्याच्या मालाच्या गांठी रस्त्यांवर फोडून पाहूं नयेत.

(४) मृत व्यक्तींची संपत्ति—मग तो मुसलमान असो किंवा अन्य कोणत्याहि धर्माचा असो—अडथळे न होतां त्याच्या वारसास मिळावी; वारस नसल्यास लोककल्याणार्थ त्या संपत्तीचा उपयोग व्हावा म्हणून विश्वस्ताकडे द्यावी.

(५) दारू किंवा इतर मादक द्रव्यें कोणीं विकूं नयेत अथवा करूं नयेत. मी अठराव्या वर्षीं दारू पिऊं लागलों व सध्यांहि पितों.....
.......गेलीं सात वर्षें निग्रह करून मी १५ कपांऐवजीं ५-६ कपच पितों. आतां फक्त अन्नपचनार्थ हें पान चालू आहे.

(६) कोणाचेंहि घर जप्त केलें जाणार नाहीं.

(७) कोणाचेंहि नाक किंवा कान कापले जाणार नाहींत. ईश्वराच्या सिंहासनापाशीं मीं अशी प्रतिज्ञा केली आहे कीं, अशा रीतीनें मी कोणालाहि छिन्नविच्छिन्न करणार नाहीं.

(८) सरकारी अधिकारी किंवा जहागीरदार यांनीं जबरदस्तीनें रयतेच्या जमिनी घेऊं नयेत, त्यांत स्वतःसाठीं पिकें काढूं नयेत.

(९) सरकारी अधिकारी किंवा जहागीरदार यांनीं पूर्व परवानगीशिवाय आपल्या परगण्यांतील रहिवाशांबरोबर आंतरजातीय विवाह करूं नये.

(१०) मोठ्या शहरांतून सरकारी खर्चानें इस्पितळें स्थापन करण्यांत येतील आणि तेथें वैद्यांच्या नेमणुका करण्यांत येतील.

(११) माझ्या पूज्य पित्याच्या आज्ञेप्रमाणें प्रत्येक वर्षी माझ्या जन्मदिवसापासून माझ्या वयाच्या दुप्पट दिवसापर्यंत माझ्या राज्यारोहणाच्या दिवशीं ( प्रत्येक गुरुवारीं ) किंवा माझ्या पित्याच्या जन्मदिवशीं ( प्रत्येक रविवारीं )प्राण्यांची हत्या करूं नये. रविवार हा सूर्याचा दिवस असल्यामुळें आणि सृष्टीचा प्रथमदिन असल्यामुळें माझे वडील तो पूज्य मानीत.

(१२) माझ्या वडिलांनीं नेमलेले अधिकारी आणि जहागीरदार यांना मी त्यांच्या आपापल्या जागीं कायम करीत आहें....याखेरीज या एकटाकी हुकुमानें मी माझ्या वडिलांच्या जनानखान्यांतील गोषांतील स्त्रियांच्या नेमणुकींत २० ते १०० टक्के वाढ केली आहे. तसेंच दानपत्रानें मिळालेलीं दानें त्या त्या आश्रितांस कायम करीत आहें. तसेंच तुरुंगांत व किल्ल्यांत बंदिवासांत राहिलेल्या सर्व गुन्हेगारांस मीं मुक्त केलें आहे.

**अभ्यास** :—१. जहांगीरनें स्वतःसंबंधीं सांगितलेली माहिती कोणती ? २. सामान्य जनतेला कोणते नियम लाभकारी आहेत ? ३. 'राज्यकारभाराची जहांगीरची तात्त्विक दृष्टि' या विषयावर एक परिच्छेद लिहा.

---

## ३२ : : : शहाजहानची दिनचर्या

[ औरंगजेबाच्या पत्राचे मुख्यतः तीन संग्रह प्रसिद्ध आहेत. पहिला त्याच्या मुख्य चिटणिसांपैकीं इनायतुल्ला याचा, दुसरा अब्दूल करीम नांवाच्या त्याच्या चिटणिसाच्या मुलाचा व तिसरा राजा अयामलच्या आश्रित विद्वानांचा.

या संग्रहांतील पत्रांना तारखा किंवा विशेषक्रम दिलेला नाहीं. परंतु बहुतेक पत्रें औरंगजेबाच्या उत्तर आयुष्यांतील व दक्षिणेंतील लढायांत ( इ. स. १६८३–१७०७ ) तो गुंतलेला असतानाचीं आहेत. या पत्रांतून औरंगजेबाची धार्मिक वृत्ति, खासगी जीवनांतील साधेपणा इ. गोष्टी त्यांत व्यक्त झालेल्या आहेत. प्रसंगोपात् त्यानें आपल्या मुलांना राजधर्माचे धडेहि दिलेले आहेत. असेंच एक पत्र पुढें दिलें आहे.

या अनेक ठिकाणच्या पत्रांच्या इंग्रजी अनुवादाचा संग्रह Letters of Aurangzeb ' या नांवानें श्री. जे. एच. बिलिमोरिया यांनीं केला व लंडनच्या Luzac & Co. नें तो प्रकाशित केला. त्या पुस्तकाच्या पृ. १४ वरील १२ वें पत्र येथ अनुवादित केलें आहे. ]

[ औरंगजेबाचें पुत्र महंमद आझमशाह बहादूर यास पत्र ]

भाग्यशील पुत्रा,

अलाहजरत* (शहाजहान) म्हणत कीं, शिकार करणें हा रिकामटेंकड्या लोकांचा उद्योग आहे; अशा रीतीनें ऐहिक विलासांत दंग असावें व धर्माचरणाचें विस्मरण पडावें हें युक्त नव्हे; कारण इहलोकच्या कृत्यांवरून मनुष्याचें स्वर्लोकांतील स्थान निश्चित होतें.

अलाहजरतविषयीं असें सांगतात कीं, ते स्वतः पहांटे चार वाजतां मोठ्या उत्साहानें उठत. नंतर मुखमार्जन झाल्यावर ते एकटेच ईशचिंतन करीत व त्यानंतर सूर्योदयापूर्वींच मशिदींतून सामुदायिक प्रार्थनेची ललकारी आल्याबरोबर विद्वज्जनांसमवेत पुनः प्रार्थनागीत ते गात. हा धार्मिक विधि आटोपल्यावर झरोक्यांत जाऊन लोकांना दर्शन देत. दहा वाजण्याच्या सुमारास अलाहजरत दिवाण-इ-आममध्यें (सार्वजनिक काम करण्यासाठीं) जात. या सभेंत त्यांचे अधिकारी त्यांना लवून सलाम करीत; प्रधान व खजिनदार हे आपल्या

* शहाजहानच्या मृत्यूनंतर औरंगजेब त्याचा उल्लेख अलाहजरत या नांवानें करीत असे.

खात्याची, त्यांतील नोकरांची, त्यांच्या झालेल्या कामाची, शिपायांच्या शिताफीची इ. माहिती सांगत व त्यांपैकीं कोणाच्या कांहीं अडचणी असल्यास त्या दूर करून घेत व सर्वांचें समाधान करीत. यापुढें अलाहजरत खास पागेंतील घोडी व हत्तीखान्यांतील हत्ती यांची निगा कशी ठेवली आहे हें पाहून अकराचे सुमारास दिवाण-इ-खास मध्यें जात. या ठिकाणीं नवीन अधिकाऱ्यांच्या नेमणुका, राज्यकारभार इत्यादींसंबंधीं अखेरचे हुकूम दिले जात. हें काम दुपारपर्यंत चाले. दुपारीं भोजन होई. भोजनांत चैनीपेक्षां किंवा विलासापेक्षां प्रकृतीस माफक व काम करण्यास उत्साह राहील असे पदार्थ असत. भोजनोत्तर ते आपल्या विद्वान् व गरीब आश्रितांच्या भोजनाची चौकशी करीत. नंतर एक वाजेपर्यंत खास आरामखोलींत जाऊन ते झोंप घेत. दोन वाजतां बाहेर येऊन शुचिर्भूत होऊन ते कुराण वाचीत. दुपारचे नमाज म्हटल्यावर, हातांत जपमाळ घेऊन तोंडानें अल्लाचें नांव घेत ते असदबुर्ज (राजवाड्यांतील एक बुरुज) मध्यें जाऊन बसत. या ठिकाणीं प्रधानमंडळी राजकीय आणि आर्थिक प्रश्नांबद्दल त्यांच्याशीं चर्चा करीत व कागदपत्रावर त्यांच्या सह्या घेत. चार वाजतां ते पुनः दिवाण-इ-आममध्यें जाऊन नेमणुका, जहागिरी इत्यादि प्रश्नांचा निकाल करीत. सूर्यास्ताच्या वेळेस दिवाण-इ-आममधून निघून सायंकाळची प्रार्थना करून ते खास दिवाणखान्यांत जात. या ठिकाणीं मधुरभाषी कथाकार, गोड आवाजाचे गवई आणि कित्येक प्रवासी हजर असत. पडद्याआड स्त्रिया बसलेल्या असत. तेथें अलाहजरत आपल्या लहरीप्रमाणें संगीत किंवा गोष्टी ऐकत किंवा देशांतराची माहिती मिळवीत. याप्रमाणें प्रहररात्रीपर्यंत या कार्यक्रमांत निमग्न राहून अलाहजरत झोपी जात. अशा रीतीनें आपल्या अधिकारास व इतमामास शोभेल अशी आपली दिनचर्या ठेवीत. अलाहजरतांची ही दिनचर्या तुला उपयुक्त होईल. तुझ्याबद्दल मला अंतःकरणांतून प्रेम वाटतें म्हणून हें सर्व लिहिलें आहे. अर्थात् मला जें आज आठवूं शकलें तेवढ्याचें चित्र मी येथें रंगविलें आहे.

**अभ्यास:**—प्राचीन विभागांतील उतारे क्र. ७, १७ व २७ वाचून, त्यांत दिलेल्या 'आदर्श दिनचर्ये' शीं शहाजहानच्या दिनचर्येची तुलना करा.

———

## ३३ : : : शहाजहानाची दक्षता

[ हा उतारा लुब-अत-तवारीख (इतिहासाचें सार) या ग्रंथांतून घेतला आहे. ग्रंथाचा लेखक रायबहादुरमल यानें तो इ. स. १६९६च्या सुमारास लिहिला असावा. याचा बाप दाराशुकोच्या पदरीं दिवाण होता. यानें गज्नीच्या सुलतान महंमुदापासून ते इ. स. १६९०पर्यंतचा इतिहास लिहिला. फिरिस्ताच्या ग्रंथांत सतराव्या शतकाचा इतिहास नाहीं व ठिकठिकाणीं तो फारच पाल्हाळिक आहे म्हणून व तैमूर घराण्याचा पराक्रम वर्णन करून सांगावा म्हणून आपण इतिहासलेखनास प्रवृत्त झाल्याचें तो सांगतो. तो म्हणतो "मोगल साम्राज्यास उपमा एक रोमची; पण रोमबद्दल आपण नुसतें ऐकतों. मोगलाबद्दल आपण प्रत्यक्ष पाहात आहों." एकूण मोगलांच्या पराक्रमाची चहा करणाऱ्यानें हें लेखन केलें आहे. इ. व डौ. व्हॉ. ७, पृ. १६८ पाहा.]

एकंदर साम्राज्याच्या भरभराटीला पुढील गोष्टी कारणीभूत झाल्या. लोकांच्या पोषणसंरक्षणासाठीं या सुखी काळांत राजानें मुद्दाम योजलेले उपाय, लोकांचें कल्याण कशानें होईल याची जाणीव, प्रामाणिक आणि बुद्धिमान् लोकांकडून त्यानें केलेली राज्यव्यवस्था, हिशेबाची व्यवस्था, बादशाहाच्या खाजगी जमिनी आणि त्यावरील खंडकरी यांची त्यानें घेतलेली काळजी, शेतीला त्यानें दिलेलें उत्तेजन, सरकारी सारा गोळा करण्याची त्याची व्यवस्था, चुका व जुलूम करणारांना शिक्षा करणें आणि धाक दाखविणें. अकबराच्या वेळीं ज्या परगण्याचा सारा तीन लाख येई तेथें आतां दहा लाख येऊं लागला, कांहीं कांहीं ठिकाणीं किंचित् फरक पडला. ज्यांनीं काळजीपूर्वक शेती करून सरकारी उत्पन्न वाढविलें त्यांना बक्षीस दिलें जाई; आणि याप्रमाणें न वागणारांना शिक्षा केली जाई. या कारकीर्दीच्या मानानें पूर्वीच्या कारकीर्दींतील खर्च एकचतुर्थांशहि नव्हता: असें असूनहि इतर राजांच्या कारकीर्दींत जमा होण्यास अनेक वर्षें लागलीं असतीं, इतका खजिना या राजानें सांठविला.

---

## ३४ : : बर्निअरनें काढलेलें चित्र : त्रस्त जनता

[फ्रॅन्सिस् बर्निअर हा फ्रेंच प्रवासी इ.स. १६५८चे सुमारास हिंदुस्थानांत सुरत येथें आला. इ.स. १६५९साली त्याची दाराशीं अहमदाबाद येथें गांठ पडली. दारानें त्याला आपल्याबरोबर वैद्य म्हणून ठेवून घेतलें. पण पुढें दाराची दुर्दैवानें वाताहात झाल्यावर बर्निअर इ. स. १६६३चे सुमारास दिल्ली येथें गेला व तेथून त्यानें काश्मीरचा प्रवास केला. नंतर टॅव्हर्नियरच्यासमवेत तो बंगालमध्यें गेला, तेथून इ. स. १६६६ चे सुमारास तो मच्छलीपट्टण व गोवळकोंडा येथें गेला व इ. स. १६६७ त सुरतला येऊन पोहोंचला. इ. स. १६७० त त्याच्या प्रवासवृत्ताचा ग्रंथ फरान्समध्यें प्रसिद्ध झाला. तो त्यानें फरेंच बादशाहास अर्पण केला आहे. तो २२ सप्टेंबर १६८८ रोजीं आपल्या वयाच्या ६८ व्या वर्षी पॅरिस येथें मृत्यु पावला. प्रथम दाराबरोबर व नंतर दिल्ली येथें वैद्य म्हणून राहण्याचा त्याला प्रसंग आल्यानें त्याला मोगल दरबारचा व्यवहार बारकाईनें पाहातां आला.

सूक्ष्म अवलोकन व तपशीलवार वर्णन हें बर्निअरच्या लेखनाचे विशेष आहेत. त्यानें गादीच्या हक्काचें भावाभावाचें युद्ध बरेच विस्तारानें वर्णिलें असून शिवाय काश्मीर, बंगाल येथील माहितीहि सविस्तर दिली आहे. बर्निअरनें लेखनासाठीं नुसत्या अवलोकनावरच भिस्त न ठेवतां बरीच माहिती परिश्रमपूर्वक जमा केली. शिवाजीचें जुनें चित्र याच्या ग्रंथांत सांपडतें. बर्निअरच्या ग्रंथांत स्त्री सती जाण्याचा विधि, जगन्नाथाची मिरवणूक, सूर्यग्रहणाच्या दिवशींचे आचार इत्यादि विविध गोष्टींची माहिती मिळते. त्यानें आपल्या ग्रंथास एक हिंदुस्थानचा नकाशाहि जोडलेला आहे. एकंदरींत हिंदुस्थानची जनता ही बादशाह, सरदार व जहागीरदार यांच्या जुलमानें पिळून निघालेली व शिक्षणांत मागासलेली आहे; पण राजधानीचें वैभव मात्र डोळे दिपण्यासारखें आहे, असा बर्निअरच्या लेखनाचा सारांश आहे. तो त्यानें पूर्वग्रहरहित वृत्तीनें नमूद केला आहे. उतारा प्र. वृ. पृ. २३०–३१]

थाटामाटाचा दरबार चालविण्यासाठीं आणि प्रजेला दाबांत ठेवण्यासाठीं ठेवलेल्या खड्या सेनेच्या खर्चामुळें प्रदेशांत हलाखी पसरलेली आहे. लोकांच्या हालांचें उचित वर्णन करतांच येणार नाहीं. दुसऱ्याच्या फायद्यासाठीं (सरकारी शिपायांच्या) दंडुक्याच्या धाकांत लोकांना सतत कष्ट करावे लागतात व त्यांना क्रूरतेनें वागविलें जातें. यामुळें जीविताविषयीं

ते उदासीन बनतात. ते बंड करीत नाहींत किंवा कोठें पळून जात नाहींत याचें कारण (केवळ) सुसज्ज लष्कराचा धाक.

या दुर्दैवी देशाचें दैन्य आणखी एका गोष्टीनें वाढलें आहे. नेहमींच पण सामान्यत: एखादें युद्ध उद्भवलें कीं वर्षांचें वसूलाचें येणें अगाऊ रोख पैशांत घेऊन प्रांतिक सरकारचे अधिकार विकण्याची (दिल्लीच्या) सरकारची पद्धति; यामुळें अशा प्रांतांतील सुभेदारांचें प्रमुख काम म्हणजे आपण मुख्य सरकारला दिलेले पैसे वसूल करणें हें होऊन बसतें, कारण त्यानें पूर्वी जी रक्कम जबरदस्त व्याजानें उसनी काढलेली असते ती त्यांस परत करावयाची असते. तसेंच अधिकारपद विकत घेतलेलें असो किंवा नसो, सुभेदार आणि वसूलाचा मक्तेदार यांना प्रतिवर्षी वजीर, खोजा किंवा दरबारांत विशेष वजन असलेल्यांस नजराणे देण्यासाठीं पैसा उभारावा लागतो. बादशाहाला नजराणा देण्यासाठीं नियमितपणें वसूली करण्याचें काम अधिकाऱ्यांस करावें लागतें. या प्रकरणानें हा ( अधिकारी ) मुळांत दरिद्री नि गुलाम असला, कर्जबाजारी असला, आणि वडिलार्जित कपर्दिकहि त्याजवळ नसली तरी तो मोठा श्रीमंत बनतो.

अशा रीतीनें देश उध्वस्त झालेला आहे. प्रांतिक सुभेदार म्हणजे लहान लहान जुलमी राजेच. त्यांचा अधिकार अमर्याद आहे. त्यांनीं केलेल्या जुलुमाविरुद्ध तक्रार करण्यास त्रस्त प्रजेला जागा नाहीं नि त्या तक्रारींची दाद लागण्याची आशा नाहीं. मग त्याच्यावर झालेला अन्याय कितीहि भयंकर असो किंवा वारंवार तोच अन्याय केला जात असो.

**अभ्यास :**—रायबहादूरमल नि बर्निअर यांचे हे लेख वांचा नि सांगा:— शहाजहानचा काळ म्हणजे 'सुवर्णयुग' म्हणण्याची रीत आहे, पण बर्निअरच्या दृष्टीनें या युगांतील दोष कोणते? रायबहादूरमलनें कोणते गुण सांगितले आहेत? साम्राज्याच्या दृष्टीनें हें 'सुवर्णयुग' होतें, कीं जनतेच्या दृष्टीनें? तुमचें मत सांगा.

---

## ३५ : : बंगालमधील ख्रिस्ती वस्ती

[बर्निअरचें प्रवासवृत्त पृ. ४३८]

बंगालमध्यें जीवनास लागणाऱ्या सर्व गोष्टी विपुल आहेत. यामुळेंच कित्येक अर्धवट पोर्तुगीज ( हाफ कास्ट ) व इतर ख्रिश्चन हे डच वसाहतींतून हाकलले गेल्यावर आश्रयार्थ याच सुपीक राज्यांत आले. जेसुईट आणि ऑगस्टाइन यांचीं येथें मोठमोठीं देवळें (चर्च) असून त्यांना आपल्या धर्माप्रमाणें वागण्याची मुभा आहे. त्यांच्यापैकीं कांहींनीं मला असें सांगितलें कीं, एकटचा हुगळीमध्येंच ८ ते ९ हजार ख्रिस्ती असून राज्यांतील इतर भागांतहि त्यांची संख्या पंचवीस हजारांवर असावी. प्रदेशांतील सुबत्ता, स्थानिक स्त्रियांचें सौंदर्य आणि सुस्वभाव यामुळें पोर्तुगीज, इंग्रज आणि डच यांच्यामध्यें एक म्हणच पडली आहे कीं, बंगालच्या राज्यांत येण्यास शेंकडों प्रवेशद्वारें खुलीं आहेत; पण परत जाण्याला मात्र एकहि नाहीं.

**प्रश्न** :—ख्रिस्ती लोकांनीं या देशांत कां वस्ती केली ? त्यांना बंगाल सोडूं नये असें कां वाटत होतें ?

---

## ३६ : : लढण्याची दिखाऊ पद्धत

[ निकोलो मनूची या इटालियन प्रवाशाची अद्‌भुतरम्य जीवनकथा व त्यानें लिहिलेली तितकीच रम्य 'मोगल कथा' ही हिंदुस्थानचा सतराव्या शतकांतील इतिहास समजण्यास अत्यंत उपयोगी आहे. मनूचीच्या लेखनाचे चार जबरदस्त खंड आहेत. हा जन्मानें इटालियन, पण यानें मूळ ग्रंथ पोर्तुगीज व थोडासा फ्रेंच व इटालियन भाषांत लिहिला; त्याचें समग्र इंग्रजी भाषांतर इ. स. १९०७ मध्यें प्रसिद्ध झालें. मनूचीचा जन्म इ. स. १६३९ च्या सुमाराचा. जन्मस्थान बहुधा व्हेनिस हें शहर असावें. लहानपणीं जग पाहण्याची आवड म्हणून वयाच्या चवदाव्या वर्षी हा वडिलांचा डोळा चुकवून बंदरावर किनाऱ्याला लागलेल्या बोटींत शिरला. बोटीवरील प्रत्येकास वाटलें कीं, हा कुणाचा तरी बरोबर आलेला मुलगा असेल. बोट चालूं लागली. अशा रीतीनें हा इ. स. १६५६ च्या जानेवारींत

सुरतेला येऊन पोहोंचला; तेथून ब-हाणपूराहून दिल्लीस गेला. त्यानें कांहीं काळ औरंगजेबाचे पदरीं नोकरी धरली; पण त्याचा ओढा दाराकडे होता. दाराची वाताहात झाल्यावर बंगाल्यांत डाक्क्यापर्यंत प्रवास करून तो परत दिल्लीस आला. तेथें जयसिंगाचे पदरीं त्यानें नोकरी धरली; त्याचेबरोबर तो दक्षिणेस आला. प्रसिद्ध पुरंदरच्या वेढ्यांत जयसिंगाबरोबर तो होता. तेथून तो जयसिंगाची नोकरी सोडून गोव्यास राहिला व तेथून पुनः १६६८ चे सुमारास दिल्लीस गेला. यानंतरहि त्याच्या आयुष्यांत अनेक स्थित्यंतरें झालीं. इ. स. १६८१ चे सुमारास फिरून तो गोव्यास आला व इ. स. १६८३ सालीं संभाजीनें गोव्यावर हल्ला केला असतां मनूची हा गोवेकर पोर्तुगीजांतर्फे संभाजीशीं बोलणें करण्यास आला. इ. स. १६८६ त तो पाँडिचरीस गेला. तेथें त्यानें लग्न केलें. या वेळीं इंग्रजांच्या दोन ईस्ट इंडिया कंपन्यांची चढाओढ चालू होती व त्यांपैकीं एकीनें मनूचीस नोकरींत बोलाविलें. पण मनूची गेला नाहीं. येथून पुढें तो पाँडिचरी येथें राहूं लागला. त्याच्या मृत्यूचें साल इ. स. १७१७ हें असावें.

मनूचीनें मोगल दरबारची अगदीं सूक्ष्म अशी हकीकत दिली आहे. त्यांतील कित्येक कथा ऐकीव व अविश्वसनीय वाटतात; पण त्या तत्कालीं प्रचलीत असल्या पाहिजेत. मनूचीनें आपल्या कल्पनेंतून त्या काढलेल्या नाहींत. मनूचीच्या ग्रंथाचें नांव 'स्टोरिआ ड मोगॉर' असें आहे. पुढील उतारा खंड १ ला, पृ. २७८]

राजपुत्र दारा व औरंगजेब यांमध्य १६५८ त सामुगडास जी लढाई झाली त्याबद्दल मनूची लिहितो :—

"या लढाईंत आणि मी हजर असलेल्या इतर लढायांतहि मला असें आढळून आलें कीं, आघाडीस जे शिपाई असत तेच फक्त लढाई करीत. मागील फौजेंतील शिपाई हातांत नंग्या तलवारी असूनहि केवळ 'मारो, मारो' असें ओरडत. आघाडीवरील शिपाई पुढें चढाई करूं लागले, तर त्यांच्या मागील रांगा त्यांचें अनुकरण करीत. ते जर परतूं लागले तर मागील रांगा पळ काढीत. ही हिंदुस्थानांतील पद्धति यूरोपांतील पद्धतीच्या अगदीं विरुद्ध आहे. हे शिपाई एकदां पळूं लागले म्हणजे कसल्याहि उपायानें त्यांना थांबविणें शक्य नसे."

---

## ३७ : : औरंगजेबाच्या राज्यांतील अव्यवस्था

[ **राजपुत्र अकबराचें पत्र** : प्रा. शर्माकृत क्रेसंट इन् इंडिया पृ.५९६.]

आपल्या राज्यकारभारांत प्रधानांना अधिकार नाहीं. सरदारांवर विश्वास नाहीं, सैनिकांच्या नशिबीं दारिद्रय, लेखक रिकामटेकडे, व्यापारी साधनें-हीन आणि कृषिवर्ग पददलित झाला आहे. त्याचप्रमाणें दक्षिणचें राज्य खरोखरच पृथ्वीवरील नंदनवन आहे तेंहि आतां ओसाड आणि नष्ट भ्रष्ट झालें आहे; बऱ्हाणपुर हें शहर सृष्टिसुंदरीच्या गालावरील तीळाप्रमाणें शोभिवंत दिसत असे; तें आतां उध्वस्त झालेलें आहे. आपल्या नांवाशीं संबद्ध असलेलें औरंगाबाद हें शहर शत्रूच्या हल्ल्यामुळें आणि धाकानें जिकिरीस आलें आहे. हिंदू जातीवर दोन संकटें कोसळलीं आहेत. शहरांतून जिझीया कराची आकारणी हें एक आणि दुसरें खेडयांतून शत्रूंचा जुलूम. सर्व बाजूनीं लोकांवर अशा आपत्ति आल्या असतां ते आपल्या राज्यकर्त्याबद्दल (परमेश्वरापाशीं) प्रार्थना कां करतील ? आणि त्यांना धन्यवाद तरी काय म्हणून देतील ? पूर्वीच्या शुद्ध आणि उच्च घराण्यांतील कारभारी मागें पडून तुमच्या सरकारचा कारभार आणि तुम्हांला राजनैतिक सल्ला देण्याचें काम हें आतां हलक्या दर्जाचे लुच्चे विणकरी वा शिंपी व साबणविके ह्यांच्या हातीं आलेलें आहे. हीं माणसें कपटहेतूनें कांहीं धार्मिक आणि पारंपरिक सूत्रें बडबडत असतात. आपण मात्र जणुं काय ते लोक व शिपाई देवदूत आहेत असें समजून त्यांच्यावर विश्वस ठेवतां, आणि त्यांच्या हातांतील बाहुलें बनतां ! अशा स्थितींत हीं माणसें गहूं दाखवून बारली विकतात. अशा रीतीनें गवताच्या काडीच्या जागीं टेकडी व टेकडीच्या जागीं गवताची काडी आहे असें तुम्हांला भासवतील यांत नवल तें काय ?

**अभ्यास** :––औरंगजेबाच्या कारभारांतील दोष कोणते ते मुद्देसूद लिहा. (१) जनतेची स्थिति, (२) हिंदूंवरील संकट, (३) राजांच्या सल्लागारांची योग्यता.

———

## ३८ : : : दाराचा स्वभाव

[ बर्नियरचें प्रवासवृत्त पृ. ६–७ ]

राजपुत्र दाराच्या अंगीं चांगले गुण कांहीं कमी नव्हते, त्याच्या संभाषणांत नम्रता, वादांत हजरजबाबीपणा, वागण्यांत सभ्यता व औदार्य कोणाच्याहि प्रत्ययास येत; पण स्वतःच्या मोठेपणाची त्यानें भलतीच कल्पना करून घेतली होती. आपल्या बुद्धिचातुर्यानें पाहिजे तें आपण करूं शकूं असें त्याला वाटे. आणि तो असे समजे कीं, आपल्यास सल्ला देण्यास समर्थ असें या जगांत कोणीहि नाहीं. जे सल्ला देण्यास धजत त्यांच्याबद्दल तो तुच्छतापूर्वक उद्‌गार काढी. यामुळें त्याच्या बंधूंनीं चालविलेले कटहि त्याला कळविणें त्याच्या मित्रांना अशक्य झालें.

तो फार तापट, चिडखोर, फटकळ, आणि मोठमोठ्या उमरावांबरोबरहि उद्धटपणें वागे. मात्र त्याचा राग अगदीं थोडा वेळच टिकत असे. मुसलमानी धर्मांत जन्मला म्हणून त्याप्रमाणें तो आचरण ठेवी एवढेंच. जाहीर रीत्या जरी दारा मुसलमान असला तरी खाजगी वर्तनांत हिंदूशीं हिंदूप्रमाणें व ख्रिस्त्यांशीं ख्रिस्त्याप्रमाणें तो वागे. त्याच्या परिवारांत कित्येक हिंदु पंडित व ख्रिस्ती पाद्री असत व त्यांना तो देणग्याहि देई. -- कांहींचें म्हणणें असें आहे कीं, दारा कोठल्याच धर्माचा नव्हता. आणि केवळ हौसेखातर तो या किंवा त्या धर्मांप्रमाणें बोले. कांहींचें म्हणणें असें आहे कीं, राजकीय उद्देश डोळ्यांपुढें ठेवून तो असा वागे, कारण तोफखान्यांत बरेच ख्रिस्ती होते ते आपलेसे व्हावेत व मांडलिक हिंदु राजांचेंहि आपणांस साहाय्य मिळावें म्हणून त्यांच्या मताप्रमाणें तो वागे.

---

## ३९ : : दुर्गादासानें औरंगजेबास चकविलें

[ प्रस्तुतचा उतारा खाफीखानकृत 'मुन्तखब-उल्-लुबाब' या ग्रंथांतून घेतला आहे. या ग्रंथास तरीख–इ–खाफीखान असेंहि म्हणतात. खाफीखानानें इ. स. १५१९ म्हणजे बाबरपासून ते महंमदशाहाच्या कारकीर्दींच्या १४ व्या वर्षांपर्यंत म्हणजे इ. स. १७३४ पर्यंतचा इतिहास लिहिला आहे. औरंगजेबाच्या कारकीर्दीसाठीं खाफीखानाच्या ग्रंथाइतकें विश्वसनीय साधन उपलब्ध नाहीं. विशेषतः औरंगजेबानें तवारीख लेखन बंद केल्यानें त्याच्या कारकीर्दीची हकीकत मिळणें दुरापास्त होतें. पण खाफीखानानें तेवढ्याचसाठीं बादशाहास न कळेल अशा रीतीनें गुप्त रीतीनें इतिहासलेखन चालू ठेवलें.

खाफीखानाचें मूळ नांव मुहम्मद हशीम किंवा हशीम अलीखान आहे. खाफी म्हणजे गुप्त. यानें गुप्तता राखून इतिहास लिहिला म्हणून संतोष पावून महंमदशाहानें त्यास खाफीखान म्हटलें व त्याच नांवानें तो पुढें प्रसिद्ध झाला असें म्हणतात पण हें खरें दिसत नाहीं. तो मूळचा खुरासान जिल्हयांतील ख्वाफ गांवचा म्हणून ख्वाफीखान किंवा खाफीखान. तो आपल्या बापाचें नांव मीर ख्वाफी असें सांगतो, यावरून संशय रहात नाहीं. खाफी म्हणजे गुप्त या अर्थावरून महंमदशाहानें त्याच्या नांवावर वर दिलेली कोटी केली असेल हें मात्र शक्य आहे. निजामउल्मुल्काचा खाफीखानावर मोठा विश्वास असे. या काळांतील मराठ्यांच्या इतिहासास जीं पर्शियन साधनें उपलब्ध आहेत त्यांत खाफीखानाच्या इतिहासास फार मोठें स्थान आहे. इ. स. १६०५ सालापासूनच्या सुमारें १३० वर्षांचा इतिहास त्यानें विशेष सविस्तर सांगितला आहे. त्यापैकीं अखरच्या ५३ वर्षांचा काळ तर खुद्द त्याच्या नजरेखालचा असा आहे. इ. व डौ. व्हॉ. ७, पृ. २०७ पाहा. उतारा. पृ. २९७ पाहा.]

**कथासंदर्भ** :—जोधपूरचा राजा जसवंतसिंग यास अफगाणिस्थानाकडे स्वारीस पाठविलें होतें. त्याला तिकडे मृत्यु आला (१० डिसें. १६७८). हें कळतांच जोधपूरचें राज्य घेण्याचा घाट औरंगजेबानें घातला. त्याचे वारस नाहींसे करून त्यानें मुसलमान अधिकारी जोधपुरांत पाठविले. सरहद्दीवरून राजपूत सैन्य परत येत असतां जसवंतसिगाच्या दोन विधवा राण्यांना मुलगे झाले. एक मुलगा दोन आठवड्यांतच वारला, परंतु दुसरा अजितसिंग पुढें जोधपूरचा राजा

झाला. त्यांना पकडून दिल्लीस आणण्यांत आलें. मुलास मारण्याचा हा कट आहे हें ओळखून जोधपूरचा अभिमानी दुर्गादास याच्या युक्तीनें तीं मुलें बादशाहाच्या तावडींतून सुटलीं तें वृत्त पुढें दिलें आहे. ]

राजा जसवंतसिंगच्या खंडणी ( Tribute )बद्दलचें दुःख औरंगजेबाच्या मनांत फार दिवस डांचत होतें, त्यांतच त्याच्या मृत्यूनंतरच्या या पुत्रजन्माच्या व इतर घडामोडीमुळें भर पडली. बादशाहानें कोतवालाला आज्ञा केली कीं, मनसबदाराकडील सैन्य, कांहीं तोफा आणि स्वतःची फौज घेऊन या राजपुताभोंवतीं पहारा ठेवा. या अवधींत राजपुत्रांच्या वयाचीं दोन मुलें राजपुतांनीं मिळविलीं. दासींपैकीं कांहींना राण्यांचा पोषाख घालण्यास दिला. आपली युक्ति कोणाच्याहि लक्षांत येऊं नये याची काळजी घेऊन या राण्यांच्या ताब्यांत मुलांना दिलें व त्यांच्यावर आपला पहारा ठेवला. खऱ्या राण्यांनीं पुरुषांचा वेष घेतला, आणि दोन विश्वासू नोकर नि देशभक्त राजपुतांच्या एका टोळीसह रात्रींच्या वेळेला त्या तळावरून निसटल्या नि शक्य त्या वेगानें स्वदेशाकडे मार्गस्थ झाल्या. त्यांना अडवूं शकतील किंवा त्यांचा पाठलाग करतील असे अधिकारी तोतया राजपुत्रांच्या तंबूभोंवतीं पहारे करीत होते. दोन तीन पहारे बदलल्यानंतर ही बातमी सांगण्यांत आली, तेव्हां कांहीं अधिकारी चौकशीसाठीं पाठविण्यांत आले. त्यांनीं पुनः पुनः वार्ता आणली कीं, राण्या आणि मुलें तंबूतच आहेत. शेवटीं राजाच्या सर्व लवाजम्याला किल्ल्यांत बंदींत ठेवण्याची आज्ञा झाली; तेव्हां मात्र राजाच्या सन्मानासाठीं वीर पुरुषांसारखे लढण्यास सिद्ध असलेले ते राजपूत आणि राणीवेषधारी स्त्रिया यांनीं चांगलाच प्रतिकार केला. पुष्कळांचा वध झाला पण (राजपुतांची) जी टोळी निसटली ती निसटलीच !

**अभ्यास :—** १. "राजपुतांचें अप्रतिम शौर्य आणि धडाडीबरोबरच मोगलांचें संघटनकौशल्य, युक्ति आणि मुत्सद्दीपणा हे गुण दुर्गादासांत एकवटलेले आढळतात." वरील वृत्तावरून या सिद्धांतास कितपत पुष्टि मिळते ? २. दुर्गादास राठोडची अधिक माहिती मिळवा.

---

# ४० औरंगजेबाकडून आपल्या शिक्षकाची कानउघाडणी

[ 'के' कृत एशन्ट इंडियन एज्युकेशन पृ. १३४ वरून ]

मोगल अमदानींतील शिक्षणाच्या पद्धतीबद्दल थोडीशी कल्पना औरंगजेब व त्याचा शिक्षक यांच्यांत झालेल्या भाषणावरून येईल.

औरंगजेबाच्या राज्यारोहणानंतर त्याचा एक जुना शिक्षक मोठ्या आशेनें त्यास भेटण्यास गेला. अगोदर तीन महिने बादशाहानें त्याची गांठच घेतली नाहीं. अखेर भेट झाल्यावर बादशाह म्हणाला, "मुल्लाजी, माझ्याशीं तुमचें काय काम आहे ? तुम्हांला असें वाटतें का कीं, मीं तुमच्यासाठीं मोठी पगाराची जागा राखून ठेवावी ? तुम्ही मला जर योग्य शिक्षण दिलें असतें तर खरोखरच मीं तुमचा सन्मान करणें जरूरीचें होतें......पण तुम्ही मला काय शिकविलें ? युरोप (फिरंगिस्तान) म्हणजे एक लहानसें बेट आहे. तेथील सत्ताधीश इकडल्या क्षुद्र राजांहूनहि अधिक मोठे नाहींत असें तुम्हीं सांगितलेंत ! त्या सर्वांपेक्षां हुमायून, अकबर, जहांगीर हेच सर्वश्रेष्ठ होत, त्यांचें नांव ऐकून काश्गर, तार्तरी, इराण, सयाम, चीन येथील राजे म्हणे थरथर कांपतात ! अहो तज्ज्ञ इतिहासकार व अजब भूगोलज्ञ, जगांतील प्रत्येक राष्ट्राची स्वाभाविक रचना, संपत्ति, धर्म, राज्यशासनाचे प्रकार हे तरी मला शिकविण्याचें तुमचें काम नव्हतें काय ? या देशाच्या आसपासच्या प्रदेशांतील भाषा राजास यावयास नको काय ? पण तुम्ही तपॅच्या तपें शिकावयास लागणारी अरबी भाषा तेवढी माझ्या माथीं मारण्याचा उपकार केलात ! राजपुत्राला कोणता विषय किती महत्त्वाचा आहे हें न ओळखतां अरबी व्याकरणाची घोकंपट्टी तुम्ही मला करावयास लावली....आपल्या मातृभाषेंतून देवाची प्रार्थना केली तर ती त्याला ऐकूं जात नाहीं काय ? तसेंच बौद्धिक कवाईत देणारें तत्त्वज्ञान तुम्हीं मला शिकवलें व माझे कित्येक तास त्यांत वांया घालविले ! या उत्पत्तिविलयाच्या शब्दजंजाळापेक्षां तुम्ही जर मला विवेचक बुद्धि, आत्म्याला उन्नत करणारा व सुखदुःखांत मनाची शांति टिकवणारा मार्ग दाखविला असतां तर, अलेक्झांडरला जितका ॲरिस्टॉटलबद्दल आदर वाटला असेल, त्यापेक्षांहि अधिक आदर तुमच्याबद्दल मला वाटला असता ! अरे खुषमस्कऱ्या (Sycophant) बोल, कांहीं

नाहीं तर निदान राजा व प्रजा यांची एकमेकांबद्दलचीं कर्तव्यें काय याचें ज्ञान तरी तूं मला द्यावयाचें होतेंस कीं नाहीं ! ....बरें झालें कीं, इतर अनेक विषयांवर तुझ्यापेक्षां जास्ती योग्यतेच्या माणसांचा सल्ला मी घेतला ! चलो, अपने देहातको चले जाओ ! तूं कोण आहेस आणि तुझें काय झालें हेंहि कोणास न कळलेलें चांगलें !

---

## ४१ : : : 'मी एकटा चाललों !'

[अंत:काळचें पत्र. इ.स. १७०७ मध्यें आपला मुलगा कामबक्ष यास औरंगजेबानें पाठविलेल्या पत्रांपैकीं एक पत्र पुढें दिलें आहे. लेटर्स ऑफ औरंगजेब पृ. ७३ वरून.]

माझ्या लाडक्या मुला,

माझ्या ऐन उमेदीच्या व भरभराटीच्या काळांत मीं तुला उपदेश केला व तुझ्यासाठीं कष्टहि केले ; पण त्या वेळीं ईश्वराची इच्छा नसल्यानें त्याकडे तूं लक्ष दिलें नाहींस. आतां मी सर्व सोडून जाणार.... माझ्या धडपडीबद्दल आतां मला वाईट वाटतें. कारण त्या धडपडीचा मला आज काय फायदा ? माझ्या पापांचीं व अदूरदर्शी कृत्यांचीं फळें मात्र माझ्याबरोबर येणार आहेत ! ईश्वरी लीला अतर्क्य आहे. मी एकटा येथें आलों आणि एकटाच निघून जात आहें ! या जगांत प्रवास करीत करीत पुढें जाणाऱ्या मानवी टोळीच्या पुढाऱ्यानें मला एकटेंच मागें ठेवल्यासारखें वाटत आहे. - - - - छावणीची आणि सैनिकांची चिंता मी काय करूं ! माझेंच काय होत आहे मला कळत नाहीं ! - - - - - - अशक्तपणामुळें पाठीस पोंक निघून मी वांकून गेलों आहें आणि पायांत तर दोन पावलें टाकण्याचेंहि त्राण नाहीं. मीं जीं असंख्य दुष्कृत्यें केलीं त्यांबद्दल मला किती दंड भोगावा लागेल कोण जाणें ! - - - - - प्रजापालन करणें ही परमेश्वरानें माझ्या मुलांना दिलेली एक विश्वासाची ठेव आहे. तरी सद्धर्मीयांवर संकटें येणार नाहींत अशी त्यांनीं काळजी घ्यावी, नाहीं तर त्यांचे शाप मला भोंवतील ! मुला, तुझें, तुझ्या आईचें व मुलांचें ईश्वर रक्षण करो ! अंत:काळच्या वेदना आपला अंमल मजवर त्वरेनें बसवीत आहेत - - - -

सरदार लोक छळ-कपट करणारे असले तरी त्यांना तोडून टाकूं नका. प्रेमानें आणि युक्तीनें आपलें म्हणणें त्यांना पटवा. अंथरूण पाहून पाय पसरा. सैन्याची पगार थकल्याची ओरड अजून आहेच. दारा शुको जरी मोठा धोरणी व विचारी होता व त्यानें कित्येकांना जहागिरी दिल्या तरी त्यानें पगार वेळेवर न दिल्यानें शिपाई लोक त्याजवर असंतुष्ट असत. मी आतां चाललों! मी जें काय चांगलें अगर वाईट केलें तें तुमच्यासाठींच केलें... तुम्ही माझे अपराध विसरून जा. आपला आत्मा शरिरांतून निघून जातांना कोणीं पाहिला नसेल, पण मी मात्र हें दृश्य पाहात आहें.

---

## ४२ : आंब्याचें नामकरण : सुधारस-रसनाविलास

[ मुलगा महंमद आझमशाह बहादुर गुजराथचा सुभेदार असतांना (इ. स. १७०३) औरंगजेबानें त्यास लिहिलेलें पत्र. लेटर्स ऑफ औरंगजेब पृ. ११ वरून. ]

प्रिय आझम,

तूं आपल्या वृद्ध पित्यासाठीं पाठविलेली आंब्यांची डाली पाहून मला फार आनंद वाटला. यांतील कांहीं नवीन जातींच्या आंब्यांना मीं नांवें सुचवावींत अशी विनंति तूं मला केली आहेस. तूं इतका कुशाग्र बुद्धीचा असतां आपल्या वृद्ध पित्यास हा त्रास कां देतोस ? बरें तर, तुझ्या आग्रहासाठीं आंब्यांना मीं पुढील नांवें दिलीं आहेत--सुधारस आणि रसनाविलास.

---

# मोगल बादशाहीचे शेवटचे क्षण

[ औरंगजेबाच्या मृत्यूनंतर मोगल साम्राज्याची सत्ता संपुष्टांत कशी आली याची कल्पना येण्यासाठीं उतारे क्र. ४३, ४४, ४५, ४६, ४७ दिले आहेत. शेवटच्या पत्रावरून मराठ्यांनीं मोगलांना कसें नामधारी केलें होतें तेंहि समजून येतें. ]

## ४३ : बादशाह फरुक्सियरला जनानखान्यांत पकडलें

[ सय्यद गुलाम हुसेन खान हा बंगालच्या नबाबाच्या नोकरीमध्यें होता. त्याचें इंग्रजांबरोबर चांगलें संधान होतें म्हणून नबाबाच्या नोकरींतून त्यांस काढून टाकण्यांत आलें. पुढें इंग्रजांनीं त्यास आपल्याकडे कामास घेतलें. कर्नल गॉडर्डची त्याच्यावर विशेष कृपा होती.

शेवटच्या मोगल बादशाहाच्या वृत्तांतासाठीं त्यानें लिहिलेला ' सियर-उल-मुताखरीन् ' ( आधुनिक काळाचें समालोचन ) हा ग्रंथ उपयुक्त मानतात. हा इ. स. १७८० त लिहिला गेला. ब्रिग्जनें त्या ग्रंथाचें चार भागांत भाषांतर केलें आहे. त्यांतून पुढील दोन उतारे घेतले आहेत. प्रस्तुत उतारा भाग १ ला, पृ. १३५ वरून ]

बादशाह फरुक्सियर हा जनानखान्यांत जाऊन बसला. वझीर आणि अजितसिंग बाहेर वाट पहात बसले. हेतु हा कीं, तो काय म्हणतो तें ऐकावें आणि त्याला पकडण्याची संधि मिळवावी. इतक्यांत नुकतीच थांबलेली (बाहेरची) गडबड पुन्हा जोरानें सुरू झाली. लूट, हाणमार व खून यांना पुन्हा जोर चढला. फरुक्सियर बाहेर आला नाहीं........(इतक्यांत) अफगाण सैनिकांच्या टोळीनें—यांत वझीराचे कांहीं गुलामहि होते—निजामुद्दीन अलिखानच्या घराच्या छपरावरून बादशाहाच्या जनानखान्यांतील अंगणांत उतरण्याचा मार्ग शोधून काढला. या ठिकाणीं हबशी, जॉर्जियन आणि कालमुक बायांचा पहारा त्यांना आढळला. त्यांची हकालपट्टी करून पठाण आंत शिरले आणि फरुक्सियरला शोधूं लागले. शेवटीं त्यांनीं केलेला छळ सहन न होऊन कांहीं बायकांनीं जेथें राजा लपलेला होता ती जागा

दाखविली. सैनिक तिकडे धांवले. ही परिस्थिति पाहून राजमाता, राणी शहाजादी व इतर पहिल्या दर्जाच्या स्त्रिया या राजाच्या साह्यार्थ धांवल्या; त्यांनीं त्याच्या शरीराभोंवतीं कडें केलें व डोळ्यांत अश्रु आणून सैनिकांची प्रार्थना नि विनवणी केली ! पण अशा प्रसंगीं या अश्रूंचा काय उपयोग होणार? त्या शिपायांनीं थोडी हिसकाहिसकी करून त्या स्त्रियांपासून बादशाहास सोडविलें व त्याला जमिनीवरून फरफटत ओढीत 'वरच्या मजल्यावरील' अंधारकोठडींत फेकलें.······बादशाही व्यक्तींचा इतका अपमान कधींच करण्यांत आला नव्हता ! (अत्यंत) असभ्यतेनें नि धसमुसळेपणानें हें सर्व (कृत्य) करण्यांत आलें !

---

## ४४ : : सय्यद बंधूंची योग्यता

[शर्माकृत क्रेसंट इन् इंडिया पृ. ६२६ खाफीखानाच्या लेखनावरून]

......वृत्तांत वर्णन करीत असतांना, या लेखणीनें दोन्ही बंधूंचेवर टीका करण्यांत आली आहे. ते परिस्थितीला बळी पडले, त्यांच्यावरची टीका आतां कांहीं दुरुस्त करतां येत नाहीं, पण त्यांना अन्याय होऊं नये म्हणून त्यांच्या चारित्र्यांतील विशेष आकर्षक गुण, न्यायप्रियता नि औदार्य याविषयीं दोन शब्द लिहितो......

दोघेहि बंधू आपल्या काळांत मानव जातीबद्दल त्यांना वाटणाऱ्या सहिष्णुता नि उदारता याविषयीं प्रसिद्ध होते. ज्या प्रदेशांतील रहिवाशांत बंडखोरी आणि आप्पलपोटेपणा नव्हता, त्यांनीं सय्यदांच्या राज्याविषयीं तक्रार केली नाहीं. विद्वज्जनांविषयीं सहानुभूति आणि औदार्य दाखविण्यांत, हुसेन अलीखान हा वडील भावापेक्षां अधिक होता. आणि त्या काळास अनुरूप असा हतीम होता. अनेकांचें सौख्य हें त्यानें दिलेला शिधा आणि अन्न यांवर अवलंबून होतें. औरंगबादला दुष्काळ पडला त्या वेळीं पुष्कळ पैसा आणि धान्य गरीबांना आणि विद्वानांना वाटण्याची त्यानें योजना केली. औरंगबादच्या पाण्याच्या सांठ्याची पद्धति त्यानेंच सुरू केली..... उन्हाळ्यांत पाणी दुर्मिळ झाल्यानें नागरिकांचे होणारे हाल यामुळें वांचत. त्यांनीं

आपल्या जन्मभूमींत बरहा येथें लोकोपयोगासाठीं धर्मशाळा, सराया, पूल आणि अन्य इमारती बांधल्या. सय्यद अब्दुल्लाचें वैशिष्टय म्हणजे शांतवृत्ति, धैर्य आणि सहानुभूति हे होत.

---

## ४५ : : दिल्ली दरबारांत निजामाची अप्रतिष्ठा

[**कथा संदर्भ** :––सय्यद बंधूंच्या मृत्यूनंतर निजामानें दक्षिणेंत स्वाऱ्या करण्यास व स्वतंत्र स्थान मिळविण्यास प्रारंभ केला होता; परंतु त्यासच बादशाहानें वजिरी देण्याचें ठरविल्यानें तो दिल्लीस परत गेला. तेथें २० फेब्रुवारी १७२२ मध्यें तो मुख्य प्रधान झाला. तेथील वातावरणास कंटाळून, कांहीतरी सबबी काढून तो ११ नोव्हेंबर १७२२ला दक्षिणेंत जाण्यास निघाला. ऑगस्ट १७२४ मध्यें तो औरंगाबाद येथें येऊन पोहोंचला. जवळजवळ स्वतंत्रपणेंच तो इकडील सुभ्यांचा कारभार पाहूं लागला. तो दिल्लीस होता त्या वेळच्या त्याच्या स्थितीचें पुढील वर्णन गुलाम हुसेननें केलें आहे. प्रा. शर्माकृत क्रेसंट इन् इंडिया पृ. ६३६ वरून.]

निजाम-उल-मुल्क हा गंभीर प्रकृतीचा, आपल्याच कामांत गर्क असणारा ( Reserve ) आणि सत्तालोलुप होता. त्यानें राज्यकारभाराच्या कांहीं महत्त्वाच्या शाखांत सुधारणा करण्यास आरंभ केला.

बादशाहाला त्यानें सुचविलें कीं, सार्वजनिक प्रसंगीं त्यानें गांभीर्यानें आणि जाणीवेनें वागावें, सर्व प्रकारचें चांचल्य टाकावें, प्रसंगास शोभेसें वर्तन ठेवावें, नोकरांना मर्यादेनें राहण्यास आज्ञापावें, प्रत्येक खात्यास ठराविक वेळ देऊन तो कारभार पहावा. स्वतः न्याय देण्याची वेळ निश्चित करावी, एका शब्दांत थोर बादशाहास साजेशीं कर्तव्यें त्या स्थानाच्या योग्यतेनुरूप त्यानें पार पाडावीं. हा सर्व उपदेश बादशाहानें ऐकला पण त्याला तो आवडला नाहीं. राजा हा ऐन तारुण्याच्या भरांत आणि साम्राज्याच्या वैभवानें आलेल्या गुर्मींत होता. त्याचा स्वभाव अगदींच सुखलोलुप होता. त्याच्या प्रमुख सरदारांनाहि (निजामाचा) हा सल्ला त्याच्यापेक्षां कांहीं अधिक रुचला नाहीं. निजाम-उल्-मुल्कसारख्यांनीं दरबारांत पुढाकार

घ्यावा ही गोष्ट खान दौरानला तर मुळींच सहन झाली नाहीं. त्यामुळें वजिरावर एकंदरींत (दरबारांत) वक्रदृष्टि असे आणि त्याच्याविषयीं उपहासाचे उद्‌गार निघत.

'निजामाचें वय आतां पन्नासाचे पुढें गेलें होतें. त्याची वागणूक जुन्या पद्धतीची (अर्थात् टाकाऊ) आहे' असें तरुण बादशाह आणि त्याचे जिगर-दोस्त उपहासानें म्हणत.

या काळांतील पुढील कथा प्रसिद्ध आहे. निजामाच्या पोषाखास आणि रुबाबास पाहून भर दरबारांत महंमदशाहा (उपहासानें)हंसला आणि शम्सुद्दौला(त्यांस) म्हणाला कीं "पहा दख्खनचें माकड कसें नाचतें आहे?"

---

## ४६ : : : नादीरशाहाची दिल्लीवर स्वारी

[ आनंद रंगा पिलै यास मनुष्यस्वभावाची आणि वस्तुस्थितीची चांगली परीक्षा होती. त्यामुळें हलक्या कामापासून वाढत वाढत तो डुप्लेचा (पाँडिचरीचा फरेंच गव्हर्नर) दुभाष्या झाला. गव्हर्नरच्या पत्नीचा त्याच्यावर रोष असला तरी डुप्लेचा सूत्रधार तोच बनला होता. तो आपली डायरी लिहीत असे, ती आतां उपलब्ध झाली आहे. तिचे एकंदर १२ भाग आहेत. त्यामध्यें इ. स. १७३६ ते १७६१ या कालांतील राजकीय, सामाजिक, व्यापारी व लष्करी घडामोडींचा वृत्तांत दिलेला असल्यानें अस्सल ऐतिहासिक साधन म्हणून तिला फार महत्त्व आहे. या पंचवीस वर्षांच्या काळांत डायरीलेखनांत मधून मधून थोडे खंड पडले आहेत त्याची पहिल्या भागाच्या प्रास्ताविकांत पृ. १६–१७ वर माहिती दिली आहे. 'प्राईस डॉडवेल' आणि रंगाचारी यांनीं 'प्रायव्हेट डायरी ऑफ् आनंद रंगा पिलै'चें संपादन केलें आहे. प्रस्तुत उतारा भाग १ ला, पृ. ९३ वरून.]

*शनिवार २३ मे १७३९········सुरतेकडून आज दुपारीं जहाज आलें त्याबरोबर पुढील वार्ता आली. इराणचा शहा तहामस्प कुली-

---

*११ मार्च १७३९ ला दिल्लींत कत्तल झाली. ५ मे १७३९ ला नादीरशाहा दिल्ली सोडून परत गेला.

खान यानें - - - - - टर्कीच्या सुलतानाचाहि पराभव केला. नंतर त्यानें आपलें लक्ष दिल्लीकडे वळविलें. मोगल बादशाहास त्यानें मगरूरीचा संदेश पाठविला - - - - - तहमास्प कुलीखानानें इ. स. १७३८ त ६० सहस्र घोडेस्वारांसह (आपली राजधानी) इस्पहान सोडलें. वाटेवर अनेक (टोळीवाल्यांच्या) पुढाऱ्यांना त्यानें नमविलें. त्यांच्याकडून खंडणी वसूल केली आणि दिल्लीच्या साम्राज्यांतील मुख्य शहर जें लाहोर त्यावर हल्ला केला. तेथील किल्ला त्याच्याच हातांत पडला. बादशाहाला क्रोध आला आणि त्यानें निजाम आणि इतर उमरावांना त्याच्यावर जाण्याची आज्ञा केली. त्यांनीं युद्ध कलें पण ते पराभूत झाले. या पराभवानें बादशाह चिडला नि त्यानें पुनः युद्ध करण्याचा आदेश दिला. ईश्वरी कृपा असल्यानें तहामस्पचा विजय झाला व तो थेट दिल्लीपर्यंत गेला; दिल्ली सर केली. बादशाह मुहम्मदशाह आणि सरदारांना त्यानें कैद केलें. एक दिवस त्यानें आज्ञा केली कीं, बादशाह आणि त्याचे वीस पंचवीस सरदार यांचा बाजारांत जाहीरपणें वध करावा. त्यानंतर त्यानें आपल्या नांवाचीं नाणीं पाडलीं आणि जुन्या नाण्यांतून मुहंमदशाहाचें नांव काढून टाकण्याची आज्ञा केली. यानुसार सुरतेच्या नबाबाला आज्ञापत्र आलें कीं,

मुहम्मदशाहाच्या नांवाचीं नाणीं व्यवहारांतून काढून टाका आणि 'ईश्वरकृपेनें बादशाह नादीरशाह' असा शिक्का असलेलीं नाणीं सुरू करा. सनदा इत्यादि या बादशाहाच्या नांवें दिल्या पाहिजेत.......सुरतेच्या नबाबांनीं या वृत्ताची शहरभर घोषणा केली आणि नवीन नाणीं पाडण्याचा हुकूम केला. जुनीं नाणीं गोलाकार होतीं, नवीन नाणीं एका टोंकास अणकुचीदार होतीं. हा फरकहि नव्या बादशाहाच्या आज्ञेनें करण्यांत आला होता असें सांगितलें गेलें. सुरतेहून ही वार्ता गव्हर्नर, कौन्सिलर आणि मि. एलिस यांना आली. ज्या जहाजानें ही बातमी आणली तें उपयुक्त व्यापारी मालाची वाहतूक करीत होतें.

जर असा दुर्दैवाचा घाला दिल्लीच्या बादशाहावर खरोखर पडला असेल तर सामान्य मनुष्याच्या दुःस्थितीविषयीं बोलावयासच नको. जगांतील राजांची संपत्ति व सत्ता यांचा काय उपयोग ? नष्ट होणाऱ्या या गोष्टी आहेत. दयाळू परमेश्वराचें राज्य हें खरें टिकाऊ राज्य, इतर सर्वांचा विनाश ठरलेलाच.

मी पूर्वी लिहिलें आहे कीं, बादशाहाचा शिरच्छेद झाला; पण तेथून नंतर आलेल्या बातमींत तो प्रसंग नाहीं. बाकी सर्व वार्तेला मात्र दुजोरा आहे. आतां असें सांगितलें जात आहे कीं, त्यास फक्त पकडण्यांत आलें होतें. असेंहि म्हणण्यांत येतें कीं निजामाचें आणि नादीरशाहाचें कांहीं संधान होतें. एक महिन्यानें अशी बातमी आली कीं, महंमदशाहाला पुन्हां सिंहासनावर बसविलें. त्याच्या कन्येचा आणि तहामस्प कुलिखानाच्या पुत्राचा विवाह करण्यांत आला, बादशाहाच्या खजिन्यांतील प्रत्येक वस्तू घेतल्यानंतर कुली-खान अटकेपार झाला. मुलतान आणि काबूलवर त्यानें हल्ला केला आणि तो आतां आपल्या राज्याच्या मार्गावर आहे.

खूप लोकांचा खून करण्यांत आला व कित्येक स्त्रियांनीं आत्महत्या केली. असा अंदाज आहे कीं, या रीतीनें १ ते १॥ लक्ष स्त्री-पुरुषांचा संहार झाला.

---

## ४७ : : : दिल्लीचें संस्थान जालें आहे

['महादजी शिंदे यांचीं कागदपत्रें' मधून क्रमांक ५५५ चें पत्र पुढें दिलें आहे. उत्तरेकडील रोहिले वगैरे शत्रूंचा नाश केल्यावर महादजी, नाना फडणविसास, उत्तरेची जबाबदारी घेण्यास अलिबाहा-दरास नेमावें व दक्षिणेंतून त्यास साह्य करावें असें सुचवीत आहे. महाराष्ट्राच्या पत्ररूप इतिहासांत पृ. २५४ वर हें पत्र छापलें आहे तें तसेंच सटीप पुढें दिलें आहे. पत्राची तारीख ६ जानेवारी १७८९.]

श्री

राजश्री बालाजीपंत नाना गोसावी यासीं :--

छ दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे विशेष :--सांप्रत आपणांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं, तरी सविस्तर इकडून वरचेवरी पत्रें रवाना जाहलीं आहेत त्यांचीं उत्तरें यावीं. इकडील बंदोबस्ताचीं पैरवी[1] होळकर व अलीबहाद्दर यांसी पत्रें येऊन व्हावी. त्या उत्तराची प्रतीक्षा आजपर्यंत जाहली. सांप्रत

१ व्यवस्था.

रांगडयांची[२] नजर इकडे राहूं न द्यावें, मेल[३] पार ठिकाणास घेऊन जाऊन, आपले फडशा[४] करून घ्यावें हीच पाहिली. लोकांसी वायदेही बहुत होऊन गेले. सवड बोलण्याची कांहींच राहिली नाहीं. तेव्हां अलीबहाद्दरबाबा यांसी इकडील माहितगारी करून दिल्ही आहे. रोहिला शत्रु भारी होता. त्याचेहि पारपत्य जाहलें. जिवंत धरून आणिला. खूळ मोडलें. याउपरी अलीबहाद्दरबाबा इकडील बंदोवस्त राखतील. सरकारांतून आपण अलीबहाद्दर यांची पुरवणी[५] पैक्यानें व फोजेनें करावी. इकडील मुलूक निर्वेध[६] जालाच आहे. एक वर्षानें पुढें इकडे फौजा राहतात त्याचे खर्चाचा सुभत्ता[७] इकडे पडेल. सारांश आम्ही लोकांपुढें आपलें स्वाधीन असें नाही[८] ? गेलेली मसलत[९] श्रीमंतांचे प्रतापें सुधारली आहे. साताऱ्याप्रमाणें दिल्लीचें संस्थान जालें आहे. बंदोबस्ताची पैरवी करणें आपल्याकडे आहे. येविसीं वरचेवर पत्रें पाठविलीं आहेत, तीं पावोन ततूंद जाहलीच असेल. रा। छ ९ रबिलाखर बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

**अभ्यास** :—या उताऱ्यांच्या आधारानें आणि इतर माहिती मिळवून पुढील प्रश्नांची चर्चा करा. औरंगजेबानंतर मोगल पादशाहीचा अधःपात फार लवकर कां झाला ? याची पुढील मुद्दे लक्षांत घेऊन चर्चा करा :— (१) स्वतः बादशाहांची वागणूक (२) नादीरशाहाच्या स्वारीचा धक्का. (३) मराठ्यांचा पराक्रम (४) निजाम-उल्-मुल्कसारख्या सरदाराच्या आणि इतर सरदारांच्या वृत्तींतील फरक. (५) सय्यद बंधूंचा कारभार.

———

२ गुजराथ व मेवाड यांमधील देशास रांगडा म्हणतात. तेथील राहाणारा, सामान्यतः राजपूत. ३ चंबळा. ४ नाश. चंबळेपर्यंतचीं ठिकाणें घेऊन आम्हांला इकडे राहू देऊं नये. आमचा नाश करावा, असा अर्थ. ५ साहय. ६ सुरक्षित. ७ सुबत्ता, पुरवठा. ८ आपले—लोकांचे स्वाधीन, आम्ही परस्वाधीन नाहीं असा अर्थ. ९ बिघडलेलें कारस्थान.

भाग ३ रा

# मराठी अंमल

## १ : : सातव्या शतकांतील महाराष्ट्राचा उल्लेख

[ पुढील् उतारा चालुक्य राजा सत्याश्रय पुलकेशी याच्या ऐहोळे येथील कोरीव लेखांवरून दिलेला आहे. याचा काल इ. स. ६३४ (शक ५५६ ) होय. यांत महाराष्ट्राच्या मर्यादा सांगितल्या आहेत. तीन महाराष्ट्रकें म्हणजे (१) अश्मक = खानदेश धरून विदर्भ, (२) कुंतल (कृष्णा कांठचा प्रदेश) आणि (३) अपरान्त (कोंकण) हे प्रदेश होत. महाराष्ट्रक हें महाराष्ट्र शब्दाचें लघुत्वदर्शक रूप आहे. ऐहोळे येथील लेखाचा अधिक परिचय, प्राचीन विभाग, उतारा क्र. ३३ पहा. ]

विधिवदुपचिताभिश्शक्तिभिश्शक्रकल्पः
तिसृभिरपि गुणौघैस्स्वैच्छ माहाकुलाद्यैः
अगमदधिपतित्वं यो महाराष्ट्रकाणां
नवनवतिसहस्त्रग्रामभाजां त्रयाणां ॥२५॥

ज्यानें तिन्ही शक्त्या विधियुक्त आपल्या काबीज केल्या आहेत आणि त्यामुळें जो इंद्रतुल्य दिसत आहे, ज्याच्या उच्च घराण्यांतील जन्मामुळें व इतर उत्कृष्ट गुणांमुळें, आणि आपल्या इच्छाशक्तीनें ज्यानें ९९ हजार खेडीं असलेल्या तिन्ही महाराष्ट्रावर आपलें आधिपत्य मिळविलें

(डॉ. केतकरकृत अनुवाद)

## २ : : : महाराष्ट्रीयांचा स्वभाव

[चिनी प्रवासी ह्युएन्त्संग यानें महाराष्ट्रीयांचें केलेलें वर्णन, 'भगवान् बुद्धासाठीं' ले. श्री. शंकरराव देव, या पुस्तकांतून (पृ. १५३ पहा.) येथें दिलें आहे. ह्युएन्त्संगासंबंधीं अधिक विवेचन प्राचीन विभाग उतारा क्रमांक ३१ पहा.]

" लोकांचा बांधा उंच व राहणी साधी व सरळ आहे. परंतु हे लोक स्वभावानें मानी, व भावनाप्रधान असून कोपिष्ट आहेत. ते अन्नु व कर्तव्य यांना सर्वश्रेष्ठ स्थान देतात आणि मरणाला तुच्छ लेखतात. ते उपकाराबद्दल कृतज्ञ राहतात, परंतु अपमानाचा सूड घेतल्याशिवाय राहात नाहींत. अपमानाचें शल्य जरूर तर प्राणाचा बदला देऊनहि तें काढून टाकतात. परंतु आपत्कालीं जो शरण येईल त्याला स्वतःचें पोट मारूनहि ते मदत करतील. जेव्हां अपमानाचा बदला घ्यावयाचा असतो तेव्हां ते प्रतिपक्षाला अगोदर सूचना देतात व नंतर दोन्ही पक्ष शस्त्रास्त्रांची जुळवाजुळव करून हातांत भाले घेऊन परस्परांशीं लढतात. युद्धांत त्यांच्यापुढें जे माघार घेतात त्यांचा ते पाठलाग करतात व जे शरण येतात त्यांना ते प्राणदान देतात. त्यांचा नायक जर पराजित झाला तर ते त्याला स्वतः देहदंड देत नाहींत, तर त्याला फक्त स्त्रीवेष धारण करण्याला देतात. तो या लांछनापासून स्वतःची मुक्तता करून घेण्यासाठीं बहुधा आत्महत्याच करतो. थोडक्यांत म्हणजे हे लोक भारतांतील एक पराकाष्ठेचे शूर व दाक्षिण्यवृत्तीचे क्षत्रिय आहेत."

**अभ्यास** :—उपरोक्त वर्णन आजच्या महाराष्ट्रीयांशीं कितपत जुळतें ?

---

३ : : : 

# संतांचा मराठीचा अभिमान

[ वारकरी पंथाचे संस्थापक ज्ञानदेव यांनीं आग्रहपूर्वक आपला उपदेश देववाणी संस्कृतमध्यें न करतां मराठींत केला. त्या कालीं लोकभाषेंत पांडित्य दाखविणें म्हणजे वेळेचा अपव्यय होय, असा विद्वानांचा खराखोटा समज होता. पण ज्ञानेश्वरांनीं तथाकथित प्रतिष्ठित कल्पनांचा त्याग करून मायभाषेंत भगवद्गीतेचा अर्थ सांगितला. हीच परंपरा साधु एकनाथांनीं चालविली. धर्मतत्त्वांच्या उपदेशाला मराठी ही अपुरी आहे असें म्हणणारांना ज्ञानेश्वर-एकनाथांनीं पुढील ठणठणीत उत्तर दिलें आहे.

भाषा हा जीवनाचा श्वास आहे. मातृभाषेच्या द्वारा मिळणारें ज्ञान हृदयाला भिडतें. शिवकालीन तुकाराम-रामदास आदि साधुसंतांनीं स्वधर्माचा व स्वभाषेचा अभिमान जागृत केला, त्याच आधारावर शिवाजीला राष्ट्राभिमान जागृत करतां आला. या साधूंनीं आपल्याला रसाळ काव्यानें व कथेंतील उपदेशानें हजारो लोकांना स्वार्थी संसारी वृत्तीपासून परावृत्त करून उच्च ध्येयाच्या भजनीं लाविलें. राज्यक्रांतीला आवश्यक असणारी मनोवृत्ति उत्पन्न होण्यास व रुजण्यास त्या कालीं (मुद्रण कलेच्या अभावीं) कथा व प्रवचनें हाच मार्ग होता व तो संतांच्या हातांत होता. त्यांचें पाठबळ नसतें तर समाज जागृत होणें कठिण होतें. ]

## ज्ञानेश्वर

**माझा मऱ्हाटाचि बोलु कवतिकें।**
**परि अमृतातेंही पैजेसी जींके।**
**ऐसी अक्षरेंचि रसिकें।**
**मेलवीन।**

ज्ञानेश्वरी (राजवाडे प्रत), अध्याय ६, ओवी १४
लेखनकाल, शके बाराशेबारा.

[ स्थूल अर्थ :—मी मराठीच शब्द योजीत आहे परंतु ते असें रसपूर्ण वेचून योजीन कीं ते गोडपणांत प्रत्यक्ष अमृतालाहि सहजासहजीं हार खावयास लावतील. ]

देशियेचेनि नागरपणें ।
शांतु शृंगारातें जीणें ।
वोविया कीं होति लेणें ।
साहित्यासी ॥

ज्ञानेश्वरी (राजवाडे प्रत), अध्याय १० वा, ओंवी ४१

[स्थूल अर्थ :—ही मराठी देशभाषा खरी पण तिच्या सौंदर्याच्या आधारानें शांतरस शृंगाररसावरहि वरकडी करील, आणि या मराठी ओव्या तर सुंदर वाङमयाला केवळ साजाप्रमाणें साजतील. ]

## एकनाथ

संस्कृत वाणी देवें केली ।
तरि प्राकृत काय चोरापासोनि झाली ?
असोतु या अभिमान भुली ।
वृथा बोली काय काज[1] ॥

—एकनाथी भागवत, अध्याय १ ला, ओंवी १२९.

संस्कृत प्राकृत परवडी[2] । सज्ञान सेविति स्वानंद गोडी ।
गाय काळी आणि तांबडी । परि दुधीं वाकुडी चवी नाहीं[3] ॥

एकनाथी भागवत, अध्याय २९–१०३३

लेखनकाल—शके १४९५

१. 'असो. हा सर्व अभिमानाचा भ्रम आहे त्याची व्यर्थ चर्चा कशाला ?' २. वर्णनांत. संस्कृत किंवा प्राकृतांत (मराठींत) वर्णन लिहिलें तरी वाचक त्यांतला आनंद चाखतात. ३. गाय काळी किंवा तांबडी असली तरी तिच्या दुधाला कांहीं निराळी चव नसते. तसेंच भाषेचें आहे असा भावार्थ.

४]

## ४ : : : फादर स्टीफनसनचें मराठीवरील प्रेम

[ अमुक धर्माची अमुक भाषा असते हें मानणें चुकीचें आहे. कोठल्याहि भाषेंत धर्माची शिकवण देतां येते. ख्रिस्ती धर्मप्रचारकांनीं भारतवर्षांत आपल्या धर्माचा प्रचार करतांना मराठी, हिंदी आदि तत्प्रांतीय भाषांचा उपयोग केला. शिवाजी महाराजांच्या पूर्वीं फादर स्टीफनसन नांवाच्या गोंवा प्रांतांतील धर्मोपदेशकानें 'ख्रिस्त-पुराण' मराठींत लिहिलें व छापून प्रसिद्ध केलें ! ग्रंथाच्या आरंभीं त्यानें छोटी प्रस्तावना गद्यांत लिहिली असून बाकी सर्व पुराण ओंवीबद्ध आहे. या पुराणाचे दोन भाग असून एकूण ओंव्यांची संख्या १०,९६२ आहे. ब्राह्मण किंवा विप्र किंवा ख्रिस्तानुयायी शंका किंवा प्रश्न विचारतो व धर्मगुरु त्यांस उत्तरें देतो असें संवादात्मक स्वरूप ग्रंथास आहे. काव्य या दृष्टीनें या पुराणास मानाचें स्थान द्यावें लागेल असें डॉ. कीर्तीकरासारख्यांचें मत आहे. भाषा मराठी असली तरी लिपि रोमन आहे. लेखकाला रोमन लिपीचा सराव व त्याच लिपींत छपाई करणें शक्य होतें म्हणून ही लिपि त्यानें स्वीकारली असावी. देवनागरी टाईप त्या वेळीं अर्थातच तयार झाले नव्हते. प्रस्तावनेंत फादर स्टीफनसन लिहितो :*

"He sarva marathiye bhassena lihile Hea
''हें सर्व मराठिये भासेन लिहिले हया

dessinchea bhassabhittur he bhassa Paramesuarachea
देशीच्या भासांभितुर हे भासा परमेश्वराच्या

vastu niropunni yogue dissali..... "
वस्तु निरोपुणी योग्य दिसली.... "

या ग्रंथाच्या प्रथम अध्यायांत ओंव्या १२१–१२५ मध्यें त्यानें मराठी भाषेवरील अनन्य साधारण प्रेम व्यक्त केलें आहे, त्याच ओंव्या पुढें दिल्या आहेत.

---

* त्यानें लिहिल्याप्रमाणें रोमन लिपींतच हा मजकूर पुढें दिला आहे. चट्दिशीं अर्थ लक्षांत यावा म्हणून त्याखालीं नागरी लिपींत तोच मजकूर जुळविला आहे.

फादर थॉमस स्टीफन्सन हा एका इंग्रज व्यापाऱ्याचा मुलगा. हिंदुस्थानांत आलेला हाच बहुधा पहिला इंग्रज. त्याचा जन्म सन १५४९ असावा. त्याचें शिक्षण झाल्यावर त्याच्या लक्षांत आलें कीं तत्कालीन इंग्लंडांत 'क्याथॉलिक' पंथाप्रमाणें वागणें अवघड होय, म्हणून तो रोमला जेसूइट पंथाच्या संस्थेला मिळाला. त्या संस्थेतर्फे लिस्बनमार्गें तो गोव्यास इ. स. १५७९ मध्यें येऊन पोहोंचला. त्याच भागांत तो ४० वर्षें धर्मप्रसाराचें कार्य करीत राहिला. प्रस्तुतचें पुस्तक त्यानें मुळांत पोर्तुगीज भाषेंत लिहिलें व मग त्यानें त्याचा अनुवाद मराठींत केला (इ. स. १६१४). तें प्रथम १६१६ मध्यें छापलें, पण त्या वेळची एकहि छापील प्रत अद्याप उपलब्ध नाहीं. हस्तलिखित (नक्कल केलेल्या) कांहीं प्रती गोंवा व दक्षिण कानडा जिल्ह्यांत सांपडल्या आहेत. इ. स. १६५४ पर्यंत त्याच्या तीन आवृत्त्या निघाल्या.

फादर स्टीफन्सननें 'कोंकणी भाषेचें व्याकरण' हि लिहिलें, त्यांत फादर रिबेरोनें (Ribero) कांहीं भर घातली. हें पुस्तक या दोघांच्या मृत्यूनंतर इ. स. १६४० मध्यें प्रकाशित करण्यांत आलें. फादर स्टीफन्सन इ. स. १६१९ मध्यें मरण पावला.

अलीकडच्या काळांत मंगलोर येथील श्री. जोसेफ एल्. सलढाना (Saldhana) यांनीं हा ग्रंथ संपादन करून इ. स. १९०७ मध्यें प्रसिद्ध केला. त्यांत ही सर्व माहिती विस्तारानें व आधारासहित दिली आहे. ]

परमशास्त्र जगीं प्रघटावेया[१]
बहुतजनां फलसिधी होवावया।
भासा बांधोनी मराठिया
कथा निरोपिली ॥ १ ॥

जैसी हरळांमाजी[२] रत्नकिळा[३]
कीं रत्नामाजी हिरा निळा।
तैसी भासांमाजी चोखळा।
भासा मराठी ॥ २ ॥

१ प्रगट करण्यास. २ लहान दगड. ३ रत्नाचें तेज.

जैसी पुस्पांमाजी पुस्प मोगरी ।
की परिमळांमाजी कस्तुरी ।
तैसी भासांमाजी साजिरी ।
मराठिया ॥ ३ ॥

पाखियांमधें[४] मयोरू ।
वृखियांमधें[५] कल्पतरु ।
भासांमधें मानु थोरू ।
मराठियेसी ॥ ४ ॥

तारांमधें बारा रासी ।
सप्तवारामधें रवि ससी ।
यां दिपिचेयां[६] भासांमधें तैसी ।
बोली मराठिया ॥ ५ ॥

---

## ५ : : : . शिवकालीन महाराष्ट्राची सीमा

[ डॉ. सुरेंद्रनाथ सेन यांनीं " शिवाजीची परकीयांनीं लिहिलेलीं चरित्रें " Foreign Biographies of Shivaji या नांवाचा ग्रंथ संपादित केला आहे. त्यांत फ्रॅन्सिस मार्टिन (फ्रेंच) कॉस्मा-द-गार्डा (पोर्तुगीज) व दुसऱ्या डच लेखकांनीं शिवाजीसंबंधीं लिहिलेली चरित्रात्मक माहिती इंग्रजींत अनुवाद करून दिली आहे. पोर्तुगीज लेखक कॉस्मा-द-गार्डा यानें इ. स. १६९५ मध्यें म्हणजे सभासदी बखरीच्या अगोदर दोन वर्षें शिवाजीचें चरित्र लिहिलें, त्यांतील प्रारंभींचा उतारा पुढें दिला आहे. महाराष्ट्राची सीमा कोणती तें या उताऱ्यांत आलेलें आहे. ]

---

४ पक्ष्यांमध्यें. ५ वृक्षांमध्यें. ६ द्वीपेचेया-बेटांतील; दक्षिणेकडील प्रदेशास जंबुद्वीप म्हणत. उदाहरणार्थ पूजेस प्रारंभ करतांना ' जंबुद्वीपे, देशे दंडकारण्ये गोदावर्याः दक्षिणेतीरेः ' असा मंत्र म्हणतात.

त्याला शिवाजी म्हणत, कारण शिवा देवीच्या नांवावरून त्याचें नांव ठेविलें होतें. 'जी' हा शब्द आदर दर्शवितो. याच अर्थाचा (पोर्तुगीज) शब्द Senhor आहे. शिवाजी म्हणजे Senhor Seva. तो महाराष्ट्र देशांतील होय. जे हिंदू गोवाशहरापासून सुरतेपर्यंतच्या प्रदेशांत राहतात, त्या सर्वांस महाराष्ट्र देशाचे मानतात.

---

## ६ : : : शिवपूर्वकालीन दुःस्थिति

[ शिवाजी महाराजांच्या समकालीन संत पुरुषांत तुकाराम व रामदास यांची जोडी प्रसिद्ध आहे. संत तुकाराम इ. स. १६५० त समाधिस्थ झाले. त्यांचा कल परमार्थाकडे विशेष होता. तथापि त्यांनींहि प्रसंगोपात् समाजस्थिति दाखविणारे उद्‌गार काढले आहेत. समर्थ रामदास हे धनुर्धारी रामचंद्राच्या पूजेचा प्रचार करणारे व राजकीय दास्यविमोचनार्थ चिंतन करून लोकजागृति करणारे साधु होऊन गेले. त्यांनीं तत्कालाचें केलेलें वर्णनहि दुसऱ्या उताऱ्यांत दिलें आहे. रामदास हे इ. स. १६८१त समाधिस्थ झाले.]

(१)

सोडिले आचार । द्विज चहाड झाले चोर
टिळे लपविती पातडी* । लेती विजारा कातडी
नीचाचे चाकर । चुकलीया खाती मार
राजा, प्रजा पीडी । क्षत्री दुश्चितासी जोडी
वैश्यशुद्रादिक । हे तों सहज नीच लोक
तुका म्हणे देवा । काय निद्रा केली धांवा ॥

—संत तुकाराम (तुकारामाची गाथा)
निर्णयसागरसंग्रह—क्र. २७३४

(२)

पदार्थ मात्र तितुका गेला । नुस्ता देशाचि उरला ।
येणें करितां बहुताला । संकट जालें ॥१॥

* पंचांग

लोकें स्थानभ्रष्ट जालीं। कितेक तेथेंचि मेलीं।
उरलीं तें मराया आलीं। गांवावरी ॥२॥
माणसा खावया धान्य नाहीं। आंथरूण पांघरूण तेंहि नाहीं।
घर कराया सामग्री नाहीं। काये करिती ॥३॥
पुढें आला प्रजन्य काळ। धान्य महर्ग दुःकाळ।
शाकार नाही भळभळ। रिचवे[1] पाणी ॥४॥
कितेक अनाचारीं[2] पडिलीं। कितेक यातिभ्रष्ट[3] जालीं।
कितेक ते आक्रंदलीं। मुलेंबाळें ॥५॥
कितेक विषें घेतलीं। कितेक जळीं बुडालीं।
जाळिलीं ना पुरिलीं। किती येक ॥६॥
ऐसें जालें वर्तमान। पुढें हि अवघा अनमान[4]।
सदा दुश्चीत[5] अवघे जन। उद्वेगरूपी ॥७॥
कांहींच पाहातां धड नाहीं। विचार सुचेना कांहीं।
अखंड चिंतेचा प्रवाहीं। पडिले लोक ॥८॥
येक म्हणती कोठें जावें। येकें म्हणती काये करावे।
विदेशा जाउनि काये खावे। वेच[6] नाहीं ॥९॥
तथापि मार्गाचि चालेना। भिक्षा मागतां मिळेना॥
अवघे भिकारी च जना। काय म्हणावें ॥१०॥
प्राणीमात्र जाले दुखी। पाहातां कोण्ही नाहीं सुखी।
कठिण काळे वोळखी। धरीनात कोण्ही ॥ ११ ॥

—रामदास

---

१ सांडणें, ओतणें. २ धर्मविरुद्ध आचरण ३. जातिभ्रष्ट. ४ संशय.
५ मन स्वस्थ नाहीं. ६ खर्च करण्यास पैसा.

## ७ : : : मोगलाशीं टक्कर देणारा शहाजी

[ अहमदनगरची निजामशाही व विजापूरची आदिलशाही येथील राजकारणाचीं सूत्रें खेळविणारा शूर व वजनदार मुत्सद्दी म्हणून शहाजी दक्षिणेंत सतराव्या शतकांत ओळखला जात असे. निजामशाहीची पुनः उभारणी करण्यासाठीं त्यानें फार खटपट केली. ती शिवभारतांतील अध्याय ९ मध्यें श्लोक १ ते ३५ पर्यंत वर्णिली आहे. त्यांतील मुख्य भाग पुढें दिला आहे. पहाः–शिवभारत, (संपादक–स. म. दिवेकर) पृ. ७८. कंसांतील आकडे श्लोकांचे आहेत.

### शिवभारत कसें सांपडलें ?

'शिवभारत' हा शिवकालीन ग्रंथ प्रकाशांत आल्याचा इतिहास उद्‌बोधक आहे. प्रस्तुतची उपलब्ध प्रत कै. स. म. दिवेकर यांनीं संपादिलेली आहे. त्यास कै. द. वि. आपटे यांनीं या 'ग्रंथांतील गोष्टी इतर पुराव्यांनीं कशा सिद्ध होतात' हें दर्शविणारी विद्वत्ताप्रचुर प्रस्तावना लिहिली आहे (इ. स. १९२७).

तंजावर येथील 'सरस्वती महाल पॅलेस लायब्ररी' मध्यें अनेक हस्तलिखित ग्रंथ आहेत, त्यांत रामदास-शिवाजीसंबंधीं कांहीं साधनें मिळाल्यास पहावीं या हेतूनें कै. दिवेकर तेथें गेले. ते लिहितात "तामील, तेलुगू, कानडी, संस्कृत, मराठी आदि भाषांत हें लिखाण आहे. तेथें या साधनांची अव्यवस्थाच होती, पण चिकाटीनें ग्रंथ चाळीत असतां 'तामील भाषेंत शिवभारत या नांवाचा ग्रंथ अदमासें दोन अडीच बोटें रुंदीच्या व सुमारें दोन विती लांबीच्या ताडपत्रावर दोन्ही बाजूंनीं लिहिलेला उपलब्ध झाला. त्याच्या कांहीं भागांचें भाषांतर तेथील व्यवस्थापकांकडून ऐकावयास मिळालें'; पुढें त्यांनीं या ग्रंथाची नक्कल मिळविली व यत्न करून त्याचें इंग्रजी भाषांतरहि करवून घेतलें. तें वाचीत असतां याचें मूळ संस्कृतांत असावें असें वाटून शोध सुरू केला. तंजावर ग्रंथालयाचें नकारार्थी उत्तर आलें; तेव्हां यूरोपमध्यें पौर्वात्य ग्रंथसंग्रह ठिकठिकाणीं आहेत तेथें चौकशी सुरू केली, तेव्हां जर्मन ओरिएन्टल सोसायटी, लायपझिग, या संस्थेच्या कॅटलॉगांत 'शिवभारताचा' उल्लेख व तो तंजावरच्या ग्रंथालयांतच आहे असें दर्शविणारा क्रमांक मिळाला. हा क्रमांक तंजावर ग्रंथ संग्रहास कळवितांच तो ग्रंथ तेथें असल्याचें उत्तर आलें ! तामीळ ग्रंथाशीं ताडून पाहतां याच ग्रंथाचा तो अनुवाद होय हेंहि लक्षांत आलें." सुमारें ९ वर्षें हा उद्योग श्री. दिवेकर करीत होते.

प्रस्तुतचा ग्रंथ त्रुटित स्वरूपांत म्हणजे अध्याय ३२ पर्यंतचाच सांपडलेला आहे. त्यांत 'मालोजीपासून तों शके १५८३ मध्यें सूर्यराजाचें शृंगारपूर हस्तगत करून तेथें त्र्यंबक भास्करास अधिकारी नेमलें' येथपर्यंतच वर्णन आहे. या ग्रंथाचा पुढील भाग आतां उपलब्ध झाल्याचें कळतें.

शिवभारत ग्रंथारंभीं, "तीर्थयात्रेच्या निमित्तानें काशी येथें कवीन्द्र गेला असतां, त्यानें तेथील पंडितांना भागीरथी नदीचे कांठीं बसून हें पुराण सांगितलें अशी भूमिका घेतली आहे......" यामुळें कवीन्द्र हा वक्ता व काशी येथील पंडित हे श्रोते अशी मांडणी केलेली असून पंडितांनीं प्रश्न विचारावे व परमानंदानें उत्तरें देऊन माहिती सांगावी अशी हरएक प्रसंगाची पद्धति आहे.

शंकराच्या दृष्टांताचें निमित्त युद्ध थांबविण्यासाठीं भारतकारानें दिलें, तें पटणारें नसलें तरी 'मोगल आटपत नाहींत' म्हणून तह झाला ही गोष्ट मात्र खरी दिसते. तसेंच तत्कालीनास शहाजीच्या पराक्रमाची जाणीव होती हेंहि यावरून स्पष्ट होईल. कारण तह केल्यावरहि आदिलशाहानें मोठ्या इतमामानें त्यास आपल्या नोकरींत घेतलें.

एकट्याच्या बळावर बलाढ्य मोगलांशीं तीन वर्षें टक्कर देणारा शहाजी स्वराज्यसंस्थापकाचा पिता शोभतो यांत शंका नाहीं. तत्कालीन मराठ्यांचें सामर्थ्य कसें आक्रमक होऊं लागलें होतें हें त्याच्या रूपानें समजून येतें. ]

**(१–२) पुढें देवगिरी प्राप्त झाल्यानें दिल्लीच्या बादशाहास आनंद झाला असतां व उन्मत्त महमूदशाहास आपलें सैन्य पराभूत झाल्यानें विषाद वाटला असतां शहाजी राजानें निजामशाहाचे शिवनेरी इत्यादि अनेक गड भराभर घेतले.**

**(३–४) तसेंच अत्यंत पवित्र गोदावरी, प्रवरा, क्षीरसमुद्रासारखें पाणी असलेली नीरा, भयंकर भीमा, यांच्या कांठचा सर्व प्रदेश क्रमाक्रमानें पादाक्रांत करून त्यानें सह्याद्रीसुद्धां लगेच आपल्या ताब्यांत आणला.**

**(५–७) शहाजी दिल्लीच्या बादशाहाविरुद्ध झालेला पाहून घाटगे, कांटे, गायकवाड, कंक, ढोमरे, चव्हाण, मोहिते, महाडिक, खराटे, पांढ, वाघ, घोरपडे इत्यादि महाराष्ट्रीय (मराठे) राजे त्यांस येऊन मिळाले आणि शहाजीनें त्यांस सेनापती केलें.**

(८–९) पुढें शहाजीस जिंकण्याच्या हेतूनें शहाजहाननें आदिलशाहाबरोबर लागलीच तह केला आणि त्या राजेंद्र शहाजीस जिंकू इच्छिणाऱ्या त्या दोघांनीं भीमा नदी ही परस्परांच्या मुलखामधील हद्द ठरविली.

(१२) सूर्याप्रमाणें प्रतापी शहाजीनें शहाजहान आणि आदिलशाह यांच्या सैन्याबरोबर तीन वर्षें युद्ध केलें.

(१३–१८) .... त्याला स्वप्नांत शंकरानें सांगितलें हा महातेजस्वी दिल्लीपति पृथ्वीवर अजिंक्य आहे, म्हणून हे शहाण्या राजा, तूं हा लढाईचा नाद सोडून दे. ....याचा संहार करण्यासाठीं जो पृथ्वीवर अवतरला आहे तो भगवान् विष्णु, शिव नांवाचा तुझा मुलगा झाला आहे....म्हणून हे महाबाहो तूं कांहीं काळ वाट पहा.

(२१) शहाजी हा हट्टी स्वभावाचा असतांहि त्यानें आपला हट्ट सोडून शंकराच्या आज्ञेप्रमाणें दिल्लीचा बादशाह आणि आदिलशाह यांच्याशीं तह केला.

(२२–२५) निजामशाहाचें राज्य मिळाल्यानें परमुलखावर हल्ला करणारे ते मोगल परत फिरले असतां, शहाण्या आदिलशाहास आपण दुर्बल आहों असें वाटूं लागलें आणि त्यानें आपल्या मनांत विचार केला कीं, ज्या सामर्थ्यवान् मोगलांनीं निजामशाहास युद्धांत बुडविलें ते मलाहि बुडवतील, म्हणून ह्या महाबाहू शहाजीस आपल्या मदतीस घेऊन मी आपलें इष्ट कार्य साधीन.

(२९) असा मनांत विचार करून त्या महातेजस्वी महमूदशाहानें शहाजीकडे आपले अमात्य पाठविले.

(३०) त्या मंत्रकुशल सेनानींनीं शहाजीचें मन वळविलें आणि त्यानें आदिलशाहास साह्य करण्याचें वचन दिलें.

(३१) .... शहाजी राजाचा आधार मिळाल्यामुळे महमूदशाहास पदोपदीं मोठा आनंद होऊं लागला.

---

## ८ : : : शिवाजीचा जन्म

[ शिवाजीचा जन्म एके काळीं शके १५४९ वैशाख शु. २ (इ. स. १६२७) असा समजला जात असे, याचें कारण कित्येक बखरींत शके १५४९ हें शिवजन्माचें साल दिलें जाई. पण सभासद बखरींत जन्मतिथि दिलेली नाहीं. अन्य बखरी उत्तर पेशवाईंतील असल्यानें तो पुरावा विश्वसनीय नव्हता. या कोणत्याहि बखरींत शिवाजीचा जन्म तिथि, वार, नक्षत्र, शक यांसह बिनचूक दिलेला नाहीं. मराठी इतिहासाच्या साधनांत समकालीन अस्सल पत्रकांइतकेंच नसलें, तरी त्याच्या खालोखाल समकालीन शकावलींना महत्त्व आहे. या शकावल्या पूर्वी प्रत्येक मोठ्या घराण्यांत तयार करीत. जेधे शकावली अशाचपैकीं आहे. या शकावलींत अनेक महत्त्वाचे उल्लेख अचूक सांपडतात.

जेधे शकावलींत निर्दिष्ट केलेल्या शिवाजीच्या जन्मतिथीस आणखी स्वतंत्र पुरावा मिळतो. कवींद्र परमानंदानें शिवाजीच्या हयातींत लिहिलेलें 'शिवभारत' नांवाचें काव्य आहे, त्यांतहि शके १५५१ फाल्गुन व. ३ हीच तिथि आहे. तसेंच तंजावर येथें बृहदीश्वराच्या देवालयावर असलेल्या शिलालेखांत शिवभारताच्या आधारें याच सालाचा उल्लेख आहे. याखेरीज पं. गौरीशंकर ओझा यांच्या प्राचीन कुंडली संग्रहांत असलेली शिवाजीची कुंडली याच तिथीस जुळणारी आहे. इतके स्वतंत्र, समकालीन व विश्वसनीय पुरावे एकत्र मिळाल्यानें शिवाजीची परंपरागत जन्मतिथि बदलून बहुतेक इतिहासकारांनीं या तिथीचा स्वीकार केला आहे.

× × ×

तथापि अशा प्रसंगांचा निर्णय करतांना संशोधकाची दृष्टि तरुण अभ्यासकांस यावी म्हणून प्रमुख बखरींतील व या विषयाचे वर उल्लेखिलेले अन्य उतारे पुढें दिले आहेत.

बखरींत तरी कां होईना चुकीचा शक कसा असावा याचा छडा लागणें कठिण आहे, पण तो न लागल्यानें इतिहासाच्या कांहीं अभ्यासूंना अद्याप जुनी तिथि अमान्य करणें अवघड वाटते. या चुकीची काहींशीं मीमांसा श्री. ज. स. करंदीकर यांनीं 'पराग' मासिकाच्या सप्टेंबर १९४८ च्या अंकांत पुढीलप्रमाणें केली आहे:

"गुरुवार शाबान १४ हा अकबराचा वास्तविक जन्मदिवस असतां कोणाला कांहीं करणी करितां येऊं नये म्हणून मुद्दाम रविवार रजब ५ हा खोटा जन्मदिन प्रचलित करण्यांत आला, असें व्हिन्सेंट स्मिथनें

'अकबर दी ग्रेट मोगल' या पुस्तकांत (पृ. १८ वरून) म्हटलें आहे. यावरून राजघराण्यांतील किंवा इतर प्रसिद्ध पुरुषांची खरी जन्मतिथि गुप्त राखण्यासाठीं भलताच जन्मदिवस रूढ करण्याची प्रथा त्या वेळीं होती हें दिसून येतें. याच कारणावरून शिवाजी महाराजांचाहि खरा जन्मदिवस गुप्त राखून, त्यांच्या पूर्वींच्या अल्पवयांत मृत्यु पावलेल्या भावाचा जन्मदिवस किंवा कोणता तरी एक कल्पित दिवस 'शिवाजीचा जन्मदिवस' म्हणून रूढ करण्यांत आला असावा. इ. स. १६२७ मधील जन्मतिथि प्रचारांत कां आली या शंकेचें निरसन अकबराच्या जन्मदिवसाच्या फेरबदलावरून होईल, असा भरंवसा वाटतो, "

खालीं शिवजन्मतिथीचे आधार-ग्रंथांतील अनेक उल्लेख दिले आहेत. ]

—१—

त्या समयांत इकडे जिजाबाईसाहेब गुरुदर म्हणोन शिवनेरी येथें ठेविली होती. त्यास (पुत्र जाला.) शिवनेरी येथें शिवाई देवी बहुत जागृत आहे. तिजला बाईसाहेबांनीं नवस केला जे पुत्र जाला म्हणजे तुझें नांव ठेवीन. त्यानंतर दिवस पूर्ण होवून प्रसूत सुसमयीं शके १५४९ पंधराशें एकूणपन्नास प्रभवनाम संवत्सरे वैशाख शु॥ २ गुरुवारीं पुत्र जाला. शुभ चिन्हे जालीं. विजापुरीं महाराज यांस शुभ शकून जाले. सा गृह अुच्च पडले. सर्व लक्षण संपन्न जाले. नांव शिवाजी राजें ऐसे ठेविले. शाहाजी राजे यांस स्वप्नगत दृष्टांत जाला....

—शिवचरित्र प्रदीप पृ. ७५. चिटणीस बखर

× × ×

—२—

शके १५५१ शुक्ल संवत्सरें
फालगुण वद्य त्रितीया शुक्रवार नक्षत्र
हास्त घटी १८ पळे ३१ गड ५
पळे ७ ये दिवसी राजश्री सिवाजी राजे
सिवनेरीस उपजले १
श्रावणे पुर्णिमेस लुखजी जाधवराव
नीजामशाहानीं मारिले १

— शिवचरित्र प्रदीप पृ. १६. जेधे शकावलि.

× × ×

—३—

*भूबाणप्राणचन्द्राब्दैः सम्मिते शालिवाहने ।
शके संवत्सरे शुक्ले प्रवृत्तेचोत्तरायणे ॥
शिशिरर्तौ वर्तमाने प्रशस्ते मासि फाल्गुने ।
कृष्णपक्षे तृतीयायां निशि लग्ने सुशोभने ॥
अनुकूलतरैस्तुंगसंश्रयैः पञ्चाभिर्ग्रहैः ।
व्यंजिताशेषजगति स्थिरसाम्राज्यवैभवम् ॥
अपारलावण्यमयं स्वर्णवर्णमनामयं ।
कमनीयतमग्रीवमुन्नतस्कन्धमण्डलम् ॥
अलिकान्तामिलत्कान्तकुन्तलाग्राविराजितम् ।
सरोजसुन्दरदृशं नवकिंशुक नासिकम् ॥
सहजस्मेरवदनं घनगंभीर निस्वनम् ।
महोरस्कं महाबाहुं सुषुवे साद्भुतं सुतम् ॥

शालिवाहन शके १५५१ शुक्लनाम संवत्सरीं, उत्तरायणांत शिशिर-ऋतूमध्यें फाल्गुन वद्य तृतीयेला रात्रीं शुभ लग्नावर, अखिल पृथ्वीचें साम्राज्यवैभव व्यक्त करणारे पांच ग्रह अनुकूल व उच्चीचे असतांना तिनें अलौकिक पुत्ररत्नास जन्म दिला. त्याचें लावण्य अपार, वर्ण सुवर्णासारखा, शरीर निरोगी, मान अत्यंत सुंदर व खांदे उंच होते; त्याचे नेत्र कमळाप्रमाणें सुंदर, नासिका ताज्या पळसाच्या पुष्पासारखी, मुख स्वभावतःच हंसरे, स्वर मेघासारखा गंभीर, छाती विशाल आणि बाहू मोठे होते.

यतःशिवगिरेर्मूर्ध्नि जातसः पुरुषोत्तमः ।
ततःप्रसिद्धा लोकेऽस्य शिव इत्याभिधाऽभवत् ॥

शिवनेरी किल्ल्यावर ह्या पुरुषश्रेष्ठाचा जन्म झाला म्हणून त्याचें "शिव" असें नांव लोकांत प्रसिद्ध झालें.

—शिवभारत, अध्याय ६ श्लोक २६ ते ३१ व ६३

* भू–१, बाण–५, प्राण–५, चंद्र–१ = १५५१

--४--

[ बिआवर संस्थानांतील पं. मीठालाल व्यास यांच्या संग्रहांतील जुन्या बाडांत शिवकालीन अनेक कुंडल्या आहेत व त्या विश्वसनीय आहेत, याविषयीं संशोधक रायबहादूर गौरीशंकर ओझा यांनीं सविस्तर विवेचन केलें आहे. त्यावरून बाडांतील शिवाजी महाराजांच्या कुंडलीचें हस्ताक्षर शिवकालीन शिवराम ज्योतिषाच्या हातचें आहे असें ठरतें. तें जन्म टिपण पुढें दिलें आहे. शकवर्षसंख्येंत १३५ मिळविलें म्हणजे संवत्सरवर्षसंख्या येते. १५५१ + १३५ = १६८६ ]

संवत् १६८६, फुल्गून वदिय शुक्रे उ. घटी ३०।९ राजा शिवाजी जन्मः। र १०।२३ ल ४।४९.




--'शिवभारत' प्रस्तावना–पृष्ठ ८९

---

**अभ्यास** :––यांतील समकालीन उतारे कोणते? त्यांचें महत्त्व काय? त्यांत जन्मतिथि कोणती दिली आहे? चिटणीशी बखरींत काय जन्मतिथि दिली आहे? त्यांतील खरी तिथि कोणती असावी? तुमच्या मताला पोषक कारणें सांगा.

२. शिवभारतांत आंकड्यांत तिथि न देतां 'भूबाणप्राणचंद्राद्वैः' अशा शब्दसंकेतांत दिली आहे. असलीं कांहीं उदाहरणें संस्कृतज्ञांस विचारा.

---

## ९ : : : मऱ्हाष्ट राज्य

शिवचरित्र प्रदीप, पृ. ४३-४४ } { जेधेकरीना*

[ राज्यस्थापनेपूर्वी मावळांत जमवाजमव करणाऱ्या लोकांना राज्यस्थापनेच्या काय कल्पना होत्या तें या उताऱ्यावरून कळून येतें. या उताऱ्यांत ' मऱ्हाष्टराज्य' हा महत्त्वाचा शब्द आहे. ]

### मावळांत जमवाजमव

त्यावरी राजश्री स्वामीनी[1] हुकुम केला की वरकड मावळचे देशमुख व तुम्ही येक जागा बैसोन त्यांचा मुदा[2] मनास आणवणे त्यावरी कान्होजी[3] ना[4] व अवघे मावळचे देशमुख येके जागा बैसले तेव्हा अवघे देश मुख बोलिले की तुमचा विचार काये तो सांगणे तेव्हा बोलले की आम्ही राजश्री स्वामीच्या पायासी इमान धरून वतनास देखील पाणी सोडिले आम्ही व आपले लेक देखील राजश्री स्वामी पुढे खस्त[5] होवे यैसा आमचा दृढ विचार आहे तुमचा मुदा काय तो बोलणे मुसलमान बेइमान आहे कार्य जालियावरी नस्ते निमित्य ठेऊन नाश करील हे मऱ्हाष्टराज्य आहे अवघियानी हिंमत धरून जमाव घेऊन राजश्री स्वामी संनिध राहोन येकनिष्ठेनें सेवा करावी यैश्या हिंमतीच्या गोष्टी सांगितल्या तेव्हा अवघे देशमुख बोलिले की तुमचा विचार तोच आमचा विचार इमानपुरस्कर[6] आहे यैसे बोलिले तेव्हा अवघे देशमुख घेऊन राजश्री स्वामी संनिध आले अवघ्यानी शफत केली मग अवघ्यास भोजनास घातले त्यावरी अगदी[7] मावळचा जमाव केला.

**अभ्यास**:—' महाराष्ट्रराज्य ' स्थापन करण्यांत त्या वेळच्या लोकांचे काय हेतू होते ?

---

*हकीकत. जेधेकुटुंबाची हकीकत. असे करीने पूर्वी लिहिले जात व वंशपरंपरा त्यांतील हकीकत वाढविली जाई.

१ मोकळी जागा ' शिवाजी 'साठीं सोडली आहे. बहुमानार्थी नांव न घेतां पत्रांत मोकळी जागा सोडण्याची चाल असे. २ मुद्दा. ३ कान्होजी जेधे. ४ नाईक. ५ झिजावे, खर्ची पडावे. ६ विश्वासपूर्वक. ७ निर्भेळ.

## १० : : शिवाजीचा फडशा पाडण्याबद्दल अफजलखानास हुकूम

[ इ. स. १९२७ सालीं शिवाजीच्या जुन्या जन्म तिथीप्रमाणें मुंबईस त्रिशत् सांवत्सरिक उत्सव झाला, त्या वेळीं 'शिवाजी सोव्हेनीर' हा इंग्रजी-मराठी-गुजराथी ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्यांतील मराठी भाग पृ. १२०–१२१ वर हें फरमान (राजपत्र) दिलें आहे. पत्रांतील मजकुरावरून खानाचा शिवाजीकडे येण्याचा उद्देश स्पष्ट होतो.

हें पत्र कै. स. ग. जोशी यांनीं मिळविलें. जोशी यांच्यासारख्या संशोधकांनीं मावळच्या देशमुख देशपांड्यांकडून अशासारखे कागदपत्र मिळविण्यांत इतिहाससंशोधक राजवाडे यांची परंपरा पुढें चालविली. यामुळें मराठ्यांचा इतिहास अस्सल साधनांच्या द्वारें प्रकट होण्यास केवढी तरी मदत झाली आहे. ]

हे आलि पैगंबरान् साह्य कर.

सुलतान महंमद पादषाह नंतर ईश्वराचे कृपेकडून आलि आदिलषाह पादशाह याणी चंद्र सूर्यावर पादषाही शिक्का ठोकिला. म्हणजे चंद्रसूर्य आहेत तोंपर्यंत हा हुकूम सर्वांनीं मान्य करावा. यदर्थीं हा शिक्का ठोकिला आहे.

कान्होजी जेधे यांस हा फर्मान सादर केला जातो जे. सु॥ तिसा खमसैन* व अलफ. शिवाजी महाराज याणी अविचार व अज्ञानपणाने निजामशाहाचे कोकणातील रहाणारे मुसलमान लोकांस उपद्रव देण्याचा हात लांबवून लुटालुट करून पातषाही मुल्कातील कितेक किल्ले आपले हस्तगत केले आहेत. यास्तव शिवाजीचा पराभव करण्या प्रीत्यर्थ महासामर्थ्य व पराक्रमाधार व प्रकृतीचे मान वोळखणार व कार्यभार जाणणार व श्रेष्ठ वजीर मंडळींतील अति उत्तम व संभावित मानकरी मंडळींतील मुख्य व शूरत्व व पराक्रम समुद्रांतील केवळ सुसरच व बुद्धिमानपणा व यशाचे खाणीतील मुक्ताफळ व शूरत्वाचे रणभूमीतील अश्वारूढ व पराक्रम भूमीतील महाशूर व अत्यंत कृपा करण्यास व योग्यता वाढविण्यास योग्य व सहस्रावधी प्रकारच्या कृपा

*१ सुहुरसन १०५९ (तिसा = ९ खमसैन = ५० अलफ = १०००)

व स्तव करण्यास पात्र व संभावितपणाची स्थिति आहे ज्याची व संपत्तीचे केवळ चिन्हच व पुत्रवत अधिकाराचे व या काळांतील सर्व शिपायी मंडळीचे सरदार व श्रेष्ठत्वाचे आकाशातील अतितेजस्वी नक्षत्र व सर्व विद्वानांचे विद्वान व मुलकी व कालीकामाचा बंदोबस्त ठेवणार व कल्याण इच्छक मंडळीतील प्रमुख व मुलुख घेणार व राज्य हस्तगत करणार असे जे अफजलखान महमदषाही यांस कृपाळू होऊन तिकडील सुभेदारी देऊन महाप्रळय कारक फौजेसहित नेमून पाठविले आहेत तरी खान मा[1] निलेचे रजामंदींत[2] व ताबेदारीत तुम्ही राहून शेवकपणाचे अधिकार सिद्धीस नेऊन शिवाजीचा पराभव करून निर्मूळ फडशा करावा, आणि शिवाजीचे निसबतीचे[3] लोक ज्या ज्या ठिकाणीं राहिले असतील व जेथजेथून येतील त्या लोकास आश्रय न देतां त्यांस ठार मारून या सरकारचे दौलतीचे कल्याण इच्छिणे व उत्तम सेवा करून दाखविणेची चाल प्रसिद्ध करून दाखवावी. कारण कीं खान मशारनिलेचे लिहिण्यावरून दौलतीचे कल्याण इच्छिणेची चाल तुमची या सरकारांत मंजूर होऊन तुमची योग्यता वाढविली जाईल व तुमचें कल्याण करण्यांत येईल व खान म।। निले हे इकडील दौलतीचे कल्याण इच्छिण्याविषयीं व पादशाही मसलती प्रकर्णी तुम्हांस जे कांहीं सांगतील व लिहितील तें तुम्ही कबूल करून त्याच प्रमाणें वर्तणूक करीत जावी व खान म।। निलेचे सांगण्या व लिहिण्याप्रमाणें जो कोणी वर्तणूक न करील त्याने पुरते जाणावे कीं त्यास कदापि उत्तम फल होणार नाहीं. हे जाणोन ह्या सरकारी आज्ञे।। चालावे तेरीख ५ माहे सवाल सन १०५९ (१६।६।१६५९) अतिश्रेष्ठ व कल्याणकारक अतिपवित्र सूर्यवत प्रसिद्ध सरकारची हुजुरची परवानगी जाली असे.

**अभ्यास :**—जुन्या पत्रव्यवहारांत आढळणारी अघळपघळ विशेषणांची खैरात या पत्रांत दिसून येईल.

---

**टीप :**—फरमानाचें हें भाषांतर पूर्वकाळचें तसेंच दिलें आहे. असें गो. स. सरदेसाई यांनीं शिवाजी सोव्हेनीर मध्यें म्हटलें आहे.

१ मशारनिल्हे—वर सांगितलेला. २ रजा—हुकूम. रजामंदी—खुषी संमति ३ तर्फेचे

## ११ : : : शिवाजी-खानाची झटापट

[ 'शिवभारत' या ग्रंथाच्या अध्याय २१ मध्यें अफझलखान-शिवाजी भेटीचें वृत्त आहे, तें पुढें दिलें आहे. परिच्छेदाच्या आरंभींचे आकडे श्लोकांचे आहेत. ग्रंथ परिचय क्रमांक ७ मध्यें दिला आहे. ]

कवीन्द्र म्हणाला—

१–२ नंतर एकमेकांच्या भेटीकरितां उद्युक्त, त्या गोष्टीचा ध्यास लागलेल्या तत्पर व आपआपल्या राजनीतीनें वागणाऱ्या त्या दोघांचा दूतांच्या (वकिलांच्या) द्वारें जसा करार झाला तसा सर्व सांगतों, हे पण्डितांनो ? ऐका.

३–८ आपलें सैन्य जसें आहे तसें ठेवून एकट्या अफजलखानानें स्वत: सशस्त्र निघावें आणि पालखींत बसून पुढें जावें; त्याच्या सेवेसाठीं दोन तीनच सेवक असावेत; तसेंच त्यानें प्रतापगडाच्या पायथ्याजवळ स्वत: येऊन तेथेंच सभा मंडपांत वाट पहात रहावें. आणि शिवाजीनें सशस्त्र येऊन त्या पाहुण्याचा आदरसत्कार गौरवानें यथाविधि करावा. दोघांच्याहि रक्षणासाठीं सज्ज, स्वामिनिष्ठ, शूर व निष्ठावान् अशा दहा दहा सैनिकांनीं बाणाच्या टप्प्यावर येऊन मागें उभे राहावें; आणि दोघांनींहि भेटल्यावर सर्वच लोकांना अत्यानंदकर असें गुप्त बोलणें (खलबत) तेथें करावें.

११–१८ उपाध्यायानें सांगितल्याप्रमाणें विविध प्रकारांनीं देवाधिदेव शंकराची नित्याप्रमाणें पूजा करून, नित्याचा दानविधि उरकला, थोडेसें जेवले. स्वत: शुद्ध परिमित जल वारंवार आचमनाप्रमाणें पिऊन त्या तुळजा देवीचें क्षणभर मनांत चिंतन केलें, तत्कालोचित असा आपला वेष केला, जगांत अप्रतिम असें आपलें मुख आरशांत पाहिलें, लगेच आसनावरून उठून आणि पुरोहितास व दुसऱ्या ब्राह्मणांस नमस्कार करून त्या सर्वांचा शुभाशीर्वाद घेतला. दहीं, दूर्वा आणि अक्षता यांस स्पर्श केला, सूर्यबिंब पाहिलें, पुढें उभ्या असलेल्या सवत्स गाईजवळ येऊन लगेच ती सुवर्णासह गुणवान् ब्राह्मणास दिली, आपल्या मागोमाग येण्यासाठीं सज्ज असलेल्या पराक्रमी अनुयायांस प्रतापगडाच्या रक्षणार्थ नेमलें आणि मनांत कपट ठेवून समीप येऊन राहिलेल्या त्या यवनाकडे तो महाबुद्धिमान् शिवाजी आपल्या पाहुण्याला ज्याप्रमाणें सामोरें जावें त्याप्रमाणें स्नेहभावानें गेला.

२५–२६ क्रुद्ध यमाप्रमाणें समोर उभा असलेल्या त्या दक्ष वीर शिवाजीचा

विश्वास आपल्यावर बसवून घेण्यासाठीं, आपल्या हातांत असलेली अकुंठित तरवार त्या क्रुद्ध,कपटी खलानें जवळ असलेल्या आपल्या सेवकाच्या हातांत दिली.

२७ मग खोटा स्नेह दाखवून प्रतिकूल दैवानें पछाडलेला तो खान त्यास मोठ्या स्वरानें म्हणाला,

३० म्हणून आज मी तुज उद्धटाला शिक्षा लावण्यासाठीं आलों आहें. हे गड दे, लोभीपणा सोड आणि मला शरण ये.

३३ अरे शहाजीराजाच्या पुत्रा, पोरा, आपली शहाणपणाची घमेंड सोडून (आपला) हात माझ्या हातांत दे, ये आलिंगन दे.

३४ असें बोलून त्यानें त्याची मान डाव्या हातानें धरून दुसऱ्या-उजव्या हातानें त्याच्या कुशींत कट्यार खुपसली.

३५-३६ बाहुयुद्धनिपुण शिवाजीनें लगेच त्याच्या हातांतून मान सोडवून घेऊन अत्यंत गंभीर ध्वनीनें दरी दुमदुमवून टाकली आणि गोंधळून न जातां आपलें अंग किंचित् आकुंचित करून शिवाजीनें आपल्या पोटांत घुसणारी ती कट्यार स्वतः चुकविली.

३७–३९ "हा वार तुला करतों तो घे, मला धर" असें म्हणतच, सिंहासारखा स्वर, सिंहासारखी गति, सिंहासारखे शरीर, सिंहासारखी दृष्टि, सिंहासारखी मान असलेला व आपल्या दोन्ही हातांनीं फिरविलेल्या नागव्या तरवारीनें शोभणारा तो धैर्यवान् व कर्तृत्ववान् (करारी) शिवाजी, त्या वैऱ्याचा सूड घेण्यास प्रवृत्त होऊन त्यानें आपल्या तरवारीचें टोंक त्याच्या पोटांतच खुपसलें.

४० त्यानें शत्रूच्या पोटांत पाठीपर्यंत झटकन् खुपसलेली ती तरवार सर्व आंतडीं ओढून बाहेर पडली.

४३–४६ नंतर आपल्या रक्ताच्या धारांनीं भूमि भिजवून झिंगलेल्या माणसाप्रमाणें मूर्च्छेनें झोकांड्या खात खात अतिविव्हल होत्साता तो खान शिवाजीच्या शस्त्राच्या योगानें पोटांतून बाहेर पडलेलीं आंतडीं जशींच्या तशींच सर्व आपल्या हातानें धरून " ह्यानें मला येथें ठार केलें, ह्या शत्रूस वेगानें ठार करा. " असें जों आपल्या पार्श्ववर्ती सेवकास म्हणतो तोंच तो अभिमानी सेवक तीच अफजलखानाची तरवार उगारून ठार मारण्याच्या इच्छेनें एकदम शिवाजीवर चालून गेला.

५६ त्याच्या त्या सैनिकांच्या डोळ्यांचें पातें लवतें न लवतें तोंच या शिवाजी राजानें त्या यवनास धाडकन् खालीं पाडलें.

५७–६१ धन्यास ठार मारलेला पाहून, अबदुल सय्यद, बंडा सय्यद, अफझलखानाचा पुतण्या उन्मत्त रहिमखान, अत्यंत मानी आणि थोर घराण्यांतील पहिलवानखान, पिलाजी व शंकराजी मोहिते हे दोघे वीर आणि वायूहून अधिक वेगवान्, बलवान् विध्वंसक व अफझलखानाचे पृष्ठरक्षक असे दुसरेहि चार यवन असे ते यवनसेनेचे नायक अतिशय क्रुद्ध व बेफाम होऊन, शस्त्रें परजीत, जंभासुराचा नाश झाला असतां इंद्रावर जसे असुर लगेच चालून गेले त्याप्रमाणें, शिवाजी राजास ठार करण्याच्या इच्छेनें सर्व मिळून त्याच्यावर चालून गेले.

७०–७३ तेव्हां संभाजी कावजी, काताजी, (काटकः) इंगळे, कोंडाजी व येसाजी हे दोघे कंक, कृष्णाजी गायकवाड, सूरजी कांटके, त्याचप्रमाणें जिवा महाला, विसाजी मुरूंबक, संभाजी करवर, इभ्राइम शिद्दी (बर्बर) अशा ह्या शिवराज रक्षक दहा महावीरांनीं गर्जना करून, म्यानांतून प्रचंड तरवारी उपसून, पर्वतांनीं जसें वायूस आडवावें तसा त्यांनीं (खानाकडील योद्ध्यांस) तेथें विरोध केला.

७५–७८ हे राजा, तुझ्यावर हा तरवारीचा वार करतों. तो माझा वार संभाळ." असें वारंवार म्हणत त्या वेळीं बंडा सय्यद सिंहाप्रमाणें प्रचण्ड गर्जना करणाऱ्या व अफजलखानास ठार मारणाऱ्या शिवाजीवर पुनः धावून गेला. वेगवान् जिवा महालानें, नको म्हटलें असतांहि "ह्याला मीच ठार करतों, हा माझ्याजवळ येऊं दे" असें महाराजांचें म्हणणें न ऐकलेसें करून, सय्यदानें उगारलेली ती तरवार आपल्या अंगावर घेतली आणि त्या वीरानें आपल्या तरवारीनें सय्यदाचे दोन तुकडे केले.

**एकाशीत्याधिकैः पंचदशभिः संमितैः शतैः**
**शालिवाहे शके संवत्सरे चैव विकारिणी ।। ८३**
**मासिमार्गे सिते पक्षे सप्तम्यां गुरुवासरे**
**मध्यान्हे दैवतद्वेषी शिवेनाफजलो हतः ।। ८४**

(८३–८४ शके १५८१ विकारी नाम संवत्सरीं, मार्गशीर्षमासीं, शुक्लपक्षीं सप्तमी तिथीस गुरुवारीं मध्यान्हीं देवद्वेष्टा अफजलखान शिवाजीनें ठार मारला.)

**अभ्यास** :—१ शिवाजीनें अफजल खानास वाघनखांनीं मारिलें असा बखरींतील प्रवाद आपणास परिचित आहे पण येथें तपशील निराळा आहे. २ वरील उताऱ्यांवरून कळणारीं शिवाजीच्या विश्वासू साहाय्यकांचीं नांवें सांगा. ३ अफझलखान–शिवाजीचें संभाषण कल्पनेनें तयार करा.

## १२ : : : किल्ल्यावर वसाहती

### शिवाजींचें बाजी प्रभूस पत्र

[संशोधक : कै. स. ग. जोशी, शिवाजी सोव्हेनीर, मराठी विभाग पृ. ११९ वरून].

मा अनाम* बाज प्रभु प्रती राजेश्री सीवाजीराजे सुाा तिसा खमसैन अलफ जासलोहगड हिरडस मावलमधें आहे. तो गड उस[१] पडला होता. याचे नाव मोहन गड ठेउनु किला वसवावा यैसा तह† करूनु किल्यास मसुरल अनाम पिलाजी भोसले यासि किले मजकूरचा हवाला[२] देउनु पाठविले असेत व मा इलेबरावर[३] किलाचे संगनाती[४] बदल लोक २५ पाठविले असेत. तरी तुम्ही मा इळेस व पंचविसा लोकास वरावर घेउनु मोहनगड गडावरी जाउनु हवालदारास व पंचविसा लोकास किल्यावरी ठेवणे आणि किलाच्या हवालदारास घर व लोकास अलंगा मजबूत करूनु देणे. घर व अलंगा[५] करूनु द्याल त्या पाउसाने अजार[६] न पावे असा करूनु देणें. नाहीं तरी सजवज[७] करूनु द्याल आणि किल्यावर लोक रहातील त्या आजार न पावे यैसे हवालदारास घर व लोकास अलंगा व एक भाखळ[८] मुस्तेद[९] करूनु देणेचे. तुम्ही सदरहु प्रमाणें काम विलेवार[१०] लाउन द्याल म्हणउनु साहेबास भरवसा आहे. याबद्दल तुम्हांस लिहिले असे तरी सदहू लिहिले प्रमाणें किला मजबूद करूनु देणें मग तुम्ही किल्याखालि उतरणे छ १ रमजानु मोर्तब[११] सुद[१२]

मर्यादेयं
विराजते.

शके १५८१ विकारी संवत्सर जेष्ठ शुद्ध २ शुक्रवार. १३ मे १६५९.

श्रीशिवनर
पति हर्ष
निदान साम
राज मतिमत
प्रधान.[१३]

**अभ्यास** :–किल्ला ताब्यांत आल्यावर शिवाजी कोणती दक्षता घेत असे?

---

*लोक, १ ओस, †विचार २ तावा, ३ मशारनिल्हे, ४ बंदोबस्त, सोपा, पडवी, ६ धोका, ७ तकलुपी, ८ बखळ, ९ तयार, १० विल्हेवार, योग्य, ११ तयार, १२ झाले, १३ शिक्क्यांतील मजकूर.

## १३ : : : मिठावरील जकात

[ राजवाड्यांच्या ८ व्या खंडामध्यें लेखांक २७ मध्यें नरहरी आनन्दराऊ सरसुभेदार ता. कुडाळ यांस मिठावरील जकातीसंबंधीं लिहिलेलें पत्र येथें दिलें आहे. त्यावरून शिवाजी महाराजांची दक्षता व्यक्त होईल. ]

"साहेबी प्रभावळीपासून तहद कल्याण भिवंडी पावेतों मिठाचा जबर निरखाचा[१] *तह दिल्हा आहे. ऐसीयासी, हालीं आपणांकडे मिठाचा पाड[२] जबर आला, हे गोष्टी ऐकोन उदमी† खळक[३] कूल[४] बारदेशाकडे[५] जातील तरी तुम्हीं घाटीं जकाती जबर बैसवणें बारदेशांत मीठ विकतें त्याचा हिशेबें, प्रभावळीकडे संगमेश्वराकडे मीठ विकते त्याणें कितेक जबर पडतें ते मनास आणून त्या अजमासें जकाती जबर बैसवणें कीं संगमेश्वरी विकते आणि घाट पावेतों जे बेरीज पडेल त्या हिशेबें बारदेशीच्या मिठास जकाती घेवणें. संगमेश्वराहून बारदेशीचे मीठ महाग पडेल ऐसा जकातीचा तह देणे जरी जबरजकातीचा तह नेदा,[६] मुलाहिजा,[७] कराल म्हणजे कुल उदमी खळक बादेरशाकडे चोहडेल.[८] आपली कुल बंदरे पडतील.... ये गोष्टीचा एक जरा[९] उजुर[१०] न करणें ये गोष्टींत साहेबाचा बहुत फायदा आहे...तुम्हांकडे लहान मीठ आहे त्याचा तह आहे त्याखेरीज हाली जाजती दरमणें टंकसाळी रुके ‡ ०।० बारा रासप्रमाणें[११] तह देणें, मुलाहिजा न करणें, मिठाचा मामला[१२] हजराही बद्दल कर्द[१३] लाख रुपये यावयाचा मामला आहे...."

---

१ किमत, *ठराव, २ किमत, †व्यापारी, ३ लोक, ४ सगळे, ५ गोव्याकडील देशाचें नांव, ६ न द्याल, ७ भीड, उपेक्षा, ८ ओढला जाईल, ९ एकजरा थोडेसुद्धां, १० तक्रार ‡ ४८ रुके = १ टक्का, टकसाळी रुका = रुका हें नाणें, १२ रुकें = ।. टका ११ नग, १२ प्रसंग, १३ मूळ—अज राहे बदल कर्द = लागवड (कीर्द) हे करण्याबद्दल, निपज करण्याबद्दल.

## १४ : : : आग्र्याहून सुटका

[कृष्णाजी अनंत सभासद यांनीं लिहिलेल्या शिव-चरित्रास सभासदी बखर असें म्हणतात. बखरींतील सर्वच वृत्त विश्वसनीय व कालानुक्रमानुसार असतेंच असें नाहीं. शिवाय चरित्रनायकासंबंधीं अद्भुत गोष्टीहि त्यांत असतात. समकालीन आधारानें बखरींतील वर्णनास जेथें पुष्टी मिळते तेथें तें वृत्त सत्य समजण्यास प्रत्यवाय नाहीं. शिवाजीसंबंधीं ज्या बखरी उपलब्ध आहेत त्यांपैकीं प्रस्तुत बखर विशेष विश्वसनीय आहे, कारण शिवाजीच्या कारकीर्दींत सुभेदाराचें काम केलेल्या कृष्णाजी अनंत सभासद यानें ही लिहिली व तीहि शिवाजीच्या मृत्यूनंतर १७–१८ वर्षांनींच. कृष्णाजी अनंत हे थोरले राजाराम महाराज यांच्या पदरीं सभासद होते. "थोरले महाराज म्हणजे शिवाजी राजे यांचें वृत्त प्रथमपासून विदित करावें, अशी राजाराम महाराज यांनीं विनंति केल्यावरून हें चरित्र तंजावर येथें कृष्णाजी यांनीं लिहिलें."

सभासद बखर, पेशव्यांची बखर, भाऊसाहेबांची बखर इ. अनेक मराठी बखरी प्रकाशित करण्याचें महत्त्वाचें कार्य काशीनाथ नारायण साने, बी. ए. यांनीं केलेलें आहे. एकाच पुस्तकाच्या अनेक हस्तलिखित प्रती त्यांनीं मिळविल्या (कारण तत्कालीं छापण्याची पद्धति नसल्यानें अशा ग्रंथाच्या हस्तलिखित प्रती सरदार घराण्यांतील पुस्तकसंग्रहांत ठेवलेल्या असत. सुवाच्य अक्षरांत ग्रंथाच्या प्रती करून त्या विकणें हा एक महत्त्वाचा धंदा त्या काळीं चाले.) त्यावरून मूळ लेखन "शुद्ध करून अर्थ निर्णायक व अवांतर माहितीच्या विपुल टीपासह" साने यांनीं बखरींचें प्रकाशन केलें आहे.

प्रस्तुतचा उतारा हा सभासद बखर, आवृत्ति चौथी, इ. स. १९२३, मधील पृ. ५०–५२ वरील आहे.]

....मग एके दिवशीं राजे व राजपुत्र एकच पेटारियांत बसले. पुढें मागें पेटारे करून मध्यें पेटारियांत बसून चालिले. ते वेळीं आपला साज सर्व उतरून, हिरोजी फरजंद यास घालून, आपले पलंगावरि निजविला. हात मात्र त्याचा उघडा बाहेर दिसूं दिला आणि शेला पांघरून निजविला. आणि एक पोरगा रगडावयास ठेवला. जवळील कारकून होते त्यांस अगोदर दिल्लीपलीकडे तीन कोसावर एक गांव होता तेथें ठिकाण करून पुढें रवाना केले होते. आणि

आपण उभयतां पेटारियांत बसून निघोन चालिले. चौकीचे लोक होते त्यांनीं एक दोन पुढील पेटारे उघडून पाहोन वरकड पेटारे न उघडितां जाऊं दिले. शहराबाहेर दोन कोसांवरि जाऊन, पेटारे टाकून, पायउतारा होऊन, कारकून ज्या गांवीं होते त्या गांवास गेले. क़ारकून बराबरी घेतले. अवघियांनीं रानांत बसून विचार केला कीं, "आतां जरि नीट आपले देशास जातो, तरि तिकडे लाग करून फौजा धावतील. तिकडे जाऊं नये. दिल्लीपलीकडे[1] जावें, वाराणशीकडे जावे." असें करून राजे व संभाजीराजे व निराजी राऊजी व दत्ताजी त्रिंबक व राघो मित्रा मराठा ऐसे निघोन चालिले. वरकडांस मनास मानेल तिकडे जाणें, म्हणून सांगितलें. आपण व राजपुत्र व इतर लोक कारकून ऐसे वाराणशीकडे आंगास राखा लावून, फकिराचें सोंग घेऊन मथुरेकडे गेले.

.....पोलादखानांनें पादशहाजवळ वर्तमान सांगितले कीं "राजा कोठडींत होता. वरचेवर जाऊन पाहत असतां एकाएकीं गइब[2] जाहाला. पळाला किंवा जमिनीमध्यें घुसला कीं अस्मानामध्यें गेला, हें न कळे. आम्ही जवळच आहों. देखत देखत नाहींसा झाला. काय हुन्नर[3] जाहला न कळे."

.... आणि पादशाहांनीं मनांत शंका धरली कीं "राजा शहरांत कोठें दडून राहिला असेल, आणि रात्रीस आपणांस दगा करील." म्हणून तजवीज[4] करून, बहूत सावध चौकी पहारा ठेवून जागेच पलंगावर राहून बैसले. लोक कंबर[5] बस्ती करून रात्रंदिवस जवळ ठेवले. ये जातीनें राहूं लागले.

---

**अभ्यास:**—अशा तऱ्हेनें तुरुंगांतून सुटका करून घेतलेल्या कांहीं भारतीय व आयरिश देशभक्तांचीं नांवें सांगा.

---

१. शिवाजी दिल्लीस न जातां आगरा येथें गेला होता. आग्रा येथून मथुरेस जाणें शिवाजीस अनुकूल होतें. दिल्लीहून मथुरेकडे जातां तर तो पाठलाग करणारास सांपडण्याचा संभव जास्त होता. "दिल्लीस गेला, हा मराठी बखरकारांचा व ग्रांट डफचा गैरसमज झाला असें म्हणावें लागतें." "आतां जरि नीट आपले देशास जातो" वगैरे वाक्येंहि चिंतनीय आहेत.

२ गाइब = गायब, गुप्त, नाहींसा. ३ युक्ति. ४. व्यवस्था. ५ कंबर बांधून.

## १५ : : : शिवाजीचे फौजेच्या अधिकाऱ्यास पत्र

राजवाडे खं० ८, लें० २८, पृ० २३

वैशाख शु० १५ श० १५९६ ता. ९ मे १६७४

[ आपल्या सैन्यापासून प्रजेस त्रास होऊं नये याबद्दल शिवाजी फारच जपत असे, हें निराळें सांगण्याची जरूरी नाहीं. एकदां शिवाजीच्या कांहीं फौजेची छावणी कोंकणांत होती. त्या फौजेच्या अधिकाऱ्यास शिवाजीनें एक पत्र लिहिलें, तें पुढीलप्रमाणें ]

श्रीभवानीशंकर

मशरुल[1] अनाम[2] राजश्री जुमलेदारानी[3] व हवालदारानी व कारकुनानी दिमत[4] पायगो[4] मुक्काम मौजे हलवर्ण ता॥[5] चिपळूण मामले[6] दाभोळ प्रति राजेश्री शिवाजी राजे सुा[7] अर्बा[8] सबैन व अलफ. कसबे चिपळूणीं साहेबी लष्कराची विले[9] केली आणि या उपरी घाटावरी कटक जावें ऐसा मान[10] नाहीं म्हणून एव्हां छावणीस रवाना केलें. ऐसीयास, चिपळूणी कटकाचा मुक्काम होता याकरितां दाभोळच्या सुबेयांत[11] पावसाळचाकारणें पागेस सामा[12] व दाणा व वरकड[13] केला होता तो कित्येक खर्च होऊन गेला व चिपळुणाआसपास विलायतींत[14] लष्कराची तसवीस[15] व गवताची व वरकड हरएक बाब लागली. त्याकरितां हाल[16] कांहीं उरला नाहीं. ऐसें असतां वैशाखाचे दिवस, उन्हाळा, हेही पागेस अधिक बैठी[17] पडली. परंतु जरूर जालें त्याकरितां कारकुनाकडून व गडोगडी गल्ला असेल तो देवऊनच जैसी तैसी पागेची बेगमी केली आहे. त्यास तुम्ही मनास माने ऐसा दाणा,

---

१ लौकिक, २ लोक, अर्थात् मशरूल अनाम-लोकांत लौकिकवान. 'राजमान्य राजश्री' प्रमाणें फारसी मायना. ३ जुमलेदार, हवालदार व कारकून यांचीं प्रथमेचीं अनेकवचनें, जुमलेदार जुम्ल्यावरील अधिकारी; जुम्ला–समाइकी जमीन. ४ दिमत–संबंधीं, पागेकडील. ४ पायगो-पायगा-पागा. ५ तरफ. ६ मामलत. ७ सुा–सुहुरसन. ८ 'अर्बा'–४ सबैन–७०, अलफ–१,०००; ९ व्यवस्था. १० हुकूम (?) ११ सुभ्यांत. १२ सामान, सामग्री. १३ इतर जिनसा. १४ विलायत–प्रदेश. १५ त्रास उपसर्ग. १६ आतां. १७ मुक्काम.

रातीव[१८], गवत मागाल. असेल तोंवरी धुंदी करून चाराल. नाहींसें जालें म्हणजे मग कांहीं पडत्या पावसांत मिळणार नाहीं. उपास पडतील, घोडीं मरावयास लागतील. म्हणजे घोडीं तुम्हींच मारिलीं ऐसें होईल. व विलातीस तसवीस देऊं लागाल. ऐशास, लोक जातील, कोण्ही कुणब्याचे एथील दाणे आणील, कोण्ही भाकर, कोण्ही गवत, कोण्ही फाटे, कोण्ही भाजी, कोण्ही पाले, ऐसें करूं लागलेत म्हणजे जीं कुणबीं घर धरून जीवमात्र घेऊन राहिलीं आहेत तेहि जाऊं लागतील. कित्येक उपाशी मरायला लागतील; म्हणजे त्याला ऐसे होईल कीं मोंगल मुलकांत आलें त्याहूनहि अधिक तुम्ही! ऐसा तळतळाट होईल! तेव्हां रयतीची व घोडयांची सारी बदनामी तुम्हावरी येईल. हें तुम्हीं बरें जाणून, सिपाई हो अगर पावखलक[१९] हो, बहुत यादी[२०] धरून वर्तणूक करणें. कोण्ही पागेस अगर मुलकांत गांवोगांव राहिलें असाल त्यांणीं रयतेस काडीचा अजार[२१] द्यावयाची गरज नाहीं. आपल्या राहिल्या जागांतून बाहीर पाय घालाया गरज नाहीं. साहेबीं खजानांतून वांटणिया पदरीं घातलिया आहेती. ज्याला जें पाहिजे, दाणा हो अगर गुरेंढोरें वागवीत असाल त्यांस गवत हो, अगर फाटे, भाजीपाले व वरकड विकावया येईल तें रास[२२] घ्यावें, बाजारास जावें, रास विकत आणावें. कोण्हावरी जुलूम अगर ज्याजती[२३] अगर कोण्हासी कलागती करावयाची गरज नाहीं. व पागेस सामा केला आहे तो पावसाळा पुरला पाहिजे. ऐसे तजवीजीनें दाणा रातीब कारकून देत जातील तेणेंप्रमाणेंच घेत जाणें; कीं उपास न पडतां रोजबरीज खायला सांपडे आणि होत होत घोडीं तवाना होत ऐसें करणें. नसतीच कारकुनासी धसपस कराया अगर असकेंच द्या तमकेंच द्या ऐसें म्हणाया, धुंदी करून खासदारकोठींत[२४] कोठारांत शिरून लुटाया गरज नाहीं. व हल्लीं उन्हाळचाला आहे तइसें खलक[२५] पागेचे आहेत, खण[२६] धरून राहिले असतील व राहातील, कोण्ही आगटया करतील कोण्ही भलतेच जागा चुली रंधनाला[२७] करितील, कोण्ही तंबाकूला आगी घेतील, गवत पडिलें आहे ऐसें अगर वारें लागलें[२८] आहे ऐसें मनास न आणितां म्हणजे अविस्वाच[२९]

---

१८ ठराविक प्रमाण १९ पायदळांतील सैनिक. २० काळजीपूर्वक. २१त्रास. २२ घाऊक, २३ बळजबरी, २४खासकोठींत, २५ लोक (नीच जातीचे). २६ झोपडी, घर, २७ स्वयंपाकाला, २८ सुरू झालें, सुटलें, २९ अकस्मात्,

एकादा दगा होईल. एका खणास आगी लागली म्हणजे सारे खण जळोन जातील. गवताच्या लहळ्यास[३०] कोणीकडून तरी विस्तो जाऊन पडला म्हणजे सारें गवत व लहळ्या आहेत तितक्या एक एक जळों जातील. तेव्हां मग कांहीं कुणबियांच्या गर्दना मारल्या अगर कारकुनास ताकीद[३१] करावी तैसी केली तऱ्ही कांहीं खण कराया एक लाकूड मिळणार नाहीं, एक खण होणार नाहीं; हें तों अवघियाला कळतें. याकारणें, बरी ताकीद करून, खासे खासे असाल ते हमेशा फिरत जाऊन, रंधनेकरितां, आगटया जाळिता, अगर रात्रीस दिवा घरांत असेल, अविस्राच उंदीर वात नेईल, ते गोष्टी न हो. खण, गवत वांचेल तें करणें. म्हणजे पावसाळा घोडीं वांचलीं नाहीं तर मग, घोडीं बांधावीं नलगेत, खायास घालावें नलगे. पागाच बुडाली. तुम्ही निसूर[३२] जालेंत ऐसें होईल. याकारणें तपशिलें तुम्हांस लिहिलें असे. जितके खासे खासे जुमलेदार, कारकून आहां तितके हा रोखा[३३] तपशिलें ऐकणें आणि हुषार राहणें. वरचेवरी रोजाचा रोज, खबर घेऊन, ताकीद करून, येणें-प्रमाणें वर्तणूक करितां ज्यापासून अंतर पडेल, ज्याचा गुन्हा होईल, बदनामी ज्यावर येईल त्यास–मराठियाची तो[३४] इज्जत[३५] वाचणार नाहीं, मग रोजगार कैसा, खळक[३६] समजों[३७] ज्यास्ती[३८] केल्यावेगळें सोडणार नाहीं. हें बरें म्हणून वर्तणूक करणें. छ.[३९] १२ सफर.[४०]

**अभ्यास**:––मोगलापेक्षां मराठी राज्य कोणत्या बाबतींत भिन्न असावें अशी शिवाजीची विचारसरणी दिसते? प्रस्तुतचें पत्र व क्रमांक १ चें पत्र वाचून उत्तर द्या.

---

३० पेंढ्या, ३१ कडक हुकूम, ३२ निष्काळजी. ३३ हुकूम, ३४ तर, ३५ अब्रू, ३६ क्षुद्र, नीच, ३७ समजून, ३८ कडक शिक्षा केल्यावांचून, ३९ चंद्र. बारावा–शुा द्वादशी. ४० सफर महिना.

## १६ : : : ‘ गृहकलह बरा नव्हे ’

इतिहाससंग्रह
वर्ष १ अं. ५ व ७ पृ. ३६, ३७

शक १५९८
इ. स. १६७७

[ अलीकडील संशोधनानें शिवकालीन पत्रें पुष्कळ सांपडलीं असलीं तरी खास शिवाजीचीं थोडींच आहेत. त्यांपैकीं हें एक महत्त्वाचें आहे. यांत शिवाजीच्या जिंजीवरील स्वारीची हकीकत आली आहे. एकोजी हा शिवाजीचा धाकटा भाऊ. त्याच्याशीं वागतांना राजकारण साधावें व भाऊपणा तुटूं नये हा शिवाजीचा दुहेरी यत्न होता. तुंगभद्रेच्या दक्षिणेस दूर आपल्या राज्याची शाखा बसवावी हें शिवाजीचें राजकारण होतें. एकोजीनें अर्नी, बंगलूर कोल्हार, होस्कोटे, तंजावर वगैरे ठाणीं दिल्यास त्याच्या मोबदला शिवाजी एकोजीस तुंगभद्रेच्या उत्तरेस पन्हाळा प्रांतीं मुलूख देण्यास तयार होता. वाढत्या विजयामुळें ‘ देवीची आपणांवर कृपा आहे ’ असा विश्वास शिवाजीस वाटूं लागल्याचें या पत्रांत व्यक्त झालें आहे.

प्रस्तुत पत्र, कै. द. ब. पारसनीस यांनीं इ. स. १९०८–१९१६पर्यंत ‘इतिहास संग्रह ’ नांवाचें जें उपयुक्त मासिक चालविलें होतें त्यांत वर्ष १ लें अं. ५ व ७ पृ. ३६–३७ वर ‘तंजावरचें राजघराणें’ या प्रकरणांत छापलें आहे.]

श्री सहस्रायु चिरंजीव अखंडित लक्ष्मी अलंकृत राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री येकोजी राजे प्रति

राजश्री शिवाजी राजे, आशीर्वाद येथील क्षेम जाणोन स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. उपरी कैलासवासी साहेबीं कैलासवास केला त्यास आजी तेरा वर्षें जाली. महाराजांचे पैके व जडाव व हाती[१] व घोडे व मुलूख अवघेहि राजश्री रघुनाथपंतीं तुम्हांला राज्यावर बैसवून संपूर्ण राज्य तुमचे हातीं दिलें. ऐशियास आमचा अर्धा वांटा तेरा वर्षें तुम्हीच खादला, आम्हीं जरी तुम्हांजवळी मागावें, तर बहुत दूर होतों. ऱ्या बोलें तुम्हीं देणार नव्हां म्हणून तेरा वर्षें सबुरी केली. मनामध्यें ऐसा विचार केला कीं बरे, महाराजांचे पुत्र तेही आहेत. जे समयीं आम्हास फावेल, ते समयीं आम्ही वेव्हार सांगोन घेऊं. असें मनीं धरोन होतों.

१ हत्ती.

यैसियास, राजकारण-प्रसंगे आम्ही कुत्बशहाचे भेटीस भागानगरास गेलों. तेथून कर्नाटकांत गेलों. चंजीस आलों. चंजी[२] घेतली, व येलूरतर्फेचा मुलूख घेतला, व शेरखानास झगड्यांत मोडून गर्देस[३] मेळविलें. शेरखानाचे हातीं मुलूख होता तेव्हढाही घेतला. त्यावरी मजल दर मजल कावेरी तीरास गेलों. तेथून तुम्हांस पत्रें लिहिलीं, कीं राजश्री गोविंदभट गोसा[४] व राजश्री काकाजीपंत व राजश्री निळोबा नाईक व राजश्री रंगोबा नाईक व तिमाजी यख्तियारराऊ असे भले लोक आम्हांपासीं पाठविणें, म्हणून तुम्हांला बहुतां रीतीं लेहून पाठविलें. त्यावरून तुम्हीं सदर्हू भले लोक आम्हांपाशीं पाठवून दिले. त्या भल्या लोकांशीं बहुतां रीतीं धरोनियाचा व्यवहार सांगून आमचा अर्धा वांटा आम्हांस बऱ्या बोलें द्या, म्हणून सांगून पाठविलें; व त्या बराबरी राजश्री बाळंभट गोसावी, राजश्री कृष्ण ज्योतिषी, कृष्णाजी सखाजी असे आपले तर्फेनें भले लोक दिल्हे. हे भले लोक तुम्हांजवळी जाऊन बहुतां रीतीं बोलिलें कीं गृहकलह करूं नये, आपला अर्धा वांटा मागतात तो द्यावा यैसें बोलिले. परंतु कपटबुद्धि तुम्ही ऐसी मनीं धरिली, कीं या समयांत आम्ही थोर राजे झालों आहों. आम्हांसी आपण खासा भेटीस येऊन हलभल[५] नरमी बहुत दाखवावी, आणि आमचा वांटा बुडवावा. तेरा वर्षे सारें राज्य आपणच खादलें, पुढेंही आपणच सारें राज्य खावें अशी बुद्धि मनीं धरून वांटियाचा निवाडियाची[६] तह न करितां आपण खासच आमचे भेटीस आलेस. यासआमची व तुमची भेट झाली. त्या उपरी आम्ही बहुतां रीतीं तुम्हांसी बोलिलों, कीं आमचा अर्धा वांटा द्या. परंतु तुम्ही वांटा द्यावा हा विचार मनी धराचना. मग जरूर जाहलें, कीं तुम्हीं धाकटे भाऊ; आपण होऊन आमचे भेटीस आले (त), यास तुम्हाला धरावें आणि वांटा मागावा ही गोष्ट थोरपणाचे इज्जतीस[७] ल्याख[८] नव्हे. या निमित्त तुम्हांस चंजावरास जावयाचा निरोप दिला. तुम्ही चंजाउरास गेलेसी.

आम्ही स्वारहोऊन तोरगळ प्रांतास आलों. तेथें अशी खबर ऐकली, कीं तुम्हीं तुरुक लोकांच्या बुद्धीस लागून, आमचे लोकांशी झगडा करावा असें मनीं धरून आपली सारी जमेत[९] एकवट करून आमचे लोकांवर पाठवून दिलेत. ते

---

२ जिंजी. ३ धुळीस. ४ गोसावी. ५ उतावीळपणे, वरवर. ६ वाटयांचा निर्णय करण्याचा. ७ प्रतिष्ठेस. ८ लायक, योग्य. ९ जमाव.

वालगोंडपुरास आले. तुमचे लोक चालून आल्यावर तुमचे आमचे लोकांत थोर झगडा झाला. तुमचे लोक पराजय पावले. प्रतापजी राजे व भिवजीराजे* व शिवाजी डबीर असे तिघे धरिले; व किती एक लोक मारिले. किती एक लोक पळून दाणादाण होऊन गेले. ऐसा समाचार ऐकिला. हें ऐकून बहुत नवल असें वाटलें, कीं कैलास वासी महाराज, त्यांचे तुम्ही पुत्र, बहुत थोर लोक, असे असून कांहीं विचार करीत नाहीं. यैसे असतां कस्टी[१०] व्हाल याचे नवल काय ?

तुम्ही म्हणाल कीं काय विचार करावा ? तरी ऐसा विचार करावा होता कीं, श्री देवाची कृपा व श्रीची कृपा त्यांवरी पूर्ण झाली आहे, दुष्ट तुरुकाला ते मारितात. आपल्या सैन्यांत तुरुक लोकच असतां जय कैसा होतो आणि तुरुक लोक कैसे वाचूं पहातात. हा विचार करावा होता; आणि युद्धाचा प्रसंग पाडावा नव्हता. परंतु दुर्योधनासारखी बुद्धि करून युद्ध केले आणि लोक मारविले. जें जाहलें ते जाहलें. पुढें तरी हट न करणें. तेरा वर्षे तुम्ही सारें राज्य खादलें तें खादलें. या उपरी कितेक आमचे आम्ही घेतले असे. अरणी, बंगलूर, कोलार, होसकोट, शिराळकोट व किरकोळ जागे व चंजाऊर असे जे जागे तुमचे हातीं उरले आहेती, ते आमचे लोकांचे हातीं देणे. आणि नकद[११] पैके व जडाव[१२] व हत्ती व घोडे यांचा अर्धा वांटा देणें. ऐसा विचार करून आम्हांसी संधि करणें. तुम्हीं ऐसा संधी निर्मलपणें केलीया आम्ही आपणापासून तुम्हांला तुंगभद्रे अल्याड[१३] पऱ्हाळे प्रांतें तीन लक्ष होनांची देऊन[१४] अथवा आम्हांजवळील दौलत तुम्हांला मानेना, तरी कुत्बशहास अर्ज करून त्यापासून तुम्हांस तीन लक्षांची दौलत देववून[१५] असे दोनही विचार तुम्हांस लिहिले आहेत. या दोनही मधील एक मनीं धरून मान्य करणें, हटाचें हातीं न देणें.[१६] आपल्यांत आपण गृहकलह करावा आणि कष्टी व्हावें याचें कांहीं प्रयोजन नाहीं या उपरी तऱ्ही आमचा आपला संधी व्हावा यैसी बुधी मनीं धरून वांटियाचा वेव्हार निर्गमून टाकणे[१७] आणि सुखें असणें. गृहकलह

---

* प्रतापजी, भिवजी, संताजी व रायभानजी काका असे शहाजीचे चार दासीपुत्र नमूद आहेत, संताजी प्रथमपासूनच शिवाजीस सामील होता.

१० कष्टी. ११ नगद, रोख. १२ सोन्याचे जिन्नस. १३ अलीकडे. १४ देऊ १५ देववूं. १६ हट्टाचे भरीस पडूं नका. १७ निकालांत काढणें.

वरा नव्हे. आम्ही तरी वडीलपणें आजीवरी[१८] तुम्हांला सांगितलें आतांही सांगतो. एकाल तरी वरें, तुम्हीच सुख पावाल, नाइकाल तरी तुम्हींच कष्टी व्हाल आमचे काय चालतें ?

बहुत काय लिहिणें. मर्यादेयं विराजते.

---

## १७. : : : शिवाजीची समर्थांस सनद

श्रीरामदासवचनामृत, पृ. १९९–२०० } { आश्विन शु० १० शके १६००

[ समर्थ–शिवाजी यांचे परस्पर संबंध लक्षांत येण्यास हा उतारा उपयुक्त आहे. ]

श्रीरघुपती श्रीमारुती

श्रीसद्गुरुवर्य श्रीसकळतीर्थरुप श्रीकैवल्यधाम[१]

श्रीमहाराज स्वामीचे सेवेसीं—

चरणरज[२] शिवाजी राजे यांनीं चरणावरी मस्तक ठेऊन विज्ञापना जे[३] मजवर कृपा करुनु सनाथ केलें. आज्ञा केली कीं तुमचा मुख्य धर्म राज्यसाधन करून धर्मस्थापना, देव-ब्राह्मणाची सेवा, प्रजेची पीडा दूर करुनु पाळण, रक्षण करावें; हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा. तुम्हीं जें मनीं धराल तें श्रीसिद्धीस पाववील. त्याजवरून[४] जो जो उद्योग केला व दुष्ट तुरुक (पाठभेद-दुराढे) लोकांचा नाश करावा, विपुल द्रव्यें करुनु राज्यपरंपरा अक्षइ चालेल

---

१८. आजवर. १ मोक्षाचें माहेरघर. २ पायाची धूळ. ३ कीं, ४ यावरून राज्यस्थापनेचा उद्योग सुरू करण्यापूर्वी, निदान त्यास मोठें स्वरूप येण्यापूर्वींच समर्थ-शिवाजी भेट झाली असली पाहिजे हें उघड आहे; यानंतर कित्येक वर्षांनीं चाफळ येथें श्रीरामाची स्थापना झाली त्यानंतर हें पत्र लिहिलें गेलें आहे. समर्थ-शिवाजीसंबंधाची त्रोटक परंतु मुद्देसूद चर्चा प्रा. रानडे यांनीं रामदासवचनामृताच्या प्रस्तावनेंत केलेली आहे.

ऐशीं स्थळें दुर्घट[१] करावीं ऐसें जें जे मनीं धरिलें तें तें स्वामींनीं आशीर्वाद प्रतापें मनोरथ पूर्ण केले.

याउपरि राज्य सर्व संपादिलें तें चरणीं अर्पण करुनु सर्वकाळें सेवा घडावी ऐसा विचार मनीं आणिला तेव्हां आज्ञा जाहली कीं, "तुम्हांस पूर्वीं धर्म सांगितला तेच करावेस तीच सेवा होय," ऐसें आज्ञापिलें.

थावरून निकटवास घडुनु वारंवार दर्शन घडावें; श्रीची स्थापना कोठें तरी होउनु सांप्रदाय शिष्यभक्ती दिगंत विस्तीर्ण घडावी ऐसी प्रार्थना केली. तेही आसमंतात गिरिगव्हरीं[२] वास करुनु चाफळीं श्रीची स्थापना करुनु सांप्रदाय शिष्य दिगंत विस्तीर्णता घडली.[३]

---

## १८ : : : शिवाजींची साक्षरता

[छत्रपति शिवाजी महाराजांना लिहितां वाचतां येत नव्हतें, सही करण्यासही येत नव्हती असें ग्रँट डफ या इंग्रज इतिहास लेखकानें लिहिलें. याबद्दल त्यानें पुरावा कांहींच दिला नाहीं. त्याचें म्हणणें खोडून काढण्यासाठीं मात्र पुरावे देणें आवश्यक झालें! त्या दृष्टीनें पुढील पत्रांचा उपयोग आहे. पत्रें इंग्रजी पत्रव्यवहारांतील व समकालीन असल्यानें डफच्या मताचें परस्परच खंडन होत आहे. हीं पत्रें 'शिवकालीन पत्रसार संग्रह' यांतून घेतलीं आहेत. पत्राचे क्रमांक त्यांतील आहेत.

या पत्रांत शिवाजीनें स्वतः पत्र लिहिलें, पत्र त्याच्याच हातांत द्यावें, शिवाजीच्या सहीचे कागद आले इ. वाक्यावरून स्पष्ट होते कीं शिवाजी लिहीत असे, वाचीत असे व सहीहि करीत असे.

'लेखनालंकार' या पुस्तकांत संपादक श्री. आबा चांदोरकर यांनी शिवाजीच्या हस्ताक्षराचें पत्र छापलें आहे, पण तें मूळ पत्र सांपडत नसून त्याची नक्कल असल्यानें तें प्रमाण मानणें अवघड जाते.]

–१–

नं. ८४८

१० जून १६६१

गेल्या वर्षीं दंडराजपूर किल्ला घेण्याबद्दल खुद्द शिवाजीजवळ बोलणें झालें तें त्याचा नोकर दौरोजी याचे मध्यस्थीनेंच झालें. शिद्दीकडून तो

---

१ अवघड. २ गुहा. ३ सांप्रदाय व शिष्य चारही दिशास विस्तार पावले.

३४]

किल्ला घेतां आला असता तर आसपासचा सर्व मुलूख शिवाजीला मिळाल्यामुळें शिवाजीकडून द्रव्य किंवा बंदरें वाटेल तशीं मिळालीं असतीं. आम्ही कैदेंत असतांना राजापूरचा त्याचा ब्राह्मण मीठ बंदर आमचे स्वाधीन करण्याचें बोलला. आम्हांला पकडून ठेवून लुटल्यामुळें आतां आम्हांला बंदराची इच्छा नसल्याचें आम्हीं सांगितलें; आणि आमचें स्वातंत्र्य आम्हाला मिळाल्याशिवाय आम्हीं काय बोलावें ? असें म्हटलें. त्यावर त्यानें आमच्या सुटकेची खंडणी नेमून आम्हाला वासोटयावर पाठविलें.............

ब्राह्मणानें आम्हाला पैशाबद्दल विचारलें... आम्हीं साफ नाकारलें. तेव्हां शिवाजीकरितां तुम्ही काय करितां म्हणून त्यानें विचारल्यावर आम्हीं दंडाराजपुरीबद्दल बोललों ... इंग्रजांना त्यानें दाभोळ देऊ केलें... दंडाराजपुरी घेण्यास इंग्रजांनीं मदत केली तरी शेवटचा हल्ला शिवाजीनेंच करावा म्हणजे इंग्रज किल्ला आपणच घेतील, ही भीति बाळगण्याचें कारण नाहीं... दंडाराजपुरी घेण्याबद्दल औरंगजेब इंग्रजांना तीन लाख रुपये देण्यास तयार आहे, असे रेव्हिंगटननें सांगितलें. दोन दिवसांनीं शिवाजी महाडला आला. दोन दिवस राहून तेथील कैद्यांना त्यानें रावजी पंडिताच्या स्वाधीन केलें आहे आतां तो कल्याण भिवंडीकडे आहे. नुकतेंच मोगलांनीं कल्याण भिवंडी घेतली आहे. ह्या पावसाळ्यांत शिवाजी ती परत घेणार. नंतर त्याची आमची गांठ पडेल... विजापूर लुटलें जाईल असें वाटतें.... शिवाजीचा एकच हेतु असेल तर तो दंडाराजपूर घेण्याचा. त्याबद्दल औत्सुक्यतेनें बोलावें. कंपनीला तें आवडलें नाहीं तर मागाहून बोलणें फिरवावें.... बरें किल्ला स्वतःकरितां घ्यावयाचा म्हटलें तरी माणसें (शिपाई) लागतील. तीं शिवाजीशिवाय दुसरा कोण पुरवील ? वकिलानें पत्र शिवाजीच्या स्वतःच्या हातांत द्यावें. हे ब्राह्मण त्यांना वाटेल तो मजकूर त्या पत्राकडून वदवितात.

–२–

नं. ९३० १२-४-१६६३.

रावजी पंडीत परत आला आहे. आल्याबरोबर मला बोलावून "तहाचीं कलमें ठरविण्याकरितां कोणातरी इसमाला त्वरित पाठवून द्या." म्हणून तुम्हांला मी लिहावें असें त्यानें मला सांगितलें. काल राजानें रावजीला

स्वत: लिहिलेलें पत्र आलें. ((A Letter from the Rajah, written by himself to Raoji) त्यांत शिवाजी ४०० निवडक लोकांसह जातीनें शाइस्तेखानाच्या तळावर गेला त्याची हकीगत आहे.

–३–

नं. १६४०

८ मे १६७४

नारायण शेणव्याकडून तहाबद्दलचे शिवाजीच्या सहीचे (Signed by Sevagy) कागद आले. त्यांचे भाषांतर करून पहातां, पूर्वी ठरल्यापेक्षां कित्येक गोष्टी अधिक घातलेल्या दिसून आल्यामुळें, कांहीं अवश्य दुरुस्त्या पुढें मांडल्या.

**अभ्यास** :—हे उतारे वाचून शिवाजीच्या साक्षरतेसंबंधीं तुमचें मत काय झालें तें कारणासह सांगा. डफच्या मतानुयायी लोकांचें समाधान कोणत्या साधनांनीं होईल ?

---

## १९ : : : संपूर्ण राज्याचें सार तें दुर्ग

[आज्ञापत्र प्रकरण ८ वें. वीणा प्रकाशन प्रत (इ. स. १९३९ पृ. ३४ ते ४३]. प्रस्तुत आज्ञापत्र रामचंद्रपंत अमात्य यांनीं राज्याभिषेक शक ४२ म्हणजे (इ. स. १६७४ + ४२) इ. स. १७१६ त छत्रपति राजारामाचा मुलगा कोल्हापूरचा संभाजी याचे आज्ञेवरून लिहिलें असें सामान्यत: मानलें जातें. पण हा सामान्य समज फारच डळमळीत करणारे पुरावे त्या आज्ञापत्रांतच आहेत. पण मग तें कोणाचें ? याचा मात्र छडा लावतां येत नाहीं. अशी आजची या विषयावरील संशोधनाची स्थिति आहे. आज्ञापत्राचा लेखक कोणीहि असो. त्यांतील वाक्यन् वाक्य इतकें अनुभवावर व राजनैतिक तत्त्वावर आधारलेलें आहे कीं त्यामुळें शिवकालीन शासनशास्त्रावरील, तो एक बहुमोल ग्रंथच होय. खेरीज अठराव्या शतकांतील, प्रगत आणि जिवंत मराठी गद्यांचा तो एक नमुनाच होय. ]

संपूर्ण राज्याचें सार तें दुर्ग. दुर्ग नसतां मोकळा देश परचक्र येतांच निराश्रय, प्रजा भग्न होऊन देश उद्वस[1] होतो. देश उद्वस झाल्यावरहि राज्य असें कोणास म्हणावें ? या करितां पूर्वीं जे जे राजे झाले त्यांणीं आधीं देशामध्यें

१ ओसाड.

दुर्ग वांधून तो तो देश शाश्वत करून घेतला, आणि आलें परचक्रसंकट दुर्गाश्रयीं परिहार केले.

.....ज्या देशांत गड कोट नसतील त्या देशांत आपले राज्याचे सरहद्दीपासून पुढें जबरदस्तीनें नूतन स्थळें बांधीत तो देश आक्रमावा. त्या स्थळांचे आश्रयीं सेना ठेवून पुढील देश स्वशासनें वश करावा. असें करीत करीत राज्य वाढवावें. गडकोटाचा आश्रय नसतां फौजेच्यानें परमुलखीं टिकाव धरून राहवत नाहीं. फौजेविरहित परमुलखीं प्रवेश होणेंच नाहीं. इतक्याचें कारण ते गडकोट-विरहित जें राज्य त्या राज्याची स्थिति म्हणजे अभ्रपटलन्याय आहे. याकरितां ज्यांस राज्य पाहिजे त्यांणी गडकोट हेंच राज्य, गडकोट म्हणजे राज्याचें मूळ, गडकोट म्हणजे खजीना, गडकोट म्हणजे सैन्याचें बल, गडकोट म्हणजे राज्य-लक्ष्मी, गडकोट म्हणजे आपली वसतिस्थळें, गडकोट म्हणजे सुखनिद्रागार, किंबहुना गडकोट म्हणजे आपलें प्राणसंरक्षण, असें पूर्ण चित्तांत आणून कोणाचे भरंवशावर न राहतां आहे त्याचें संरक्षण करणें; व नूतन बांधण्याचा हव्यास स्वतांच करावा, कोणाचा विश्वास मानूं नये.

गडकोट संरक्षणाचें कार्य फार नाजूक. परम नाजूक स्थळास एखादा मामलेदारादि जे लोक ठेवणें, त्यांणीं भेद केलियामुळें अथवा शत्रु चालोन आला असतां नामर्दी केल्यामुळें अथवा त्यांचे गाफिलीमुळें स्थळास दगा जाहला तर स्थळसहित तितकें राष्ट्र हातींचे गेलेंच. उरल्या स्थळास व राष्ट्रास उपसर्ग लागला, शत्रु प्रबळ येऊन पावला असतां जो गेला किल्ला, त्या किल्लेकराचें वारें इतर राहिले किल्लेकरांस लागोन तेही स्थळास अपाय योजितात. म्हणजे एक एक राज्यासच धक्का बसतो. या कारणें किल्ले कोट जतन करणें ही गोष्ट सामान्य आहे असें न समजतां, तेथील उस्तवारी[1] व शासन यांस तिळतुल्य अंतर पडों न द्यावें.

.....त्यास आधीं किल्ल्याचा जीव तो किल्ल्याचा हवालदार, तसाच सदर सरनोवत म्हणजे निस्पृह, कोणाचे निसपतीचे[2] अथवा एकाचे आर्जवामुळें ठेवावे असें नाहीं, जे कुलवंत मराठे आणि शिपाई जे शरम धरत असतील, कबीलेदार विश्वासू, उद्योगी, अलालुची, अनिद्रिस्त, सकल लोकांचें समाधान

१ व्यवस्था, बंदोबस्त. २ निसबतीचे, तर्फेचे.

रक्षून यथोचित सर्वांपासून स्वामिकार्य घेत हें स्थळ म्हणजे धन्यानें ही परमप्रिय ठेवी दिली आहे, आपलें प्राणान्त यास दगा होऊं नये, असें पूर्ण चित्तांत आणून जे धन्यांनीं लावून दिली मर्यादा तीस तिळांश अंतर पडों न देतां, दिवसाचा उद्योग दिवसा रात्रीचा उद्योग रात्रीं, निरालस्यपणें करून सर्व प्रयत्नें स्थळ जतन करीत, असें ठेवावे.

गडास यावयाचे मार्ग असतील ते सुगम नसावे. सुगम असले तर ते मार्ग मोडून त्यावर झाडी वाढवून आणखी कडे[1] परकें फौजेस येतां कठीण असें मार्ग घालावे. या विरहित बलकुबलीस[2] चोरवाटा ठेवाव्या. त्या सर्वकाळ चालूं देऊ नयेत. समयास तेच खिडी अथवा दरवाज्याचा रावता[3] करून सांजवादा[4] चढवीत जावा. तसेंच गडावर आधीं उदक पाहून किल्ला बांधावा पाणी नाहीं आणि तें स्थळ आवश्यक बांधणें प्राप्त झालें तरी आधीं खडक फोडून तळी, टांकीं पर्जन्यकाळपर्यंत संपूर्ण गडास पाणी पुरे अशीं मजबूत बांधावीं. गडावरी झराही आहे, जसें तसे पाणीही पुरतें, म्हणून तितकियावरीच निश्चिती न मानावी. किंनिमित्य कीं, झुंजामध्यें भाडियांचें[5] आवाजाखालीं झरे स्वल्प होतात, आणि पाणियाचा खर्च विशेष लागतो, तेव्हां संकट पडतें. याकरितां तसे जागीं जखिरीयाचें[6] पाणी म्हणून दोन चार टाकीं तळीं बांधावीं. त्यांतील पाणी खर्च होऊं न द्यावें, गडाचे पाणी बहुत जतन राखावें. गडावरी राजमंदिराविरहित थोर इमारतीचे घर बांधों नयें.

दारुखान्यास नेहमीं राखणेस लोक ठेवावे त्यांणीं रात्रंदिवस पाहाऱ्या-प्रमाणें जागत जावें. परवानगी विरहित आसपास मनुष्य येऊं न द्यावे. गड पाहून गडाचे नाजूक जागे पाहून, त्या त्या जागीं व गडाचे उपराचे[7] जागा, त्या त्या सारिखीं भांडीं, जुंबरे[8] चरक्या[9] आदिकरून यंत्रें बुरजा बुरजास तटोतट टप्पे गुजरे[10] बांधून ठेवावीं.

**अभ्यास** :–क्रमांक व ९ ते १९ चे उतारे वाचून त्या प्रत्येकांत दिसून येणाऱ्या शिवाजीमहाराजांच्या एकएक गुणाचें स्वतंत्र टाचण करा व नंतर त्यावरून शिवकालीन राजवटीबद्दल एक सुसंगत चिकित्सक टिपण तयार करा.

१ इतर बाजूंनीं. २ संकटाच्या प्रसंगीं. ३ वहिवाट. ४ (?) ५ ताफांचे आवाज. ६ सांठविलेले. ७ वरच्या जागीं. ८ जंबुरे–लांबतोफा. ९ धार लावण्याचे यंत्र, चरक. १० मोर्चे.

# २० : : संभाजीच्या कारकीर्दींतील घडामोडी

[मराठी इतिहासाच्या साधनांत समकालीन अस्सल पत्राइतकें नसलें तरी त्याच्या खालोखाल समकालीन शकावलींना महत्त्व आहे. या शकावल्या पूर्वी प्रत्येक मोठ्या घराण्यांत तयार करीत. जेधे शकावली अशापैकींच आहे. ही लो. टिळक यांनीं प्रथम उजेडांत आणली.]

शिवचरित्र प्रदीप पृ. ३१–३४ ] [ जेधे शकावली

शके १६०३ जेष्ठ मासी सुलतान अकबरशाह जाला औरंगजेबावर यागी[1] होऊन त्रिंबकास आले त्यास संभाजी राजे याणी कोकणांत पालीस ठाव दिल्हा २.

भाद्रपद मासीं संभाजो राजे याणी कवि कळशाचा बोले मागती आणाजी दत्तो सचीव यांजवर ईतराजी करून मार दिल्हा त्या मारानें राजश्री आनाजीपंत व बाळ प्रभु व सोमाजी दत्तो व हिराजी फर्जंद परळी खाले कैद करून मारिले. कर्णाटकांत शामजी नाईक यास कैद करविले १.

कार्तिक शुध १३ रविवार पातशाहापुरीं संभाजी राजे यांची व अकबराची भेटी जाली अगदीं सेना समुदाये लश्कर व हशम देखील समागमे होते अकबरा समागमे दुर्गादास होता बहुत सन्मान केला.

(शके १६०५) जेष्ठ वद्य ११ संभाजी श्वार होऊन राजापूरास गेले फिरंगीयासीहि बिघाड केला. रेवदंडीयासी वेढा घातला १

आशाढ सुध पोर्णिमा जनार्दन नारायेण याणी देवरूखी देह ठेविला कार्तीक वद्य ७ संभाजी राजे हंडियास गेले गावीकर फिरंगी यानी कोटास वेढा घातला होता. त्यासी लढाई करून वेढा उठविला तेथें येसाजी कंक व त्याचा लेक कृष्णाजी कंक याणे युद्धाची शर्त केली १ मार्गषीर्ष मासी फिरंगीयाचे कुंभार जुवे घेतले साष्टी व बरदेस मारिला १

(शके १६०७) आषाढ मासी संभाजी राजे याणी विजापूरचे मदतीस कबजीस पाठविले ते जाऊन पनाला राऊन फौजा रवाना केल्या १ फालगुण मासी अकबर जाहजात बैसोन विरानांत[2] गेला.

(शके १६१०) माघ वद्य ७ शुक्रवासरी संभाजी राजे व कवि

---

१ रुष्ट. २ इराणांत.

कलश रायेगडास जावयास संगमेस्वरास अले असतां सेक निजाम दौड करून येऊन उभयेतांस जीवतच धरून नेले वरकड लोक रायेगडास गेले १.

फालगुण वद्य ३० अवरंगजेब तुलापुरी संभाजी राजे व कवि कलश यास जिवें मारून सिरछेद केले १.

**अभ्यासः**–वरील ओळींतून फक्त त्रोटक नोंदी आहेत. त्या समकालीन व कर्त्यापुरुषांच्या घराण्यांतील आहेत म्हणून त्यांस महत्त्व आहे. या शकावलींतील शेवटचा उल्लेख शके १६१९ इ. स. १६९७ तील आहे.

---

# २१ : देवा ब्राह्मणाच्या राज्यांत दिल्ली सामावण्याची राजारामाची इच्छा

[शिवचरित्र साहित्य खं. ५ पृ. १० ते १२ वर हें पत्र छापलें आहे. या पत्राच्या प्रारंभीं संशोधक श्री. शं. ना. जोशी यांनीं पत्राच्या महत्त्वाचें वर्णन केलें आहे. त्याच्या आधारें पुढील सारांश लिहिला आहे. "छ. राजारामाचा काल श. १६१० ते श. १६२१ (इ.स. १६८९-१७००) होय. ह्या राजवटीस 'स्वातंत्र्ययुद्धाचा काल' असें नांव दिलें जातें. पण 'देवा ब्राह्मणांनें राज्य' किंवा 'महाराष्ट्र राज्य' अभिवृद्धीस लावण्यासाठीं या काळीं मराठे लढत होते असें तत्कालीन शब्दांत याचें नेमकेपणानें वर्णन करतां येईल. कारण शिवचरित्र साहित्य खंड ४ मध्यें जीं तत्कालीन पत्रें आलीं आहेत त्यांतून याच संज्ञेचा उल्लेख आला आहे. (पृ. ७८ व ८० पहा.) राजारामकालीं अनेक मराठे, प्रभु, ब्राह्मण इ. मोगलाची बाजू सोडून इकडे आले. ह्याला उद्देशून 'गनिमाचे लष्कर आटोन हुजूर जमाव होऊं लागला' असें स्वतः राजारामानें म्हटलें आहे. फलटणकर मुधोजी निंबाळकर हे राजारामास लिहितात 'आपण ताम्राकडे मनसबा करीत होतो ते टाकून या राज्यांत आलो कार्ये निमित्य कीं हे महाराष्ट्र राज्यवृद्धीस पावधावे व आपले वतन आपले सांभाळी व्हावे म्हणोन सर्वश्वास तऱ्हा दिल्ही.' या महाराष्ट्र राज्याच्या मर्यादेत काय काय यावें असें राजाराम छत्रपति व त्यांचे सर-कारकून यांना वाटत होतें ते पुढील पत्रावरून समजून येतें.

छ. राजारामाचे मनांत दिल्ली घेण्याची गोष्ट होती हें सांगणारें प्रस्तुत पत्र आहे. मुसलमानाकडे असलेले दोन सरदार, हणमंतराव ४०]

घोरपडे व कृष्णराव घोरपडे हे राजारामाकडे येत आहेत. त्यांस इ. स. १६९१ त छत्रपति राजाराम महाराजांनीं ही कामगिरी सांगितली आहे. हणमंतरावास पांचलाख व कृष्णरावास एक लाख मिळून सहा लाखांचा सरंजाम कबूल केला आहे, पण तो पदरांत टाकण्यापूर्वी पायऱ्या सांगितल्या आहेत. औरंगजेबाला आसपास शह लावावा आणि औरंगाबाद व खुद्द दिल्लीकडे आवढाव करून तिकडून जेर करावा म्हणजे मराठ्यांच्या मुलुखावरील त्याची पकड ढिली होईल हाच या योजनेतील दूरचा पेंच आहे. सारांश, महाराष्ट्र राज्याची अभिवृद्धि करणारांच्या मनांतील गोष्ट ही कीं, विजापूर भागानगरच नव्हे तर औरंगाबाद दिल्लीसुद्धां देवाब्राह्मणांच्या राज्यांत आणावी. आतां कुणास या 'देवा ब्राह्मणांच्या' राज्याच्या प्रसारास साम्राज्यवादाचा किंवा धर्माधिष्ठित राज्याचा वास येत असला तर तो 'वास' वस्तुगत आहे कीं वास घेणाराचा तो दोष आहे हें संशोधनानें पारखून ठरवावें लागेल. एक गोष्ट मात्र निश्चित आहे कीं, पुढें घडलेल्या बनावावरून राजारामकालीन लोकांचे हेतु ठरविणें योग्य होणार नाहीं. ]

'वजारतमाब राजेश्री हणमंत घोरपडे गोसावी अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री–प्रती राजाराम छत्रपती उपरी तुमचे विशई राजश्री नागोजी माने येही विनंती केली कीं तुमचा मुदा स्वामीच्या राज्यांत यावयाचा आहे, स्वामीनें त्याजयोग्य भाग्य दिधलिया त्याप्रती राजश्री रामचंद्र पंडित अमात्य याजकडे येतील म्हणोन विदीत केले त्यावरून तुमचा मनोदेये कलला कीं महाराष्ट्रधर्म पूर्ण रक्षावा येसा (स) कलप (कल्प) स्वामीनी जानून तुम्हावरी (कृपाळ होऊन) राजश्री कृष्णाजी घोरपडे उभयतास भाग्ये होन पा ६,००००० दिल्हे आहे बाा राजश्री कृष्णाजी घोरपडे यास खाा तुम्हांस भाग्य होन ५०००००

खाा तुम्हांस होन पाा

| | |
|---|---|
| ६२५०० | रायेगड प्रात कबज जालिया उपरी सरजाम |
| ६२५०० | विजापूर हस्तगत जाल्यानतर द्यावे |
| ६२५०० | भागानगर घेतल्यास |
| ६२५०० | औरंगाबाद घेतल्यावर देणें |
| २५०००० | दिली घेतलेवरी |
| ५००००० | |

भाग्य पाा होन १,००००००.
राजश्री कृस्णाजी घोरपडे
१२५०० (रायग)ड प्रांत कबज (केल्यावरी)
१२५०० विजापूर हस्तगत झाल्यावर
१२५०० भागानगर घेतल्यावर
१२५०० औरंगाबाद घेतल्यावर
५०००० दिली घेतलेवरी
१०००००

येणेंप्रमाणें सहा लक्ष होन पाचा सरजाम करून द्यावयाचा निश्चय केला आहे. नवे स्वाराचा जभाव माफिक सरजाम करून देऊ येकनिस्टपणें* सेवा करावी स्वामी तुमचे बहुत प्रकारे चालवितील गनिमा कडील लुटीमध्यें जो जिनस येईल त्यापैकीं निमे द्रव्य व हती व निशाण व दमामा यैसे स्वामीचे वरकड घोडीसहित तुम्हास माफ असे छ१६ रमजान सुाा इसने तिसैन अलफ (नि) बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा.

---

## २२ : : शिवाजी ते शाहूपर्यंतची शुद्धीकरणाची परंपरा

[महाड हायस्कूलांतील इतिहाससंशोधक शिक्षक श्री. शां. वि. आवळसकर यांनीं संपादिलेला आंगरेकालीन पत्रव्यवहाराचा लहानसा खंड भा. इ. सं. मंडळानें आपल्या त्रैमासिकाच्या द्वारें ( वर्ष २८ वें, अंक ३–४ एप्रिल १९४८) प्रकाशित केला आहे. इ. स. १५०० पासून १७७७ पर्यंतचीं ८६ पत्रें यांत आहेत. ७--८ पत्रें सोडलीं तर बाकी सर्व पत्रें चौलच्या अधिकारी दप्तरांतील आहेत. आर्थिक, सामाजिक, राजकीय, व्यापारविषयक अशी अनेकविध माहिती या पत्रांतून मिळते. यापैकीं ले. ४२ पुढें दिला आहे. त्यासंबंधीं संपादक प्रास्ताविक पृ. ४ वर लिहितात :"याचा इत्यर्थ असा कीं, थोरल्या छत्रपतींच्या कारकीर्दींत परधर्मांत गेलेल्यांचें शुद्धीकरण अपवाद म्हणून कां होईना होऊं लागलें. तसें शुद्धीकरण होत राहणें अवश्य होतें. कारण साष्ट बारदेश व कोर्लई चौलकडे फिरंग्यांनीं धार्मिक आक्रमण करून प्रजेस त्रस्त केलें. स्वधर्मांत परत यावें असें त्यास वाटे. छत्रपति संभाजीच्या कारकीर्दींत या प्रश्नास चालना देण्याचा प्रयत्न झाला व वसई-रेवदंडा ताब्यांत

* एकनिष्ठपणें.

आणण्यापूर्वी मराठ्यांनीं तसा प्रयत्न करावा, अशी या पत्रांत स्पष्ट विनंति आहे. "

तीन छत्रपतींच्या कारकीर्दींतील शुद्धीकरणाचें धोरण समजण्यास हें पत्र उपयोगी आहे.]

ले. ४२ नकल } श्री { श. १६५७ कार्तिक शु।। ८ इ. स.१७३५ ऑक्टो. १३

श्रीमंत माहाराज राजश्री दिवाण साहेबांचे सेवेशी आज्ञाधारक सेरीकर* रयेत लोक पाठरे पांच कलसे सुभा प्रांत चेऊल सेवेसी विज्ञापना सास्ट प्रगणे यास फिरंगी याने वल. . . करून आपली यात अधीक व्हावी म्हणोन मऱ्हास्ट लोक याना यातींचें जन भ्रष्ट करून किरिस्तांव केलें त्या लोकां-मधून आमचे यातीचे लोक च्यालीस पनास घरें बाटविलीं ती घरें कितेक मुदत त्याचें जातींत वर्तलीं तें कलत नाहीं त्यामधून दहा वीस घरें तें स्थल सोडून हें स्थल प्रान्त मजकुरीं येऊन सुखवस्तीस राहिलीं कितेक दिवसांनंतर आपले पूर्व जातीत यांवे हा हेत धरून कितेक प्रकारे घालमेल वसिला उपराला[1] करून आमचे जातीचें पदरीं पडले कीं आम्हांस यातीत घेणें जो खर्चवेंच होईल तो देऊन त्यास यातीनी अंगीकार केला नाहीं त्या उपर कितेक मुदत जालियावर कारकीर्द महाराज (मो. जा.[2]) छेत्रपत्री साहेबांच्या राज्यांत कितेक घालमेल करून बजीद[3] होऊन कतीकाना जातीत घ्यावे म्हणौन सनद घेतली ते प्रसंगी आमचे वडील सर्व यात समुदाव मिलोन महाराजाचे सेवेसी विज्ञाप्ती केली कीं, साहेबांची आज्ञा सिरसा आहे पर येत कती कोम ? यांचे मूल पुरुश प्रथम भ्रष्ट जाहाले होते ते जातीत घेतले असते तर कार्यास येतें हाली लोम प्रतिलोम पेढी[4] दर पेढी चालत आली त्याचे नांव व त्यांचा धर्म निराला जाहाला असतां पूर्वजातीत मिलते करून जातीस लंछेन लाऊन घ्यावें येसा अर्थ नाहीं अथपर देवधर्माचें सवरक्षेण करणार साहेब धनी आहेत त्याउपर महाराज साहेबी विवेक चितांत आणून हे गोस्ट अमान्यें केली. त्यास कितेक वर्शे जाहालीं यानंतर माहाराज कैलासवासी (मो. जा.) आबाहेसाबांचे[5] सेवेसी विज्ञापना करून आज्ञापत्र घेऊन आम्हा समस्तांस हूजूर नेऊन बोली-

*भागीदार. १ साह्य. २ मूळ पत्रांत मोकळी जागा. ३ काकुलतीस. ४ पिढी. ५ शिवाजी.

चाली होऊन माहाराज साहेबी आज्ञा केली कीं कती कोम ?[६] यांस याती घेणें त्यावरून प्रति उतर अर्ज केला कीं उत्तम बरें साहेबांची आज्ञा आम्हांस मान्ये असे सिरसा आहे पर येत[७] साहेब आमचे धनी परंतु शेरीस मध[८] गोताई मुळें[९] साहेब आमचे जांवाई आहेत साहेबांचें आमचे गोत गंगा येक आहे कती कोम (?) यांस आज्ञ करून सर्व जातीस जेवण करऊन साहेंबीं आपणासमवेत गोतजेवण करून जातीत वर्तवावयाची आज्ञा करणें त्या उपर महाराजसाहेब ख्याल खुशालींत येऊन आम्हांसंगे विनोद करून कितेक गोस्टी केल्या आण म्हणो लागले कीं बेटे हो आम्ही तुमचे जांवाई कैसे, त्या उपर सेवेसी अर्ज केला कीं चेऊलकर अदीकारी[१०] व आम्ही शेरी संमधी असों चेऊलकर अदकारी व गाव्हाणकर व आमचे जांवइ दिनकरराऊ ह्रानोल्कर सेरीसंमधी आहेत. साहेब दिनकरराऊ यांचे जावाई ते येसा साहेबांचा निशा[११] करून आपल्यावर मेहेरबान करून घेतलें त्या उपर कती कोम यांचा गौरव केला कीं तुम्ही आपले मुलांमाणसें पोटीं गर्भ असेल त्या समवेत श्रीमहाक्षेत्र (मो. जा.) वा (रा) णसीस जाऊन तेथील यात्रा करून तेथील सोड्या[१२] घेऊन येणें त्याजवर जे आज्ञ करणे ते केली जाईल येसें बोलोन सर्वांस विडे देऊन बिदा[१३] केलें त्यावर कतीकोम आपले घरीं जाऊन संवसार करूं लागले त्यास कितेक वर्शे गेली त्या मागोन देवधर्म रक्षेण गौब्राह्मण प्रजापालण महाराज साहेबी अवतार घेऊन सकल छेत्रथें निर्दाळून येकछेत्री राज्यें करून देवधर्माची वृद्धी वाढवून आम्हा प्रजेचें सवरक्षेण करीत असा यण्हे करून सकल जन संतोसी होऊन साहेबांचें राज्यें लक्ष्मी आयुष्ये सदा सर्वदा वृद्धी होऊन साहेबांची छाया आमचे मस्तकी निरंतर असावी हे श्रीजवळ सदा निरतर इच्छीत असो हाली किरिस्ताव कतीकोम जातीविसीं साहेबांजवळ वजीद जाहाले असत हे गोष्ट आईकोन शेरीरीं कस्ट होऊन चित्त उदास जाहाले असे ते श्री (मो. जा.) साक्षे असे हे कतीकोमास कितेक मेढया[१४] व कितेक मुदत जाहाली हे कलत नाहीं आबासाहेबांचे अमलात देवघराहून कती कोमाची सोइरीक गोलदाज फिरगीयास दिली होती येसें असोन ते यात

६ जातीच्या नांवाचा अपभ्रष्ट उच्चार. ७ परयेत, पर्यंत. ८ शरीर-संबंध ९ सोयरीकीमुळें. १० अधिकारी. ११ खात्री. १२ साक्षी. १३ रवाना. १४ पेढ्या, पिढ्या.

आमचे यातीत येईल तेव्हां स्वदेस[१५] उतम आहे तो सांडून परदेश कदाचिद्रुघट[१६] असला तर तो कार्याचा आहे हे विसी सेवेसी आधिकोतर विज्ञाप्ती करावी तों साहेब धनी खावद असत आमचे यातीचे व धर्माचे रक्षेण करून पूर्वप्रमाणें चाले आण[१७] आम्हां प्रजेचें समाधान होये तों हुकूम करणार साहेब धनी आहेत हे विज्ञाप्ति.

तेरीख ७ रोज माहे जमादिलाखर सु।। सीत सलासीन मया व अलफ.

---

## २३ : : : शुद्ध करून जातींत घेतला

आंग्रेकालीन पत्रव्यवहार
लेखांक २५ भा.इ.सं. मंडळ
त्रैमासिक वर्ष २८,अं. ३-४

शके १६३७ वैशाख व. ११
इ. स. १७१५ मे १८

आज्ञापत्र समस्त राजकीय धुरंदर विस्वासनिधी राजमान्य राजश्री कान्होजी आंगरे सरखेल ता। वाडवल प्रा। चेहूल सु।। खमस अशरमया व अलफ भिवमी राणा याचा भाऊ गोदजीराणा हा फिरगाण प्राते बहुत दिवस होता म्हणोन तुम्ही त्यास पंक्तीस घेतला नाहीं येशास गोदजी मारानें ब्राह्मणास अन्य व देवास दीप देहू केला आहे तेणे प्रा।। देहून जातीत घेणें (नि.अ.)

छ २५ जमादिलौवल (मोर्तब सुद)

**अभ्यास :--** 'शुद्धीकरण' म्हणजे काय ? छत्रपतींची या प्रश्नाबद्दल काय वृत्ति होती ? या चळवळीचें पुनरुज्जीवन अलीकडील काळांत कोणीं केलें ?

---

१५ स्वदेश. १६ कदाचित्, दुर्घट. १७ आणि.

## २४ : : : कान्होजीच्या सत्काराची तयारी

पेशवे दप्तर भा. ७ क्र. २१] [८-११-१७१४

[महाराष्ट्रांत इतिहास–संशोधनाचा संघटित खाजगी उद्योग इ. स. १८७८ सालीं 'काव्येतिहाससंग्रह' मासिकाच्या प्रकाशनानें झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. सरकारच्या ताब्यांत असलेलें मराठी राज्याचें पेशवे दप्तर अभ्यासकांस खुलें व्हावें यासाठीं खूप खटपटी झाल्या परंतु त्यास यश आलें नाहीं. अखेर पन्नास वर्षांनंतर म्हणजे इ. स. १९३० पासून सरकारनें हें दप्तर खुलें करण्यास सुरुवात केली.

पेशवे दप्तर मूळ शनवारवाड्यांत होतें. परंतु दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दींत शनवारवाड्यास आग लागली तेव्हां तें तेथून घाईघाईनें रेसिडेन्सींतून ठिकठिकाणीं ठेविलें गेलें. इ. स. १८१८ त एलिफन्स्टननें तें एकत्रित केलें. त्यांत एकंदर १३००० रुमाल आहेत व त्यांत मुख्यतः इ. स. १७२९ ते १८१७ या काळचे कागद आहेत. पुढील काळांत यांत दक्षिण विभाग कमिशनरचे अहवाल, निरनिराळ्या सरदारांच्या वकिलांचीं दप्तरें, कुलाबकर आंग्र्यांचें दप्तर, रत्नागिरीचें कोंकण दप्तर, सातारा छत्रपतीचें दप्तर इनाम कमिशनचे जमाव-दप्तर अशा रीतीनें या दप्तरांची संख्या १३००० हून आतां ३५६३३ पर्यंत वाढली आहे. त्यांपैकीं ८५५९ इंग्रजी, २७०४५ मराठी व २९ पर्शियन आहेत. या दप्तराचा अधिक परिचय प्रा. सरकार यांनीं पेशवे दप्तराच्या प्रकाशनास एक छोटीशी प्रस्तावना लिहिली आहे तींत पहावा.

सरकारनें रियासतकार श्री. सरदेसाई यांच्या नेतृत्वाखालीं 'पेशवे दप्तराची' पाहणी करून त्यांतील निवडक कागदपत्र एकूण ४५ भागांत प्रकाशित केलें. हें काम इ. स. १९३० पासून इ. स. १९३४ पर्यंत चाललें होतें. अद्यापहि अनेक महत्त्वाचे लेख अप्रकाशितच आहेत. संशोधकांनीं यत्न केल्यास तेथें जाऊन हें कागदपत्र पाहण्याची आज व्यवस्था आहे. प्रकाशित झालेल्या पत्रांनीं मराठेशाहींतील कित्येक प्रसंगांवर चांगला प्रकाश पाडला आहे. प्रस्तुतचें पत्र शाहूच्या खाजगीकडील नोकर वसंतराव खोजा याचें आहे. कान्होजी आंग्रे व शाहू यांचा समेट बाळाजी विश्वनाथानें घडवून आणला, त्यानंतरची ही दोघांची पहिलीच भेट होय.]

श्री

महाराज राजश्री छत्रपति स्वामीचे सेवेशीं विनंती सेवक आज्ञाधारक बसवंत राऊ कृतानेक विज्ञापना. येथील वर्तमान तागायत कार्तिक शुध त्रयोदशी भोमवार[1] पर्यंत येथास्थित असे विशेष. स्वामीनी आबाजी वाड याज बराबर आज्ञापत्रे सादर केली की रा कान्होजी आंगरे याचे भेटीचा प्रसंग आहे तरी सनगे[2] तुरे व पदके येका दो प्रतीची याद पाठविली आहे, त्याप्रमाणे सिध करून पाठवणे. त्यावरून थोडी बहुत माहाली जे वस्ता होत्या त्या व आनिखी[3] खरिदी करून शैवेसी पाठविल्या आहेत. त्याची माहालीची बखैर[4] व सनगाप्रमाणें बजिनस जाबिता[5] पाठविला आहे, त्याप्रमाणे पावलियाचे उत्तर द्यावया आज्ञा केली पाहिजे. यानंतर दर्शनचा प्रसंग दिसगतीचा देखिला[6] या करितां सनगे पाठवावयाचा अनमान केला होता, परंतु मागती समागम यैसा नाहीं, या करितां पाठविली असेत तरी बजिनस स्वामीनी ज्या प्रसंगास आणविला आहे तोच प्रसंग संपादिला पाहिजे. या उपरी येसा जिनस माहाली व खरीदीहि समई मिळणार नाहीं या करितां सेवेशी सूचना मात्र लिहिली असे. स्वामी सर्वज्ञ आहेत आपण शेवक आज्ञाधारक आहो हे विज्ञाप्ति.

**अभ्यास** :—तत्कालीन राजभेटीचे प्रसंगीं भेटणारांना कांहीं तरी नजराणा घेऊन जावा लागे, परंतु राजांनाहि त्या भेटणारांच्या योग्यतेप्रमाणें परत भेट द्यावी लागे ही गोष्ट या पत्रावरून लक्षांत येईल.

कान्होजीला विशेष भेट देण्याची योजना शाहूनें कां केली असावी ?

———

१ मंगळवार. २ मौल्यवान वस्त्र. ३ आणखी. ४ हकीकत. ५ तपशीलवार यादी. ६ आंग्रे यांचे भेटीस दिवस गत लागणार हें पाहून, असा अर्थ.

## २५ : : : पहिल्या बाजीरावाची योग्यता

पेशवे दप्तर
भा. १०, क्रमांक ६६ } { २७-१०-१७३०

[पेशवे दप्तराचा दहावा विभाग हा पहिला बाजीराव व निजाम यांच्या प्रारंभीच्या संबंधांच्या कागदपत्रांचा संग्रह आहे. मराठ्यांच्या विरुद्ध चाललेले निजामाचे उद्योग, पालखेडला त्याचा बाजीरावानें पराभव केल्यापासून थोडे कमी झाले. परंतु मराठ्यांत कलागती लावून बाजीरावाचें पारडें हलकें करण्याचीं अनेक अयशस्वीं कारस्थानें त्यानें केलीं. निजामच्या या कूटनीतीची माहिती पेशव्यांचा औरंगाबाद येथील प्रतिनिधि गणेश बल्लाळ यानें वेळोवेळीं बाजीरावास कळविली आहे. पुढील पत्रहि त्याचेंच आहे.

उत्तरेकडील जयपूरचा राजा सवाई जयसिंग हा दिल्लीचें राजकारण मराठ्यांना अनुकूल राखण्यासाठीं धडपडत असे. त्यानें आपले विश्वासू सेवक म्हणून दीपसिंग यास सातान्यास एकंदर माहिती मिळविण्यासाठीं पाठविलें होतें. दीपसिंग उत्तरेंत जात असतां निजामास भेटून गेला. त्याचें गणेश बल्लाळाला कळलेलें वर्णन पुढील पत्रांत आलें आहे.]

श्रीशंकर

पुरवनी श्रीमन्त राजश्री प्रधान पंत स्वामीजी शेवेसी. विनंती उपर दीपसिंगजी भेटीस नबाबाचे गेले होते. मेजवानी वगैरे देऊन बहुमान (नें) मुख्य भेटला. पोटासी धरिले. मग येकांती बैसोन वर्तमान पुसिलें कीं आम्ही जाणितो जे, सवाई जैसिंगजी सर्वाहून थोर, यानी तुम्हास शाहू राजियापासी पाठवावेसे काये काम होते ? तुम्हांसारखी थोर माणसांही यावेंसें नव्हतें, म्हणोन पुट देऊन [1] भेट घेऊं लागले. त्यास यानी उत्तर दिल्हे जे, माहाराजियांनीं आम्हांस आपमतें पाठविलें नाहीं. पातशाहांची आज्ञा होती जे, जाऊन मांडवगडास जप्तीत आणावा आनी शाहू राजियाकडे इतबारी [2] मुतसदी [3] पाठऊन गुजरात व मालवियाचा बंदोबस्त करावा कीं नरमदा उतरून आलीकडे न येतेसें करावें, म्हणून पातशहाचे हुकुमावरून गेलों होतों, म्हणून जाब दिल्हा. मग पुसों लागले जे कसें केलें, काय केलें ? यांनीं निवेदिले

१ पुष्टि देऊन, चढवून. २ विश्वासू. ३ मुत्सद्दी.

४८]

जे, अकरा लाख मालवें व पंधरा लाख गुजरात येणेंप्रमाणें करार केला. म्हणों लागले जे, मालवे तर तुमचे हातचे गेलें. बंगस जाहला. जाब दिल्हा कीं तोच चितास येईल तर येणेप्रमाणें चुकवील अगर न चुकवीत, येख्तियार त्याचा आहे. नवाब म्हणो लागला कीं तुम्ही बंगशाचे घर अकरा लाख करून बुडविलें. त्यास काय राहेल ?[1] आपण मालवाचे सुबेदार होतो तेव्हां अगदीं[2] तीस लाख चालीस लाख वसूल होता, म्हणून नवाब बोलिले. यांनीं अुत्तर दिल्हे जे, तो अेक रुपया न देऊत आम्हांस काय गरज ? मग गुजरातचा मजकूर पुसिला कि गुजरातेस बांडे व गायेकवाड धुमधाम करतील तुम्ही प्रधान पंताचे विदमाने[3] चुकविलें हे कसें होत जाईल ? यानी उत्तर दिल्हे जे करार पडला आहे कीं बांडे गायकवाड दाभाडे येतील त्यांस श्रीमंत राजश्री चिमाजी आपा व आम्ही एक होऊन त्यास तंबी करावी. मग बोलिले जे याचा इतबार[4] तुम्हांस आहे. आपणास येक काडीचा इतबार वाटत नाहीं. यानी उत्तर दिल्हे कीं, आम्हांस इतबार आहे. याचे आमचे वडिलापासून घरोबा आहे. आम्हासी बदलून गोस्ट सांगणार नाहीं. मग या गोस्टी सोडून घडी घडी पुसो लागले कीं सातारा महाराजापांसी मातबर मनसुबेबाज राजा ज्यास मानीतो ऐसा तुमचे नजरेस कोण आला ? यानी जाब दिल्हा की माहराजा जैसिंगजीनी मजला याच कामाबद्दल बहुत करून पाठविले जे बाजीराऊ पंडित प्रधान यांचे नांव मुलकांत मरदुमीचे फार आहे. परंतु गिरंदारी[5] व मुदसदगिरी व मान आदर राज्यांत व बोलोन चालोन पोख्त कारबारी मनास आणून येणें म्हणोन पाठविले होते, ते आपण मनास आणिले. मग नवाब पुसो लागले कीं कोन्हास तुम्ही मातबर व पोख्तकार[6] व साहेब तरतुद व राजा मेहरबान गिरंदार कोन्हास वलखिले ? दीपसिंगजीनीं उत्तर दिल्हे जे सिवाय बाजीराऊजी आणिक कोन्ही सत्यवचनी अगर प्रामाणिक अगर पोख्तकारी अगर चलन-साहेब-फौज[7] दुसरा दिसत नाहीं. मग पुसिले जे, राजा खुद कसा आहे ?

---

१ माळव्याच्या सुभेदारानें मराठ्यांना अकरा लाख द्यावे असा केलेला करार परडवणार नाहीं. तीस चाळीस लाखांतून एवढे मराठ्यास दिल्यावर उरलेले प्रांताच्या कारभारास लागतील मग बंगषास काय राहील असा भावार्थ. २ एकंदर. ३ मार्फत. ४ विश्वास. ५ मिळवणें व संरक्षण करणें. ६ वजनदार. ७ चालती फौज धारण करणारा.

यानी उतर दिल्हें की राजाहि वहुतच खुबिया[१] राखतो. नबावानी उत्तर दिल्हे जे आम्ही आयिकिले जे कितेक गोस्टी हलकेपणाच्या आइकतो. यांनीं उत्तर दिल्हें की ते मजलीसीसारखें [२] न चालत तर राज्य कैसे राहतें? परंतु पोख्त शाहणे विवेकीं. जावसाल उत्तम करिताती यैसे उत्तर झाले.

**अभ्यास** :—शाहू व बाजीराव यासंबंधीं दीपसिंगाचें काय मत झालें तें सांगा. मूळांत निजामाचें मत काय होतें?

---

## २६ : : : धीराचा चिमाजी आप्पा

हिंगणे दप्तर खं. १ ला पृ. १२, पत्र १५ वें

२ जून १७४०

[बाजीरावाच्या मृत्यूनंतर दोन महिन्यांनीं चिमाजी आप्पानें पुण्याहून जयपूर येथील आपला वकील महादेवभट हिंगणे यास लिहिलेलें हें पत्र चिमाजी केवढा धीराचा पुरुष व मुत्सद्दी होता व त्याला मराठ्यांच्या सामर्थ्याविषयीं केवढा विश्वास होता हें दाखविणारें आहे. तसेंच बाळाजी विश्वनाथाच्या वेळेपासून मराठे उत्तरेस कां धाव घेत, त्यांचें ध्येय काय याचीहि बरीच स्पष्ट कल्पना चिमाजीच्या पत्रावरून होते. पराक्रमी भावाच्या मृत्यूनंतर चिमाजीस शोक करीत बसण्यास फुरसद नाहीं. उत्तर हिंदुस्थानांतील आपल्या मित्रमंडळींत तो या पत्रानें विश्वास निर्माण करीत आहे. पत्र काळजीपूर्वक अर्थ लावून वाचण्यासारखें आहे. —भा. इ. सं. मंडळ वर्ष २५, अंक १ ते ४,]

....ऐशास[३] पातशहाची सर्वप्रकारें कृपा संपादून घेऊन[४] पातशहाचा बंदोबस्त तुटला आहे कित्येक अमीर बेयेख्तियार[५] होऊन जो जे जागा राहिला तो बराय[६] खुद खावंद आपणच यैसे मानून पातशहाचा हुकूम किमपि मानीत नाहीं. त्यास पातशाहाच्या येख्तियरांत आणून पातशाही बंदोबस्त करून रयेत गोर गरीबाची दुवा घ्यावी. मुलकाची मामुरी[७] करून पातशाही खजानियाची तरकी[८] करून हिंदुस्थानच्या पातशाहाचा बंदोबस्त केलियाची लोकोत्तर

१ खुब्या, युक्त्या. २ मुत्सद्दीमंडळीची बैठक. ३ येथून पत्रास उत्तर सुरू. ४ घेऊं. ५ अधिकार नसलेले. ६ साठीं, जागीं. ७ भरभराट. ८ भरभराट.

५०]

कीर्ती संपादून पातशाहाचे कृपेस पात्र व्हावें याच अन्वयें आजी आठ दहा वर्षें तीर्थरूप कैलासवासी राव यानी राजश्री सवाईजी यांचे हातून नवाब खानदौरा यांजसी संदर्भ[1] लाविला होता कितेक करार मदाराच्या गोष्टी सवाईजीच्याच विद्यमाने होऊन आल्या होत्या. त्याचा परिणाम लागोन योजिला मनसुबा पातशाहाच्या चितानरूप सेवटास जावा तरी आमचा प्रसंग सरदारी सिपहा-खर्च व किलेजात व बाजे[2] कितेक कामे यामुले वोढगस्त सार्वभोमापासून मदतखर्च व कर्ज परिहारास द्रव्य प्राप्त होऊन उमदा मनसुबा करून बंदोबस्ताची सुरत करून दाखवावी तर ते गोष्टी त्याजकडून होऊन आली नाहीं द्रव्यावरी मनसुबा आमचा त्यामुळें सर्व सिथील पडले मध्यें कितेक विक्षेपही[3] पडले तथापि रायांची उमेद पातशाही बंदगी[4] हासील[5] करून घेऊन आपले करारमदारावर काईम राहावें हेच त्रिकर्णपुरसर[6] होते तेच गोष्ट चितात आणून उदडही आशा नवाब आसफज्याहानीं दाखवून सेद लस्करखान पाठविले त्यास तऱ्हा[7] देउन पूर्वीपासून जे जे गोष्टी चितावरी धरिली आहे तेंच परिणामास लावून लोकोत्तर उत्तम करून दाखवावें दुसऱ्या जवळून द्रव्यादीक विशेष प्राप्त जाहाले आणि सार्वभोमापासून काहीं न्यून मिळाले तरी तेच कबूल करावे आणि आपल्या वचनप्रमाणावर काईम राहावें याच अन्वयें रायाची आमची बोली दृढोत्तर होऊन तुम्हांस सवाईजीकडे पाठवावेसा निश्चय ठहराऊन ठेविला तदोत्तर रायांनी मालवियांत जावयाचा उदेश केला आम्हीं औरंगाबादेस गेलो उपरातीक[8] रायानी तुम्हांस सवाइजीकडे रवाना केले रायानी बरानपुराहून कूच करून नेमाड खरगोण प्राते आले काकेरकर मवास[9] मुफसद[10] होता त्याचे पारपत्य करून बंदोबस्त केला तदोत्तर कूच करून रेवा उतरून जाताच शरीरी पीडा वायोची होऊन वैशाख शुध त्रयोदशीस रायानी देहावसान केलें इश्वरे मोठी अनुचित गोष्ट केली. इश्वरी तंत्रास उपाय नाहीं जे जे काली ज्या ज्या गोष्टी घडून यणार तितक्याच घडतात सर्व गोष्टीस इश्वरी सत्ता प्रमाण आहे माणसाचे हाती तिलमात्र नाहीं परंतु विचारी दीर्घदर्शी लोक आहेत ते मनसुबियांचा पेश[11] अंदेशाचा[12] विचार चि(ति)तात व सवाई प्रमुख थोरथोर आहेत त्याचेही चितांत येणे ते आलेच

---

१ संधान २ इतर. ३ व्यत्यय. ४ सेवा. ५ रुजू. ६ सर्वश्रुत. ७ त्याग करून. ८ नंतर. ९ बंडखोर. १० बंड करून. ११ पुढील. १२ धोरण.

असेल या गोष्टीचा विचार कैसा म्हणाल तर तीर्थरूप कैलासवासी नाना[१] याची नजर रयेत पाळावी अशेष जनाची दुवा घ्यावी हेच त्याच्या चितात कायावाङमन्सा होते तदनरूपच अरण्यवत् मुलूख जाहाला होता त्यास कौल देऊन कंटकाचा उच्छेद करून रयेत नादविली रयेतीचा आसीर्वाद घेतला तन्मुले नानाची कीर्ती लोकोत्तर प्रकाशमान जाहाली नानाचा काळ जाहाला तीर्थरूप राव प्रधानपदास आठई[२] जाहाले राजश्री (मो. जा[३]) स्वामीनी कृपा करून गौरव केलें नानाच्या पदरीं रयेतेची दुवा व देव ब्राह्मणाची स्थापना केली त्यांचा आसीर्वाद पदरीं विपुल ते पुण्य नानानी रायाचे पदरीं बांधले व रायांचीही बुध रयेत परिपाळणांस पूर्ण देवा ब्राह्मणाची स्थापना करून काश्या दीक महास्थळी विश्वेश्वराचा जीर्णोद्धार केला पुढें उतर प्राती कीर्तीलता प्रफुल्लित केली. विश्वेश्वराची स्थापना करावी हे आर्त होतीच नानानी कीर्ती संपादिली त्यापेक्षा दशगुणीत कीर्ती जगत्यात रायाची प्रकाशमान जाहाली राव पूर्ण प्रतापी प्रतिश्रिष्टकर्ते[४] होते त्याचे पुत्र चिरंजीव राजश्री नाना आहेत सर्वा प्रकारे बुधिमंत वडील वडिलोपार्जित येशकीर्ती घडून आली ते अभिवृधीस पावावयास निपुण आहेत राव असता सरदार व फौज व कार्यकर्ते पुरुष पदरीं होते तेच प्रस्तुत आहेत ज्या ज्या गोष्टी रायानी संपादिल्या व संपादावयाच्या चितांत आल्या त्याचा परिणाम लावावा हेच त्रिकर्ण पुरसर चितांत आहे.

सारे फौजेची सिधता करून दसरा होतांच उभयेतातून येकजण सरदार सहवर्तमान घेऊन त्या प्रांते येऊन तदोतर राजामलजी (स घे) ऊन तुम्ही पुढें येणें सवाईजी व राणाजी यांचे भेटीचा विचार करून अभेसिंगजीसही उभयेताचे विचारे आपणाजवळ आणून भारी होऊन सार्वभोमाची इच्छा असेल तदनरूप कर्तव्यार्थ संपादेणें तो संपादिला जाईल. कदाचित नकारपूर्वक[५] आदिकरून दीर्घ दृष्टी न देता अल्पबुद्धीस प्रवर्तून राव गेले अत:पर कार्ये राहिलें म्हणून आम्हासी विरूध वर्ततील तर काये मुजाइका[६] आहे लक्ष फौज व उमेदे सरदार आमच्या पदरीं आहेत नकारपूर्वकस मुळीच ठिकाणीं लावा-

१ बाळाजी विश्वनाथ. २ आ–ठायी = स्थानापन्न. ३ मूळ पत्रांत मोकळी जागा. ४ प्रतिसृष्टि कर्ते. ५ निजाम. ६ पर्वा, फिकीर.

वयास[1] अतर होणार नाहीं याही गोष्टीने सार्वभोमाचे व सवाईचे मनो-भीष्ट सिधीस पाऊन कोते उदेश कितेक संकल्पविकल्प चित्तांत आणितील तैसे सवाईजीच्या चित्तांत येणेच नाहीं सवाईजी आम्हाप्रमाणें जाणतच आहेत राव होते तेव्हां ते काय करीत होते करणार सरदार व इत्यादिक सामादीक[2] व आम्ही आहों तेच आहों तुम्हांस सर्वाविसी कुळीप्त आहे आधी तो आमच्या करत्रृत्वास ते बरे वाकीफ[3] आहेत येद्यापि काही गोष्ट त्याच्या चितात नयेसी जाहाली तरी तिचा शेहनिशह[4] करून त्याच्या प्रत्ययास येईसे करून ते सार्वभोमाचा निशा[5] करीत ते करणें सर्वा हिंदूस महदाश्रये रावच होते रायासरिखा सामानपूर[6] सर्व गोष्टीनें संपूर्ण दक्षणेस या हिंदुस्थानांत दुसरा कोणी नव्हता असों राव काये घेऊन गेले रायानी सर्व ठेविले आहे पहिल्यापासून आम्ही व वरकड रायांच्या पदरी होतो ते आहो सवाई व राणाजी व अभेसिंग यांचा आमचा येक विचार असता जे जे मनावर धरून ते न घडेसे काये आहे सारांश राव असता होते तेच हाली आहे अंतर तिलतुल्य नाहीं म्हणावयास अंतर ये(व*) ढेच की राव पर्जन्यकाली मालवियांत राहून मनसुबा करिते तोंडास[7] गेले होते ते गोष्टी मागे येऊन तोच मनसुबा दसरा जाहालियावर होणार इतकेच अंतर आहे वरकड कांहीं नून्य नाहीं.

**अभ्यास** :--उत्तरेकडे स्वारी करण्यांत बाजीरावाचे काय उद्देश होते? यासाठीं कोणाकोणाचा 'येक' विचार पाहिजे असें चिमाजी लिहितो? असें कां? 'नकारपूर्वक' असें निजामास उद्देशून सूचक कां लिहिलें असावें.

---

१ बंदोबस्त करण्यास. २ सामदामादि करणार. ३ जाणणारे. ४ खात्री. ५ भरंवसा, विश्वास. ६ सामग्रीयुक्त. ७ तोंडास पुढें.

## २७. : : : निजाम उल्‌-मुल्क यानें मृत्युसमयीं पुत्रास केलेला उपदेश

इतिहास संग्रह, वर्ष ७ अंक ४।५।६ पृ. ३१ } { इ. स. १७४८

[पुढील उताऱ्यावरून निजामाची मराठे लोकांबद्दलची कल्पना, तसेंच आपण स्वतंत्र आहों कीं बादशाहाचे नोकर आहों याबद्दलची जाणीव हीं दोन्ही कळून येतील. या उपदेशाचीं एकंदर १७ कलमें आहेत. निजामानें आपला पुत्र नासिरजंग यास मृत्युसमयीं उपदेश केला त्या वेळेस तेथें राज्याचे सदरुस सुदूर (मुख्य न्यायाधीश) बिछान्याशीं बसले होते. त्यांनीं त्या उपदेशाचें पेन्सिलीनें कागदावर टिपण करून ठेवलें. या १७ कलमांपैकीं निवडक पुढें दिलीं आहेत. प्रा. जदुनाथ सरकार यांनीं मॉडर्न रिव्ह्यूच्या ऑगस्ट १९४८ च्या अंकांत यास 'निजामचें मृत्युपत्र' म्हटलें आहे तें मात्र बरोबर दिसत नाहीं.]

१ दक्षणचे राज्य करणारास योग्य आहे कीं मराठे लोक या देशचे जमीदार आहेत त्याशी सल्लेने वागावें.

३. आपले वय मुशाफरींत घालून नवी जागा नवे पाणी व छाया नवी तंबूची येणेप्रमाणें हरएक उपभोग घ्यावे. कारण ईश्वरी आज्ञा नित्य मुशाफरी करण्याविषयीं कुराणांत आहे. आणि मुलखाचा बंदोबस्त होतो. परंतु बरसात व जरूरी पुरती छावणीहि करावी. कारण अशा समयांत सर्व जीवास श्रम होतात. आणि शिपाई यांची तैनात जवळ पास करीत जावी. कशाकरितां कीं त्यांचा वंशखंड होऊं नये.

७. दक्षण देश सहा सुभे. त्यांत हरएक सुभ्यास एक एक बादशाह होते आणि लाखो शिपाई पाळले जात असत. सांप्रत ही पृथ्वी कैलास (पैगंबर?) वासीयांचे वेळेपासून[1] एकाकडेच जाली. त्यापक्षीं योग्य हे आहे कीं हरएक खानदानी लोकांची खबर घेऊन, त्यास आपले सरकारचे कामावर ठेवून, वारंवार त्यांची बदली एक दो सालांत करणें व वाढविणें हें मुख्य मानून हाच शिरस्ता आपण व आपले वंशजांकडून जारी ठेवावा.

१ औरंगजेबापासून.

१०. दक्षणचें राज्य नोकरीबद्दल आहे. याजकरितां बादशाहांची मर्यादा सोडूं नये. म्हणजे त्यांत ईश्वराचा संतोष आहे. इराणचा बादशाहा दिल्लीस आला, तेव्हां तो कृपाळूपणें मजला हिंदुस्थानची बादशाहात देत होता. परंतु विनंति केली कीं, मी चाकर आहे. या गोष्टीनें निमकहराम ठरेन व आपले कारकीर्दीसही लोक वाईट म्हणतील. या जबावानें संतोष होऊन माझी फार तारीफ त्याणें केली.

१२. सर्व दक्षणचे लोकांत बुराणपुर व विजापूरचे लोक इतबारायोग्य* नव्हते जसे काश्मीर व गुजराथ येथील माणसें बेइतबारी, त्याप्रमाणें. असे माझे अनुभवास आलें.

१४. तमाम खजीना स्वारीबरोबर ठेवणें हे शिपाई व फौजेचे खातर-जमेकरितां आहे आणि सावकारही आबाद राहातो. व त्या आबादीमुळें शत्रु आपण होऊन पादाक्रांत होतो. मी आपले शिपायांस शत्रूचे शिपायांहून अधिक भितो. कारण त्यांस दिलगीर ठेवूं नये.

१७. जावें. आपले कारखान्यावरील माणसांस कायम करायाहून अवकाश आतां सांपडत नाहीं. मी तुम्हांस ईश्वराचें स्वाधीन केलें आहे कीं सद्बुद्धी देवो व तुमचा रक्षक तोच आहे.

---

## २८. : : : शाहूचें स्वदस्तुरचें मृत्युपत्र

इतिहास संग्रह, पुस्तक ७ वें, अं० ४।५।६ पृ. १५ } { इ. स. १७४९

[थोरले शाहू छत्रपति यांच्या हातच्या दोन याद्या. या याद्यांमुळें पेशव्यांकडे मराठा राजमंडळाचें प्रभुखत्व आलें.]

**यादी नंबर १**

ओळ
१ श्री.
२ राजमान[1] रा बालाजी[2] प्रधान
३ पंडित[3] यास आज्ञा तुम्ही फौ-

---

* विश्वासास पात्र.

१ राजमान्य. २ बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे. ३ पंडित.

४ ज घरने[1] सरवास[2] आज्ञा केली
५ त्याच्या* दैव नाहीं महारा-
६. जास दुखने जाले नाहीं बर हात[3]
७ नाहीं राजभार चाला[4] पाहिजे
८ तर पुढें वस[5] बसवने[6] कोलापुर-
९ चे न करने[7] चिटणीसास[8] सर-
१० व[9] सांगितले[10] तसे करने वस
११ होईल त्याच्या आज्ञे-
१२ त चालून राजमंडल[11] चालव-
१३ ने चिटणीस स्वामीचे इस-
१४ वासू[12] त्याच्या तुमच्या
१५ विचारे राज[13] राखने वस होई-
१६ ल तो तुमची घालमल कलनार नाई[14]
१७. सुदन[15] आसा.

**यादी नंबर २**

ओळ
१ श्री.
१ राजमान रा बालाजी व पंडित प्रधान
३ आज्ञा जे राजभार तुम्ही चालवा-
४ ल हा भरवसा स्वामीस आहे पहि-
५ ले सांगितले खातरजमा ती चिटणी-
६ सानी आढल[16] कली[17] तुमचे मसतकी

---

१ घरणें. २ सर्वांस. *रघूजी भोसले. ३ वरे होत. ४ चालला. ५ वंश (रामराजा). ६ वसविणें—गादीवर बसविणें. ७ करणें. कोल्हापूरच्या वंशजाची सातारच्या गादोवर स्थापना करूं नये. ८ गोविंदराव चिटणीसास. ९ सर्व. १० आपल्यामागें कोणास गादीवर वसवावें याचा विचार शाहू छत्रपति करीत होते, त्या वेळीं ही यादी लिहिलेली आहे. ११ राजमंडल दाभाडे, भोसले, प्रतिनिधि इत्यादि. १२ विश्वासू. १३ राज्य. १४ करणार नाहीं. १५ सुज्ञ असा. १६ अढळ. १७ केली.

७ हत[1] टविला[2] आहे तस[3] होईल तो
८ तुमचे पद प्रधान चालवील करी
९ ल आतर[4] तास (स) फत आसे त्याचे
१० आज्ञेत चालून सेवा करने[5] राज-
११ राखने[6] वहुत काय लिहिने[7] सुदन[8]
१२ आसा[9].

—संशोधक : श्री. य. रा. गुप्ते

**अभ्यास** :—या मृत्युपत्रांतील मुख्य मुद्दे सांगा.

---

## २९ : : : मोठी सनद

मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १ ला, पृ. १ } { इ. स. १७५२

[राजवाडे खं. १, या पुस्तकांत ही सनद मूळ फारशी व तिचें भाषांतर सुमारें १० पृष्ठें व्यापीत आहे. तिचा निवडक भाषांतरित भाग येथें घेतला आहे. हा एक करारनामा असून त्याचे दोन भाग आहेत. पूर्वार्धाला अर्जी म्हणून म्हटलें असून उत्तरार्धाला अर्जीचें उत्तर म्हणून म्हटलें आहे. पूर्वार्धांत मराठ्यांतर्फे अमुक कामगिऱ्या अमुक किफायतीसाठीं 'आम्ही करूं' असें म्हटलें असून उत्तरार्धांत बादशाहातर्फे 'तुम्ही करावें' असें लिहिलें आहे. बादशाहीचा बोज राखण्यासाठीं बरोबरीच्या करारास 'अर्जी' व 'अर्जीचें उत्तर' किंवा 'आम्ही करूं' 'तुम्ही करावें' असें स्वरूप आलें आहे. या सनदेमुळें बादशाहा मराठ्यांच्या रक्षणाखालीं आल्यासारखें झालें. या सनदा पेशव्यांच्या नांवें दिल्या असून त्यांत साताराच्या महाराजांचें नांव नाहीं. (राजवाडे टीपेचा संक्षेप. मूळ पृ.१, २, ३.)]

राजश्रियाविराजित बाळाजी बाजीराव यांस दिलेल्या उच्च फरमानाची नक्कल.

---

१ मस्तकीं हात. एकंदरींत शाहूची भाषा म्हणजे अशुद्ध मराठीचा एक मासलाच होय. २ ठेविला. ३ तसें. ४ अंतर देईल त्यास शपथ असे. ५ करणें. ६ राखणें. ७ लिहिणें. ८ सूज्ञ. ९ असा.

प्रस्तुत राजश्री मल्हारराव होळकर व पातशहाचे दोस्त आणि वीरशिरोमणि जयाजीराव शिंदे यांच्याशीं तह येणेंप्रमाणें केला जातो कीं--श्रीमहादेवाची व खंडेरावाची व धर्माची व स्मृतीची शपथ व साक्ष तुम्हा आम्हास आहे कीं--आम्हीं आमरणांत तुमची आज्ञा व सेवा व चाकरी व तुमच्या शत्रूचें पारिपत्य करण्याचा मनापासून प्रयत्न करूं--मग तो शत्रू अबदाली असो किंवा दुसरा कोणी राजा असो अथवा एखादा लहान मोठा जमीदार* असो--सारांश. जो कोणी सरकारचा हुकूम मोडील त्याला तंबी देऊं व हुजूरच्या पुढें आणूं.. जेणेंकरून आपल्या अखंड राज्याचें व खुद्द हुजूरचें कल्याण होईल अशीच तजवीज करूं; आणि जेणेंकरून हुजूरचें व नवाबबहादराचें† समाधान व वजीरबहादराची मर्जी राहील त्याच गोष्टी अमलांत आणूं. आणि जो कोणी हुजुरजनाव[१] याचा व नवाबबहादराचा दोस्त असेल त्याला आम्हीं आमच दोस्त म्हणूं व जो कोणी हुजूरचा व नवाबबहादराचा शत्रू व दुष्मन असेल त्याला आम्ही आपला शत्रू समजूं, आणि जो कोणी सरकारच्या हुकुमीं आपले तनमन खर्चणार नाहीं त्याला आम्ही शिक्षा करूं. आणि पन्नास लक्ष रुपयापैकीं अबदालीच्या पारिपत्याकरितां तीस लक्ष रुपये आम्हास पावते झाले, व मुलतान, पंजाब, थटा[२] व भकर[३] या सुभ्यांची व त्यांच्या फौजदारीची व चार महालांच्या साऱ्याची व हिसार[४], संबळ[५], मुरादाबाद[५] व बदाऊंचे[६] फौजदारीची चौथ आमच्या सैन्याच्या खर्चाकडे लावून दिली आहे. आणि दोन भाग हुजूरच्या खालसाकडे[७] लावून दिली आहे. आणि एक हिस्सा वजीरबहाद्दर व नबावबहादराजवळ असणाऱ्या पातशाही सैन्याच्या खर्चाकडे लावून दिली आहे. येणेंप्रमाणें करार केला आहे. आणि पवित्र अजमीर सुभ्याची सुभेदारी व नारनोल[८] व सांभर[९] वगैरेची फौजदारी व त्यांच्या मुतालिकी[१०] आणि अकबराबादेची सुभेदारी व मथुरा वगैरे यांची फौजदारी व मुतालिकी व दुसऱ्या शर्तींतल्या सुभेदाऱ्या व फौजदाऱ्या व

*वतनदार. †अयोध्येचा नबाब.

१ साहेब, महाराज. २ ठठ्ठा. ३ बक्कर, हीं ठिकाणें सिंधमध्यें आहेत. ४ हें ठिकाण पंजाबांत आहे. ५ संयुक्त प्रांतांत आहेत. ६ दिल्लीनजीक. ७ खास सरकारकडे. ८ पतियाळा संस्थानांत. ९ सांबर राजपुतान्यांत. १० कारभारीपणाचा अधिकार.

त्याचे नजराणे सेवकास मुकरर[११] केले आहेत व बक्षीस दिले आहेत. म्हणून आम्ही शपथपूर्वक कौलकरार करितों कीं ह्या सुभेदारींतील व फौजदारींतील राजांच्या व जमीदारांच्या अब्रूप्रमाणें मामूल[१२] वहिवाटीला अनुसरून सर्व अटी पाळीत जाऊं व त्या सुभेदारीचे व फौजदारीचे जे हक्क व लवाजम[१३] असतील त्यांचा कबजा घेऊं व सुभ्यांचा व फौजदाऱ्यांचा पक्का बंदोबस्त करूं व पातशाही राजेरजवाड्यांचे ताब्यांतील मुलखांपैकीं जुना प्रांत कोणी बळकाविला असेल तो त्याच्या ताब्यांतून काढून अर्धा सरकारांत देऊं व अर्धा सैन्याचे खर्चाकरितां आम्ही आपलेकडे ठेवूं. आणि एखादा प्रांत खालसा करण्याचे वेळेस व फिसाद्यांचें[१४] पारिपत्य करण्याचे वेळेस जी अधिक फौज, सरदार, शिपाई व तोफखाना आम्ही ठेवूं ती हुजूर तैनातींतील[१५] समजत जावी. आम्ही दोघे व इतर अमीरउमराव नित्याप्रमाणें हुजूरच्या सेवेंत हजर राहूं आणि अबदाली वगैरेंचें पारिपत्य करण्याचे कामीं आमचाच सल्ला हुजूर ऐकतील तर तें काम आम्ही स्वतःच बजावूं, आणि तें काम करण्यास हुजूरची स्वारी स्वतःच जाणें जरूर पडेल तर आम्ही आपल्या स्वारीबरोबर येऊं आणि जिवापाड मेहनत करूं. अथवा तें काम अमिरांच्या हातून होत असल्यास आम्ही विनंति करूं त्या अमिरांनाच पाठवावें, किंवा त्यांची सल्ला घेऊन तें काम आम्ही करूं[१६]....

**अभ्यास**:—या करारानें कोणत्या जबाबदाऱ्या मराठ्यांनीं स्वीकारल्या?

---

११ निश्चित. १२ नेहमींच्या. १३ लवाजीम, कर. १४ बंडखोर. १५ चाकरी, सेवा. १६ ह्या दोनतीन ओळींतील शब्दयोजना काळजीपूर्वक वाचण्यासारखी आहे.

## ३० : : विजयदुर्गकर आंग्रे यांजवर चाल करा

पेशवे दप्तर
२४, पृ. १५२, ले. १५६ } { १४-२-१७५६

[ इंग्रजांचे साह्यानें झालेला विजयदुर्गाचा पाडाव व तुळाजीचें पारिपत्य हा नानाच्या पेशवाईंतील एक विषादजनक बनाव आहे. त्यासंबंधीं अधिक पत्रें विस्तारभयास्तव देतां येत नाहींत. ' कुलाबकर आंग्रे सरखेल* या पुस्तकांत सविस्तर विवेचन सांपडेल. ]

श्री. राजश्री जावजी गौली गोसावी यांसी--

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ना बालाजी बाजीराऊ प्रधान असीर्वाद. सुहूर सन सीत खमसैन मया व अलफ. मुंबईकर इंग्रज यावयाचा गुंता होता त्यास सर्व सरंजाम आरमार सामानसुधा येऊन पोहोचला. राजश्री रामाजी* माहादेवहि आले. तुम्ही आहाच. अत:पर गुंता राहिला नाहीं. तरी तुम्ही सर्व सरदार येकचित.होऊन मातबर येलगार[1] करून मुख्य स्थल हस्तगत करणें. आंगारकाचे[2] भेटीचा मजकूर कोण्ही बोलावयास येईल तरी सहसा न आइकणें. येविसी राजश्री रामाजी माहादेव यास सविस्तर आर्थ लिहिला आहे. आंगारकाचे भेटीचे प्रयोजन नाहीं. निकडीने येलगार करून कार्यसिद्धि करणं.[3] असा समय पुढें कधी येणार नाहीं हे पुर्ते चितात आणून सर्व येकविचारें होऊन कार्य करणे. जाणिजे छ १३ जमादिलोवल. बहुत काय लिहिणे ?

---

*बिवलकर. १ एलगार, निकराचा हल्ला. २ आंग्रे. ३ येथें बाळाजी बाजीरावाचा शिक्का.

## ३१ : : : राघो भरारीची कंदाहारकडे दृष्टि

इतिहास संग्रह वर्ष ७ वें अंक १०–१२ }
ऐ. स्फु. ले. भा. ४ ले. ११ } { ४ मे १७५८

[मराठ्यांच्या चढत्या वाढत्या पराक्रमाचें स्वरूप दाखविणारें खुद्द राघोबाचें पत्र.]

श्री.

"सेवेशीं विज्ञापना. लाहोर, मुलतान, काश्मीर वगैरे सुभे अटके अलिकडे, येथील बंदोबस्त करून अम्मल बसवावा. त्यास, कांहीं जाला, व कांहीं होणे तोही लवकरच करितों. अहमदखान अबदाली याचा पुत्र तैमुर सुलतान व जाहांखान यांचा पाठलाग सरकारचे फौजेने करून त्याची फौज लुटून घेतली. कांहीं थोडीशी फौज झडत पडत अटकेपार पिशावरास जाहान-खान व तैमुर सुलतान पोहोंचले. खांसा अबदाली इस्पहां इराणचा पाद-शहावरी फौज सुद्धां चालोन गेला होता, त्यास इराणचा पादशहा जबरशाहा तिकडून अवदालीचे फौजेवर चालोन येऊन हल्ला करून कांहीं फौज लुटून घेतली. खासा अबदाली मात्र बारा, चौदा हजार फौजेनिशीं इस्पहानांतून अलिकडे कंधारास आला. इराण्याची फौज याचा पाठलाग करीत आली आहे. जबरदस्तखान व मुकरबखान वगैरे सरदार व जमीनदार त्या प्रांतींचे अब-दालीचे जबरदस्तीमुळें रुजू होते, तेही बदलोन[1] हंगाम[2] करितात. हल्लीं त्यांच्या अर्जा,[3] रफीकां[†] होऊन सेवा करून दाखवून अबदालीस तंबी करूं ऐशा आल्या आहेत. चहूंकडून अबदालीवर हंगाम जहाला आहे. याजमुळें त्यांचा धर सुटला आहे.सबब हिरातेंत गेला तर अबदालीस धर धरवत नाहीं. सारांश, अबदालीचा जोरा तिकडून होतो ऐसे नाहीं. त्याचें साहित्य उपराळा[4], कोण्ही करितां दिसत नाहीं. इरानचे पातशाहानीं तिकडून फारच जेरदस्त केले आहे. इकडून जोरा पोहोचावून सरकारचा अंमल अटकेपार करावा. अहंमदखान अबदाली याचा पुतण्या अबदुल रहीमखान अबदालीचे दौलतेचा वारीस[5] स्वामीपाशी देशास आला, तो स्वामीनीं आम्हांकडे पाठविला होता..

---

१ बदलून अबदाली विरुद्ध जाऊन. २ दंगा. ३ विनंतीपत्रे. † स्नेही, दोस्त ४ साहय. ५ वारस.

त्यास अटकेअलीकडे कांहीं थोडीशी जागा बसावयास देऊन अटकपार काबूल पिशावरचा सुभा देऊं. अबदालीची फौज अबदुल समदखान सरहिंदेत होता तो पाडाव होऊन सरकारांत आहे तो व आणखी या प्रान्तींची फौज इरानी मोगल येऊन देऊन मशारनिल्हेची रवानगी करितो. हे तिकडील बंदोबस्ताची पैरवी* करितील. स्वामींचे पुण्यप्रतापें अबदालीस जोरा पोंहोचावून तंबी करितील, पारपत्य उत्तम प्रकारें करून अटकेपार अंमल बसवितील. लाहोर प्रांतीं राजश्री रेनको अनाजी व रायाजी सखदेव ऐसे ठेविले. गोपाळराव गणेश यांचाही पैगाम† आहे. तेही राहातील. यांजशिवाय आणखी किरकोळी पथकें ठेवितों. स्वामीचे पुण्यप्रतापें बंदाबस्त उत्तमच होईल. पुढें स्वदस्तुर इरानचे पातशहाचे कागदही आम्हांस व मल्हाररावास आले होते कीं, लवकर कंधारेस यावें आणि त्यांचे पारपत्य करून अटकेची हद्द करावी, ऐसा मजकूर आहे. परंतु आम्ही तरी काबूलचा सुभा अबदुल रहीमखान स्वामींनी पाठविला, त्यास देतों. फौज वगैरे थोडेबहुत साहित्यहि करितो. काबूल व कंदहार हे अटकेपारचे सुभे हिंदुस्थानकडे अकबरापासून आलमगीर पावेतों होते. ते आम्हीं विलायतेंत[६] कां द्यावे ? यास्तव तूर्त येथें सुभे देतों. त्यासही फारसे या सुभ्यांची दरकार नसेल. तो इरानचा अंमल करील. आम्ही कंदाहार पावतो अंमल बसवून तूर्त त्यास गोडच जाब पाठविणार आहों. लटी व जंबूचा राजा व काश्मीर वगैरे तमाम वकील आले आहेत. मामलत थोडीबहुत अटके अलीकडे करीत आहों. पलिकडील तूर्त होत नाहीं. खटपटमात्र होईल. तूर्त तांतडीमुळें जें होईल तें करितों. पुढील स्वारीस जो कोणी सरदार मातबर येईल तो बंदोबस्त करील. मुलूख दो चौ करोडीचा वसुली परंतु जमीदार मवास[७] मोठे मोठे आहेत. आम्हीं नांवास मात्र खंडणी करितो. परंतु जेथें पंचवीस लक्षांच मुलूख, तेथें एक दोन लक्ष देणेंच कठिण आहेत. तूर्त माघारें फिरावयाचा डौल[८] स्वामींचे आज्ञेवरून धरिला आहे. त्याजमुळें जें होतें तेंच करितो. तटी[९] लावीत नाहीं तूर्त या प्रान्तीं आदिना बेग मोगल मातबर व प्रामाणिक आहे. त्याजवरच सारा

*बंदोबस्त. †संधान.

६ बादशाही मुलुखांत. ७ दंगेखोर. ८ इरादा. ९ हट्ट.

यकतियार[१०] दिल्हा आहे. लाहोर मुलतान यांसच कामाविसीनें[११] दिल्हे आहे. यंदा तर सारें कांहीं सोईस लागेल. स्वामींस कळावे. रवाना छ २५ साबान. मुक्काम लाहोर बहुत काय लिहिणे. हे विज्ञापना.

**अभ्यास** :--या उताऱ्याबरोबर पुढील क्र. ४२ (गोविंदराव काळे यांचें पत्र) व प्राचीन काळांतील उतारा क्र. ९ वाचा व त्यावरील प्रश्नाचें उत्तर लिहा.

---

## ३२ : : नाना फडणीसाचें आत्मचरित्र

काव्येतिहास संग्रह ले. १९२ } { श. १६८३ आषाढ व. ३ ता. २०-७-१७६१ नंतरचें

[ पानिपतच्या लढाईंत अगदीं अखेरच्या प्रसंगापर्यंत नाना फडणीस भाऊजवळ होता. त्यानें लिहिलेलें हें आत्मचरित्र इतिहासाचें साधन म्हणूनच नव्हे तर मराठी वाङ्मयाचा एक बहुमोल अलंकार आहे. हें समग्र मुळांतून वाचल्यास कांहीं ठिकाणीं महात्माजींच्या आत्मचरित्राची आठवण झाल्यावाचून राहणार नाहीं.

या उताऱ्यावरून (१) भाऊ गर्विष्ठ होता. (२) त्यास अखेरच्या दिवशीं लढाई प्रतिकूल जाण्याचा संभव वाटूं लागला होता. (३) नानांच्या मतें त्यानें खंदकबंद लढण्याची रीत उचलली हें चुकलें. (४) अबदालीकडून सर्वांत जोराचा हल्ला निशाणाजवळ न होतां अन्यत्र झाला. (५) त्याबरोबर डाव्या उजव्या बाजूंच्या लोकांनीं पळ काढला. इतके मुद्द उपलब्ध होतात. त्यांची प्रत्यंतरपुराव्यानें छाननी केली पाहिजे. ]

श्रीकृष्ण प्रसन्न

.... ..मीही युद्धांत होतों. ईश्वरें रक्षिलें. तो इतकियांत यवन आलीकडे आला. श्रीमंत सैन्यासहवर्तमान त्याचे समोर गेले. गांठ पडली. तेव्हां मी तर लहान श्रीमंताचि बुद्धीस महानबुद्धी परंतु भावी* अर्थ* तेणेंकरून विपर्यास पडला. आप्त होते बळवंतराव[१] मातुल व नाना पुरंधरे वगैरे ते अनाप्त

---

१० भरंवसा. ११ वसूल गोळा करण्यास. *होणार गोष्ट.

१ बळवंतराव मातुल--हे बळवंतराव गणेश मेहेंदळे. नाना म्हणतात मातुल अनाप्त झाले. परंतु दुसरे लेखांत बळवंतरावांच्या मसलतीनेंच भाऊसाहेब चालत असत असें म्हटलेलें असतें.

झाले. जे अनाप्त शाहनवाजखानी[२] भवानी शंकर वगैरे ते आप्त जाहले त्यांचे वाक्याचे ठायीं विश्वास तेणेंकरून आपली रीत युद्धाची सोडून यवनाची रीत[३] धरिली. परस्परें युद्ध होत असे. गोळे प्रत्यहीं शत्रूचे राहुटीवरून जात. मातोश्री व स्त्री भयभीत होत. कीं कसें होईल ? ते ते समयीं मातोश्रीस विनंती करीत गेलों, कीं मी विनंती करितों. एक ईश्वरीं लक्ष असावें. त्यांत मातुल युद्धांत होते ते पडले. ते दिवशींच सर्व सैन्य नाशास पावावें. परंतु रात्र जाहली यामुळें राहिलें. त्या दोन महिन्यांत मनुष्यें, पशु बहुत मेले. अन्नाची महर्गता. दुर्गंधी एकेच ठिकाणीं. असे श्रम पाहिले. पुढें मातुळाची स्त्री समागमें[४] गेली. मातोश्रीस श्रम फार जाहले. होणार अवश्यक होतें. यदर्थी संदेह धरूंच नये. हा माझा निश्चय, पुढें थोरले युद्ध* उदयीक होणार तो पूर्व दिवशीं संकेत कीं, पराजय आपला जाहला तरी शत्रूचे हातीं श्रीमंताचें कुटुंब व आपलें हातीं लागूं नये. आपणच नाश करवावा. आपण तर वांचत नाहीं असा सिद्धांत करून श्रीमंतांनीं याचीही योजना केली. दुसरे दिवशीं तयार होऊन प्रातःकालचे दोन घटिका दिवसास युद्धास गोळागोळीचा प्रारंभ जाहला. श्रीमंत अति बुद्धिवान्, धैर्यवान शूर, कृतकर्मे गर्व मात्र विशिष्ट[५], परंतु तर्तुद फारच सैन्याची वगैरे केली. शेवटीं निशाणाजवळील तर्तुद एकीकडे जाऊन शत्रूची मुख्य स्थानींच गांठ पडली. मी श्रीमंतासन्निध ईश्वरस्मरण किंचित् करून असें. तों विश्वासराव यांस गोळी लागली. पडले. ते हत्तीवर श्रीमंतांनीं घालून उभेंच राहिले. तो पठाण पायउतारा आंत येऊन मिसळले. तोडातोडी होऊं लागली. आणि डावे बाजूचे मातबर सरदार चौघडयाचे धनी देखील, पूर्वींच पळाले. उजवे, बाजूचेही होळकर शिंदे निघोन निशाण निघालें. दोन तीन शत पायदळ होतें. श्रीमंत दिसेनातसे जाहले इश्वरे बुद्धी दिली माघारे फिरलो.

---

२ हे दिल्लींतील पादशाही मुत्सद्दी. ३ एक जागा खंदक करून राहणें ही रीति; ही यावनी रीत इभ्राइमखान गारदी याचे मसलतीवर व बळावर पतकरली. ४ सती. *थोरलें युद्ध—पौष शुद्ध ८ शके १६८२. ५ विशेष.

# ३३ : : थोरले माधवराव यांचें परराष्ट्रीय धोरण

भा. इ. स. मं. त्रै. मा. वर्ष २७ अ. ३ व ४ ले. ३६ असल

शके १६९१ पौष शु. ४ २१-१२-१७७०

[ उत्तरेच्या मसलतीबाबत थोरला माधवराव आपल्या सरदारांना या पत्रांत मार्गदर्शन करीत आहे. त्याचें हें पत्र खरोखर उत्तरेचें राजकारण कां बिघडलें या प्रश्नावर उत्तम प्रकाश पाडणारें आहे. माधवराव लिहितो 'सर्वांनी एक एकाचे न्यून पाहून घाण केली. मातबर सरकारचे लक्ष सोडून धणियांचे कामाची पायमल्ली केली. यात कल्याण नाहीं अशा गोष्टी सहसा नच कराव्या.' शिंदे होळकर, रामचंद्र गणेश कानडे, विसाजी कृष्ण बिनीवाले या सर्वांचें एकसूत्र कधींच झालें नाहीं इतकेंच नव्हे तर एक कांहीं करीत असेल व त्यांत आपला हात नसेल तर दुसरे त्या यशाचें श्रेय त्याला मिळूं द्यायचें नाहीं असा खोडा घालीत ! ]

पुा* राजश्री रामचंद्र गणेश व विसाजी कृष्ण स्वामी गोसावी यास.

तुमची उमेद नवी नवाजी[1] केल्यास करून दाखवाल पैसा मबलग मेळविण्यांत येइल व मुलुख सोडवाल तैसेच शिंदे व होळकर कृतकर्मे पराक्रमी होते जे कर्म धन्यानी करावे ते उभयतानी करावे करीत आलो आपले स्वहित न पाहाता सरकार उपयोगी कर्मे बहुत केली तेव्हाच या दौलतीचे बाजू[2] म्हणवून घेतले होते ते तर आपले येकनिष्ठेत गेले त्याप्रमाणे त्याचे वंशज होळकर शिंदे आहेत. किंबहुना आपल्या पेक्षांहि अधिक करून दाखवितील हा फार फार भरंवसा होता....होळकर कोटचास गेले ते शिंद्यास असाह्य, त्यांत त्यांचे इंगित,[3] येकूण परस्पर फूट. येकाचे केले येकास अहंकृतीमुळें न माने, तुम्ही उभयता मुखतार ते परस्पर भांडता बदलौकिक.... तुम्ही सारे एक दिल असते तर जाट जिवंत कसा जाता समरू फिरंगी संभाळून कसा जाता ? (जाटाची) मोडली फौज मराठ्याची मिठी लुटीची बैसिली असता ते कसे जाते....घरात दुही या भावे नजीबखानास होळकराचे विद्यमाने आणिले. नजीबखान येताच जाटास तुम्ही नतीजा दिला तसेच तहरह[4] खंडणी जबर दस्ती करिता, तर जाली असती रुपये येणें झाडा[5] होणे तो आजपर्यंत

* पुरवणी १ स्तुति. गौरव. २ आधार. ३ मरुखी. ४ विचार. ५ वसूल.

जालाच असता. नजीबखान आले त्यांचें मतें आपण आल्यासारखे यांचे कांहीं तरी कार्य करून द्यावे या अर्थें त्यानी तुम्हास अंतरवेदींत उतरावयाची मसलत दिल्ही. शिंद्याचे मतें हें काम आपले हातें न घेतले तेव्हां त्याचा कांहीं गुंडघा[६] असेलच.

गाजुदीखान आले ते रोहिल्याचा मतलब बोलतात यंदाचे साल वीस लक्ष रुपये द्यावे त्यात दहा तूर्त सध्या दहा मुदतीनें घ्यावे. मुलूख दाविला तो पेस्तर साली सोडून देतो म्हणोन लेहोन देतात व वजारत आपणास द्यावी दहा लक्ष सध्या घ्यावे पंधरा दिल्लीचा बंदोवस्त जाल्यावर घ्यावें म्हणून बोलतात म्हणोन परस्परे कळले ऐशास† ....

नजीबखानाच्या मरणामुळें दिल्लीचा बंदोबस्त तुटला असेल यास्तव तुम्ही रोहिल्याची मामलत पैक्यावर करावी पेस्तर साली मुलूक सोपून देतो ऐसे लेहून घेऊन मामलत चुकवावी[७] दिल्लीचा बंदोबस्त जाबतेखानानी केला नाहीं तों तुम्ही दिल्लीस जावे दिल्ली हस्तगत करावी आपला बंदोबस्त करावा यंदाच रोहिल्यापासून मुलूख सोडवावयाची अड[८] न धरावी दिल्लीत काबिजात[९] जाल्यास वजारतीची आरजु[१०] सुज्या अतदौलास आहे व पातशाहास तक्तावर बसावे हे जरूर तेव्हां ते तुमचे मुदे मान्य करतील पैका देतील व मुलूख देतील तुम्ही चार कलमे अधिक लेहून दिल्ही तरी करितील वजारत देतां सुजा अतदौल्यास द्यावी त्याचा सबल पक्ष आहे फौज जमेत[११] राखतो गाजुदीखान म्हणतात ते सिद्धिस जाणार नाहींसे वाटते. सारांश नजीबखान मेला तुम्ही होळकरानी क्रिया शफता दिल्यात तो मेला तेव्हां सर्व उगवले[१२] जाबतेखानापासून नजर व सदरहू करून घेऊन बहुमान करावा तो न केला जावतेखान तुम्हांजवळ आहे त्यास दगा न करावा. त्यास नजीबगडास पाऊन द्यावा आपले मुदे सर्व करून घ्यावे सुरळीत रीतीने वर्तिले तर उतम न वर्तेल तर पारपत्य करावे....

नजीबखान मरावा दिल्ली खाली पडावी[१३] सरकारची पनास हजार फौज अंतरवेदीत असावी हा योग कधी तरी बनावयाचा आहे तुम्ही उभयेतानी

६ पेच. †येथपासून उत्तरादाखल मजकुरास सुरवात होते. ७ चुकती करावी, पुरती करावी. ८ अट. ९ स्वाधीन. १० इच्छा. ११ जमाव. १२ वसूल झाले आता त्याची अट राहिली नाही असा अर्थ १३ पूर्ण कह्यात यावी.

दीर्घ दृष्टीनें विचार करावा धण्याने इतके वाढविले असतां व फौजे प्रा पों मोठे कार्य करून ह्याखालीं चुकी जाल्या त्याचे बरबात[14] करून घ्यावे असा समय प्राप्त आहे. तुम्ही करावे. येणेंकरून सुज्याअतदौला व पातशाहा व रोहिले तुमची उपार्जना[15] करतील करारप्रमाणें जाट पैका देईल द्रव्यास व मुलुकास न्यून होणार नाहीं. खुलासा. सर्वांनी एक एकाने न्यून पाहून पाहून घाण केली तैसे न करणें मातबर सरदारानीं सरकारचे लक्ष सोडून धणियाचे कामाची पायमल्ली केली आपले वडिलाची रीत सोडून अमर्यादेस गोष्ट नेली यांत कल्याण नाहीं त्याही अशा गोष्टी सहसा नच कराव्या धण्याचे लक्ष धण्याचे हित तेच त्यानी करावे करून दाखवावे यांत उत्तम नक्ष[16] लौकिक होईल धणी कृपाच करतील असो तुम्ही सर्व लिहिल्या अन्वयें समजोन करणें जाणीजे छ ३ रमजान बहुत काय लिहिणे हे विनंती.

—संशोधक—श्री. मा. वि. गुजर.

**अभ्यास** :—माधवरावानें कोणत्या गोष्टी करण्यास सरदारांना सांगितलें आहे तें थोडक्यांत लिहा.

---

## ३४ : : : वस्तूंचे बाजारभाव

इ. स. १७६४ मध्यें } { पहिले माधवरावांची रोजनिशी भाग २ पृ. ३१४

[इ. स. १७६४–६५ या वर्षी महागाई होती, कारण त्या पूर्वीच्याच वर्षी निजामाकडून पुणें प्रांत लुटला गेला होता. पुढील भाव हे महागाईच्या काळांतील होत हे लक्षांत घ्यावे.]

| एका रुपयास | वस्तू | मापी शेर |
|---|---|---|
| ,, | गहूं | १६ |
| ,, | ज्वारी | १६ |
| ,, | हरभऱ्याची डाळ | ८ |
| ,, | मूग | १२ |
| ,, | तांदूळ | १२ |
| ,, | तीळ | ३ |

---

१४ वर्ज. १५ आर्जव. १६ कीर्ति.

| एका रुपयास | वस्तू | शेर (वजनी) |
|---|---|---|
| ,, | गूळ | ५ |
| ,, | सैंधव | २ |
| ,, | सावण | १। |
| ,, | सुंठ | २ |
| ,, | खोबरे | २ |
| ,, | जिरें | २ |
| ,, | साखर | २ |
| | वस्तू | मापी शेर |
| ,, | पोहे | ८ |
| ,, | कणिक | १२ |
| ,, | कापूस | ४ |
| ,, | तूप | १।।। (सुमारें) |
| ,, | दूध | ११ (,,) |
| ,, | शेंगा मुगाच्या | ८ |
| ,, | ऊद | अदपाव |
| ,, | खडीसाखर | १ |
| ,, | बदाम | १ |
| ,, | सुपारी | ३ |

*  *  *  *

| एका वजनी शेरास | वस्तू | रुपये |
|---|---|---|
| ,, | कथील | १।। |
| ,, | द्राक्षें | १।।।= |
| ,, | मिरीं | १। |
| ,, | नवसागर | २ |
| ,, | तांबें | २ |
| ,, | हिंग | ५ |
| लांकडे एक खंडीस | | ७ रुपये. |

**अभ्यास** :—आजकाल या वस्तूंचे भाव काय आहेत ? गूळ किंवा साखर यांचे सध्यांचे भाव व तत्कालीन भाव यांत फारसें अंतर कां नाहीं ?

---

## ३५ : : नारायणरावाचा खून

ऐतिहासिक लेखसंग्रह
भाग ४ था, नं० १२५७ } { २ सप्टेंबर १७७३

[ पत्र शिवाजी बाबाजीचें पुण्याहून वामनरावास मिरजेस. हें पेशव्यांचा खून झाला त्याच्या तिसरे दिवशीं लिहिलेलें आहे. खून ता. ३०–८–१७७३ रोजीं झाला. ]

..त्या गडबडींत इच्छारामपंतास[1] तीन जखमा लागल्या. दुसरे दिवशीं मृत्यु पावला. नारायणजी नाईकास सदरेस[2] बसल्यावर मारून टाकिला. त्याप्रमाणेंच फडके यांस करावें म्हणून बोलिले. आणखी ब्राह्मण चार पांच व चाफाजी खिजमतगार ठार झाला. त्या गडबडेंत (धाकटे श्रीमंत) थोरल्यांजवळ जाऊन पोहचले होते. "दादासाहेब ! वांचवावे, किल्ल्यावर घालावें, नाचण्यांची भाकर द्यावी," असें म्हणून गळां मिठी घातली तेव्हां (त्यांणीं) लोटून दिला. तुळाजी पवार भेदला होता त्याणीं पायांस धरून ओढिला. सुमेरसिंगानें वार टाकिला. पांच सहा वारांनीं पुरा झाला. तेथेंच चाफाजी ठार झाला. असें होतांच (दादासाहेब) सदरेस जाऊन बसले. तमाम चोपदारांस वगैरे यांस बोलवूं पाठवून बंदोबस्त करूं लागले. सुतक नाहीं. नित्य नमस्कार सूर्यास घालितात. "वैरियाचें सुतक कशास ?" म्हणतात ! गोवधदेखील वाड्यांत झाला. दोघी कुणबिणी मेल्या. बालहत्या, ब्राह्मणहत्या, गोहत्या, स्त्रीहत्या सारेंच झालें !!! गंगाबाई आनंदीबाईनें कोंडोन खोलींत ठेविली, दहनास तिकडे गेल्यावर विधि[3] उरकविला. रात्रीस करूं नये पण ते समयींच गुंता उरकविला ! हें राजकारण फार दिवस घाटत होतें त्यांत मोठे मोठे होते असे आतां उद्गार निघतात. ज्यांनीं राजकारणें केलीं होतीं त्यांचें मानस (पेशव्यांस) कैद करावें असें होतें. परंतु करावयास गेले एक आणि झालें एक ! ईश्वराच्या चित्तास आलें तसें झालें ! आतां त्राता कोणी नाहींसा झाला.

गाड्यांचें प्राबल्य बहुतच होतें कीं, (आम्हीं) "राज्याचा खावंद मारिला. होता तो मारिला. आतां निम्में राज्य वांटून देणें" असें बहुतच

१ ठेरे. २ मुख्य कचेरी. ३ वपनविधि. पण ही बातमी पुढें खोटी ठरली.

पाय पसरून बोलत होते. आंत तमाम बंदोबस्त सुमेरसिंग व महमद इसफ व खरगसिंग चौकीदार यांचा. परवानगी रसानगी[1] त्याची. मराठे माणूस आंत अगदीं नव्हतें. शहर लुटितात अशी धास्त बसून कोणास कोणी न पुसे. अशी अवस्था होती. गाड्यांस हा मनसबा सांगितला ते समयींचा करार–किल्ल्यांपैकीं पुरंधर व नगर व साष्टी हे तीन किल्ले व पांच लाख रुपये रोख द्यावे. येणेंप्रमाणें करार असतां आडमुद्दे राज्याचे वगैरे गाड्यांनीं मनस्वी घातले. "नाहीं तरी त्यांची गत ती यांची! अल्लीबहादर राज्यास खावंद करूं." असें चित्तास येईल तसें बोलत. गांवांत जितका मुसलमान होता तितक्यांनीं बंदुका घेऊन वाड्यांत जथ[2] पाडिला.

**अभ्यास**:—१. नारायणरावाच्या खुनानंतर पुण्यांतील परिस्थिति किती बिकट होती याचें वर्णन करा. २. नारायणरावाच्या खुनाबरोबर आणखी कोणत्या प्रकारचे खून करण्यांत आले?

---

## ३६ : : मराठे--इंग्रज सेनापतींची भेट

२९ मे १७९१

['नॅरेटिव्ह ऑफ दि कॅम्पेन इन इंडिया, वुइच टरमिनेटेड दि वॉर वुइथ टिपू सुलतान इन सेव्हंटीन नाइंटी टू' या नांवाचें ८" × १०॥" आकाराच्या २९६ पृष्ठांचें पुस्तक मेजर डायरम (Dirom) यानें युद्धोत्तर हिंदुस्थानांतून विलायतेस जात असतां जहाजावर लिहिलें. हें वृत्तांताचें पुस्तक इ. स. १७९३ मध्यें युद्ध संपल्यावर एक वर्षाच्या आंत लंडन येथील डब्ल्यू. वुल्मर अँड कंपनीनें प्रकाशित केलेलें आहे.

प्रस्तुत पुस्तकांत या युद्धांतील इंग्रज, मराठे, निजाम यांच्या सैनिकांची संख्या, त्यांतील किती जाया झाले, मोहिमा किती झाल्या, टिपूची तयारी, सैन्यांच्या तळाचे नकाशे इत्यादि विस्तृत माहिती असून टिपूला शरण येणें कां भाग पडलें याचेंहि विवेचन आहे. तत्कालीन इंग्रज ज्ञानाच्या प्रसारासाठीं मुद्रणकलेचा कसा सर्रास

---

१ चिठीनें दिलेली परवानगी. २ तळ दिला.

## मराठे स्वार



मराठी फौजेचे आघाडीचे शिबंदी श्रीरंगपट्टणनजीक अर्ल कॉर्नवॉलिसला मिळण्यास येत आहेत २६ मे १७९१

मेजर रेनेल यांनीं प्रकाशित केलेल्या चित्रावरून

इ.स. १७९३ सालीं प्रकाशित झालेल्या ग्रंथांतील चित्रावरून प्रतिकृति केली. "संपादक"

उपयोग करूं लागले होते हें पाहून आश्चर्य वाटतें. आमच्याकडे या काळांत स्वराज्य असूनहि मुद्रणकलेचा प्रारंभहि नव्हता!

या ग्रंथांतील भाग १, प्रकरण १ पृष्ठें ७ ते १३ यावरून पुढील उतारे अनुवादित केले आहेत.]

[**कथा संदर्भ** : श्रीरंगपट्टण जवळील (Milgottah मेलकोटा?) च्या आसपास इंग्रजी सैन्याचा तळ होता, तेथूनच कांहीं अंतरावर मराठ्यांची छावणी होती तरी दोन्ही तळांमध्यें बरेच अंतर होतें. या भागांत तंबू ठोकण्यांत आले होते. येथें इंग्रज गव्हर्नर जनरल लॉर्ड कॉर्नवॉलीस व मराठे पुढारी हरीपंत फडके व परशुरामभाऊ पटवर्धन यांची भेट झाली. (२९ मे, इ. स. १७९१) त्या वेळचीं पुढील वर्णनें आहेत.]

लॉर्ड कॉर्नवालीसनें आपल्या बरोबर जनरल मेडोस, त्याचे सहकारी व सैन्यांतील प्रमुख अधिकारी घेतले व ठरल्या ठिकाणीं व ठरल्या वेळीं दुपारीं एक वाजतां तो आला. लॉर्ड कॉर्नवॉलीस वाट पहात आहे असें अनेक वेळां सांगूनहि मराठ्यांचे प्रमुख तीन वाजेपर्यंत स्वतःच्या कॅम्पमधून हाललेहि नाहींत! कारण त्यांची समजूतच ही कीं नियमितपणा हा सत्ता व दर्जा याशीं विसंगत होय. शेवटीं ते हत्तीवर स्वार होऊन... मोठ्या लवाजम्यानें चार वाजतां ठरलेल्या ठिकाणीं येऊन पोहोंचले. हत्तीवरून खालीं उतरल्यावर तंबूच्या दाराशीं लॉर्ड कॉर्नवॉलीस व जनरल मेडोज यांनीं त्यांचें स्वागत केलें व थोडा वेळ औपचारिक बोलणें झाल्यावर एकांतीं बोलण्यासाठीं दुसऱ्या तंबूत गेले.

* * *

सरदार, मराठे सैनिक आणि सर्व मराठे लोक यांचा पोशाख अगदीं साधा पण नीटनेटका होता. (हे लोक) दिसण्यांत सौम्य, स्वभावानें दयाळू, बोलण्यांत सभ्य आणि अकृत्रिम आहेत. त्यांच्यामध्यें दोन वैशिष्टचें आहेत : आपल्या मुख्याधिकाऱ्यांच्या आज्ञा पाळणें व देशावर प्रेम करणें.

मुसलमान, निजाम किंवा 'मोगल' सैन्य असें संबोधिल्या जाणाऱ्या सैन्यांत ज्याप्रमाणें, पूर्वेकडील देशांतून आलेले व स्वतःच्या धाडशीपणाबद्दल गर्व असलेले कांहीं चिलखत घातलेले शिपाई असतात तसे यांत (मराठी सेनेंत) मुळीच नव्हते. असले लोक गर्विष्ठ व व्यक्तिगत शौर्याबद्दल प्रसिद्ध असत,

पण युद्धभूमीखेरीज इतरत्र अंग वांकविण्यांत त्यांना कमीपणा वाटे. रण-भूमीवरहि प्रत्यक्ष प्रसंग आला म्हणजे (सैन्य संख्या पुष्कळ असली तरी) एक-सूत्रीपणाच्या अभावामुळें त्यांचा उपयोग होत नसे !

* * *

...(अन्न न मिळाल्यानें) भुकेनें व्याकूळ झालेले आमचे सैनिक हजारोंनीं मराठ्यांच्या छावणीकडे धांवले व धान्य मिळाल्यानें आनंदित झाले.. साधारणपणें बाजारभाव रुपयास ३ शेर तांदूळ, ६ शेर राई किंवा हरबरे असा होता.

मराठ्यांचा तळ आमच्यापासून सहा मैलांवर होता. ही छावणी म्हणजे एक अव्यवस्थित शहरच होतें. सेनापतीच्या सभोंवतीं कसेतरी इतर सरदारांचे तंबू ठोकलेले होते. त्यांचे आकार व रंग इतके भिन्न होते कीं दुरून तीं घरेंच वाटत. रस्ते वळणावळणाचे असून (भोंवतालच्या गर्दीनें त्यास) जत्रेचें स्वरूप दिसे. सराफ, रत्नपारखी, सोनार, इतर हुन्नरी लोक बिनधोक आपले उद्योग चालू ठेवीत. जणूं काय आपण शांत असलेल्या पुण्यांतच आहोंत !

तोफांची मांडणी विचित्र असे. त्या अनेक आकाराच्या असून त्यांच्यावर चमत्कारिक चित्रें रंगविलेलीं होतीं. प्रत्येकीस कोठल्या तरी देवतेचें नांव दिलेलें असे. त्यांतील कांहीं तोफा निरुपयोगी होत्या, पण पूर्वीं त्यांनीं चांगली कामगिरी केली म्हणून त्या (सैन्याबरोबर) बाळगलेल्या असत. ज्या तोफा चांगल्या होत्या त्यांचाहि पूर्ण उपयोग मराठ्यांना होत नसे, कारण त्यांच्या-जवळ दारुगोळा थोडा असे.

* * *

रात्रौ ९ ते १० च्या दरम्यान एकाएकीं मराठ्यांच्या छावणींत तोफांचे बंदुकांचे आवाज ऐकूं येऊं लागले. आमचे सैनिक सज्ज झाले व हत्यारें सांवरू लागले, कारण त्यांना वाटलें कीं टिपूनें मराठ्यांवर हल्ला केला आहे परंतु नंतर असें कळलें कीं, प्रतिपदेला उदित होणाऱ्या चंद्र-दर्शना-निमित्त सलामी देण्यासाठीं त्या तोफा मराठ्यांनीं डागल्या होत्या.

* * *

आपल्या सैन्याचा तळ ज्या मैदानावर होता तें अगदीं अस्वच्छ, ओसाड, व उघडें होतें. तेथून लवकर हलावें अशी लॉर्ड कॉर्नवॉलीसची इच्छा होती.

त्यांच्या वाटेंतच मराठ्यांचा तळ होता म्हणून त्यानें विनंति केली कीं उद्यां सकाळीं आपण तळ हलवूं. मराठ्यांनीं उत्तर दिलें कीं ही आज्ञा त्यांनीं आनंदानें मानली असती, परंतु असें करणें अशुभ व धर्माचाराच्या विरुद्ध आहे, (म्हणून त्यांचा निरुपाय आहे.) कारण जेथें आठ दिवस ते तळ देतात तेथून नवव्या दिवशीं त्यांना हलतां येत नाहीं. त्यांच्या या भ्रामक समजुतीला लॉर्ड कॉर्नवॉलीसनें मान दिला व आपला बेत पुढें ढकलला !

**अभ्यास** :––या उताऱ्यांत मराठ्यांसंबंधीं कोणती माहिती मिळते तें मुद्देसूद व थोडक्यांत लिहा. तुम्हांस ती कितपत यथार्थ वाटते याची चर्चा करा.

---

## ३७ : : : मराठ्यांना इंग्रज शरण आले

(इ. स. १७७९)

[स्प्रिगेल या जर्मन लेखकानें इ. स. १७९१ सालीं मराठ्यांचा इतिहास लिहिला व त्यांत प्रारंभापासून ते १७ मे १७८२ रोजीं झालेल्या इंग्रज–मराठ्यांच्या तहापर्यंत हकीकत आणून ठेवली आहे. पुस्तकास हिंदुस्थानचा नकाशा जोडला आहे. तो मेजर रेनेल यांच्या नकाशावरून काढला असें म्हटलें आहे. स्प्रिगेल हिंदुस्थानांत कधींच आला नव्हता, पण त्यानें ३९ इंग्रजी व २४ इतर युरोपियन भाषांतील तत्कालीन ग्रंथ वाचून हा इतिहास तयार केला. 'सर्व हिंदुस्थानांतील लोकांत मराठ्यांनीं मोगल साम्राज्य जिंकण्यांत यश मिळविलें, त्यांचा जितक्या झपाट्यानें लौकिक झाला तितक्याच वेगानें त्यांचा अधःपात झाला यामुळें लेखकाचें लक्ष मराठ्यांकडे जाऊन तो इतिहास लेखनास प्रवृत्त झाला असें त्यानें म्हटलें आहे. त्याच्या पुस्तकाचीं पृष्ठें २८८ असून त्याची प्रत भा. इ. सं. मंडळांत आहे. मराठ्यांचा पहिला इतिहासकार होण्याचें श्रेय या दूरस्थ जर्मन पंडितास आहे !]

....प्रत्येक दिवशीं या प्रबळ सैन्याकडून इंग्रजावर हल्ला चढविला जात होता. जसेजसे इंग्रज लोक पुढें सरकूं लागले तसतसे मराठ्यांनीं इंग्रजांच्या जनावरांच्या आणि (माणसांच्या) रसदेचा नाश केला ; शहरांत आणि खेड्यांत आगी लावल्या, हेतु हा कीं या कारणांनीं (होणाऱ्या) दुर्मिळतेमुळें आणि अपुरेपणामुळें इंग्रजांना परतणें भाग पडावें. (शेवटीं) इंग्रजांना

माघार घेण्याचा निर्णय घ्यावा लागला. त्याचें एक कारण असें कीं रोज रोज होणाऱ्या नुकसानीनें त्यांचें सैन्य कमी होत होतें आणि दुसरें हें कीं राघोबानें त्यांना सोडून जाण्याची सिद्धता केली होती. माघार घेतांना पुण्यापासून पांच मैलांवरील वडगांवाला* इंग्रज कोंडले गेले, ते घाटापर्यंत पोहोचूं शकले नाहींत.

सैन्यांत जे थोडे सैनिक उरले होते ते सर्व थकलेले व निराश झालेले होते. ते युद्ध चालू ठेवण्यास राजी नव्हते. यामुळें इंग्रजांना मराठ्यांबरोबर नुकसानीचा करार (convention) करावा लागला. पुढील अटी मान्य केल्यावर इंग्रज सैन्याला मुंबईस जाण्यास मराठ्यांनीं परवानगी दिली :

> महादजी शिंद्याच्या ताब्यांत राघोबास देणार, त्या वेळीं माळवा प्रांतांत असलेलें गॉडर्डचें सैन्य यमुनापार पुनः परत जाईल, या व मागील युद्धांत इंग्रजांनीं जो प्रदेश जिंकला तो मराठ्यांना मिळेल आणि भविष्यकाळांतहि मराठ्यांच्या घरच्या भांडणांत इंग्रज भाग घेणार नाहींत.

या रीतीनें मराठ्यांचें दुसरें युद्ध मुंबईकरांच्या नुकसानीनें संपलें. मराठ्यांकडून प्रदेश जिंकण्याची आपली आशा पुनः एकदां विफल झाल्याचा अनुभव मुंबईच्या गव्हर्नरला आला.

मुंबईच्या सेनाधिकाऱ्यांनीं स्वतःच्या जवाबदारीवर केलेला हा नुकसानीचा करार मुंबई किंवा बंगालनेंहि पाळला नाहीं. पुरंदरच्या शेवटच्या तहाच्या वेळीं वडगांवचा करार बदलण्याचा इंग्रजांनीं यत्न केला (पण) तो पुण्यानें हाणून पाडला. वडगांवचा करार बदलण्यास मराठे तयार नव्हते; त्यांच्याशीं तिसऱ्यांदा तह करण्याचीहि मराठ्यांची इच्छा नव्हती कारण इंग्रजांनीं दोनदां तह मोडले होते. अशा रीतीनें इ. स. १७८१ मध्यें युद्ध पुनः सुरू झालें. या वाटाघाटीमध्यें मुख्य अडचण म्हणजे मराठे साष्टी सोडण्यास तयार नव्हते व इंग्रजांनीं पुनः एकदां राघोबास आपल्या छत्राखालीं घेतलें होतें.

**अभ्यास** :—स्प्रिंगेलच्या मतें वडगांवला मराठ्यांनीं इंग्रजांचा पराभव कसा केला तें सांगा.

---

* पुणें ते वडगांव अंतर २१ मैल.

# ३८ : : : पेशवेकालीन सामाजिक जीवन

–१–

**घरंदाज घराण्यांत गोतपात करण्याचा महादजी शिंदे ऊर्फ पाटील बावा यांचा प्रयत्न.**

[अहमदनगर जिल्ह्यांत राहुरी आहे. तेथील तनपुरे पाटील स्वतःस मातबर घरंदाज मराठे समजत असत. त्यांची मुलगी पाटील बावानीं मागितली. त्यासंबंधीचें पेशवे दप्तर भा. ४३ पृष्ठ ४४ वर लिहिलें आहे तें असें :]

नं. ४९ ] श्री [ ७–२–१७७६

विनंति उपरि तुम्ही पत्र पाठविले ते पावले. राजश्री माहादजी शिंदे याचा मानस मराठे मातबर घरंदाज यासी गोतपात करावी. व तनपुरे पाटील राहुरीकर याची कन्या मागतात. त्याणे मूल पलविली. त्याचे घरी चौकी बसविली आहे. मराठे सरदार राजे येऊन येविसीचे काय ते आम्हांस सांगा म्हणतात. येविसीचा माार[1] लिहिला तो कलला. त्यास हा प्रकार सरकारातून व्हावयाचा नाहीं. राजीमताचा[2] प्रकार ज्याचा त्याचा आहे. बलात्कारे होणार नाहीं. तुम्ही लोकास समजाऊन सांगितले. उत्तम आहे. खातरजमा ×× तनपुरे याचे घरीं चौकी बसविली आहे त्याविसी व लोकांस पत्रें येतात येविसी त्यास वाईट वाटे व गोड दिसे असा प्रकार करितो. तुम्ही लौकर जावे म्हणज गोतपत सहजच राहिली. रा छ १६ जिल्हेज हे विनंति.

–२–

**पेशव्यांच्या घराण्यांत पिरास नवस**

[रघुनाथराव व जनार्दनराव यांस देवी आल्या तेव्हां शेखसल्यास थोरल्या बाजीरावांची स्त्री काशीबाई यांनीं नवस केला त्याचा उल्लेख पेशवे दप्तर भा. ४३ पृ. ९० वर आहे तो असा :)

माहे रबिलोवल

२।। छ रोज राजश्री रघुनाथपंतास व जनार्दनपंतास देवी आल्या आहेत सबब नवस सेख सला मलिदा वि ।। मातु (श्री) कासीबाई

[सदाशिवरावास देवी आल्या त्यावेळीं सैद सादद पीर कसबे पुणें कंदोरी[3]

१ मजकूर. २ खुषीचा. ३ पिराच्या नांवें अन्न समर्पण.

नवसली ती पिरास नजर केली व फकीरास खुर्दा वांटला. त्याचा उल्लेख वरील भागांत त्याच पृष्ठावर आहे तो असा : ]

३ छ १६ रोज सैद सादत पीर कसबे पुणें राजश्री सदाशिवपंतास देवी आल्या होत्या ते समई कंदोरी नवसिली होती ती केली सबब

१ नजर पिरास २ खुर्दा फकीरास वाटावयास

[ वरील उताऱ्यावरून पेशव्यांच्या बायकांचा सुद्धां पिरावर भरंवसा असून प्रसंगविशेषीं ते त्यास नवस करीत असें दिसतें. अहमदनगरासहि तोच प्रकार होता.]

---

## ३९ : : : सवाई माधवरावाचें लग्न

काव्येतिहाससंग्रह, ले. ३९७ } { १०–२–१७८३ (?)

### कामांची नेमणूक व विल्हेवारी

[ ही ४८ कलमी याद मूळांतून वाचण्यासारखी आहे. नमुन्यादाखल एक कलम दिलें आहे. यावरून नानांची दक्षता व बारीक नजर लक्षांत येते.]

नेमणूक लग्न* श्रीमंत राजश्री रावसाहेब सुरू सन सल्लास समानीन मया व अलफ. कामें नेमून सांगितलीं :—

* * *

(८) गंध अक्षत उगाळून लावण्याचें काम जनार्दन मुकुंद यांजकडे व बाबाजी लंबोदर.

केशरी गंध अर्कचें व मध्यम ऐशीं दोन प्रकारचीं चांगलीं, रंगदार कपाळीं लावावयासि; व अंगास लावण्यास केशर व अर्गजा वगैरे सुवासिक एक व साधें पांढरें एक व गुलाबी चंदनाचें व कृष्णागराचें[१] याप्रमाणें चांगलीं उगाळावीं. केशरी गंधांत केशराची कसर राहूं नये. व अक्षता उंच कस्तुरीची

* हें लग्न माघ शु. ९ श. १७०४ ता. १०–२–१७८३ रोजीं झालें.
१ एक प्रकारचा चंदन.

व मध्यम कस्तुरीची ऐशा दोन कराव्या. गंधअक्षत खांसा मध्यम असामी पाहून लावीत जावी. उभे खोडानें गंध उगाळावें.

गंध लावणारे चांगले कुशल चौकस माणूस असावे. त्याणीं सांखळीनें कपाळीं लावावें. वांकडें गंध लागूं नये व अक्षत लावते समयीं नाकास धक्का न लागतां कपाळाचा मध्य पाहून लहान मोठी अक्षत ओघळ न येतां वाटोळी लावावी, व गंध उभें आडवें ज्यांस जसें पाहिजे तसें लावावें. कोणी मातबर असतील त्यांच्यापुढें गंध व अक्षत ठेवीत जावी. व हातास लावण्याचें गंध देते समयीं भागीरथीचा गुलाब* वाटींत पुढें ठेवीत जावा. गंध अक्षता लावणार यांणीं नखें काढून बोटें चांगलीं करून लावावें....

---

## ४० : : : बालपेशव्याचा दिनक्रम

काव्येतिहाससंग्रह, ले. ३९३, पृ. ३३९

पौष शु. ६ श. १७०४ ता. ८–१–१७८३

['पेशवाईंतील राजपुत्रांचें शिक्षण' या विषयाची या पत्रानें बरीच कल्पना येईल.]

श्रीयासह चिरंजीव राजश्री माधवराव प्रधान यांसि प्रती गोपिकाबाई[1] मुक्काम नाशिक अशीर्वाद उपरि येथील कुशल तागायत छ ४ माहे सफर जाणून स्वकीन[2] कुशल वर्तमान यथास्थित असे विशेष. तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें.

"मी लहान, वडीलीं सर्व-त्याग करून श्रीक्षेत्रीं वास केला आहे, त्यास सर्व माहित वडिलांस, यास्तव कोणे रीतीनें चालावें हें सर्व ल्याहावयास आज्ञा व्हावी." म्हणोन लिहिलें. त्यास सूर्यग्रहणसंधि अन्वयें कृष्ण पक्ष होऊन लोप जाहला होता, तो हल्लीं पुण्योदयें करून दुष्टांचा संहार व सुष्टांचे पाल-

* गुलाबपाणी व गंगा एकत्र मिसळलेली.

१ नारायणरावाची आई. ही विरक्तीनें नाशिकला जाऊन राहिली होती.

२ स्वकीय.

ग्रहणार्थ तुम्ही या कुळांत जन्म घेऊन पुरंदर येथें उदयास आलां[1]; त्यापक्षीं इकडून लिहावयाचें कारण दिसत नाहीं. परंतु मानवी देह आणि तुम्ही लिहिलें, त्यापेक्षां तूर्त चालावयाचे जें सुचलें तें लिहिलें आहे. तपसील कलम बंदी :—

१ प्रातःकालचे घटका रात्रौ उठोन दिशेस जाऊन पादप्रक्षालन मुख-प्रक्षालन करून दिवाणखान्यांतील श्रीमृत्तिका गणपतीचें दर्शन घेऊन प्रातः-स्मरणाचे श्लोक म्हणावे. नंतर सूर्योदयाबरोबर वैद्यांनीं येऊन हात पहावा. प्रकृतिअन्वयें औषध घ्यावें. नंतर लिहावयास बसावें. कित्यांत हात फिरवून मग ज्या कागदावर निशाणें[2] व्हावयाचीं असतील तें लिखितान्वयेंच[3] वाचावें. ते समयीं जवळ गुरुजी व आणखी एक दोघे संभावित योग्य असतील ते असावे. जास्त असो नये. येणेंप्रमाणें घटिका तीन. येकूण घटिका. कलम १

१. तालिमखान्यांत जाऊन दंड[4] काढावे. दिवसेंदिवस शक्ति अन्वयें चढते[5] दंड असावे. बरोबर समवयी मुलें पांच चार संभावितांचीं असावीं. व जेठी[6] एक दोघे व नेहमीं विश्वासुख गृहस्थ बरोबर असावयाचे तें असावें खिसमतगार कार्याकारण असावे. जेठी यांनीं कुस्तीचे डाव शिकवावे. नंतर समवयी मुलांसुद्धां प्रकृतीस जो खुराख मानेल तो नेमेंकरून घेत जावा. येणें-प्रमाणें घटिका दीड. येकूण घटी साडेचार. कलम २

२. स्नान करावयाचे समयीं पंचांग जोशी वाचून संकल्प सांगावा. नंतर गंगाष्टक म्हणावें, संध्या थोडकी, परंतु न बोलतां करावी. कलम ३

१. कचेरीस यावें ते समयीं सर्वांस येऊन योग्यतेनुरूप नेत्रलाभ व भाषण होत असावें. कचेरींत लघु शब्द बोलूं नये व गैर नि ही (?) बोलूं नये. मनुष्यपरीक्षा असावी. गैरवाखा[7] एखाद्यानें समजाविलेस पक्केपणीं विचार करून अपराध ठरल्यास दुसऱ्याकडून त्यास निषिद्ध करवावें. आणि आपण नेत्रकटाक्ष करून पहावें. अपराधानुरूप पारपत्य करावें, परंतु संभावित गृहस्थ बहुत दिवस पदरींचा प्रामाणिक अशानें रदबदली केली असतां क्षमा करावी.

---

१ नारायणरावाच्या वधावर सूर्यग्रहणाचें हें रूपक आहे. सवाई माधवराव हा अवतारी आहे असा तत्कालीन समज गोपिकाबाईच्या मनांतहि आहे. २ शेवटील अक्षरें "आज्ञा प्रमाण" हीं अक्षरें सहीच्या ऐवजीं घालीत. ३ लिहिलेलें समजून घेऊन वाचावें. ४ जोर. ५ वाढते. ६ मल्ल, कुस्तीगीर. ७ गैरवाजवी, बनावट.

दुसऱ्याचें क्षुद्र काढूं नये. येणें करून त्याचा अपमान होतो, आणि तो त्याचे मनांत दंश राहतो, साधल्यानुरूप नाश करील. आणि आपल्यास लघुपणा येईल. संन्निधानीं[1] लोभांत लघुमनुष्य[2] राखल्यास जें केलें त्यास ते रुकार देतात, परंतु जन लोक वाईट म्हणतात, थोरपणास हानि होती. येणेंप्रमाणें घटी तीन. येकूण घटी अकरा.

कलम ४

१. भोजनाचे पूर्वीं सोवळें जाहले नंतर थोरल्या देवघरांत जाऊन, फुलें घालून, नमस्कार करून, ब्राह्मणांस उदक सोडून, भोजनास बसावें. ते समयीं भाषण करणें ते राजसुययज्ञांतील ब्राह्मणभोजन प्रकरणें वगैरे योग्य सर्वांस दिसेल तें बोलावें. पाक[3] करणार व शिष्य मंडळी सुशिक्षित विश्वासुक असतील ते बाळगावे. घटी २. येणेंप्रमाणें घटी १३.

कलम ५

१. भोजनोत्तर आचमन करून शतपदी[4] करून तांबूल घ्यावा. नंतर दोन घटिका राजविलास खेळ खेळावे. येणेंप्रमाणें घटी २. येकूण घटी पंधरा.

कलम ६

१. शास्त्री यांजवळ विराटपर्वापासून भारतांतील चिंतनिका[5] करीत असावी; व वृद्ध मनुष्यें पदरचीं बहुत दिवशीं[6] व अन्यत्र शहाणें असतील त्यांशीं दिल्लीप्रकरणीं व महाराजप्रकरणीं गोष्टी कशा जाहल्या त्या ऐकण्यांत असाव्या. आपले वडिलांच्या गोष्टी कारभारी यांसि एकांत स्थळीं विचारीत असावें; व तसबिरा व नकाशे अनेक पहात असावे. ते समयीं शाहाणें बुद्धिमान् असतील ते जवळ असावे. येणेंप्रमाणें घटिका चार. एकूण घटिका १९.

कलम ७.

१. खर्डे लिहावयास बसावें. ते समयीं एक दोन मुलें संभावित गृहस्थांचीं बुद्धिमान पहावयास असावीं. करदन[7] बस्तन[8] गुणाकार भागाकार करावयाचा सराव बहुत असावा. गुरुजी यांणीं विद्याभ्यासाकरितां बोलणें[9] प्राप्त आहे. परंतु लिहावयाचे जागींच बोलावें. तेथें विशेष कोणी असो नये. घटी चार. एकूण घटिका तेवीस.

कलम ८

१ जवळ. २ हलका. ३ स्वयंपाक. ४ शतपावली. ५ मनन. ६ दिवसांचीं. ७ बेरीजवजाबाकी. ८ ताळा. ९ रागें भरणें.

१. लिहिणें जाहलेनंतर कांहीं उपकार थोडासा मर्जी असल्यास मुलासमवेत घेऊन करावा. नंतर तांबूल घ्यावा. घटी एक. एकूण घटिका चोवीस.
कलम ९

१. घोडीं फेरावयास चार रोजांनीं जात जावें. ते समयीं बरोबर पटवर्धन मंडळी व अंन्यत्र सरदार असावे. त्यांशीं भाषण करणें तें संतोषवृत्तीनें करावें. परंतु अत्यंत लोभही नसावा व विरुद्धही न दाखवावें. कांहीं अंतर[1] जाहल्यास क्षमा होणार नाहीं असें भय असावें. योग्यता बघून त्याशीं भाषण संतोषेंकरून करावें. दिवाण यांणीं राजकारणाचें वर्तमान व पुढील योजना करावयाचा विचार करून विनंती करीत असावी. त्या समयीं अन्यत्र कोणी असों नये. व त्यांतील अभिप्राय दुसऱ्यापाशीं निघों नये. म्हणजे मसलतीं असाध्य होत नाहीं. बातमी हरतऱ्हेची राखावी म्हणजे मसलतीस बल बहुत आहे. पदरच्या मनुष्यांचें चालवावयाचें त्यास जिकीर करूं नये. एकूण घटी चार. एकूण घटिका अठ्ठावीस.
कलम १०

१. तिरंदाजी करावयास जावें.—तेथें बरोबर सरदार व पागे व मानकरी बरोबर असल्यास तीर कोण कसे मारताहेत ध्यानांत असावें. व हरएक खेळ पहावयाचे ते सर्वत्र समवेत पहावे. येणेंप्रमाणें घटिका दोन. एकूण घटिका ३०
कलम ११

१. दीपदर्शन जाहल्यानंतर संध्येस वस्त्रांतर करून बसावें. संध्या जाहले नंतर स्तोत्रपाठ म्हणावा. नंतर पुरुषसूक्त अथवा पवमानांतील[2] अध्याय म्हणावे. ते समयीं अश्रितांनीं जवळ असावें. नंतर भोजनास जावें. भोजन होऊन उठेपर्यंत घटी चार.
कलम १२

१ भोजनोत्तर तांबूल खावयास दिवाणखान्यांत क्षणभर बसून तांबूल घ्यावें. नंतर कार्याकारण मंडळी जवळ असावी. ते समयीं बातमीदार यांणीं वर्तमान गुप्त सांगत असावें. व हरएक बातमीचीं पत्रें आलेलीं पहावयाजोगीं असतील तीं पहावीं. बाकीचीं पत्रें विश्वासूक मनुष्य कोण असेल त्याजकडे काम योजावें, त्यांणीं सांगावें. व त्यावर ही बातमी प्रमाण अथवा अप्रमाण सांगतात याची चौकशी असावी. नंतर निद्रेस जावें. येणेंप्रमाणें घटी तीन. एकूण घटिका सात.
कलम १३

१ फरक, गैर गोष्ट. २ पुरुषसूक्तासारखा एक मंत्र.

एकूण कलमें तेरा लिहिलीं आहेत, तीं ध्यानीं आणोन चालल्यास उपयोगी पडतील. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

**अभ्यास** :—१. पेशवाईंतील राजपुत्रांचें शारीरिक शिक्षण व बौद्धिक शिक्षण कोणतें होतें ? या शिक्षणांत आणखी कोणती भर सुचवाल ? त्यांच्या जीवास कोणत्या प्रकारें जपत ? २. क्रमांक ३६, ३८, ३९, ४० हे उतारे वाचून 'पेशवेकालीन चालीरीति' यावर एक छोटा निबंध लिहा.

---

## ४१ : : अहिल्याबाईची सूक्ष्म राजकीय दृष्टि

[ चंद्रचूडांच्या दप्तरापैकीं 'निवडक उतारे' नांवाचें एक पुस्तक ग्वालेर दरबारनें इ. स. १९३४ सालीं प्रकाशित केलें आहे. गंगाधरपंत चंद्रचूड हे होळकरांचे दिवाण. त्यांच्या घराण्याच्या संग्रहांतील हीं पत्रें आहेत. होळकर आणि शिंदे हीं दोन्ही घराणीं उत्तरेंत एकत्र काम करीत असल्यानें या संग्रहांत महादजी शिंदेकालीन राजकारणाची माहिती आली आहे, या दृष्टीनें ग्वाल्हेर दरबारनें हें प्रकाशनकार्य केलें. संग्रहाचे संपादक श्री. डोंगरे प्रस्तावनेंत लिहितात " या तीस वर्षांत (१८ व्या शतकांतील शेवटचीं ३० वर्षें) शिंदे, होळकर यांचे संबंध कसकसे होते, नवीन मिळालेल्या मुलुखाच्या वाटण्या कशा होत असत, उभयतांनीं कामगिऱ्या कोणत्या केल्या, दिल्ली, सातारा व पुणें येथील दरबाराविषयीं त्यांची मनःस्थिति वेळोवेळीं परस्पर विभिन्न कशी होती इ. मुद्यांची हकीकत या पत्रावरून चांगली उघडकीस येते. " या पत्रसंग्रहांतील क्रमांक १०५ चें पत्र पुढें दिलें आहे. अहिल्याबाई होळकर यांची सूक्ष्म राजकीय दृष्टि ध्यानांत येण्यास त्याचा उपयोग होईल. ]

ता. ५ जुलई इ. स. १७९२

श्री

राजश्री यशवंतराव गंगाधर

गोसावी यांसि.

दंडवत वीनंती उपरी श्रीमंताच्या व राजश्री पाटील बावाच्या भेटी ज्येष्ठ वद्य ९ बुधवारी होऊन दुसरे दिवशीं सरकार वाड्यांत पाटील बावा आले

होते बोलणे कांही न होतां वीडे घेऊन गेले बोलण्याचा प्रसंग न घालतां परस्परे मेजवान्या होऊन लौकरच जामगांवास जाणार तेथून रा१ आवा चिटणीस व रामजी पाटील यांचे हातें बोलावयाचें ते बोलावें या प्रा१ बेत आहे. बोलणें. मीनाने[1] सुद्धां आपल्या कडील प्रसंग घालणार[2] त्याची पुरवणीआलाहिदा[3] लीहीली आहे श्रीमंतास नजर नज़राणा फरमान बाडी* करून घ्यावा असे पाटील बावाचें मानस. पातशाही चाकर होऊन घेऊ नये असें श्रीमंताचें मानस. घडेल तसें मागहुन लीहुं म्हणोन लिा ते कळले. येसियांसी सींदे यानी पातशहाची वजारत संपादुन कारभार केला सीक्यात पातशहाचे वजीर श्रीमंत त्याचे मुतालीक आपण असा अन्वय आणून वहिवाट केली त्या पक्षीं नजर नजराणा फरमान वाडी करून घ्यावा हे त्यांस उचीतच. परंतु पूर्वीपासोन कैलासवासी बाजीरावसाहेब यांचे कारकीर्दीपासोन आज पावेतो दीलीत पातशहा बलाय[4] मजबूत फौज व बलाय खजाना मुलकांत आमल दखल करून होते. तेव्हां जोर पोहोंचाऊन पातशहा लुटून मारून नवे पातशहा स्थापीत केले ते समई पातशाहीच केली असती तरी योग्यता [होती–परंतु राजे याचा वरदहस्त मस्तकी आहे तोच असून पृथ्वीत लौकीक असावा याजवर नजर देऊन पातशहा आपले हाते स्थापुन आटक पर्यंत राज्य केलें. विचार पहातां फरमान बाडी करून वरून नजर नजराणा घेऊन पातशाही चाकर म्हणवावें यांत आधीक्य नाहीं. राजश्री बालाजीपंत नाना व राजश्री हरीपंत तात्या वीचारवंत आणि सर्व गोष्टी त्यांचे ध्यानांत आहेत. तेही श्रीमंतास असी सला देतील असे नाहीं तत्रापी सींदे यांचे भिडेस पडल्यास न कलें[5] याज करीतां तुम्ही प्रसंगोचीत नाना व तात्या यांहि सुचवणें राा छ १४ जल्किद सुा सलास तीसैन मया व आलफ बहुत काय लिहिणे हे विनंती मोर्तब सुद.

**अभ्यास** :—फरमानबाडी करूं नये असें अहिल्याबाईला कां वाटलें ? राजकीय दृष्टचा पेशव्यानें पातशाहीचे चाकर कां होऊं नये ? मराठी राज्यविस्तारांतील अभिमानाचा पराक्रम कोणता ? पेशव्यांनीं पातशाहीच कां मारून टाकली नाहीं ? हा फरमान बाडीचा समारंभ झाला कीं नाहीं ?

———

१ (मौनाने ?) २ न बोलता सुद्धां आपलें साधणार. ३ निराळी. *फर्मान घेण्याचा दरबार. ४ बिला–बिना–बिना. ५. कळत नाहीं.

# ४२ : गोविंदराव काळे यांचें नाना फडणीसास पत्र

इतिहाससंग्रह, व० १ लें अं० ३ रा, ऐतिहासिक टिपणें, भा० १ ला, टिपण १३ } { २-७-१७९२

[ गोविंदराव काळे हा सवाई माधवरावाचे पेशवाईंत निजामाचे दरबारीं पेशव्यांचा वकील होता. त्याला नाना, महादजी वगैरेंचे 'परस्परांतील संशय दूर झाल्याचें' कळल्यावर पेशवाईच्या वाढत्या वैभवाचें त्यानें पुढीलप्रमाणें अंतःकरणपूर्वक वर्णन केलें आहे. पत्रांत लिहिल्याप्रमाणें या वैभवास लौकरच दृष्ट लागावी असा योग होता! हें पत्र, पेशवाईंतील मराठी गद्य वाङमयाचा एक उत्कृष्ट नमुना आहे. ]

....ऐशियास पत्र पाहतांच रोमांच उभे राहून अति संतोष जाला. याचा विस्तार पत्रीं किती लिहूं? सीमा असे. यावरून ग्रंथांचे ग्रंथ मनांत आले. ते लिहिल्यानें बहुचकपणा[1] दिसतो. दिसो, परंतु जें मनांत आलें त्यांतून किंचित् अमर्याद[2] करून लिहितो. एक एक रक्कम[3] मनांत आणून दीर्घ दृष्टीनें तोलून पाहिल्यास खरें आहे असेंच निघेल. तें काय? तपशील :— अटक नदीचे अलीकडे दक्षिण समुद्र पावेतों हिंदूंचें स्थान—तुरकस्थान[4] नव्हे —हे आपली हद्द पांडवांपासोन विक्रमाजितपावेतों त्यांनीं राखून उपभोग केला. त्यामागें नादान राज्यकर्ते निघाले. यवनांचें प्राबल्य जालें. चकत्यांनीं[5] हस्तनापूरचें पद घेतलें. शेवटीं आलमगिराचे कारकीर्दीस यज्ञोपवीतास[6] साडे तीन रुपये जेजया[7] बसून, ओलें अन्न विकावें, सर्वांनीं घ्यावें, हें नौबत[8] गुजरली.

त्या दिवसांत कैलासवासी शिवाजीमहाराज शककर्ते व धर्मराखते निघाले. त्यांनीं किंचित् कोन्यांत[9] धर्मसंरक्षण केलें. पुढें कैलासवासी नाना साहेब, भाऊसाहेब प्रचंड प्रतापसूर्य असे जाले कीं, असें कधीं झालें नाहीं. अमुक ब्राह्मणांनीं राज्य केलें असें शास्त्रीं पुराणीं वर्णन नाहीं. परशुराम अवतारीं

१ भोचकपणा. वाचाळता. २ मर्यादा सोडून. ३ गोष्ट. ४ मुसलमानांचा देश, यवनभूमि. ५ झगताईखानाच्या वंशजांनीं, मोगलांनीं. ६ दर ब्राह्मणास. ७ जिझिया. ८ द्वाही फिरली. ९ देशाच्या लहानशा कोपऱ्यांत.

काय असेल तें असो. त्या गोष्टी यांस शिंदे-होळकर दोन बाजू होऊन प्राप्त जाल्या. हल्लीं श्रीमंतांचे पुण्यप्रतापेंकरून व राजश्री पाटीलबावांचे बुद्धि व तरवारेच्या पराक्रमेकडून सर्व घरास आलें. परंतु जालें कसें ? प्राप्त जालें तेणेंकडून सुलभता वाटली. अगर मुसलमान कोणी असे, तरी मोठे मोठे तवारीखनामे[१] आले असते. यवनाच्या जातींत तिळाइतकी चांगली गोष्ट जाल्यास गगनावराबर करून शोभवावी; आमचे हिंदूंत गगनाइतकी जाली असतां उच्चार न करावा हे चाल आहे. असो. अलभ्य गोष्टी घडल्या. उग्याच दौलती पुसत घरास आल्या. यांचें संरक्षण करणें परम कठिण ! दोस्त दुष्मन फार. यवनांचे मनांत कीं काफरशाही[२] जालीं हें बोलतात.

लेकीन[३] ज्यांनीं हिंदुस्थानांत शिरें उचललीं, त्यांचीं शिरें पाटीलबावांनीं फोडिलीं. कोणच्याही मनांत हे वहाडले,[४] तें शेवटास जाऊं नये. यास्तव, नाना स्वरूपें व युक्तीकडून नाश करावे ऐसे आहेत. न लाभाव्या त्या गोष्टी लाभल्या. त्यांचा बंदोबस्त शककर्त्याप्रमाणें होऊन उपभोग घ्यावे हें पुढेंच. आहे. कोठें पुण्याईत उणें पडेल आणि काय दृष्ट लागेल न कळे. झाल्या गोष्टी यांत केवळ मुलूख, राज्यप्राप्त, इतकेंच नाहीं, तरी वेदशास्त्ररक्षण, धर्म-संस्थापन, गोब्राम्हणप्रतिपालन, सार्वभौमत्व हातीं लागणें, कीर्ति, यश यांचे नगारे वाजणें, इतक्या गोष्टी आहेत. हे किमया[५] संभाळणें हक्क[६] आपला व पाटीलबावांचा ! यांत वेत्यास[७] पडला कीं, दोस्त दुष्मन मवजूद.[८] संशय दूर जाले, हे अति चांगलें ! अति चांगलें ! या उपरी हे जमाव व या फौजा लाहोरच्या मैदानांत असाव्या. त्यांचे मनसबे[९] दौडावे[१०], वेत्यास पडावे, तमाशे पहावे, असे जन जे आहेत ते उशापायथ्यास लागून आहेत. चैन नव्हते. आतां आपण लिहिल्यावरून स्वस्थ जालें. जितकें लिहिलें इतक्याचें उगेच मनन व्हावें. खरें कीं लटकें हें समजावें. रवाना छ ११ जिल्काद हे विनंती.

---

१ बखरी. २ लबाड लोकांची बादशाही (काफर हा शब्द मुसलमान हे मुसलमानेतरांस केव्हां केव्हां तुच्छतेनें लावतात). ३ परंतु. ४ वाढले. ५ अद्भुत कृति. ६ अधिकार. ७ व्यत्यय, अंतर. ८ मौजूद, भांडण्यास तयार. ९ मसलत, राजकारण. १० पराभूत पावावें.

**अभ्यास** :—या लेखकाचें प्राचीन इतिहासाचें ज्ञान कितपत आहे? यवन व हिंदु यांच्या स्वभावांत यानें कोणता भेद दर्शविला? यानें म्हटल्याप्रमाणें मराठी राज्यास कोणती दृष्ट लागली? २. या उताऱ्याबरोबर ९, ३१, ३३ व ४७ हे उतारे वाचून 'मराठी राज्याचें ध्येय' यावर निबंध लिहा.

---

## ४३ : : : खड्र्याचा तह

ऐतिहासिक पत्रव्यवहार, ले. ३१४

शके १७१७ वै० शु० २ २१-४-१७९५

### तहाचीं कलमें

१. मुलूख हिंदुस्थान व दक्षिण हिंदुस्थानचे पादशहाचे तावे[1] आहेत. पादशाही बंदोबस्त त्याचे अखत्यार[2] त्याचे ताबे दक्षण तालुका जो पादशाही कायदा आहे व तेथून जो अहकाम[3] पोहोंचेल त्याची मुतावत[4] असावी.

दक्षिणेंत बिलकुल गोवध न करावा. मुसलमानीचा जो धर्म निमाज, रोजा,[5] बांगसलवात,[6] इकारानें[7] खुदापस्ती[8] करावी.

१. हिंदुमुसलमान ईश्वराचे घरची, दोन्ही धर्म चालत असतां मुसलमानानें हिंदूचे जाग्यास उपद्रव करावा, हे बेमुनसफी[9] व हिंदूनें आजतागाईत मुसलमानीचे जागे पीर पैगंबर यांसी दुसरी गोष्ट समजण्यांत आणिली नाहीं. तेव्हां मुसलमानानें हिंदूचे धर्मास खलश[10] करूं नये. आपले चालीनें धर्मावरीं कायम असावें परस्परें मुजाहीम[11] नसावें.

१. शाहाजादे पादशाही दक्षिणेंत आले त्याचा खर्च येथून निभतो, त्याची जायदाद[12] व मकान[13] नवाबांनीं द्यावी......

[ याखेरीज मीररुकनुद्यौले यांस नोकरींतून काढावें वगैरे आणखीही कलमें आहेत. ]

---

१ अंमल. २ अधिकार. ३ हुकूम. ४ बजावणी; बादशहाचे नांवें येईल तो हुकूम बजवावा. ५ उपवास. ६ बांग-प्रार्थनेसाठीं हांक मारण्याची आरोळी (सलबात-सलवात-प्रार्थना). ७ इकरान (?) इकरम, इक्रम-दान. ८ 'खुदापरस्ती' पाहिजे, ईश्वराची पूजा. ९ अन्याय्य. १० खंड, अंतर. ११ अडथळा, प्रतिबंध. १२ सैन्याच्या खर्चास लावून दिलेली जहागीर; सैन्याचा खर्च. १३ घर, राहण्याची व्यवस्था.

## ४४ : : : बारा बलुत्यांत सुतार श्रेष्ठ

पे० द० भा० ४३ नं० २७ } { १७९५ पूर्वी

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री

परशराम रामचंद्र स्वामी गोसावी यांसी :—

पा।* माधवराव नारायण प्रधान नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणें विशेष. समस्त सुतारांचा बारा बलत्यामध्यें वडीलपणाचा मानपान सुदामत† चाल (त) असतां कोठें कोठें नवीन दिकत¶ करितात ती करूं नये. सुदामत बारा बलुत्यामध्यें सुतारांचे वडीलपण चालत आल्याप्रा। चालवावयाचा करार करून देऊन नजरेचा[1] ऐवज सुतार वगैरे ज्ञात खूम[2] तीन यांजपासून सरकारांत घ्यावयाचा करार केला. त्यास तुम्हाकडील सरकार कमाविसचे* माहाल व फुटगावदेखील[3] दुमाले[4] येथील कमाल बेरजेवर दर सद्दे[5]

१ सुतार बलुत्यांत श्रेष्ठ सा।[6]
.।।. लोहार
.।।. परीट
―――
२

येकूण दोन रुा।[7] प्रा।[8] सरकारांत घ्यावयाचा करार करून हे सनद सादर केली असे. तरी सदरहूप्रा। तिही खुमापासून ऐवज वसूल घेऊन शंकराजी बली खिजमतगार हुजूरून पाठविला आहे याचे मारफातीनें[9] ऐवज सरकारांत पावता करणें.

---

* पोष्य. † विनतकार. ¶ हरकत.

१ नजर म्हणून घ्यावयाची रक्कम. २ जात (ज्ञात म्हणजे जात; अर्थात खूम हा शब्द (आरबी कौम पासून) जात या अर्थी आहे. सुतार, लोहार, परीट या तीन जाती. *वसूलाचे ३ सुद्धां, सह. ४ जेथें सरकारी वसुलाचा अंश स्वत:साठीं राखून ठेवण्याचा हक्क कोणास दिला जातो तीं गांवें दुमाले गांवें म्हणतात. ५ सदे, शेंकडा. ६ समजून. ७ रुपये. ८ प्रमाणें. ९ मार्फतीनें, तर्फेनें.

## ४५ : : : सवाई माधवरावाचा मृत्यु

राजवाडे, खं० ५ वा,
लेखांक २४१ शेवटचा कागद* } { मृत्यु ता० २७–१०–९५ सायं० ७ वा०

'द्वादशीचे दिवशीं श्रीमंतांस ज्वरांशांत वायु झाला होता. प्रातःकाळीं गणपतीचे दिवाणखान्यावर रंगमहाल आहे, तेथें निद्रेचें स्थान, तेथें गेले पलंगावर बसले होते. वायूचे भिरडींत[1] काय मनास वाटलें न कळे, पलंगावरून उठून दक्षिणेकडील खिडकींत उभे राहिले. खिजमतगार यानें शालेस हात लाविला कीं, येथें उभें राहणें ठीक नाहीं. तों एकाएकींच तेथून उडी टाकिली. खालीं दीड भाला खोल कारंजी हौद आहे, तेथें कांठावर पडून आंत पडले. उजवी मांडी मोडून हाड वाहेर निघालें. दांताची कवळी पडली. नाकावाटे रक्त निघालें. तेथून उचलून नानांनीं ऐने[2] महालांत नेलें. तबीब[3] आणून हाड बसवून, टाके देऊन शेक केला. चहूं घटकेनंतर शुद्धीवर येऊन डोळे उघडले. वायूचा प्रकोप[4] होताच. कांहीं सावध होऊन बोलत, कांहीं वेळ भ्रंश होऊन बोलत. आश्विन शुद्ध १४ सात घटकानंतर पौर्णिमा मंगळवार ते दिवशीं प्रथम घटका रात्रीं कैलासवासी जाले, म्हणोन बाळाजी रघुनाथ व केशवराव कोंडाजी यांचें पत्र मुक्काम हैदराबाद येथें आलें.'

---

*पत्र गोविंदराव काळे यानें लिहिलें आहे. खेरीज रेसिडेन्सी प. व्य., व्हॉ. दुसरा, पृष्ठ ३९१, लेखांक २६४ पहा. आत्महत्या केली हें समकालीन इंग्रजी रेकॉर्ड पहातांहि खरें वाटत नाहीं. १ तिरिमिरी, आवेश. २ आरसे. ३ हकीम, वैद्य. ४ जोर.

## ४६ : : : पुण्यांत प्रळय : पट्टीची वसुली

ऐ० ले० सं० भा. १४ वा, नं० ६५४५ } { ३ जानेवारी १८०२

श्री

सेवेशीं धोंडो बापूजी जोशी. त्रिकाल चरणावर मस्तक ठेवून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना......गांवांत पट्टीचा तगादा प्रळय जाहला आहे ! होळकर यांणीं नाकेबंदी केली आहे. दुकानें हर[1] कोणाचीं व घरें बहुतेक उघडीं नाहींत. जिवाजीपंत नेने व रामराव पुरंदरे यांजकडील कारकून व दमल शिंपी तिघे जण तस्ती[2] अनेक प्रकारची करून मृत्यु पावले. आज चार रोज होळकर खासा पट्टीस्तव गांवास फडके याचे कारभार वाड्यांत होतो तेथें येत असतात. धक्का[3] घरपटी व उदीमपट्टी[4] चालली आहे. कालपासून बुधवार शनवारांत मोठा दंगा आहे. कारभारी लपत फिरतात. जो सांपडेल तो नेतात, पठाणाचे हवाली करितात, हाल करितात ते पत्रीं काय लिहूं ? * * * [5] लोक हरतऱ्हेनें बातमी बंदी असतां सडे रात्र बीरात्र करून जीव मात्र घेऊन जातात. याजप्रमाणें प्रकार आहे. वसईस श्रीमंतांनीं इंग्रज याजला आठ आणे[6] देऊं करून चाकरीस आणिलें. त्याजला मुलुख गुजराथ सुरत अठाविसी[7] झाडून व श्रीकृष्णातीर दो प्रांत देण्याचा करार करून चार पलटणें आणलीं. आणखी येणार हें वर्तमान बोलतात. . . .मातुश्री येशवदाबाई[8] रायगडावर आहेत. तेथें कोणी वेळेस काय होईल न कळे. शहर मरूं घातलें आहे ! वाड्यावर आख[9] पडल्यास मग जीव बचावण्यास कठीण आहेत. वडिलांचे पुण्येंकरून पार पडेल तें खरें. श्रीहरि पार करवील. बहुत काय लिहिणें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना........

———

१ दर प्रत्येक. २ श्रम हाल सोसून. ३ व्यापारावरील सरकारी कर. ४ जकात. ५ येथें पत्र फाटलें आहे. ६ राज्याचा अर्धा भाग. ७ अठ्ठावीस महालांचा सुरत. ८ सवाई माधबरावाची स्त्री. ९ आग.

## ४७ : : : होळकराची तळमळ

ऐतिहासिक पत्रव्यवहार,
नंबर ३९४

शा० १७२७ फा० शु० १०
२८-२-१८०६

श्रीम्हाळसाकांत

राजश्री व्यंकोजी भोसले सेनाधुरंधर गोसावी यांसी—

सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित येशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत असावें विशेष...स्वराज्यांत जलचरांचा प्रसर विशेष जाला, हा घडूं नये यास्तव माहाल मुलकाची आशा न ठेवतां कळेल त्याप्रमाणें फौज व कंपू वाढवून करोडों रुपयांचे पेंचांत येऊन आज दोन अडीच वर्षें होत आली. रात्रंदिवस आंग्रजांसीं मुकाबल्याचा प्रसंग घडत आला. दरम्यान राजश्री दौलतराव शिंदेयांसी मेळ* करून भेट घेतली. त्यांचे आपले विचारानें पगडीबंद[1] सामल[2] राहतीलच याच भावें आपल्याकडे पत्राच्या रवानग्या होत गेल्या. मेवाडप्रांतीं आलियावर ताम्रांस[3] चौकडून पायबंद देऊन हारीस[4] आणावें यास्तव पंजाबपावेतों यावयाचें केलें. इकडे लाहूरवाले वगैरे सिखांच्या भेटी होऊन सर्व सामल जाले. जमाद पोक्त जाल्यामुळें फिरंगी मागें पंचवीस तीस कोसांचे अंतरानें येत गेले. त्याणीं पटाल्याचे‡ मुक्कामापासून समेटाचें बोलणें लाविलें. इकडील मुस्तेदी[5] पाहून सोबत्याणीं राजेरजवाडे अनुकूल करून दिल्लीचे सुमारें येऊन शह द्यावा तें न करितां कारभारी दुराशेत[6] येऊन पुन्हा त्यासी[7] येकोपा ठेवून मेवाडांतच राहिले ! स्वराज्यांतील ऐक्यता बहुत, येणेंकरून आजपावेतों व्यंग न पडतां एकछत्रीच अंमल फैला[8] होता. हालींच्या आपसांतील वदचाली पाहून सर्वांस आपलालें घर संरक्षण करून जमीदारीनें[9] असावें हेंच प्राप्त जालें. येणेयाची[10] प्रतीक्षा होती तो योग न आला. फौज

*सख्य. १ दौलतराव (?) २ सामील. ३ इंग्रज (हा शब्द 'मोगल' या अर्थीहि वापरला जातो.) ४ जेरीस आणावें. ‡ पत्याळा (?) ५ तयारी. ६ (शिंद्याचे) कारभारी निराश होऊन. ७ इंग्रजाशीं. ८ फैलावला. ९ मांडलिकीनें. १० येतील अशी वाट पाहात होतों.

सामल होईल हें कागदपत्रीं मात्र श्रवण जालें, अथवा तिकडेच बंगाल्यांत वगैरे वल धाडलें असतें तरी किती उपयोग घडता. हिंदु धर्मास मुख्य आपले इरादे[1] नमूद[2] असावे तें कांहीं एक दिसण्यांत येईना. स्वधर्मास एक आमचा नफा, वरकडांची नुकसानी असाहि अर्थ नाहीं [3] सर्वत्राची उमेद, अनुभव व प्रत्यय पाहून आंग्रजांकडून समेटाचें बोलणें आलें होतें त्याजवरून समेट करून घेतला. फिरंगी कूच करून माघारे दिल्ली प्रांते गेले. आमचे मुक्काम व्यासगंगा व सुतलज नदीचे द्वाबांत असे. इत:पर दरकूच माळवे प्रांतीं यावयाचें घडेल. वरकड घरोब्याचे विचार सनातन आहेत ते यथाक्रम चालवावे. इकडील दुसरा अर्थ मानूं नये....बहुत काय लिहिणें? लोभ कीजे हे विनंती. मोर्तब.

**अभ्यास** :—हा व क्र. ३३ व ३६ हे उतारे वाचून 'आपले म्हणजे महाराष्ट्रीयांचे दोष' सांगा. आजहि हे दोष आढळतात काय?

---

## ४८ : : : पेशवाईंतील भाव-नियंत्रण

[ कोणता जिन्नस कोणीं विकावा यासंबंधीं पूर्वीं जसे नियम असत तसेच तो त्यांनीं कोणत्या भावानें विकावा यासंबंधींचेहि नियम असत. पुढील कागद इ. स. १८०६–७ चे सुमाराचा म्हणजे पेशवाईअखेरच्या काळां-तील आहे. गांव पंचायत व सरकार सहकार्य करून या नियमांची अंमल-बजावणी करीत असे. कागद सासवड संग्रहांतील अप्रसिद्ध. ]

श्री

[4] यादी क्रो–[5]सासवड सुा सबा मयातैन व अलफ कोा मारचे[6] तेली यांचा उदीम[7] पडला वाणी तेल विकतात ते त्यांणी विको नये ये विसीची कलमे बी तपासील—

---

१ संकल्प. २ रुजू. ३ स्वधर्म रक्षिल्यानें आमचा नफा होईल व इतरांची नुकसानी होईल असें नाहीं. ४ ठराव. ५ कसबे. ६ मजकूरचे. ७ व्यापार.

पुण्याचे धारणे[1] प्रो । तेल विकावे कमी विको नये

बिछाईती[3] येके जोडीपासून पन्नास जोडया आल्या आसता त्याची खो[4] फरोक्त[5] तेल्यानी करावे जिनस माघार जाऊ देऊ नये जातो असे जहाल्यास वाण्यानी दरम्यान दर-दाम ज्याजती आगर कमी करून घ्यावे.

पैशापासून हजारो रुपयांचे तेल गावांत अगर परकी खरेदीस गावात गिराइकास मिलावे सासवडात तेल मिलत नाहीं असे होऊ नये

पुण्याचे धारणेपेक्षा ज्याजती[2] आसावे किंवा बरावरीने आसावे कमी धारणेने विकले असता व तेल मिळत नाही असा बोभाट पडला आसता पारपत्य करून वाण्यानीहि तेल विकावे असे होईल ते त्यानी बोलू नये.

वाण्यानी तेल विको नये

दरम्यान लबाडी केली आसता पार-पत्य करावे वाण्यास घरखर्चास तेल लागेल ते देखील तेल्यापासून घ्यावे.

भुसार[6] उदीम सर्वांनी करावा असे आहे त्याप्रो तेली यानी केला आसता वाण्यानी बोलू नये भुसार सर्वानी विकावे.

किराण जिनस तेल्यानी विको नये विकले असता गुन्हेगारी घ्यावी. कलमे ७.

सात कलमे कराराची याप्रा निशाणी करून म्हणौन तेल्यापासून कतबा लेहून घ्यावा आणि वाण्यास तेल विको नये म्हणोन ताकीद करावी.

छ ११ सावान आस्विन मास सन मार.

**अभ्यास** :–पुण्याच्या भावांतच तेल विकावें असा हुकूम कां केला, तें सांगा.

---

१ बाजारभाव. २ जास्त. ३ घाऊक दुकानदार. ४ खरेदी. ५ विक्रय. ६ भुस, कोंडा असणारे, जिन्नस, धान्य.

## ४९ : : : प्रतापसिंहाचें बाणेदार उत्तर

शास्त्री दप्तरांतील वेचे नंबर १०८ पृ. २०७ } श्री { सुमारें इ० स० १८३९

[शास्त्री दप्तरांतील वेंचे, हें पुस्तक बडोद्याच्या राजदप्तरखात्यानें १–२–४८ ला प्रकाशित केलें. गंगाधरशास्त्री हे बडोद्याच्या इंग्रज रेसिडेंटाकडे मदतनीस म्हणून काम करीत. पुढें इंग्रजांनीं त्यास फत्तेसिंग गायकवाडाकडे कंपनीतर्फें मुतालिक नेमलें. प्रस्तुत संग्रहांतील पुष्कळ पत्रें इ. स. १८०३ ते १८१५ या कालांतील या शास्त्र्यांनीं लिहिलेलीं किंवा त्यांना आलेलीं आहेत. गायकवाडांचा व पेशव्यांचा देणेंघेण्याच्या व्यवहाराचा वाद होता. पेशव्यांना भेटून या वादाची सोडवणूक करण्यासाठीं इंग्रजांनीं शास्त्र्यांना पुण्यास पाठविलें. तेथून ते पंढरपुरास गेले असतां २० जुलै १८१५ ला त्यांचा खून झाला. या शास्त्र्यांच्या पदरीं यशवंतराव मराठे नांवाचे कारकून होते, त्यांच्या नातवानें प्रस्तुत दप्तर बडोदा सरकारकडे दिलें.

इ. स. १८०३–१८१७ पर्यंत बडोद्यास जें राजकारण चाले त्याची माहिती या संग्रहांत आहे. याखेरीज दोन कागद सुटेच दप्तरांत सांपडले तेहि यांत समाविष्ट आहेत. त्यांतील एक साताऱ्च्या प्रतापसिंहाच्या वृत्तांताचा आहे. त्यांत वर्णिलेला प्रसंग ऑगस्ट १८३९ मधील आहे. उतारा अपुराच सांपडलेला आहे.

खालील पत्रांतील मराठी भाषा पूर्वीच्या पत्रांतील भाषेइतकी अपरिचित नाहीं. फारसी शब्द मागें पडले इंग्रजीची छाप अजून पडावयाची होती अशा काळांत निव्वळ मराठी वळणाचे शब्द या पत्रांतून अधिक आहेत. पत्रांत गव्हर्नर कारनॅक याच्याशीं प्रतापसिंहाच्या भेटीचे पांच प्रसंग वर्णिले आहेत. हातीं सत्ता आल्यावर इंग्रज कशी जबरदस्ती करीत याचा हें पत्र उत्तम नमुना आहे. मराठेशाहीच्या पडत्या काळांत प्रतापसिंहानें दिलेलीं बाणेदार व चोख उत्तरें वाचलीं म्हणजे मराठ्यांचें राज्य गेलें पण स्वाभिमानाचा पीळ गेला नाहीं याची साक्ष पटते.]

साताऱ्यास गवरनर गेल्यावर तेच दिवसी रीसीदींटास माहाराजानी

आल्याची खबर देण्यास व "आपली भेट घेण्यास गवरनर सो॥ अुत्छुक आहेत" म्हणोन सांगावयास पाठवीले. त्याप्र॥ रीसीदींट यांणी सांगीतले. 'येतो' म्हणोन उत्तर राज्यानी रीसीदींटाबरोबर सांगुन पाठवीले. नंतर चार घटकेने माहाराज बंगल्यास आले. तेथें गवरनर सो॥ सामोरे जाऊन सांप्रदायाप्रमाणें सालुट वगैरे जाली. नंतर बंगल्यांत येऊन बसले. तेथें अजम[1] गवरनर सा॥. अंडरसन, उलवी व रीसीदींट वोवन मिळोन माहाराजसुद्धां मंडली ५ दुसरे कोणी नवते. ही प्रथम भेट. तेच दिवशी भेटीमध्यें कांहीं वेळ गेल्यानंतर गवरनर साहेबानी राज्यास सांगितले कीं "तुमचेकडे फीतुर शाबुद खचीत आहे. तुम्ही म्हणता याची चोकसी करावी." 'अुगीच म्हणण्यांत कसे लागु होअील ?' असें अुत्तर राज्यानीं केले. नंतर गवरनरनी चोकसी करण्याची फुरसद नाहीं असे सांगुन व चौकसी काय करावयाची. नंतर मुधोजी-बावाचे पत्र राज्यास येत होते ते धरलेले सांगितले. त्याजवरोन राज्याचे असे अुत्तर कीं, "तुम्ही पत्रावर काय म्हणोन वहीम धरता ? आता अंडर सन सो. आहेत. याचे नांवे जर येखाद्याने पत्र अुगीच फीतुराचे लीहीले तर काय तो संबंध अंडरसन सोकडे ? तेव्हां असता उगीच आपण म्हणतात ते कसे लागु होईल ? बरे ते पत्र मजला दाखवावे म्हणजे समजेल तरी त्या पत्रांत मुदा तरी काय, वरकड आम्हीं कोणास पत्रें पाठवीलीच नाहींत व कोणाचीं उत्तरेही आली नाहींत" वगैरे अुत्तरे प्रत्योत्तरे जाली. नंतर गवरनर सोनी सांगितले कीं, "असो, जे जाले ते जाले परंतु आपण कबुल करावे म्हणजे सर्व पार पडले. त्याचे उत्तर "आम्ही केलेच नाहीं, ते कबुल काय करावें ? त्याजवर गवरनर सो. बोलले कीं "आम्ही एक याद पाठवीतो. ती पाहून त्याजवर सही करावी." त्याचे उत्तर याद पाहून सही करावयाजोगी असल्यास करू" नंतर राज्यानी गवरनरास सांगितले कीं "आपण आमचे घरी यावे." त्याचे उत्तर केले जे "तुम्ही ऐकत नाहीं. सरकारी वखेडा तसाच आहे तेव्हां आपले महालास येण्यास मी लाचार[2] आहे." असे म्हणोन कचेरी उठली. नंतर तेच दिवसी रीसीदींटाबराबर याद पाठविली. त्यांत कलमे ; रीसी-

१ श्रेष्ठ. २ क्षीणोपाय, असमर्थ.

दींटाचे विच्यारे कारभार करावा, फितुराची माफी मागावी, बाळासाहेबास जवळ ठेवू नये, आप्पासाहेबास नेमणूक चालवावी, आमच्याकडे जे लोक झाले आहेत त्याजवर आपला रोष नसावा. त्यास बाहादरी द्यावी." असी पाच कलमाची यादी गेली. त्याची उत्तरे "रेसिडेंटाचे विच्यारें काम चालू करण्याचे कवुल करूं, बाळासाहेबावीसीचे कारण काय ते समजले पाहिजे, ते फीतुराचे कबुल करण्याचे जे म्हणतात त्यास आम्ही हे कबुल करीत नाहीं, आम्ही केलेच नाहीं तेव्हां काय कबुल करावे' आपासोाची नेमणूक चालत आल्याप्रा चालेल तुमचेकडे लोक मिळाले आहेत त्यास नेमणूक देऊ परंतु बाहादरीची चाल बडोद्याप्रमाणें येथें घालावयाची नाहीं." त्याजवरून रीसीदींटानी सांगीतले कीं "तुम्ही विच्यार करून अुत्तरे करावी. गवरनर सोा आपल्यावर मेहेरबानगी करतील वगैरे सांगीतले आहे. उत्तर जाऊन काही मी सांगेन परंतु आपण येऊन सांगितल्यास चांगले." त्याचे उत्तर राज्यानी केले की, "आम्ही बावद[1] कबुल केली नसेल ती कसी करावी ?" वगैरे उत्तरे जाली. ती येऊन रीसीदींटानी सांगितली, दुसरे दिवसी राज्यास सांगुन येण्यासी सीपाई पाठवील्यावर आले. तेथेही आा[2] च होत्ये. तेथें रीसीदींट सोा नी विच्यारले की आपल्याकडें याद आणली होती त्याजवर गवरनर साोची सही होती तेव्हां ती आपण कसी कबुली न करीतां पाठविली? उत्तर[3] गवरनर सोा आपले चांगले कल्याण करतील. त्याचे उत्तर महाराजानी केले कीं "आम्ही आपले मतलबाप्रमाणें येक याद लीहून त्याजवर सही करून गवरनर सोाकडे पाठवीतो. त्याजवर सही गवरनर साोनी करावी हे होईल ?' असे कडक उत्तर केले की नंतर गवरनर सोानी वीचारले की, "तुम्ही येकत नाहीं हे चांगले नाहीं. मी जे करीन ते होईल. तुम्ही न ऐकल्यास राज्यावरून नीघाल. या करता विच्यार करोन तुम्ही कबुल करावे." असे सामोपचाराने गवरनरसोानी सांगीतले व तुमचे वकील जाऊन काय होणार आहे ? "तुमचे जवळून जे ऐकीले हेच तेथून ऐकण्याचे" असे राज्यानी उत्तर केले. नंतर तीसरी भेट बाहेर फीरावयाचे सांगून पाठोन फीरावयासी गेले. नंतर चौथे दिवसीची भेट जाली. बंगल्यांत पांच असाम्या तेथे गवरनर

१ गोष्ट. २ आसामी. ३ पुढें.

सोा बोलले की "तुम्ही राज्यावरोन निघाल. तुम्ही हे कबुल करावे म्हणजे तुमचे अवलादीस* चांगले." त्याचे अुत्तर "मजला राज्य काय करावयाचे आहे? याचे मागे काय आम्हांस राज्यच होते आम्हास अवलादही नाहीं." नंतर रीसीदींट तेथें बोलले की, "तुम्ही राज्य सोडल्यावर तुम्हांस काय फायदा?" त्याचे अुत्तर राज्य असु. ......(अपूर्ण)

---

* संततीस

भाग ४ था

# ब्रिटिश अम्मल

## १ : : ईस्ट इंडिया कंपनीची पहिली सनद

३१ डिसेंबर १६००

[ज्या ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्थानांत ब्रिटिश राज्याचा पाया घातला तिची सुरुवात कशी झाली तें पाहणें मनोरंजक आहे. पोप ६ वा आलेक्झांडर यानें काढलेल्या फतव्यान्वयें पोर्तुगालला पूर्वे-कडील व्यापाराचा मक्ता मिळालेला होता (इ. स. १४९३). कालांतरानें पोर्तुगाल स्पेनच्या ताब्यांत गेलें. स्पेन व इंग्लंड यांचें १६व्या शतकांत वांकडें होतें. पूर्वेकडील व्यापारांत आपल्याला वांटा मिळाला पाहिजे असें इंग्रज व्यापाऱ्यांना वाटून त्यांनीं २४ सप्टेंबर १५९९ रोजीं लंडनमध्यें फाऊंडर्स हॉलमध्यें लॉर्ड मेयरचे अध्यक्षतेखालीं सभा बोला-विली व थेट हिंदुस्थानशीं व्यापार करण्यासाठीं एक संस्था स्थापन करण्याचा ठराव पास केला. या संस्थेला पूर्वेकडील व्यापाराची मक्ते-दारी मिळावी म्हणून त्यांनीं राणी एलिझाबेथकडे अर्ज केला. त्या अर्जान्वयें राणीनें सदरहु व्यापाऱ्यांस सनद दिली. त्यांतील प्रमुख कलमांचें सारांशवजा भाषांतर पुढें दिलें आहे. मुकर्जी पृ. १–२०]

परमेश्वर कृपेनें इंग्लंड, फरान्स व आयर्लंड या देशांची राणी, धर्म-संरक्षक इत्यादि पदव्यांनीं युक्त अशी ही एलिझाबेथ जाहीर करते कीं, "ज्या अर्थी आमचे प्रिय आप्त जॉर्ज अर्ल ऑफ कंबर्लंड व त्यांचे बरोबरच आमच्या प्रजाजनांपैकीं २१४ जण यांनीं आम्हांकडे असा अर्ज केला आहे कीं ईस्ट इंडीज आणि आशिया व आफ्रिकेकडील प्रदेश या भागांशीं व्यापार व दळणवळण करण्यासाठीं स्वखर्चानें व स्वतःच्या हिंमतीवर जहाजें पाठ-विण्याचा आम्हांस एकमेव मक्ता असावा व ज्या अर्थी या उद्योगानें इंग्लंडच्या आरमारी बळांत व वैभवांत भर पडेल त्या अर्थी सर्वांनीं जाणावें कीं आमच्या देशाच्या सन्मानार्थ व प्रिय प्रजेच्या संपत्तीच्या अभिवृद्ध्यर्थ आरमाराच्या बळकटीसाठीं व व्यापार वाढण्यासाठीं आम्ही सदरहु मंडळींना 'गव्हर्नर अँड कंपनी ऑफ मर्चंट्स ट्रेडिंग इन् दी ईस्ट इंडीज' या नांवानें त्याप्रमाणें संपूर्ण व्यापाराची सनद देत आहोंत.

" या सनदेअन्वयें या मंडळींना जमीन व मालमत्ता विकत घेण्याचे व देण्याचे, फिर्याद करण्याचे व प्रतिवादी बनण्याचे संपूर्ण कायदेशीर अधिकार देण्यांत येत आहेत. त्यांच्या व्यवहारासाठीं शिक्का वापरण्याची परवानगी देण्यांत येत आहे. या मंडळीपैकीं दरसाल २४ सभासदांची निवड व्हावी. व त्या सभासदांस कमिटी असें म्हणावें. लंडनचा आल्डरमन थॉमस स्मिथ हा यांचा पहिला गव्हर्नर असावा. या २४ जणांकडे कंपनीच्या व्यापार व्यवहाराचे सर्व अधिकार असावेत.

" या कंपनीनें नेमलेल्या व नोकरीस लावलेल्या उमेदवारांना व नोकरांना पुढील १५ वर्षेपर्यंत आशिया, आफ्रिका आणि अमेरिका वगैरे भागांत बोना एस्पेरेंजा भूशिरापासून ते मॅगेलानच्या सामुद्रधुनीपर्यंत कोठच्याहि बेटांत, बंदरांत, खाडींत किंवा शहरांत व्यापार करण्याची मुभा आहे. तसेंच या पंधरा वर्षांच्या मुदतींत त्यांना हव्या त्या ठिकाणीं सभा बोलावून पाहिजे ते नियम व कायदेकानू करण्याची मोकळीक आहे. त्याचप्रमाणें या नियमांचें उल्लंघन करणाऱ्यांना शिक्षा, कैद व दंड करण्याची मोकळीक आहे. मात्र कंपनीचे हे सर्व कायदे आमच्या राज्याच्या कायदेकानूशीं विसंगत असतां कामा नयेत.

" व्यापार व्यवहारासाठीं त्यांना लागणारीं रुप्याचीं नाणीं, स्पेन किंवा इतर परदेशांत चालणारीं हीं या देशाच्या बाहेर नेण्याचा अधिकार आहे. तसेंच तीस हजार पौंडांपर्यंत आमच्या देशाचें नाणें लंडनच्या टांकसाळींत पाडून घेण्याचा अधिकार आहे.

" कधीं युद्ध उद्‌भवल्यास किंवा संरक्षणासाठीं जरूर लागल्यास कंपनीनें आपलीं सहा जहाजें आमच्या हवालीं केलीं पाहिजेत व या संरक्षणाच्या काळांत तीं बाहेर कोठें पाठवितां कामा नये.

" कंपनीचा परवाना किंवा अधिकारपत्र नसलेल्या कोणालाहि पूर्वेकडील देशाशीं व्यापार व दळणवळण ठेवण्याचा अधिकार नाहीं. तसें कोणी करील तर तो आमच्या रोषास पात्र होईल व त्याची मालमत्ता जप्त होईल. या सनदेअन्वयें आम्ही स्वतःवर व आमच्या वालीवारसांवर असें बंधन घालून घेतों कीं आम्ही पुढील १५ वर्षेपर्यंत कंपनीखेरीज कुणालाहि पूर्वेकडील देशाशीं व्यापार करण्याचा परवाना देणार नाहीं.

" कंपनीनें पूर्वेकडील देशांशीं व्यापार करतांना आमच्याशीं मित्रत्वानें राहणाऱ्या ख्रिश्चन राष्ट्रांनीं आधींच पूर्वेकडे जेथें वसाहती केल्या आहेत तेथें त्यांच्या परवानगीवांचून वसाहती करूं नयेत

" कंपनीला तूर्त दिलेली पंधरा वर्षांची मुदत एकंदर व्यवहार आमच्या राज्यास फायदेशीर दिसल्यास पुढेंहि वाढवण्यांत येईल.

" ही सनद वेस्टमिन्स्टर येथें ३१ डिसेंबर इ. स. १६०० रोजीं आमच्या कारकीर्दीच्या ४३ व्या वर्षीं दिली असे."

**अभ्यास** :—पूर्वेकडील देशांशीं व्यापाराचा परवाना देतांना त्या देशांच्या सरकारची परवानगी घेतली पाहिजे असा निर्बंध या सनदेंत नाहीं. इंग्लंडच्या एलिझाबेथनें अकबराच्या ताब्यांतील हिंदुस्थानांत आपल्या व्यापाऱ्यांना कांहीं अधिकार द्यावेत असा हा प्रकार आहे, ही गोष्ट ध्यानांत घ्यावी.

---

## २ : व्यापार करा, भलत्या भानगडींत पडूं नका

(सर टॉमस रोचें इंग्लंडच्या राजास पत्र इ. स. १६१४)

" व्यापारासंबंधानें आपल्या इच्छा सफल होण्यास अडचण नाहीं. बादशाहाशीं बरोबरीच्या नात्यानें कायमचा तह होणें मात्र शक्य नाहीं. मोगलांस मदत करणें किंवा तटबंदी करून किनाऱ्याचें रक्षण करणें असले बेत निरुपयोगी आहेत. व्यापार व युद्ध या दोन गोष्टी परस्पर विरुद्ध होत. समुद्रावर शांतपणें व्यापार करून मिळेल तोच नफा मिळविण्याचा आपण आपल्या मनांत हेतु ठेवला पाहिजे."

—मराठे व इंग्रज, पृ. १६.

---

# ३ : ई. इं. कंपनीस राजकीय धोरणाची आवश्यकता

[ इंग्रज व्यापारानिमित्त या देशांत आले, परंतु व्यापारावरोबरच राजकीय धोरण व व्यवहार यांचा त्यांनीं परिस्थितीनुरूप अंगीकार केला. इ. स. १६८८ मध्यें सुरतेचा गव्हर्नर सर जोशिया चाइल्ड याच्या प्रेरणेनें पुढील महत्त्वाचा ठराव पास करून पाठविण्यांत आला. हा चाइल्ड त्या काळांत कंपनीच्या हिंदुस्थानांतील व्यवहाराबाबत दीर्घ विचार करणारा सूत्रचालकच होता असें दिसतें.

—इल्बर्ट पृ. २३ ]

आमचें असें ठाम मत आहे कीं, "व्यापाराइतकीच आमच्या ताब्यांतील प्रदेशांतून वसुलाची वाढ करण्याची आम्हीं काळजी घेतली पाहिजे. कारण व्यापारास अनेक अपघात झाले असतां उत्पन्नांत जो खंड पडेल तो या वसुलानें भरून येईल व आम्हांस त्यामुळें सैन्य खडें ठेवतां येईल. या धोरणामुळेंच आम्हांस हिंदुस्थानांत राष्ट्र म्हणून जगतां येईल. याच्या अभावीं आम्ही इंग्रज लोक म्हणजे (इंग्लंडच्या) राजाच्या सनदेनें परवाना मिळालेले व एकत्र झालेले लुडबुडे ठरूं. जेथें कुणी आम्हांस आडवीत नाहीं तेथें आम्हीं वाटल्यास व्यापार करावा अशी आमची स्थिति होईल. ही परिस्थिति इकडील आमच्या डच व्यापारी बंधूंस पक्की माहीत असल्याकारणानें ते आपल्या मायदेशाशीं पत्रव्यवहार करतांना व्यापाराबाबत जेथें एक ओळ लिहितील तेथें आणखी दहा ओळी राजकीय अंमल, लष्करी धोरण, वसुलाची वाढ व चढाईची तरतूद याबद्दल लिहीत असतात."

**अभ्यास** :—राष्ट्र म्हणून जगणें याचा अर्थ काय ? ई. इं. कंपनीस त्याची केव्हां व कां आवश्यकता भासली ?

———

## ४ : : : वेचक व सूचक स्फुट माहिती

प्रा. श्री. म. माटे ] [ रोहिणी, जुलै १९४७

——इ. स. १६६२ त ईस्ट इंडिया कंपनीनें चार्लस्‌कडे तक्रार केली कीं, कंपनीशीं कोणाचाहि संबंध नसतां कित्येक इंग्रज हिंदी गलबतें चालवितात, आणि गलबतें बांधावयाचें व चालवावयाचें कसबहि ते हिंदी लोकांस शिकवितात. म्हणून चार्लसनें आज्ञापत्र लिहिलें कीं अशा लोकांना धरून इंग्लंडांत पाठवावें.

* * * *

——इ. स. १६६७ त हैबतराव उंब्रजच्या अधिकाऱ्यास लिहितो, "औरंगजेबानें मुसलमानांना जकातीची पूर्ण माफी दिली असून हिंदू लोकांवर मात्र त्या पूर्ववत् ठेविल्या आहेत. ख्रिस्त्यांना अशी सवलत देण्यांत आली आहे कीं, त्यांनीं त्या निम्म्या द्याव्या"

* * * *

—इ. स. १६७१ त सुरतेच्या अधिकाऱ्यांनीं कंपनी सरकारास लिहिलें कीं भीमजी पारख या नांवाच्या कंपनीच्या दलालानें कांहीं ब्राह्मणी लिखाण छापण्याकरितां इंग्लंडांतून एक मुद्रक मागविला आहे व त्याचा पगार देण्याचें त्यांनीं पत्करलें आहे.

* * * *

—इ. स. १६७३ त मुंबईकर इंग्रजांनीं जाहीर केलें कीं मुंबईतील आणि शेजारच्या बेटावरील सर्व ख्रिस्ती लोकांनीं इंग्लंडमध्येंच बनविलेल्या कापडाचीं वस्त्रें वापरावीं अशी आमची उत्कट इच्छा आहे.

## ५ : : : सतराव्या शतकांतील प्रवास

[ प्रस्तुत उतारा टॅव्हर्नियरच्या प्रवास-वृत्तांतून घेतला आहे. हा ग्रंथ इ. स. १६७६ सालीं तीन खंडांत प्रसिद्ध झाला. त्याचें जॉन फिलिप्सनें इंग्रजींत भाषांतर केलें आहे. टॅव्हर्नियर इ. स. १६०५ सालीं पॅरिस येथें जन्मला. तो रत्नांचा व्यापारी असून पूर्वेकडील तुर्कस्तान, इराण, हिंदुस्थान वगैरे देशांत त्यानें अनेक वेळां प्रवास केला होता. तो इ. स. १६८९ सालीं मॉस्को येथें प्रवासांत असतांनाच मरण पावला.
—किणो पृ. १० ]

आतां मी हिंदुस्थानांतील प्रवास करण्याच्या पद्धतीकडे वळतों. येथें घोड्याऐवजीं बैलांचा प्रवासांत उपयोग करतात. बैलावरून प्रवास करणें सुखाचें आहे परंतु प्रवासासाठीं बैल निवडतांना बैलांचीं शिंगें एक फुटांहून अधिक लांब नाहींत याची आपण काळजी घेतली पाहिजे, नाहींतर बैल अंगावरच्या माशा वारतांना जोरानें मान हलवीत असतां त्याचीं शिंगें स्वाराच्या पोटांत खुपसण्याची भीति आहे. बैलाच्या नाकांत वेसण घालून त्या दोरीचा लगामाप्रमाणें उपयोग करतात. साधारण जागेवर प्रवास करावयाचा असल्यास ते बैलाला नाल ठोकीत नाहींत. यूरोपांत बैलांना शिगांना दोरी बांधण्याची चाल आहे. पण हिंदुस्थानांत, गळ्याभोंवतीं एक जाड चार बोट रुंदीचा कातडी पट्टा अडकविला म्हणजे काम भागतें.

कधीं कधीं ते प्रवासासाठीं छोट्या गाडीचाहि उपयोग करतात. त्यांत दोन माणसें बसतात. परंतु प्रवास सुखाचा व्हावा म्हणून बहुधा एकच माणूस त्यांत बसतो. बरोबर एक सामानाची कातडी पिशवी, एक दारूचें छोटें भांडें वगैरें सामान गाडीच्या सांठ्याच्या खालीं अडकविलेलें असते. या गाडीला पडदे अडकविलेले असतात. मीं आपल्या गाडीसाठीं जे बैल घेतले त्यांना ६०० रु. पडले. हे बैल एकसारखे ६० दिवस रोजीं १२ ते १५ लीगचा (३६ ते ४५ मैलांचा ? ) प्रवास करूं शकतात. गाडीचें भाडें रोजीं एक रुपया पडतें. सुरत ते आग्र्याचा प्रवास किंवा सुरत ते गोवळकोंड्याचा प्रवास दोन्ही सारख्याच अंतराचे आहेत. त्यांना प्रत्येकीं ४० दिवस लागतात व ४०–४५ रु. पडतात.

याहून अधिक सुखाचें वाहन म्हणजे पालखी होय. ही सहा ते सात फूट लांब व तीन फूट रुंद असते. हिच्यावर एक लाकडाची कमान असून कमानीवरून झालर वगैरे सोडतात. पालखीच्या बाजूस एक गुलाम अब्दागीर बरोबर घेऊन चालतो व ऊन जसजसें फिरेल तसतसा उन्हाच्या तिरपीपासून मालकाचें रक्षण व्हावें म्हणून या किंवा त्या बाजूस मागें पुढें राहात असतो. पालखी वाहून नेण्यास मागें व पुढें तीन तीन माणसें असतात. या पालखीवाल्यास महिना ४।५ रु. दिले म्हणजे पुरे होतें.

तुम्ही गाडींतून प्रवास करा कीं पालखींतून करा, तुम्ही बरोबर २० ते ३० सशस्त्र शिपाई घेतलेच पाहिजेत. कधीं कधीं या प्रवासांत डौल दाखविण्यासाठीं निशाणेंहि घेतात. इंग्रज व डच कंपनीचे अधिकारी अशा रीतीनें जातात. वर सांगितलेले सशस्त्र शिपाई नुसते डौलाकरितां नाहींत, रक्षणासाठीं आहेत तुम्ही ज्या शहरांतून हे शिपाई घ्याल त्या शहरांतील त्यांचा मुख्य या शिपायांच्या विश्वासूपणाबद्दल ग्वाही देतो. परंतु या ग्वाहीबद्दल त्याला दर शिपायाबद्दल दोन रुपये द्यावे लागतात.

हिंदुस्थानांतील उन्हाळ्याची झळ ज्यांना सोसत नाहीं ते रात्रीचा प्रवास करतात व दिवसा विश्रांति घेतात. अस्तमानी ते एखाद्या तटबंदीच्या शहराजवळ आले तर त्यांनीं त्या ठिकाणीं सूर्यास्तापूर्वींच शहरांत प्रवेश केला पाहिजे; कारण एकदां रात्र पडली कीं तटाचे दरवाजे बंद होतात. रात्रीं कांहीं चोरी मारी झाल्यास त्या शहरचा कोतवाल त्याला जबाबदार असतो. हा कोतवाल आपल्यावरील जबाबदारीमुळें रात्री कोणास हालचाल करूं देत नाहीं व हा राजाचा हुकूम असें सांगून अत्यंत कडक रीतीनें वागतो.

**अभ्यास** :—सतराव्या शतकांतील प्रवासाचीं साधनें व आजचीं प्रवासाचीं साधनें यांचीं चित्रें काढून शेजारी मांडा. प्रत्येकाचा ताशीं वेग लिहा व पूर्वींच्या व आजच्या प्रवासखर्चाची व सौकर्याची तुलना करा.

---

# ६ : : : तरुण वसाहतवाल्यांची दिनचर्या

[ई. इं. कंपनीचा हिंदुस्थानशीं व्यापार सुरू झाल्यापासून इंग्लंड व हिंदुस्थानमधील कंपनीच्या अधिकाऱ्यांमध्यें झालेला पत्रव्यवहार फॅक्टरी रेकॉर्डस् मध्यें भरपूर उपलब्ध आहे त्यावरून वसाहतवाल्यांच्या तत्कालीन जीवनावर भरपूर प्रकाश पडतो. वसाहतवाले बहुश: सडेच येत. फक्त फॅक्टरीचे अध्यक्ष सहकुटुंब येत. इतरांनीं नोकरीच्या कालांत लग्न करूं नये अशी अपेक्षा असे. कॉलेज रेसीडेन्सींतील विद्यार्थी जीवनाप्रमाणें या व्यापाऱ्यांचें सामुदायिक जीवन असे. इ. स. १७२० पर्यंत तरी भोजन-व्यवहार एकत्र होत. रोज सामुदायिक प्रार्थना असे. रात्रौ वखारीचे दरवाजे बंद करून घेत. कोणी दारू पिणें, जुगार खेळणें इत्यादि प्रकारची गैर वर्तणूक केल्यास त्यास शिस्तभंगाबद्दल वखारीचे अध्यक्ष शिक्षा करीत. वखारीचे हे अध्यक्ष प्रथमपासूनच इतमामानें रहात असत. कोठें बाहेर निघतांना आपल्या राष्ट्राचें निशाण बरोबर घेत व वेळोवेळीं सलामीच्या तोफांची फैर झडत असे. पी. रॉबर्टस् पृ. ८१]

इंडिया ऑफिस रेकॉर्डस्, पृ. १५वें.} {५ मार्च १७१४

आम्हीं असा हुकूम दिला होता कीं आमचें जहाज येईल व जाईल तेव्हां सात ते नऊ तोफांच्या फैरी झाडाव्या. असें असूनहि जुलै १७१२ मध्यें १३४ तोफांच्या फैरी झाडल्या गेल्या; ३८५ पौंड दारुगोळा खर्च झाला व त्यांतहि सव्वीस वडचा तोफा डागण्यांत आल्या. हा अपव्यय आहे. येथून पुढें काटकसरीवर लक्ष ठेवावें. राणीच्या जन्मदिवशीं किंवा राज्यारोहण दिनीं उत्सवार्थ तोफांची सलामी द्यावी हें आम्ही समजतों. परंतु कुणा मि. मॅशबोर्नचें लग्न झालें किंवा हस्किनसनचा दफनविधि झाला कीं या साध्या प्रकारास एकवीस तोफांचे वायबार काढावेत हें आम्हांस संमत नाहीं. तसेंच एखाद्या गव्हर्नराचें आगमन झालें म्हणून लागलीच इतक्या तोफा उडवूं नयेत थोडचा उडवल्या तर पुरे होतील.

इं. ऑ. रे. पृ. १७ वें. } २६ एप्रिल १७२१

मद्रास येथें जुगारीचें व्यसन आमच्या कुलीन स्त्रियांतहि पसरलें आहे हें वृत्त ऐकून आम्हांस चिंता वाटते. आम्हांस असेंहि कळतें कीं, कॅ. सिटन नांवाच्या कुणी इसमानें जुगारीचा व्यापार चालवून कित्येक तरुणांची

त्यानें नागवणूक केलेली आहे. या दुष्ट व्यसनापासून सावध रहा असें आमचें तुम्हांस कळकळीचें सांगणें आहे. कॅ. सिटननेंहि हें ध्यानांत ठेवावें कीं त्यानें हा दुष्ट प्रकार बंद केला नाहीं तर त्याला तेथें राहातां येणार नाहीं व तेथून दूर घालविलें जाईल. मद्रासच्या कुलीन स्त्रियांनाहि सामोपचारानें हें सांगावें कीं हें व्यसन त्यांना घातक व त्यांच्या स्वकीयांसंबंधीं मत कलुषित करणारें असल्यानें त्यांनीं या व्यसनापासून अलिप्त रहावें.

**अभ्यास** :—परदेशांत नवीनच राहावयास जाणाऱ्या तरुणांबद्दल कोणती काळजी घेतली पाहिजे? हल्लींचे हाय कमिशनर परदेशस्थ हिंदी लोकांबद्दल अशी काळजी घेतात काय?

---

## ७ : : मुंबईच्या गव्हर्नरानें मराठ्यांच्या दरबारीं पाठविलेल्या कॅप्टन गार्डनला दिलेल्या सूचना

[ इ. स. १७३९ ]

—मराठे व इंग्रज. पृ. ३७

"सोबतचीं पत्रें व नजराणे नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें आदबशीर रीतीनें ज्यांचे त्यास द्यावे. शाहू राजाच्या दरबारीं त्याचे मुख्य सल्लागार कोण, त्यांचे विचार काय आहेत आणि त्यांचे हिताहितसंबंध कसे काय आहेत याची चौकशी करावी. बाजीरावाचे शत्रु दरबारीं पुष्कळ आहेत; यामुळें योग्य प्रसंग पाहून त्याच्या विषयीं त्यांचे मनांत स्पर्धा व हेवा उत्पन्न करावा. तो आधींच प्रबल असून पोर्तुगीजांवर जय मिळविल्यानें तो आणखी प्रबळ होणार; त्याच्या वर्चस्वाला आळा घालावयाचा तर हीच वेळ आहे, असें त्यांचे मनांत भरवून द्यावें. आपला कमकुवतपणा त्यांना फारसा दाखवू नये. बाजीरावास आम्ही भीत नाहीं. आमच्यावर त्यानें स्वारी केली तर आम्हांस आपला बचाव करतां येईल असेंच त्यानें भासवावें. आमचा मतलब मुख्य व्यापाराशीं, आम्हांस कोणाचा मुलूख नको, आम्ही कोणाच्या धर्मांत हात घालीत नाहीं. या देशांत खपून उरणारा तुमचाच माल आम्ही

स्वदेशीं नेऊन विकून तुमचें काम करतों आणि त्याच्या बदला इकडे पैसा व माल आणतों व शिवाय जकातही देतों. यामुळें आमचा धंदा मराठ्यांना सर्वस्वी फायदेशीरच आहे असें त्यांस समजून सांगावें."

---

## ८ : : : अर्काटचा वेढा

[ प्रस्तुत उतारा रॉबर्ट ऑर्मच्या "हिंदुस्थानांतील इंग्रजांच्या लष्करी घडामोडीचा इतिहास : इ. स. १७४५ पासून" या पुस्तकांतून घेतला आहे. ऑर्म इ. स. १७२८ त जन्मला. इ. स. १७४३ सालीं ई. इं. कंपनींत कारकून म्हणून नोकरीस राहिला व पुढें मद्रास कौन्सिलचा सभासद झाला. क्लाइव्हला पुढें बंगालच्या भानगडी मिटविण्यास पाठविण्यांत आलें तें याच्याच सूचनेवरून. यानें वरील ग्रंथाखेरीज "हिंदुस्थानांतील मोगलांचें साम्राज्य, मराठे व इंग्रज यांचे व्यवहार यासंबंधींची इ. स. १६५९ पासूनची ऐतिहासिक स्फुट माहिती" हें पुस्तक लिहिलें आहे.

महंमद अल्ली त्रिचनापल्लीस वेढ्यांत अडकून पडला असतां क्लाइव्हनें चंदासाहेबाची राजधानी अर्काट यावर हल्ला करून तें शहर घेतलें (इ. स. १७५१) हें प्रसिद्धच आहे. अर्काट परत घेण्यासाठीं चंदासाहेबानें अर्काटला वेढा दिला. त्यासंबंधींची ही हकीकत आहे.

—किणी पृ. १२४ ]

१४ नोव्हेंबर १७५१ हा मोहरमचा दिवस. हिंदुस्थानांतील मुसलमान हा दिवस धार्मिक धुंदींत घालवितात. या प्रसंगीं हसन हुसेनच्या मृत्युबद्दल कोणी कोणी इतका शोक करतात कीं त्या अतिरेकांत कित्येक स्वतःच मृत्यु पावतात. या धार्मिक धुंदीच्या जोडीस कैफ चढण्यास भांग गांजाचीहि मदत होते. याप्रमाणें दिवस रात्र घालविल्यावर राजासाहेब (चंदासाहेब) यानें दुसरे दिवशीं पहाटे हल्ल्याची तयारी केली. अनेक जण शहरच्या तटाभोंवतीं शिड्या घेऊन पुढें सरसावले. परंतु मुख्य सैन्याच्या चार तुकड्या केल्या होत्या. पैकीं दोन मुख्य दरवाजावर बाकीच्या दोन ठिकाणीं पडलेल्या खिंडारावर हल्ला करण्यास पुढें सरसावल्या. दरवाजाकडे येणाऱ्या टोळीबरोबर हत्ती होते. या हत्तींच्या कपाळावर लोखंडी पत्रें मारलेले होते. त्याच्या सहाय्यानें दरवाजे फोडण्याचा त्यांचा हेतु होता. परंतु या हत्तींस

तटावरून गोळ्या लागतांच ते मागें फिरले व त्यांच्याबरोबर असणाऱ्या लोकांसच त्यांनीं तुडविलें. वायव्येकडील बाजूस पडलेल्या खिंडारासमोर जो खंदक होता तो तरून येण्यासारखा होता. तेव्हां त्या खिंडारांत जितके मावतील तितके लोक घाईघाईनें हल्ला करण्यास पुढें सरसावले व बाकीचे लोक बुरुजाजवळ आसन मांडून बसले होते. लढणारे दमले म्हणजे हे विसांवा घेणारे पुढें सरसावणार होते. तटावरील शिबंदीच्या लोकांनीं गोळ्या झाडण्यापूर्वीच हल्ला करणाऱ्यांपैकीं कांहीं खंदकांतून पसार होऊन पुढें आले होते, परंतु लवकरच गोळीबारास सुरुवात झाली. हा गोळीबार कांहीं वेळ झाल्यावर हल्ला करणारे मागें परतले. नंतर थोड्या वेळानें दुसरी टोळी आली व नंतर तिसरीहि आली. परंतु या सर्वांस वरीलप्रमाणेंच धुडकावून लावलें. नंतर तटावरून बाँबगोळे फेंकण्यांत आले व ते नेमके आसन मांडून बसलेल्या लोकांत पडले त्याबरोबर ते लोक सैरावैरा पळून गेले.

तटावरून सोडलेल्या तोफांचे नेम बरोबर लागत नाहींत हें पाहून कॅ. क्लाइव्ह तिकडे वळला व त्यांच्यांत अचूकपणा आणला, त्याबरोबर हल्ला करणाऱ्यांमध्यें गोंधळ उत्पन्न होऊन कित्येक खंदकामध्यें गडबडत पडले. अशा रीतीनें एक तास युद्ध झाल्यावर चंदासाहेबाच्या फौजेनें युद्ध थांबविलें व पडलेलीं प्रेतें शिबिरांत वाहून नेण्याचें काम सुरू केलें. दरवाजावरील हल्ल्यांत टोळीचा नायक मरण पावला. त्याला एका शिपायानें मोठ्या धोक्यांतून खंदकांतून वाहून नेलें. तो स्वतःच तटावरून चाललेल्या गोळीबारांत मेला नाहीं हें आश्चर्य ! त्यांची अशीहि अपेक्षा दिसली कीं, प्रेत वाहून नेत असतां शिबंदीचे लोक गोळ्या झाडणार नाहींत. या हल्ल्यांत एकंदर ४०० माणसें मृत व जखमी झालीं. पण त्यांत फरेंच लोक अगदींच थोडे होते, कारण फरेंचांची टोळी हा हल्ला चालू असतां दूर उभी होती !

दोन तासांनंतर शत्रूनें किल्ल्यावर पुन्हां हल्ला चढविला तो दुपारीं दोन वाजेपर्यंत चालू होता. दोन वाजतां उभयपक्षीं तात्पुरत्या विश्रांतीचा करार ठरला. या काळांत मुडदे पुरण्यांत आले. पुन्हां चार वाजतां लढाई सुरू झाली ती पहांटे २ वाजेपर्यंत चालू होती. परंतु पहाटे एकाएकीं बातमी आली कीं हल्ला करणारें सैन्य किल्ला सोडून पसार झालें. ही आनंददायक वार्ता कळतांच किल्ल्यावरील शिबंदीचे शिपाई शत्रूच्या तळावर गेले व तेथें पडलेलें त्यांचें

अस्ताव्यस्त सामान, बंदुका, दारूगोळा वगैरे त्यांनीं लुटून नेलें. या एकंदर हल्ल्यांत ४५ यूरोपियन व ३० शिपाई मारले गेले व कित्येक जखमी झाले.

अशा रीतीनें हा ५० दिवसांचा वेढा संपला. सर्व परिस्थिति प्रतिकूल असतां या धाडशी कप्तानानें (क्लाइव्हनें) अविश्रांत श्रमानें, चिकाटीनें व धैर्यानें आपल्या मूठभर साथीदारांसह हा विजय मिळविला. क्लाइव्हला लष्करी विद्येचें पूर्वीचें कसलेंही ज्ञान नसतां एखाद्या सराइताप्रमाणें आपल्या जवळच्या सामुग्रीचा त्यानें व्यवस्थित उपयोग केला.

**अभ्यास** :—प्रत्यक्ष लढाईचें हें वर्णन वाचून हिंदी शिपायांचें शौर्य, शिस्त, तारतम्य यांबद्दल तुम्हांस काय वाटतें? या लढाईंत फ्रेंच शिपाई कसे वागले?

---

## ९ : : : कलकत्त्याची अंधारकोठडी

[ कलकत्त्याच्या अंधारकोठडी संबंधीं हॉलवेलनें केलेलीं विधानें अतिशयोक्तिपूर्ण आहेत हें मेजर बसू यांनीं 'राइज ऑफ् ख्रिश्चन पॉवर इन् इंडिया' या ग्रंथांत दाखविलें आहे. तरीपण समकालीन कागदपत्रांत हात्र अतिशयोक्त वर्णनाचा प्रकार प्रसृत होता असें दिसतें. तथाकथित अंधारकोठडीचा प्रकार २० जून १७५६ रोजीं कलकत्त्यास घडला. त्यासंबंधीं नजीकच्या चंद्रनगर येथील फ्रेंच कौन्सिलनें १६ डिसेंबर १७५६ रोजीं आपल्या वरिष्ठास जें पत्र लिहिलें त्यांतील उतारा पुढें दिला आहे.

ता. १७ डिसेंबर रोजीं खुद्द क्लाइव्ह व वॅटसन यांनीं नबाबास पत्रें लिहिलीं त्यांत नबाबाकडे कंपनीच्या नुकसानभरपाईची मागणी केली आहे. पण या पत्रांतहि अंधारकोठडीचा किंवा खोलींत कोंडून माणसें मारल्याचा उल्लेख नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. यावरून समकालीन नजीकचा अस्सल पुरावाहि विश्वसनीय मानण्यापूर्वी तो नीट पारखून घेतला पाहिजे हें लक्षांत येतें. मूर, पृ. ४१–४३.]

मित्रहो! तुम्हांस मी एक आश्चर्यकारक घटना सांगतों. बंगाल्यांत नुकतीच एक मोठी क्रांति झाली व इंग्रजांचें त्यांच्या वसाहतींतून जवळ जवळ उच्चाटन झालें. त्याच्या बनावाची हकीकत पुढीलप्रमाणें आहे :

कुणाच्या इच्छेची किंवा अपेक्षेची पर्वा न करतां सिराजउद्दौला हा आपला आजोबा अलिवर्दीखान याच्यामागून बंगालचा नबाब झाला (एप्रिल १७५६). इंग्रजांनीं आपल्या उद्दामपणानें त्याच्या शत्रूस आश्रय देऊन त्याला चिडविलें होतें. यामुळें निकरावर येऊन त्यानें या प्रकारचा सूड घेण्याचें ठरविलें व इंग्रजांचें मुख्य ठाणें जें कलकत्ता त्यास वेढा घालण्यासाठीं मोठें सैन्य पाठविलें.

इंग्रज आपल्या ऐटींत अशा भ्रमांत राहिले कीं, मुसलमान इकडे येणारच नाहींत. यामुळें ते प्रत्यक्ष येऊन पोहोंचल्याबरोबर सर्व जण अगदीं गांगरून गेले व एरवीं त्यांना जें सहज करतां आलें असतें तेंहि ते करूं शकले नाहींत. जवळ चांगले ६०० गोरे शिपाई असून, भरपूर दारुगोळा असून व बळकट किल्ल्यांत स्वतःचें आसन स्थिर असतांहि त्यांनीं मुळीं नबाबाचें सैन्य आल्याबरोबर कांहीं प्रतिकारच केला नाहीं. खुद्द गव्हर्नर मि. ड्रेक, सैन्याचे अधिकारी, मोठमोठे कामगार व स्त्रिया, बंदरांत नांगरून पडलेल्या जहाजावर आश्रयार्थ पळून गेले. मागें जे थोडे शिपाई राहिले त्यांना कोणी नेता नसल्यानें सर्वत्र बेबंदशाही माजली. अखेर तारीख २० रोजीं तिसरें प्रहरीं, म्हणजे तीन दिवसांच्या वेढ्यानंतर किल्ल्यावर शरणागतीचें पांढरें निशाण लावण्यांत आलें.परंतु ही सर्व व्यवस्था जाहीर होण्यापूर्वींच मुसलमान किल्ल्यांत शिरले तेव्हां कांहींनीं त्याचा प्रतिकार केला. ते मारले गेले. नवाबाच्या फौजेनें तेथें मनस्वी लूट केली कारण इंग्रजांनीं पळून जातांना आपला खजिनाहि बरोबर नेला नव्हता.

येथून पुढील अनर्थास सुरुवात झाली. मुसलमानांच्या हातीं जे २०० लोक सांपडले त्या सर्वांना एका गुदामांत रात्रभर कोंडून ठेवलें व अर्थात् तेथें ते गुदमरून मेले. त्यांतून जे वांचले त्यांना विशेषतः त्यांतील अधिकाऱ्यांना हातकड्या घालून बंगालची राजधानी मुर्शिदाबाद येथें नेलें व कांहीं दिवसांनीं त्यांना (आमच्याकडे) मोठ्या केविलवाण्या स्थितींत परत पाठवून दिलें. आम्ही शक्य त्या प्रयत्नांनीं त्यांचें दुःख कमी करण्याचा प्रयत्न केला. जहाजांकडे पळून जाऊन ज्यांनीं जीव वचावण्याचा प्रयत्न केला त्यांचीहि दुर्दशा झाली. कसेबसे ते आपल्या जहाजांतून नदीच्या तोंडापर्यंत आले. पावसाळ्याचे दिवस होते. हवा मोठी वाईट पडली होती. बायकामुलांची एकच गर्दी झाली

होती. शिधासामुग्रीहि कशी तरी मिळाली. यामुळें तेथें रोगराई सुरु होऊन त्यामुळेंहि कांहीं जण मृत्यु पावले.

कलकत्ता काबीज झाल्यामुळें बंगालभर परसलेल्या इंग्रजांच्या वखारीचा सर्वस्वी नाश झाला. आतां या राज्यांत त्यांची एकहि वखार नाहीं. इतके दिवसांत यूरोपांतून (इंग्लंडमधून) फक्त एकच जहाज त्यांच्या सहाय्यार्थ येऊन पोहोंचलें. कर्नाटकच्या किनाऱ्याहून सहा जहाजांचें एक आरमार व काळ्या गोऱ्यांची एक पलटण ऑक्टोबर १४ ला निघाली असून ते सर्व लवकरच कलकत्त्यास पोहोंचतील अशी कल्पना आहे. त्याप्रमाणें सर्व घडून आले तर इंग्रज कलकत्ता परत घेऊं शकतील यांत शंका नाहीं. कारण कलकत्त्यास मुसलमानांची शिबंदी अगदीं थोडी आहे; पण एवढ्यानें ते या विपत्तींतून कितपत सांवरतील व नवाबाच्या मोठ्या फौजेपासून कलकत्त्याचें संरक्षण कितपत करूं शकतील याची मोठी शंका आहे.

**अभ्यास** :—या पत्रांतील कांहीं भाग ऐकीव माहितीवर आधारलेला आहे हें सिद्ध करण्यास अंतर्गत पुरावे द्या.

---

## १० : : : प्लासीची लढाई व तिचे परिणाम

[ कर्नल क्लाइव्हचा 'डायरेक्टर्सच्या सिक्रेट कमिटीस' खलिता ता. २६ जुलै १७५७. –मूर, ५३.]

मी आपणांस चंद्रनगर घेतल्याची हकीकत लिहिलीच आहे. आज आपणास फारच महत्त्वाची––नवाब सिराज उद्दौला पदच्युत होऊन मीर जाफर गादीवर आल्याची––हकीकत कळवीत आहें. सिराज उद्दौला तहाच्या अटी मान्य करण्यास टंगळमंगळ करीत असे हें मी लिहिलेंच आहे. शिवाय आमचा नाश करण्यासाठीं त्याचें फरेंचांशींहि संधान होतें असें दिसून आलें. याच सुमारास त्याचे कांहीं बडे कारभारी त्याला पदच्युत करण्यासंबंधीं आमच्याकडे कारस्थानार्थ आले. त्यांत बक्षी मीरजाफर हा प्रमुख होता. सिराज उद्दौला जितका अप्रिय तितकाच हा जनतेंत प्रिय आहे व

सिराजबद्दल सर्वत्र असंतोष आहे याचा अंदाज घेऊन आम्ही मीर जाफरच्या डोक्यावर नबाबीचा मंदील चढविण्याचा मनसुबा केला. सर्व तयारी अगदीं गुप्ततेनें केली व तारीख १३ रोजीं एक हजार यूरोपियन, बाराशें शिपाई आणि आठ तोफा घेऊन आम्ही चंद्रनगरहून निघालों व १८ तारखेस कटवा येथें पोहोंचलों. तें ठिकाण आमच्या सहज हातीं आलें. तारीख २२ रोजीं सायंकाळीं नदी ओलांडून कासीम बाझारच्या बेटांत प्लासी येथील राईंत पहाटे १ वाजतां येऊन पोहोंचलों. सकाळीं नवाबाचे १५ हजार घोडेस्वार, ३५ हजार पायदळ व ४० तोफा असें पायदळ आमच्याकडे चाल करून येत असलेलें आम्हीं पाहिलें. सकाळीं ६ला त्यांनीं तोफांच्या सहाय्यानें आम्हांवर हल्ला सुरू केला. परंतु आम्हीं नदीतीरावरील मातीची दरड पाहून तेथें आश्रय घेतला असल्यानें शत्रूचा हल्ला नीट लागू पडला नाहीं. त्यांचेवर हल्ला करणें आम्हांस अशक्य होतें. कारण ते आमच्या भोंवतीं सर्वत्र विस्कळीत रीतीनें पसरले होते म्हणून रात्रीं शत्रु छावणींत गेल्यावर तेथें हल्ला करावा असा विचार ठरवून आम्ही स्वस्थ राहिलों. दुपारीं शत्रूनें आपला तोफखाना मागें घेऊन विश्रांतिस्तव छावणींत गेले. आम्ही लागलीच शिपायांची एक तुकडी दोन तोफा बरोबर देऊन तिकडे पाठविली. आम्हांपासून सुमारें ३०० यार्ड अंतरावर वरच्या बाजूस एक तळें होतें. तेथून शत्रूनें फ्रेंच शिपायांच्या सहाय्यानें तोफांची मारगिरी करून आम्हांस बराच त्रास दिला होता. या मोक्याच्या जागेपासून शत्रूला हाकलावें एवढाच आमचा उद्देश होता. आमची तुकडी जातांच ते तेथून बाहेर पडले व आम्ही तेथें जाऊन बसलों शत्रूचें आमचें उच्चाटन करण्याचें लक्षण कांहीं दिसेना म्हणून आम्हीं एवढ्यावरच न थांबता आणखी दोन तीन उंचावरच्या जागा लगोलग ताब्यांत घेण्याचें ठरविलें कारण त्याहि मोक्याच्या होत्या. आम्हीं पुढें जातांच त्यांनीं आपला तोफखाना चालू करण्याचा यत्न केला. पण आमच्या तोफांनीं ऐसी छान कामगिरी बजाविली कीं शत्रूस मागें परतावें लागलें. या वेळीं त्यांचें घोडदळ उघड्यावर पडलें होतें. तेव्हां आम्हीं त्याच्यावर मारा करून कित्येक मारले. या गर्दींत ४–५ बडे अधिकारीहि मारले गेले. यामुळें शत्रुसैन्य नामोहरम होऊन त्यांच्यांत एकच गोंधळ पसरला. त्याबरोबर आम्हांस उमेद चढून आम्हीं वरील मोक्याच्या जागा संपूर्णपणें आपल्या ताब्यांत घेण्याचें ठरविलें.

याबरोबर शत्रुपक्षांत पळापळीस सुरुवात झाली व आम्ही त्यांचा सहा मैल-पर्यंत पाठलाग केला. या पलायनांत त्यांनीं चाळीस तोफा, कित्येक बैलगाड्या व खूप लष्करी सामान मागें टाकलें. खुद्द सिराजउद्दौला उंटावर बसून निसटला व दुसऱ्या दिवशीं सकाळीं मुर्शिदाबादेस पोहोंचला. लागलीच त्यानें आपली मौल्यवान् रत्नें व खजिना सोय झाली तेथें पाठवून दिला, व मध्यरात्रीं आपल्या दोनतीन विश्वासू साथीदारांसह पळून गेला.

या हालचालींत शत्रूचे सुमारें ५०० लोक मरण पावले असा अंदाज आहे. आमच्याकडील फक्त २२ मेले व ५० जखमी झाले. मोहीम जोरांत चालू असतां आमच्या उजव्या बाजूस एक सैन्य खडे होतें. त्यानें युद्ध चालू असतां आमच्याशीं कांहीं शत्रु-मित्रभाव प्रकट केला नाहीं म्हणून आम्हीं मधून मधून त्यांच्यावर गोळागोळी करून त्यांना जवळ येऊं दिलें नाहीं. हें सैन्य मीरजाफरचें होतें. युद्ध संपतांच त्यांनीं मला अभिनंदनाचा संदेश पाठवला व आपलें करार इमानानें पाळण्याचें आश्वासन दिलें.

सिराजउद्दौला पळून गेल्यामुळें मीरजाफरला त्याचा राजवाडा ताब्यांत घेण्यास कांहीं त्रास पडला नाहीं. प्रजेस सैन्याकडून उपसर्ग होऊं नये म्हणून मी सैन्य घेऊन मुद्दामच बाहेर छावणी दिली. तरी पण खजिन्याची काय हालहवाल आहे हें जाणण्यासाठीं मी मि. वॅट्स् आणि मि. वाल्श या दोघांस राजवाड्यांत पाठविलें. त्यांनीं एकंदर स्थिति पाहून धोका टाळण्यासाठीं तावडतोब राजवाड्यांत या असा मला निरोप पाठविला. ता. २८ रोजीं सुमारें २०० यूरोपियन्स बरोबर घेऊन मी राजवाड्यांत गेलों. सायंकाळीं मीरजाफरला भेटण्यास गेलों तों त्यानें मला पाहतांच माझें स्वागत करून, मी त्यास मसनदीवर बसविल्याखेरीज आपण बसणार नाहीं, असा हट्ट धरला. अखेर मी त्यास हाताला धरून मसनदीवर बसविलें. यावर सर्वांचे मुजरे जाहले.

दुसरे दिवशीं मीरजाफर मला भेटण्यास आला. या वेळीं झालेल्या भाषणांत मी त्यास जगत्शेटला* भेटण्यास सांगितलें. शेटजींनीं नव्या

* हा शेटजी व त्याची पेढी तसेंच अशा दुसऱ्या पेढ्या कलकत्त्यांत मोठ्या श्रीमान् व वजनदार होत्या. सिराजउद्दौल्याच्या [छळामुळें हे शेटजी त्याच्या विरुद्ध झालेल्या कटांत सामील होते. या शेटजीचें मोगल दरबार-पर्यंत वजन होतें.

नबाबास पाठिंबा देण्याचें कबूल करून दिल्लीहूनहि त्याच्या नबाबीस मान्यतेचें फरमान आणून देण्याचें आश्वासन दिलें.

यानंतर नबाब व कंपनी यांच्यामध्यें जगत्शेटच्या विद्यमानें करार ठरला. या करारांत कंपनीस द्यावयास लागणाऱ्या नुकसानभरपाई इतकी रक्कम (दीड कोट रुपये) खजिन्यांत नव्हती म्हणून तूर्त आम्ही अर्धी रक्कम घ्यावी व अर्ध्याची तीन वर्षांत तीन हप्त्यांनीं फेड करावी असें ठरलें. ह्या अर्ध्या रकमेपैकीं कांहीं भागहि आम्हांस रत्नांच्या रूपानें घ्यावा लागला.

नबाबानें सिराजउद्दौल्याच्या शोधार्थ मनुष्य पाठविला आहे. कित्येक दिवस तो सांपडत नव्हता. परंतु अखेर त्यास राजमहालनजीक पकडण्यांत आलें. व ता. २ रोजीं रात्रीं मुर्शिदाबादेस आणलें. नबाबाच्या मुलानें (असें म्हणतात कीं) त्याची संमति न घेतांच सिराजउद्दौल्याचा खून केला. दुसरे दिवशीं सकाळीं नबाबानें माझी भेट घेऊन राजकारणाच्या दृष्टीनें हें सर्व आवश्यक होतें असें समर्थन केलें. सिराजउद्दौल्यास सहाय्य करण्या-साठीं फ्रेंचांची एक तुकडी येत होती परंतु त्यास पकडल्याची वार्ता ऐकून ती परत गेली असें विश्वसनीय रीत्या कळतें.

बंगालच्या गादीवर या नबाबाचें आसन स्थिर राहील असा रंग दिसतो. एकंदरींत प्रांतांत शांतता नांदत आहे व दिल्लीहून स्वारी होण्याची जी कांहीं भीति होती तीहि आतां नष्ट झाली आहे.

एकंदरींत ही दूरगामी स्वरूपाची राज्यक्रांति सर्व दृष्टीनें पूर्ण झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. हिचें महत्त्व लक्षांत घेऊन तुम्ही आणखी सैन्य व राज्यकारभार करण्यास लायक माणसें पाठवाल असा मला भरंवसा वाटतो.

**अभ्यास** :—“प्लासीच्या लढाईचें लष्करी दृष्टचा महत्त्व फारसें नाहीं. राजकीय दृष्टया मात्र फार आहे.” या विधानाचें स्पष्टीकरण करा.

---

## ११ : : राज्य वाढविण्यासाठीं सैन्य पाठवा

[कर्नल क्लाइव्हनें इंग्लंडचा मुख्य प्रधान वुइल्यम पिट यास लिहिलेलें पत्र. (इ. स. १७५९)—कीथ पृ. १३]

महाराज,

इंग्रजी सैन्याला मिळालेल्या विजयामुळें येथें जी क्रांति घडून आली आहे आणि युद्धाच्या शेवटीं झालेल्या करारामुळें कंपनीला जो अतोनात फायदा झाला आहे त्याकडे इंग्लंडांतील जनतेचें बरेच लक्ष वेधलें आहे असें दिसतें. परंतु कंपनीनें भावी भरभराटीची आशा मनांत ठेवून जर नीट प्रयत्न केले तर झाला हा फायदा कांहींच नव्हे असें त्यांच्या लक्षांत येईल. संधि मिळतांच आपलें राज्य आणखी वाढविण्यासाठीं जास्त सैन्य पाठविण्याबद्दल व खूप मोठें सैन्य खडें ठेवण्याबद्दल मी वारंवार शक्य तितक्या निग्रहानें लिहिलेलें आहेच आणि गेल्या दोन तीन वर्षांतील या देशांतील लोकांच्या स्वभावाच्या ज्ञानाच्या अनुभवावरून मला असें वाटतें कीं, अशा तऱ्हेची संधि लवकरच आपणाला मिळणार आहे. प्लासीच्या लढाईंतील विजयामुळें या प्रांतावर राज्य करणाऱ्या ज्या नबाबाला सार्वभौमत्वाचे हक्क प्राप्त झाले आहेत त्यानें अद्याप आपली मैत्री सोडली नाहीं व जर दुसरीकडून मदत मिळाली नाहीं तर तो ती कायमहि ठेवील. पण त्याच्यावर आपण केलेल्या उपकाराचा मुळींच परिणाम झालेला नाहीं व त्यानें जर आपले संबंध तोडून टाकण्याचा विचार केला तर केलेल्या उपकाराचीं बंधनें त्यास थांबवूं शकणार नाहींत. याचें ताजें उदाहरण म्हणजे त्यानें आमच्याशीं संबंध असलेले त्याचे मुख्य वझीर व इतर एक दोन अधिकारी यांना नुकतेंच बडतर्फ केलें आहे. ... अशा परिस्थितींत जर त्याच्या आपल्या मित्रत्वांत खंड पडला तर सार्वभौमत्वाचे अधिकार आपल्या ताब्यांत घेण्यास फक्त दोन हजार सैन्य खात्रीनें पुरें पडेल. अशा तऱ्हेचा बनाव घडवून आणण्यालाहि फारसा त्रास पडणार नाहीं. कारण हल्लींच्या कोणाही एका राज्यकर्त्याबद्दल येथील रहिवाश्यांना विशेष प्रेम वाटत नाहीं. सध्यांच्या राज्यव्यवस्थेखालीं त्यांना जीवाची व मालमत्तेची सुरक्षितता वाटत नाहीं व असें (नबाबाचें) एकतंत्री राज्य

जाऊन त्या जागीं सौम्य पद्धतीचें (इंग्रजी) राज्य आलें तर त्यांना आनंदच वाटेल. जर कंपनीने मोगल बादशहाला वसूलीपैकीं ठराविक रक्कम म्हणजे पन्नास लक्ष रुपये देण्याचें कबूल केलें तर आपणाला बादशहापासून अधिकाराची सनद मिळण्याला मुळींच अडचण पड़णार नाहीं. इतकेंच काय, दिल्ली येथील राजदरबाराकडून मला वसूली खात्याचे अधिकार आपल्या ताब्यांत घेण्याबद्दल विनंत्याहि आल्या आहेत... परंतु नबाबाला मत्सर वाटूं लागेल अशी कोणतीहि गोष्ट करण्यास मी सध्यां नाखूष आहें, त्यामुळें मी ह्या मागणीला नकार दर्शविला आहे. विशेषतः एवढी मोठी जबाबदारी सांभाळण्यासाठीं आज कंपनीकडून मला सैन्याची पुरेशी मदत मिळण्याचा संभव नाहीं. परंतु एवढें सांगतों कीं आज ही जबाबदारी घेतली तर यांतूनच उद्यां प्रांताची सुभेदारी मिळण्याचा मार्ग खुला होईल.

........वार्षिक वीस लक्ष पौंडांपेक्षां अधिक उत्पन्नाच्या निसर्गसंपन्न प्रदेशावर स्वामित्व मिळण्याचा संभव इंग्लंडांतील जनतेनें डावलण्याजोगा आहे काय याचा तुम्ही विचार करा. ह्या प्रांतांचा ताबा घेण्यामुळें साम्राज्याला बरीच मोठी संपत्ति मिळण्याचा संभव आहे व आपल्याला झालेलें भयंकर कर्ज फेडण्याच्या दृष्टीनें बराचसा उपयोग होईल. इंग्रजी सैन्य थोडेंसें आलें तरी पुरें आहे, कारण येथील काळचा पलटणींना येथील राज्यकर्त्यांकडून मिळणाऱ्या पगारापेक्षां आम्हीं जास्त पगार देतों व जास्त चांगल्या तऱ्हेनें वागवितों त्यामुळें वाटेल तितके काळे सैनिक आम्हांस सहज मिळूं शकतात...

तुमचा अत्यंत नम्र सेवक,
राबर्ट-क्लाइव्ह

---

## १२ : : : मराठ्यांच्या दरबारीं पाठविलेल्या टॉमस मॉस्टिन यास अधिकाऱ्यांनीं दिलेल्या सूचना

(इ. स. १७६७)

—मराठे व इंग्रज, पृ. ४५

मराठ्यांचें वर्चस्व दिवसानुदिवस वाढत आहे ही गोष्ट मोठी अनिष्ट आहे व ती आमच्या लक्षांत आहे. मद्रास–बंगाल येथील आमच्या अधिकाऱ्यांच्याहि मनांत हेंच शल्य आहे. पण हल्लीं निजामअल्ली व हैदरअल्ली यांची दोस्ती झाल्यामुळें आम्हांस मराठ्यांशीं स्नेह करणें भाग आहे. मराठ्यांस वाटेल तर आम्ही बेदनूर व सोंदा देऊं; मात्र याचा मोबदला पेशव्यांनीं आम्हांस वसई व साष्टी द्यावी; तसेच सुरतेवरील हक्क सोडावा, वाटेल तेथें आम्हांस वखारी घालूं द्याव्या. मिरी, वेलदोडे व चंदन यांच्या व्यापाराचा कुलमक्ता आम्हांस द्यावा. आमचा मुख्य हेतु साष्टी हातीं ठेवण्याचा आहे. मराठ्यांशीं स्नेह करून त्यांची सत्ता वाढूं देणें हें आम्हांस फार अनिष्ट आहे; पण या वेळीं त्याशिवाय गत्यंतर नाहीं.

माधवराव व रघुनाथराव यांच्यामधील भांडणामुळें माधवराव पेशव्यांचें मन व्यग्र असेल तर मग पेशव्यांचें मन सांभाळण्यास आम्हांस फारसें कारण आहे असें नाहीं. म्हणून दरबारचें रंगरूप पाहून पेशवे आम्हांस मिळूं इच्छीत असतील तर, मद्रासकडे कारण पडल्यास ते आम्हांस किती फौज पुरवूं शकतील असा सवाल तुम्हीं प्रथम टाकावा व ते जें उत्तर देतील त्यावरून त्यांच्या स्थितीची खरी परीक्षा करावी.

———

## १३ : हिंदुस्थानांत कारकुनी मिळविण्याची धडपड

[इ. स. १७६७]

'– एंपायर ऑफ दि नबाब्ज' पृष्ठ ८६.

[ क्लाइव्ह इ. स. १७६७ सालीं जेव्हां इंग्लंडला गेला तेव्हां त्यानें मिळविलेल्या संपत्तीकडे पाहून इंग्लंडमधील सरदार दरकदारांच्या मुलांचे डोळे दिपून गेले. क्लाइव्ह हिंदुस्थानांत जातांना प्रथम एक साधा कारकून ( writer ) म्हणून गेला होता. ही कारकुनी मिळविण्यासाठीं विलायतेंतील तरुण अतिशय धडपड करीत व कंपनीच्या डायरेक्टरांना हजारों पौंडाची लालूच दाखवीत. या गोष्टी कोणत्या थराला पोहोंचल्या हें तत्कालीन वृत्तपत्रांत आलेल्या पुढील जाहिरातीवरून कळून येईल. ]

"बंगालमध्यें कारकुनाची (writer) जागा पाहिजे बंगालमध्यें कारकुनाची जागा पाहिजे. देणारास एक हजार गिन्या रोख देण्यांत येतील. या व्यवहारामध्यें कोणीहि दलाल अगर मध्यस्थ नाहीं. कोणत्याहि लेखी कराराशिवाय पैसे ताबडतोब देण्यांत येतील."

---

## १४ : : : दुहेरी राज्यव्यवस्थेचे दुष्परिणाम

[ 'रिचर्ड बेकर याचे विचार—ता. २४ मे १७६९' —बानर्जी, पृ. ८. ].

कंपनीला दिवाणीचे अधिकार प्राप्त झाल्यापासून प्रजेची स्थिति पूर्वीपेक्षां खालावत चाललेली आहे, असें वाटण्यास सबळ पुरावे आहेत. हें पाहून इंग्रज मनुष्याचें चित्त व्यथित झालें पाहिजे. माझ्या मतें वस्तुस्थिति भयंकर आहे यांत संदेह नाहीं. अत्यंत हुकूमशाही व अनियंत्रित अंमलांतहि सुजलाम् सुफलाम् असणारी ही भूमि दिवसेंदिवस विपत्ती व विनाश पावत आहे.

अलिवर्दीखान नबाब असतांना खजिन्यांत येणारा वसूल आजच्यापेक्षां कमी असे....इंग्रजांना दिवाणीची सनद मिळतांच त्यांचे सारें लक्ष या राज्यांतून किती अधिक पैसा गोळा करता येईल याकडे लागलें कारण त्यांना घरची

मागणी पुरी करावयाची होती व येथील वाढत्या खर्चाची तोंडेंहि भागवावयाची होती. कंपनीनें मागितलेला पैसा जमिनदार वसूल करण्यास व खजिन्याकडे आदा करण्यास नाखूष आहेत असें पाहून दर जिल्ह्यांत त्या कामासाठीं अमीलाची नेमणूक करण्यांत आली. नेमणूक होतांच प्रत्येक अमीलानें आपण ठराविक रकमेची भरपाई करूं असें आश्वासन दिलें व ज्यानें जास्त रकमेचें आश्वासन दिलें त्यास अमीलांची जागा मिळाली. गरीब रयतेच्या दृष्टीनें ही पद्धत किती तरी हानिकारक आहे! ह्या अमीलांना प्रजेच्या कल्याणाची पर्वा नाहीं. त्या प्रदेशांत ते उपरी असल्यानें तेथें त्यांचें चित्तहि नाहीं. पुढल्या वर्षी याच अधिकारावर राहू अशी त्यांना शाश्वती नाहीं. आपला वसूलाचा हप्ता वक्तशीर भरावयाचा एवढ्याकडेच त्यांचे सारें लक्ष व सौम्य उपायांनीं त्यांना हप्ता वसूल करतां न आला तर ते प्रजेस पिळून काढतात व खजिन्यांत भरपाई करून स्वतःस मोठें कमिशनहि मिळवतात.

प्रत्यक्ष वसूल गोळा करण्यासाठीं अमीलच आपले हस्तक नेमतात व त्या वर्षापुरता अमीलांचा त्यांच्यावर निरंकुश अधिकार असतो.... वसूल गोळा करण्याच्या घातुक पद्धतीमुळें व पैशाच्या एक सारख्या वाढत्या मागणी मुळें कंपनीच्या दिवाणी अंमलाखालीं खजिन्यांत पैशाची भर होत आहे.

**अभ्यास** :—"दुहेरी राज्यव्यवस्थेंत कंपनीच्या अंमलाखालीं बंगाल वर पद्धतशीर जुलूम झाला." या वाक्याचें विवेचन करा.

---

# १५ न्यायनिवाड्याच्या कामांत गव्हर्नरची दाबादाबी

[ कलकत्ता येथें आल्डरमन (सिटी मॅजिस्ट्रेट) च्या अधिकारावर असणाऱ्या विल्यम् बोल्ट्स नांवाच्या व्यापाऱ्यानें इ. स. १७७२ त हिंदुस्थानचा बंगालच्या भागांतील कंपनीचा कारभार, या विषयावर एक ग्रंथ लिहिला. पृष्ठसंख्या २२८ व परिशिष्टांची पृष्ठसंख्या १८४ आकार ११"×९". हा दुर्मिळ ग्रंथ सध्यां नाशिक सार्वजनिक वाचनालयांत आहे. इ. स. १७६५ ते १७७२ या काळांतील कंपनीचा दो हातीं कारभार कुप्रसिद्धच आहे. त्याचें तपशीलवार स्वरूप या ग्रंथाइतकें इतरत्र क्वचितच सांपडेल! हा ग्रंथ लिहिल्यामुळें कंपनीनें विल्यम बोल्टस याचे ६०००० पौंडांच्या मालमत्तेचें नुकसान केलें. विलायतेहून कंपनीचा नोकर म्हणून गेलेल्या इसमास खाजगी रीतीनें हिंदुस्थानच्या कारभाराबाबत कुणास कांहीं लिहिण्याची चोरी असे म्हणून अनेक गोष्टी छपून राहिल्या! पार्लमेंटला त्या वेळीं कंपनीकडून दरसाल ४०००० पौंड देणगी मिळे तेव्हां पार्लमेंटहि या प्रकाराकडे डोळेझाक करी. विल्यम् बोल्टस् प्रस्तावनेंत इंग्रज जनतेस विनवून म्हणतो, 'निदान एवढी तरी काळजी घ्या कीं आशिया खंडांत राहाणाऱ्या राजाच्या प्रजेनें असें म्हणू नये कीं सरकारनें एका व्यापारी कंपनीकडून ४०००० पौंड घेऊन आम्हास तिला विकून टाकले!' या पुस्तकांतील पृ. ९१–९२ वरील पुढील उतारा आहे.]

"देशाच्या अन्तर्गत भागांत कंपनीच्या अधिकाऱ्याकडून मनस्वी जुलूम चालू होता. त्याचें वर्णन आम्हीं या ग्रंथाच्या १३ व्या भागांत केलेंच आहे. या जुलुमाविरुद्ध वैतागून दाद मागण्यासाठीं एका पारसीक आरतून या आर्मिनियन व्यापाऱ्यानें १५ सप्टेंबर १७६७ रोजीं मेयरच्या कोर्टांत गुमास्त्याविरुद्ध म्हणजेच गव्हर्नर मि. हॅरि व्हेल्स्ट व मि. फरॅन्सिस साइक्स या दोघांच्या एजंटा विरुद्ध–गुमास्ते गव्हर्नरचे एजंटच होते—६०४३२ रुपयांची म्हणजे सुमारे ७५०० पौंडाची फिर्याद लावली. कारण वादीच्या गुदामांतून तेवढ्या किंमतीचें मीठ सदर गुमास्त्यांनीं पळवून नेलें होतें. अखेर फिर्याद १७६८ च्या ऑगस्ट मध्यें सुनावणीस निघाली व सर्व साक्षी पुरावे व जबाब झाले. कोर्टापुढें आलेल्या पुराव्यावरून प्रतिवादी विरुद्ध दावा शाबीत होण्याची सर्व सिद्धता होती. कोर्टाचे मेयर आपलें निकालपत्र लिहिण्यास

[ २३

बसले असतां त्यांना गव्हर्नरकडून एक खाजगी पत्र[1] आलें. या पत्रांत गव्हर्नरनें मेयरला कळविलें म्हणतात कीं, त्याचा स्वतःचा या प्रकरणीं हात असून एकंदर सर्वच प्रकरण खाजगी मध्यस्थीनें मिटविण्याचा तो प्रयत्न करीत आहे त्या अर्थी या फिर्यादीचा निकाल तूर्त देऊं नये. हें पत्र आल्याबरोबर मेयरनें खटल्याचें काम एकदम तहकूब केलें. वादीच्या सॉलिसिटरनें भर कोर्टांत तक्रार केली कीं, 'अशा प्रकारें समेटाची भांषा निघाल्याची त्याला कांहींच माहिती नाहीं व त्याच्या अशिलानेंही त्यास तसें कांहीं सांगितलें नाहीं. अर्थात खटला तहकूब केल्याचें पाहून मला व माझ्या अशिलाला फार आश्चर्य वाटत आहे' पण आश्चर्य वाटून उपयोग काय? खटला तहकूब झाला तो झालाच!

**अभ्यास** :—अशा प्रकारच्या कारभाराचा अंतर्गत व्यापारावर, उद्योगधंद्यावर व शेतीवर काय परिणाम झाला असेल याचें विवेचन करा.

---

१. ह्या पुस्तकाचा प्रस्तुत लेखक कोर्टाचा आल्डरमन असल्यामुळें त्यास या प्रकरणाची जातीनें माहिती आहे. तो म्हणतो, कोर्टांत खटला तहकूब झाला तेव्हां मी रजेवर होतों परंतु ही वार्ता कानीं येतांच मीं मेयरला चिठी लिहिली कीं 'गव्हर्नर मि. व्हर्ल्स्ट यांच्या ज्या पत्रावरून तुम्ही खटला तहकूब केलात तें पत्र मला पाहाण्यास पाठवून द्या.' त्यानें या पत्रास थोडें दिवस दिरंगाई केल्यानंतर खालील सबब सांगणारें उत्तर पाठविलें. या पत्राचें मूळ मजजवळ आहे. 'मि. विल्यम बोल्ट्स यांस, तुम्हांस अभिवचन दिल्याप्रमाणें मि. व्हर्ल्स्ट याचें पत्र पाठवावयास हवें होतें. पण माझे एकंदर कागदपत्र पहातां मला आतां खात्रीलायक असें वाटतें कीं, मला त्याचा आतां उपयोग लागणार नाहीं असें समजून दुसऱ्या इतर पत्रांबरोबर ते फाडून टाकलें असलें पाहिजे.' कलकत्ता ता. ११ आगस्ट, १७६८.

आपला आज्ञाधारक
कार्नेलियस गुडवुईल

## १६ : : : रेग्युलेटिंग अॅक्ट १७७३

[ या कायद्यास रेग्युलेटिंग अॅक्ट हें परिचित नांव असलें तरी त्यास 'ईस्ट इंडिया कंपनीचा १७७३ चा कायदा' असें सरकारी कागदपत्रांत नांव आहे. या कायद्याचीं महत्त्वाचीं कलमें शक्य तों मुळास धरून पुढें दिलीं आहेत. कलमांचे क्रमांक कंसांत दिले आहेत. —बानर्जी पृ. १६]

(७) संयुक्त कंपनीचा हिंदुस्थानांतील कारभार अधिक व्यवस्थित चालण्यासाठीं बंगालमधील फोर्ट विल्यमच्या इलाख्यासाठीं एका गव्हर्नर जनरलची व चार सल्लागारांची नेमणूक करावी व त्यास बंगाल, बिहार व ओरिसा प्रांतांतील कंपनीच्या प्रदेशावर व वसूलावर पूर्वीच्या अध्यक्षांच्या (प्रेसिडेन्ट) एवढा अधिकार असावा.

(८) गव्हर्नर जनरल व त्याचें कौन्सिल यांनीं सर्व प्रश्नांचा निकाल हजर असलेल्यांच्या बहुमतानें करावा व तें सर्वांवर बंधनकारक आहे. क्वचित कोणी गैरहजर असल्यामुळें किंवा मृत्यु पावल्यामुळें मतभेदाच्या प्रसंगीं सारखीं मतें पडलीं, तर गव्हर्नर जनरलला जादा मत देण्याचा अधिकार असावा.

(९) गव्हर्नर जनरल व त्याचें कौन्सिल यांना मुंबई, मद्रास व बेंकूलेन (बंगाल) या इलाख्यांच्या अध्यक्षांवर आणि त्यांच्या कारभारावर देखरेख ठेवण्याचा व हुकमत चालवण्याचा अधिकार असावा. गव्हर्नर जनरल व त्याचें कौन्सिल यांच्या अनुमतीखेरीज कुणाहि हिंदी राजसत्तेशीं युद्ध किंवा तह करणें हें बेकायदेशीर आहे. फक्त आणीबाणीच्या प्रसंगीं गव्हर्नर जनरलची संमती येईपर्यंत वाट पहाणें धोक्याचें असल्यास मात्र हा नियम बंधनकारक असूं नये किंवा कंपनीच्या लंडनमधील अधिकाऱ्यांचे खास हुकूम असतील तर मात्र गव्हर्नर जनरलचा विशेष अधिकार बंधनकारक असणार नाहीं. मुंबई, मद्रास व बेंकूलेन येथील अध्यक्ष या नियमाविरुद्ध वागल्यास ते अधिकारावरून दूर होण्यास पात्र ठरतील. म्हणून त्यांनीं वरीलसारखे हुकूम वेळोवेळीं पाळावे असें आम्ही बजावतों.

(१३) फोर्ट विल्यम येथें एक चीफ जस्टिस व दुसरे तीन न्यायाधीश यांचें एक वरिष्ठ कोर्ट बादशाहाच्या सनदेनें सुरू करणें हें कायदेशीर आहे. या कोर्टाचे न्यायाधीश इंग्लंड किंवा आयर्लंड येथील पांच वर्षांचा अनुभव

असलेले बॅरिस्टर असावेत. या कोर्टास दिवाणी, फौजदारी, आरमार व धर्मविषयक दाव्यांची चौकशी करण्याचा पूर्ण अधिकार असावा.

(१४) वरील कलमान्वयें निर्माण झालेल्या कोर्टाची बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतांत कंपनीच्या संरक्षणाखालीं राहणाऱ्या सर्व ब्रिटिश प्रजाजनांवर हुकूमत असावी. तसेंच बादशाहाच्या प्रजाजनांविरुद्ध कसलाहि गुन्हा, गैरवर्तणूक किंवा जुलूम याबद्दल कोणी तक्रार व फिर्याद केल्यास ती ऐकून घेण्यांत यावी असा अधिकार असावा. तसेंच कंपनीच्या नोकरींत असलेला किंवा बादशाहाचा प्रजाजन याच्या विरुद्ध कर्ज वगैरेबाबत तक्रार ऐकण्याचा या कोर्टास अधिकार असावा.

(१५) मात्र गव्हर्नर जनरल किंवा त्याच्या कौन्सिलपैकीं कोणी यांच्याविरुद्ध गुन्ह्याबाबत कुठलीहि तक्रार आली तरी ती ऐकून घेण्याचा या कोर्टास अधिकार नाहीं.

(१७) तसेंच गव्हर्नर जनरल व त्याच्या कौन्सिलचे सभासद यांना कुठल्याहि कारणानें अटक करण्याचा किंवा तुरुंगांत घालण्याचा या कोर्टास अधिकार नाहीं.

(३६) कंपनीचा कारभार व्यवस्थित चालावा म्हणून गव्हर्नर जनरल व त्याचें कौन्सिल यांना जरूर ते नियम व निर्बंध करण्याचा अधिकार आहे. मात्र ते नियम व निर्बंध इंग्रजी राज्याच्या कायद्याशीं विसंगत असतां कामा नयेत. हे नियम-निर्बंध तयार करून ते वर सांगितलेल्या वरिष्ठ कोर्टाकडे पाठवावेत. त्यांनीं ते लोकांच्या माहितीसाठीं वीस दिवसपर्यंत तसेच राहूं द्यावेत व त्यानंतर वरिष्ठ कोर्टानें वाटल्यास मान्यता द्यावी. वरिष्ठ कोर्टाच्या मान्यतेखेरीज कुठलाहि नियम कायदेशीर ठरणार नाहीं.

(३७) या नियम-निर्बंधाच्या प्रती इंग्लंडच्या प्रधानमंडळाकडे पाठवाव्यात. हे नियम प्रसंगीं नापसंत ठरविण्याचा ब्रिटिश प्रधान मंडळास अधिकार आहे.

(३९) जर गव्हर्नर जनरल, प्रेसिडेंट, गव्हर्नर किंवा त्यांचे सभासद तसेंच वरिष्ठ कोर्टातील न्यायाधीश यांपैकीं कोणीहि या कायद्याविरुद्ध वर्तन केलें तसेंच त्यांच्याविरुद्ध राजाच्या प्रजेपैकीं कोणीहि हिंदुस्थानांतील रहि-

वाश्यांवर अन्याय केला म्हणून तक्रार आणिली किंवा दुसऱ्या कांहीं गुन्ह्यांबद्दल फिर्याद केली तर त्या गुन्ह्यांची चौकशी करण्यांचा इंग्लंडमधील किंग्जबेंच या कोर्टास अधिकार आहे.

**अभ्यास** :—सर्वसामान्य क्रमिक पुस्तकांत आढळून येणारी रेग्युलेटिंग ॲक्टची माहिती कायद्याच्या भाषेंत कशा रीतीनें सांगितली आहे हें मुळांतूनच वाचलें पाहिजे, म्हणजे कायदा व सामान्य नियम यांतील फरक वाचकांचें ध्यानांत येईल. सनदशीर हक्काचें ज्ञान होण्यास ही कायदेशीर कांटेकोरीची सूक्ष्म दृष्टि उपत्न होणें आवश्यक आहे.

---

## १७ : : पहिल्या इंग्रज-मराठे युद्धांत हेस्टिंग्जचें अंग

[ वॉरन हेस्टिंग्जचें ता. २१ मार्च १७७६ चें डायरेक्टर लॉरेन्स सुलिव्हन यास पत्र. मराठ्यांशीं झालेलें पहिलें युद्ध मुंबईकर इंग्रजांनीं आपल्यावर ओढवून घेतलें, पण वॉरन हेस्टिंग्जची त्यास संमती नव्हती हा समज सामान्यतः बरोबर असला तरी पुढील उताऱ्यावरून हेस्टिंग्जच्या आल्या प्रसंगास तोंड देण्याच्या निश्चयाची साक्ष पटते. —कीथ, ७२–७४ ]

मि. टेलर (मुंबईच्या गव्हर्नराचा विलायतेस जाऊन आलेला प्रतिनिधि) यानें मला सांगितलें कीं, त्यानें मराठ्यांशीं उद्भवलेल्या युद्धांत मुंबई व बंगाल सरकार यांनीं केलेल्या व्यवहाराची खडान् खडा माहिती लिहून पाठविली आहे म्हणून त्यावर विस्तार न करतां मीं या प्रकरणांतील माझें मत काय आहे तें तेवढें पुढें मांडतों.

साष्टी काबीज करावी ही गोष्ट आपल्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक व हितकारक आहे. तसेंच केवळ राजकीय दृष्ट्याहि त्यांत अन्याय्य असें कांहीं नाहीं असें माझें मत आहे.

राघोबाशीं झालेला तह मला कधींच पसंत नव्हता. तसेंच त्या तहापाठोपाठ ज्या घिसाडघाईनें युद्ध सुरू केलें व पुरेसें सैन्य व खजिन्याचें बळ पाठीशीं नसतांहि व पुढील धोरणाचा विचार न करतां चालू ठेवलें, तेंहि

मला पसंत नव्हतें. त्याची आवश्यकता नव्हती व त्यांतून कांहीं लभ्यांशहि नव्हता. परंतु युद्ध म्हटलें, कीं तें एकदां सुरू झाल्यावर त्यांतून आब राखून व सुरक्षितपणें पार पडल्याखेरीज दुसरें कांहीं करणें शक्य व इष्ट नाहीं हें लक्षांत घेऊन, मीं मुंबई सरकारास त्यांच्या योजनेप्रमाणें त्यांना राघोबास पुण्यास नेऊन पोहोंचवावें व नंतर आपली इभ्रत व आब राखून या युद्धांतून काढता पाय घ्यावा अशी सूचना दिली असती. परंतु हा निर्णय घेणें माझ्या हातीं राहिलें नाहीं. येथील कौन्सिलचें बहुमत असें ठरलें कीं मुंबई सरकारला आपलें सैन्य बिनशर्त परत घेण्याचा हुकूम करावा. अशा स्थितींत मी त्यांतले त्यांत जें काय साधेल तें करूं लागलों व मुंबई सरकारास सैन्य परत घेण्याचा हुकूम देत असतां त्यास तीन अपवाद सुचविले.

(१) परतीमुळें लष्करच्या सुरक्षिततेस धोका येऊं नये.

(२) हुकूम पोहोंचण्याअगोदरच लष्करनें शत्रूवर विजय मिळविला असेल तर बिनशर्त परतीचें कारणच नाहीं.

(३) उभय पक्षांत (मराठे व मुंबई सरकार) वाटाघाटी चालू असतील तर परतीचा हुकूम अमलांत आणूं नये. कौन्सिलांतील बहुमतास पहिला अपवाद तेवढा मान्य झाला परंतु दुसऱ्या दोन अपवादांस त्यांनीं साफ नकार दिला. अगदीं प्रथमपासून माझें असें मत होतें कीं, मुंबई सरकारला ही मोहीम चालविण्यासाठीं लागेल तो पैसा व माणूसबळ अवश्य पुरवावें. या योगानेंच युद्धाचा इष्ट शेवट होऊं शकेल. मि. बार्वेल यांचेंहि असेंच मत होतें (पण तें कौन्सिलांत मान्य झालें नाहीं). आतां तर पुन्हां लढाई सुरू झाली. तीहि अशा दिवसांत कीं, जेव्हां मुंबई सरकारला पैशानें व सैन्यानें मदत करणें आम्हांस अशक्य व्हावें. आम्हीं त्यांचेकडे ८० शिपाई व पांच लाख रुपये धाडण्याचें ठरविलें आहे. परंतु ही तुटपुंजी मदतहि घेऊन जाणारीं जहाजें अजून बंदरांतून बाहेर निघालेलीं नाहींत. योग्य वेळ येतांच त्यांनीं आम्हांपासून आणखीहि पांच लक्ष रुपये मागून घ्यावेत असें त्यांस कळविलें आहे.

हिंदुस्थानांतील सर्व ठिकाणचे इंग्रज एक होऊन त्यांनीं राघोबास पाठिंबा दिला तर राघोबाचें वजन वाढून त्याच्या पक्षास बरेच लोक येऊन मिळतील हें संभवनीय आहे. सुदैवानें तसें झालेंच तर तुम्हांस माझें पत्र

येऊन पोहोंचण्यापूर्वी युद्ध संपल्याची बातमी मिळेल. पण ती न मिळाली तर तुम्हीं असें समजावें कीं, युद्ध पुढील सालपर्यंत लांबलें व बंगाल सरकारनें मुंबईकडे सर्व प्रकारें मदत पाठविण्याची आवश्यकता आहे.

कंपनीच्या कारभाराची एकंदर स्थिति याहून वेगळी वर्णन करून सांगण्याची आवश्यकता नाहीं. कंपनीच्या या कारभारावर अखेरची हुकमत कोणाची हें एकदां ठरवून दिलें पाहिजे. म्हणजे त्या अधिकाऱ्यास प्रस्तुतच्या बिकट अवस्थेंतून मार्ग काढतां येईल व योग्य ते उपाय योजतां येतील. जनरल क्लॅव्हरिंग, कर्नल मॉन्सन व मि. फ्रॅन्सिस यांच्या आतांपर्यंतच्या वागणुकीवरून ते असा अधिकार हातीं घेण्यास पात्र आहेत असें दिसत नाहीं. तथापि आज चालू आहे या परिस्थितीपेक्षां सर्व कारभार त्यांच्या हातीं सोंपविला तरी अधिक बरें होईल. जोंपर्यंत राज्यकारभारांतील प्रत्येक प्रश्नावर पक्षापक्षांचीं वादांचीं रणें माजणार तोंपर्यंत कुणाला कसलाहि अधिकर दिला तरी त्यास आपल्या उपाययोजना तडीस नेण्यास कठिणच जाईल.

[ येथून पुढें हेस्टिंग्जनें कलकत्त्याचें सुप्रीम कोर्ट व त्याचा न्यायाधीश सर एलिजा इंपे याचेविषयीं मजकूर लिहिला आहे. ]

**अभ्यास** :—१. कलकत्त्याहून लंडनला पत्र पोहोंचण्यास व उत्तर येण्यास तेव्हां किती दिवस लागत ? २. इंग्रजांच्या एकजुटीच्या पाठिंब्यानें राघोबास अधिक साथीदार मिळाले असते असें तुम्हांस वाटतें का ? ३. साष्टी काबीज करणें इंग्रजांस आवश्यक कां व न्याय्य कसें ?

---

## १८ : : : वॉरन हेस्टिंग्जची चौकशी

[ हेस्टिंग्ज हिंदुस्थानांतून परत गेल्यावर त्याच्या कारभाराची पार्लमेंटपुढें चौकशी झाली हें प्रसिद्ध आहे. या प्रसंगीं एडमंड बर्कनें केलेलें भाषण अठराव्या शतकांतील वक्तृत्वाचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून समजलें जातें. ता. १५ ते १९ फेब्रुवारी १७८८ असें पांच दिवस हें भाषण चालू होतें. भाषणांत ब्रिटिश घटनेचा अभिमान, हक्क संरक्षणाचा आग्रह, न्यायाची तरफदारी, मूलभूत मानवधर्मास आवाहन व हिंदुस्थानच्या गांजलेल्या जनतेबद्दलचा कळवळा हीं सर्व ओतप्रोत भरलेलीं आहेत. निवडक ठसकेदार शब्द व भावनांचे आरोह अवरोह यांची खरी प्रचिती तें भाषण मूळांतून स्वतःशींच मोठ्यानें वाचल्यानें येऊं शकेल. त्यांतील मुद्याचा निवडक भाग पुढें दिला आहे. —कीथ, १५०–५१]

म्हणून मी हेस्टिंग्जवर असा आरोप करतों कीं, त्यानें खाजगी हितासाठीं सहा प्रान्तिक मंडळांच्या साहृयानें चाललेली राज्यरचना साफ मोडून टाकली. असें करण्याचा त्याला अधिकार नव्हता.

एकंदर राज्याचा योग्य कारभार करण्यास पार्लमेंटनें त्याच्या हातीं जे अधिकार दिलेले होते त्या अधिकारांचा वापर त्यानें दुसऱ्यास बेकायदेशीर रीत्या करूं दिला.

राज्यांतील दिवाणाच्या जागीं त्यानें असा मनुष्य नेमला कीं, जो कंपनीच्या मतानें तसेंच उपलब्ध सरकारी कागदपत्रांवरून व इतर अनेक बाजूंनीं सर्वांच्या तिरस्कारास पात्र झालेला व नांव बद्दू झालेला असा होता. त्याच्या हातीं कारभार देऊन हेस्टिंग्जनें इंग्रज लोकांस त्याच्या हातचीं बाहुलीं बनविलीं. अशा रीतीनें मध्यवर्ती व प्रांतिक कौन्सिलांनीं करावयाचा कारभार त्यानें त्यांच्या हातून गैरकायदा काढून घेतला.

गंगा गोविंदसिंगापासून त्यानें लांच स्वीकारली असा माझा आरोप आहे. ज्या इतर लोकांपासून त्यानें लांच घेतली, त्यांना नागविलें असा माझा आरोप आहे.

विधवांची संपत्ति त्यांच्यापासून कपटानें हिरावून घेतली असा माझा आरोप आहे.

गरीब अनाथांच्या जमिनी कांहीं एक हक्क किंवा अधिकार नसतां

त्यांच्यापासून हिरावून घेऊन त्या दुष्ट माणसांस देऊन टाकल्या असा माझा आरोप आहे.

एका अल्पवयी राजाला त्याच्या पालकापासून तोडून त्याला देवीसिंग नांवाच्या दुष्ट जमीनदाराच्या ताब्यांत दिलें असा माझा आरोप आहे.

याच देवीसिंगाचा दुष्टपणा सर्वत्र जगजाहीर असतांना तीन मोठ्या प्रांतांची व्यवस्था हेस्टिंग्जनें त्याच्याकडे दिली यामुळें देश उध्वस्त झाला जमीनदार नष्ट झाले, शेतकरी संत्रस्त झाले, त्यांच्या घराची जाळपोळ झाली, पिकें कापून नेलीं व अनेकांस क्रूर शिक्षा दिल्या, व त्या देशांतील स्त्री जातीचीं इज्जत घेतली असा माझा त्याच्यावर आरोप आहे.

सद्‌गृहस्थ हो! इंग्लंडच्या कॉमन्सतर्फे मीं आपणांस असें विनवून विचारतों कीं, हिंदुस्थानांतील नागावलेल्या राजांचे, नष्टचर्यं ओढवलेल्या स्त्रियांचे व बेचिराख झालेल्या प्रदेशांचे वाली म्हणून उभे राहून तुम्ही त्यांचा कैपक्ष घेणार कीं नाहीं?

पुन्हां एकवार वॉरन हेस्टिंग्जवरील माझे आरोप मी समजावून सांगतोंः—

"त्यानें भयंकर गुन्हे व दुर्वर्तणूक केलेली आहे.

पार्लमेंटनें त्याच्यावर ठेवलेल्या विश्वासाचा घात केलेला आहे.

इंग्रज राष्ट्राचें नांव व त्याचें शील यास काळिमा आणलेला आहे.

हिंदुस्थानांतील लोकांचे कायदे, हक्क व स्वातंत्र्य यास त्यानें तिलांजलि दिली, मालमत्ता नष्ट केली व देश उध्वस्त केला.

या जगांतील शाश्वत न्यायाचीं तत्त्वें त्यानें झुगारून दिलीं.

सात्त्विक मानवी प्रवृत्तीवर त्यानें आघात केला.

स्त्री व पुरुष यांच्या अब्रूची चाड ठेविली नाहीं व असें करतांना कुणाचेंहि वय, दर्जा, अधिकार व परिस्थिति हीं लक्षांत घेतलीं नाहींत."

**अभ्यास**:—वरील भाषण वक्तृत्वाच्या दृष्टीनें परिणामकारक असलें तरी कायद्याच्या दृष्टीनें त्यांतील आरोप कसे अतिव्याप्त आहेत तें लक्षांत घ्या.

---

## १९ : : : 'पिटस् इंडिया अॅक्टा'चा उद्देश

[ पिटचें हाऊस ऑफ कॉमन्समधील भाषण. ६ जुलै १७८४ निवडक उतारे. —बानर्जी पृ. ७८ ]

हिंदुस्थानांतील आपला कारभार पाहाण्यास तेथें जाग्यावरच एक सत्ताधारी सरकाराची आवश्यकता आहे, मात्र तें सरकार आपल्या देशाच्या सरकारापासून स्वतंत्र असें असतां कामा नये. आपण येथून जे हुकूम पाठवूं ते हुकूम त्यांनी पाळलेच पाहिजेत. परंतु त्याबरोबरच हिंदुस्थानांत कसलाहि जुलूम होणार नाहीं व महत्त्वाकांक्षी लोकांची अरेरावी चालणार नाहीं याबद्दलहि त्या सरकारनें काळजी घेतली पाहिजे. आपला मुख्य उद्देश तेथें व्यापार सुरळीत चालावा हा आहे व लोकांत शांतता व सौख्य नांदल्याखेरीज हें साध्य होणें शक्य नाहीं. व्यापाराचा सर्व व्यवहार मात्र आज चालू आहे त्याप्रमाणें कंपनीच्या हातांत राहूं देणें इष्ट आहे.

व्यापारी कंपनीला साम्राज्यावर राज्य करतां येईल का असा प्रश्न कधीं कधीं विचारला जातो. या प्रश्नाचें तात्त्विक उत्तर कसेंहि असो. प्रत्यक्ष व्यवहारांत मात्र या प्रश्नास निराळेंच उत्तर देणारा पुरावा उपलब्ध आहे. ईस्ट इंडिया कंपनीनें कित्येक वर्षेपर्यंत व्यापारहि चालवला व साम्राज्यावर अंमलहि केला. ही ई. इं. कंपनी म्हणजे कांहीं नवेंच मंडळ नव्हे. पार्लमेंटच्या कायद्यानें व सनदांनीं त्या कंपनीला कांहीं हक्क प्राप्त झाले. या हक्कांची अंमलबजावणी करीत करीतच कंपनी लहानाची मोठी झाली. कंपनीचे हे हक्क पवित्र असून त्यावर अतिक्रमण होतां कामा नये हें जितकें खरें, तितकेंच कालाच्या ओघांत किंवा एखादा नवा बनाव घडल्यानें जर त्या हक्कोपभोगामुळें जनतेचें सार्वजनिक नुकसान होत असेल तर त्या हक्कांचें अतःपर समर्थन करतां येणार नाहीं ही गोष्ट तितकीच खरी आहे. .....

वर सांगितल्याप्रमाणें राज्याच्या कारभाराची देखरेख व ताबा बोर्डाकडे सोंपवावा व व्यापाराचा व्यवहार कंपनीनें पहावा. आतां हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत जे कित्येक अधिकारी लागतील त्यांची नेमणूक कोणी करावयाची हा प्रश्न आहे. माझ्या मतें हा अधिकार बोर्डाच्या कक्षेबाहेर ठेवावा व कोणाच्याहि हातांत तो असो त्यासंबंधीं यापुढें आपण इतके नियम

करूं व बंधनें घालूं कीं त्यामुळें या अधिकाराचा अंमल भानगडीचा व दुष्परिणामीं ठरणार नाहीं.

या बोर्ड ऑफ कंट्रोलच्या कचेरीकडे सर्व पत्रव्यवहार जाईल. त्यांच्या सर्व कृत्यांबद्दल ते जबाबदार रहातील व त्यांच्या हातून कांहीं करावयाचें राहून गेलें तर तीहि जबाबादारी त्यांचीच. प्रत्येक प्रश्नावर त्यांनीं आपला निर्णय दिला पाहिजे. कां कूं करतां कामा नये. विलंब लावतां कामा नये. दुसरी कांहीं कामें होतीं म्हणून सवड सांपडली नाहीं, अशी लंगडी सबब पुढें आणतां कामा नये. मी सुचवीत असलेलें हें बोर्ड नवीन असलें तरी त्यांचीं कामें व अधिकार नवीन नाहींत. पूर्वीं प्रधानमंडळांत एखाददुसऱ्या प्रधानाच्या हातीं हे अधिकार होतेच, पण त्यांची अंमलबजावणी करण्यांत त्याच्या हातून ढिलाई व दिरंगाई झाली म्हणून आतां हें बोर्ड निर्माण करण्यांत येत आहे. या बोर्डाची मुदत किती दिवस असावी हा एक प्रश्न आहे. बोर्ड कायमचें नेमल्यास त्याच्यांत व सरकारांत प्रसंगीं विरोध निर्माण होईल. म्हणून मी असें सुचवितों कीं या बोर्डास नेमण्या–काढण्याबाबतचे अधिकार आपल्या सरकारचे हातीं असावेत. जनतेस पसंत पडेल तोंपर्यंत सरकार अधिकारावर राहील व जोंपर्यंत सार्वजनिक हितबुद्धि ठेवून सारा कारभार चालेल तोंपर्यंत सरकारांत बदल होण्याचें कारण नाहीं.

या बोर्डाच्या हातीं कंपनीच्या नोकरांनीं कोणतें राजकीय धोरण ठेवावें हें सांगण्याचा अधिकार राहील व कंपनीच्या नोकरांनीं हे हुकूम पाळले नाहीं तर त्यांना परत बोलावण्याचा अधिकार राहील. हें बोर्ड मुख्यतः कारभारावर देखरेख व ताबा ठेवील, परंतु अधिकारी नेमण्याची सत्ता या बोर्डास नाहीं.

बंगालमध्यें स्थापन झालेल्या वरिष्ठ सरकारास इतर इलाख्यावर परिणामकारक देखरेख ठेवण्याचा अधिकार असावा व तेथील अधिकाऱ्यांची इकडून तिकडे बदली त्यांना करतां आली पाहिजे. बंगाल सरकारचे अधिकारी कोर्ट ऑफ डायरेक्टर्स नेमतील, परंतु प्रसंगीं राजाला एखाद्या नेमणुकीबाबत मनाई हुकूम करतां येईल.

ही सर्व व्यवस्था करण्याचा मुख्य उद्देश तेथील सरकारला महत्त्वाकांक्षी मुलुखगिरीचें धोरण चालवितां येऊं नये, त्यापासून परावृत्त करावें हा आहे.

या प्रवृत्तीनें आपल्याला हिंदुस्थानांत केवढा तरी खर्चाचा बोजा सोसावा लागला व रक्तपात करावा लागला म्हणून यापुढें तेथील सरकारनें होतां होईतों युद्धाचा प्रसंग आणूं नये. अर्थात् आत्मसंरक्षणासाठीं शस्त्र उपसावें लागल्यास नाइलाज आहे. देशी संस्थानिकांमधील देण्याघेण्याचे व्यवहार—विशेषत: आपल्या छायेखालीं असलेल्या देशी संस्थानिकांचे कर्ज व्यवहार—निश्चित व कायम करण्यासाठीं एक स्वतंत्र लवाद मंडळ नेमण्यांत यावें.

कंपनी सरकारनें यापुढें आपला राज्यकारभाराचा खर्च वाढूं देऊं नये, यावर सक्त नजर ठेवावी. कोणत्याहि कारणानें खर्चांत वाढ करावयाची झाल्यास पार्लमेंटची अगोदर संमती घ्यावयास पाहिजे.

कंपनीचे जे नोकर कंपनीचा अधिकार किंवा तावा मानणार नाहींत किंवा येथून गेलेले हुकूम पाळणार नाहींत त्यांना कोणती शिक्षा द्यावी हें विलांतच सांगितलेलें आहे. आतांपर्यंत पार्लमेंटच्या पद्धतीनें त्या प्रत्येकाची चौकशी करणें हें मोठें दिरंगाईचें ठरलें आहे. यापेक्षां अधिक झटपट चौकशी-मार्गाचा अवलंब केला पाहिजे. यासाठीं एक स्पेशल कमिशन नेमावें त्याच्यावर पुरावा कायद्याचीं कांटेकोर बंधनें असूं नयेत. मात्र शपथपूर्वक सदसद्विवेक बुद्धीला धरून आपलें काम करावें. या स्पेशल कमिशनला हिंदुस्थानांतून पुरावा गोळा करण्याचा अधिकार असावा. हिंदुस्थानांत गुन्हा घडत असतां तेथें हजर असणाऱ्यापैकीं कोणी साक्ष देऊं केली तर ती साक्ष या कमिशनला घेतां यावी. तसेंच या कमिशनला न्यायदानाबरोबरच पुराव्याची छाननी करण्याचाहि अधिकार असावा.

**अभ्यास** :—राज्यकारभाराची देखरेख बोर्डाकडे व व्यापाराचे व्यवहार तेवढे कंपनीकडे या व्यवस्थेंतील दोष सांगा. व्यापार व्यवहाराच्या नांवाखालीं कंपनीच्या नोकरांनीं अरेरावी केल्यास बोर्ड काय करूं शकेल ? या भाषणांत प्रतिपादिलेलें शांततेचें धोरण कंपनीनें पुढें कितपत पाळलें ?

---

## २० : : : टिपूवर विजय

महादजी शिंदे यांचीं कागद पत्रें नं. ६०५ } { ३ एप्रिल १७९२

### महादजीकडून अभिनंदन

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी :—

छ विनन्ती सेवक महादजी शिंदे कृतानेक विज्ञापना स्वामींनीं कृपा करून पत्र छ २७ रजबचे पाठविलें तें पावोन संतोष जाहला. राजश्री हरि बल्लाळ व निजामअल्लीखान बहाद्दर याचे पुत्र पोलादजंग व इंग्रज मिळोन फौज सुद्धां पट्टणा* नजीक तीन कोसांवर गेले. तेथून छ. १३ जमादिलाखरी रात्रीस इंग्रजांनीं सडीं पंधरा पलटणें तोफा खेरीज घेऊन पुढें चालोन गेले. टिपूस खबर कळली. तोही तयार होता. इंग्रजांची व टिपूची लढाई होतच आहे, तों सरकारची व नवाबाकडीलहि फौज जाऊन पोंहचली. टिपू माघारा हटून गेला. नंतर टिपूनें सलूखाचा पैगाम[1] लाविला. वकील पाठविले. त्यांसी सरकार व नबाब व इंग्रज मिळोन बोलणें होऊन तहाचा जाबसाल[2] ठरला.‡ टिपूकडील मुलकापैकीं निमे मुलूक व तीन क्रोड रुपये तिन्ही सरकारांस द्यावे या प्रमाणें ठरोन, सदरहू जाबसालाचा फडशा होय तोंपावेतों टिपूचे दोघे पुत्र ओलीस ठेवावे असें ठरलें. त्याप्रमाणें दोघे पुत्र ओलीस आले, येऊन भेटले. याप्रमाणें हरि बल्लाळ याजकडून पत्रें आलीं. तुम्हांस कळावें याकरितां लिहिले आहे म्हणोन पत्रीं आज्ञापिलें. ऐसियास[3], टिपू पैकेपूर[4], यामुळें उन्माद होऊन अलीकडे अमर्याद वर्तणूक करूं लागला. त्यावरून त्याचे पारपत्याचा विचार सरकारांतून नवाब, इंग्रज यांच्या फौजा सरकार फौजेस सामील करून ठरला....टिपूचा सरंजाम जंगी मातबर असतां व पट्टण त्याची रहावयाची जागा, कलब[5] तेथवर फौजा जाऊन लढाई केली पट्टणानजीकच्या बातेऱ्या[6] घेतल्या, आणि शत्रूस जेर केला. हा प्रताप एक स्वामींचाच..... लिहून कळविणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

* श्रीरंगपटण. १ बोलणें. २ मसुदा. ‡ ७ फेब्रुवारी १७९२. ३ येथपर्यंत मूळ पत्र, ज्यास हें पत्र उत्तर आहे तें. ४ भरपूर पैसेवाला. ५ काळीज. ६ बॅटरी, मोर्चे बांधलेल्या तोफा.

## २१ : : कायमधाऱ्याच्या पद्धतीवर सर चार्ल्स मेटकाफ् याची टीका

[पुढील उतारा, 'मेटकाफच्या कागदपत्रांतील निवडक उतारे' या ग्रंथातून पृ. २५३ वरून घेतला आहे. सर चार्लस् मेटकाफ हा मार्क्विस ऑफ हेस्टिंग्ज्चे वेळीं कर्तबगार अधिकारी म्हणून प्रसिद्धीस आला व इ.स. १८३५ सालीं बेंटिकनंतर कांहीं काळ गव्हर्नर जनरलहि झाला. इ.स. १८१८त मराठ्यांचा संपूर्ण पाडाव झाल्यावर उत्तर हिंदुस्थानांत स्थिरस्थावर करण्यांत याचा मोठा भाग होता. कायमच्या जमीनदारी पद्धतीवर त्यानें त्याच वेळीं घेतलेले आक्षेप आजहि वाचण्यालायक आहेत. —मूर १११.]

बंगाल्यांत कायमधाऱ्याची पद्धत अंमलांत आल्यापासून त्या प्रान्तांतील जमिनीची लागवड वाढलेली आहे यांत शंका नाहीं, परंतु तेवढ्यावरून दुसरी एखादी पद्धत अंमलांत असती तर अशीच लागवड वाढली नसती असें कांहीं म्हणतां येत नाहीं. पश्चिमेकडेहि आपण जिंकलेल्या प्रदेशांतहि जमिनीची लागवड वाढलेली आहे. ती किती प्रमाणांत वाढली, त्यांत बंगालइतकीच वाढ झाली कीं नाहीं हें सांगण्यास मजजवळ पुरावा नाहीं. परंतु पुष्कळच वाढ झालेली आहे. या प्रांतांत बंगालपेक्षांहि लागवडीस अडचणी अधिक, हें लक्षांत घेतां झालेली वाढ आश्चर्यकारक आहे. मी असेंहि घटकाभर धरून चालतों कीं कायमधाऱ्याच्या पद्धतीमुळें अधिक लागवड झाली असेल.

परंतु या कायमधाऱ्याच्या पद्धतीसाठीं आपण केवढी किंमत दिली याचा कांहीं विचार केला आहे काय ? या पद्धतीमुळें व लागवडींत कितीहि वाढ झाली तरी त्यामुळें होणाऱ्या वसुलाच्या सर्व वाढीवर सरकारनें कायमचें पाणी सोडलें. हें केवढें तरी नुकसान ! पण त्याहून महत्त्वाची गोष्ट म्हणजे आम्हीं रयतेचा जमिनीवरील मालकी हक्क सर्वस्वी नष्ट केला व तो कांहीं थोड्या उपरी जमीनदारांस देऊन टाकला. आतां सरकारी कायदा कांहीं करो, हिंदुस्थानांतील प्राचीन संस्था देशांत इतक्या बद्धमूल आहेत कीं रयतेचे सर्व हक्क अजिबात नष्ट झाले असतील असें म्हणवत नाहीं. व नवीन जमीनदारांनाहि तसें तें नष्ट करणें सोईचें नसेल. परंतु वेळ येतांच व या नवीन

जमीनदारांना सोईचें वाटतांच ते जुन्या मालकांचे हक्क नष्ट करूं शकतील यांत शंका नाहीं.

डायरेक्टर बोर्डानें बंगाल्यांतील कायमधाऱ्याच्या पद्धतीसंबंधीं प्रशंसा करतांना त्या पद्धतीचा संस्थापक लॉर्ड कॉर्नवॉलिस यास 'शेत जमिनीवरील खाजगी मालमत्तेच्या कल्पनेचा उत्पादक' असें गौरवून म्हटलें. खरोखर लॉर्ड कॉर्नवॉलिसच्या पूर्वींहि हिंदुस्थानांत (शेतजमिनीबाबत) खाजगी मालमत्तेची कल्पना अस्तित्वांत होतीच. कायमधाऱ्याच्या पद्धतीनें जर कांहीं केलें असेल तर ती नष्ट करण्याचा पाया घातला असें म्हणतां येईल. लॉर्ड कॉर्नवॉलिस याच्याबद्दल मला पूर्ण आदर आहे. त्याचे हेतु शुद्ध होते यांत शंका नाहीं. त्यानें घालून दिलेल्या पद्धतीनें आज रयतेवर होणारे अन्याय चालू राहावेत असें त्याच्या मनांतहि नव्हतें. पण डायरेक्टर बोर्डाचें अनुकरण करून मला जर लॉर्ड कॉर्नवॉलिसला एखादें प्रशंसापत्रक द्यावयाचें असेल तर मी असें म्हणेन कीं, 'जो खरोखर सरकारचा वसूल त्याची त्यानें खाजगी मालमत्ता केली व जी खरोखर खाजगी मालमत्ता होती ती त्यानें पूर्ण नष्ट केली. आणि हें करीत असतां हजारों, लाखों लोकांचे जमिनीचे मालकी हक्क बुडविले व मूठभर उपटसुंभ असे नवे जमीनदार निर्माण केले!'

**अभ्यास** :—बंगालमधील जमीनदारीसंबंधीं सर रमेशचंद्र दत्त आदींची मतें समजावून घ्या. आज तुम्हांस या पद्धतीसंबंधीं काय वाटतें?

## २२ : : : वेलस्लीची तडफ

पु. रे. प. व्य. भाग ६ वा, पुना अफेअर्स १७९७–१८०१ नं० १२४ | फोर्ट विल्यम ८–७–९८

लॉर्ड वेलस्ली–पुणें रेसिडेंट.

पुढील मुद्यावर तुम्हांस लवकरच सूचना मिळतील त्याप्रमाणें वागूं लागावें. :

टिपूच्या गैरवर्तनाबद्दल जाब मागण्याबाबत पेशव्यानें आपल्याशीं सहकार्य करावें अशी मागणी तुम्ही पेशव्याकडे करा.

पेशव्यानें कांहीं लष्करी मदत मागितल्यास एक युरोपियन पलटण, दोन हिंदी पलटणें आणि तोफांची एक कंपनी इतकें साह्य त्यास द्या. हें सैन्य तुम्हीं मुंबई सरकारकडून मागावें. त्यांना मी परस्पर पत्र पाठवून तुमची मागणी पुरविण्याविषयीं लिहीत आहे.

पण पेशव्यास अशा रीतीनें मदत करण्यापूर्वी त्यानें दोन गोष्टींस संमति दिली पाहिजे. एक इंग्रज हे निजामाच्या दरबारीं असलेली आपली फौज वाढवितील व दुसरें निजाम व पेशवा यांचेमधील वाद इंग्रजांकडे लवाद म्हणून सोपविला जाईल. वरील अटी पेशव्यावर वंशपरंपरा बंधनकारक समजल्या जातील. पेशव्यानें ह्या अटी कबूल करीपर्यंत त्यास कसलीच मदत द्यावयाची नाहीं.

शिंद्यास आपल्या राज्यांत जाण्यास सल्ला द्या. शिंदे दक्षिणेंत आहेत तोंवर त्यांस आमच्या संरक्षक मैत्रीचा फायदा मिळणार नाहीं हें सांगा.

अफगाणिस्तानच्या झमानशाहाचें पत्र आलें असून त्यांत तो कंपनीला शिंद्याविरुद्ध मदत करण्यास बोलावीत आहे, पण शिंदा जर उत्तरेस आपल्या राज्यांत जाईल तर झमानशाहाच्या विरुद्ध त्याचें रक्षण करण्यास आपण तयार आहोंत असें सांगा.

शिंदा उत्तरेस जाण्याचें नाकारील, किंवा आपल्या किंवा पेशव्याविरुद्ध उठेल, तर त्याच्याविरुद्ध युद्ध पुकारण्यास तुम्हांस अधिकार आहे.

भोसल्यानें मागितल्यावरून मी त्याच्या दरबारकडे रेसिडेंट लवकरच पाठविणार आहे. या बातमीचा योग्य तो उपयोग करा. अगदीं जरूर पडल्याखेरीज प्रकरण हातघाईवर आणूं नका.

## २३ : : : लॉर्ड मिंटोचें परराष्ट्रीय धोरण

लॉर्ड मिंटो इन इंडिया पृ. १०१ ] [ २ फेब्रुवारी १८०८

[ बोर्ड ऑफ कंट्रोलला लॉर्ड मिंटोनें पुढीलप्रमाणें लिहिलें.

—मूर, पृ. २५२, २५४]

जोंपर्यंत फरान्स युरोपांतील युद्धामध्यें गुंतलें आहे तोंपर्यंत या भागाकडे त्यांचा हल्ला होणें हें असंभवनीय; परंतु जर रशियाशीं तह[1] झाल्यानें फरान्सचें सैन्य मोकळें झालें, आणि यूरोपियन सत्ताधीश त्यांच्याशीं सतत नमून वागले तर, तुर्क, रशियन व पर्शियन सत्ताधीशांशीं समझौता करून फरेंच सैन्याचा मोठा भाग इराणमध्यें येणें ही गोष्ट सध्यांच्या फरेंच राज्यकर्त्यांच्या[2] चिकाटी व उत्साह या विशेषाकडे पाहिलें म्हणजे अशक्य वाटत नाहीं.

एकदां कां इराणांत फरान्सचें वर्चस्व स्थिर झालें, कीं अशी न्याय्य अपेक्षा करतां येते कीं, फरेंचांना आपलें वर्चस्व हळुहळू हिंदुस्थानांपर्यंत वाढवितां येईल. आणि शेवटीं कंपनीच्या राज्यांत सैन्य घुसविण्यास मार्ग खुला होईल. ...., ही घटना संभवनीय आहे असें समजून, शक्य तेथें त्यास आपल्या विचारानुसार पायबंद घालणाऱ्या योजना करणें हें आमचें कर्तव्यच आहे.

* * *

कित्ता, पृ. १४८ ] [ जून १८०८.

योजिलेला हेतु असा कीं काबूल व लाहोरच्या राजांना खूष ठेवून, त्यांच्या प्रदेशांतून आमचें सैन्य नेण्यास त्यांची अनुमति मिळविणें किंवा तेथें आपल्या सैन्यास प्रवेश मिळविणें (व या रीतीनें) हिंदुस्थानावर होणाऱ्या फरेंच स्वारीस विरोध करणें. आमची अपेक्षा अशी कीं, या सरकारांच्या सहकार्यानें होईल तितकी बचावाची व्यवस्था करणें किंवा निदान आमच्या लष्करी हालचालींना व हेतूंना त्यांची मैत्रीची सहानुभूति व साहाय्य प्राप्त करणें शक्य व्हावें.

**अभ्यास** :—नेपोलियनची इतकी भीति लॉर्ड मिंटोस कां वाटत होती ? परराष्ट्रांत त्यानें मि. मेटकाफ् इत्यादींचीं शिष्टमंडळें कां पाठविलीं ?

---

१. टिलासिटचा तह. झार व नेपोलियन यांमधील इ. स. १८०७. रशिया-फरान्स जोडीनें हिंदुस्थानवर स्वारी करावी अशी योजना या तहांत होती असें त्या वेळीं वाटत होतें. २ नेपोलियन.

## २४ : : पेशव्यांचें संस्थानहि कां ठेवलें नाहीं ?

ई. इं. कं. पेपर्स
पी. एम. मराठा वॉर्स
पृ. ३६२
} { २० जून, १८१८

[ मार्क्विस ऑफ हेस्टिंग्जनें कोर्ट ऑफ डायरेक्टरला लिहिलें.
—मूर, पृ. २७४ ]

प्रत्येकास असें दिसेल कीं कसल्याहि अटी घालून मुद्धां बाजीरावाची पुनः स्थापना करणें हें आपला मान व सुरक्षितता याच्याशीं विसंगत आहे. नवीन सरकारच्या ताब्यांत प्रदेश यावयास हवा.... तुमच्या वर्चस्वाखालीं तो यावयाचा नसेल तर ममनदीवर बाजीरावाच्या घराण्यांतील कोणास अगर तिऱ्हाइतासच बसविला पाहिजे. पहिल्या प्रकाराबावत हें सिद्ध करण्यास आपल्याजवळ पूर्ण आणि भरपूर पुरावा आहे कीं वाटेल तीं बंधनें घातलीं तरी इतर मराठे राजांकडून गुप्तपणें आपल्याशीं राजनिष्ठ राहण्यास पेशव्यानें त्यांना सांगितलें तर त्यास आपण अडथळा करूं शकणार नाहीं. आणि पुराव्यानें सिद्ध केलें आहे कीं आपल्याला दिलेल्या वचनांना हरताळ फासून मराठ्यांच्या (Head of Mahrattas) मुख्याच्या आज्ञांचें पालन केलें जाईल... म्हणून पेशवा नकोच. तिऱ्हाइतालाहि (गादीवर बसविणें) नकोच. कारण त्याची स्वाभाविक परिणति म्हणजे त्यामुळें खालच्या वर्गांत क्षोभ निर्माण होईल आणि मोठ्या सरदारांत विद्वेष उत्पन्न होईल..... अशा प्रकारचें असमाधान तुमचें सरकार झाल्यास होणार नाहीं. लगतच्या कंपनीच्या प्रदेशांत प्रजेला जी सुरक्षितता व सौख्य मिळतें त्याची जाणीव (इकडील) रहिवाशांनाहि आहे. तसें कंपनीचें राज्य झालें तर वाईट वाटणार नाहीं, किंबहुना हेंच लोकांस पाहिजे आहे अशा उत्सुकतेचे प्रत्यक्ष दाखले त्यांनीं दर्शविले आहेत.

..म्हणून निर्णय असा कीं, तुम्हालाच हा प्रदेश तुमच्या ताब्यांत घ्यावा लागेल. तुमच्या शस्त्रांनीं जें महत्कार्य केलें त्यानंतर शांततेचें कार्यहि तुम्हीं केलें पाहिजे, असेंच तुम्हांस वाटेल; कारण कीं ही एक सुदैवी संधि अशी आहे कीं ज्यामुळें सामाजिक तत्त्वें व कर्तव्यें यांची कल्पना नसलेल्या येथील समाजांत नीति वा शिक्षण यांचा प्रथमच प्रचार करतां येईल. मानवी

उद्धाराचें केवढें तरी क्षेत्र आपल्यापुढें आहे. सध्यां नापीक असलेल्या मनोभूमींत चिरंतन चांगलेपणा उत्पन्न करण्याचें बी रुजविण्याचें कार्य ब्रिटिशांच्या कीर्तीस साजेसें आणि ब्रिटिशांच्या परंपरेस पोषक असेंच आहे. निःसंशय असेहि अनेक प्रसंग घडतील कीं ज्यामुळें हें उदार धोरण गढूळ व्हावें. परंतु आपला हा यत्न फसला तरी, आपण चांगला यत्न केला ही जाणीवसुद्धां आपल्या डायरेक्टर कोर्टास भूषणावह होईल.

**अभ्यास** :—१. पेशव्यांचा ठावठिकाणासुद्धां इंग्रजांनीं कां ठेवला नाहीं ? मोगल बादशाह व ब्रह्मदेशचा राजा थिबा यांच्यासंबंधीं इंग्रजांनीं काय धोरण ठेवलें ? २. पेशव्यांचें संस्थान असतें तर सर्व मराठ-मंडळाची इंग्रजाविरुद्ध कधीं काळीं एकजूट झाली असती काय ? वर्गांत दोन पक्ष करून कारणासह चर्चा करा.

---

## २५ : : : ब्रिटिश अंमलाचें ध्येय : सर थॉमस मन्रोचे विचार

[सर थॉमस मन्रो हा एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांतील एक उदारमतवादी ब्रिटिश अधिकारी होय. एल्फिन्स्टन, मन्रो, बेंटिक व मेकॉले यांनें या काळांतील लेखन वाचनीय आहे. दुर्दवानें यांनीं प्रतिपादिलेलें धोरण अंमलांत आलें नाहीं. नेपियर, डलहौसी, लिटन यांच्या धोरणाचें वर्चस्व कायम राहिलें व कर्झननें तें विसाव्या शतका-पर्यंत आणून पोहोंचविलें. मन्रोच्या एका खलित्यांतील उतारा पुढें दिला आहे. —बानर्जी, भा. १, पृ. १६६.]

आपल्या सर्व व्यवस्थेंत आपण एका गोष्टीकडे नेहमीं लक्ष दिलें पाहिजे. आपल्या सर्व व्यवस्थेचा लोकांच्या चारित्र्यावर काय परिणाम होईल, तें चारित्र्य अधिक उदात्त होईल कीं त्याची उंची खालावेल हा मूलगामी प्रश्न आहे. आपल्या हातीं सर्व सत्ता ठेवून हिंदुस्थानांतील नागरिकांचें रक्षण तेवढें करावें म्हणजे आपलें काम झालें, मग ते आज आहेत त्यापेक्षां मनानें दुर्बल व कमकुवत झाले तरी चालतील, हें धोरण बरोबर, कीं त्याऐवजीं त्यांच्यांत दिवसेंदिवस सुधारणा करण्याचें धोरण ठेवून त्यांना आपला कारभार

करण्यास समर्थ करावें, या प्रकारचें धोरण अधिक बरोबर हा महत्त्वाचा प्रश्न आहे. जेव्हां हिंदुस्थानांतून आपला अंमल नाहींसा होईल तेव्हां आपल्या अस्तित्वाचा पुरावा म्हणजे तेथील दीनदुबळी प्रजा, खुरटलेली व निःसत्त्व झालेली अशी असण्यापेक्षां ते आपला कारभार पाहण्यास अधिक समर्थ झालेले आहेत हें दृश्य दिसावें. यासाठीं आपण कोणते उपाय योजले पाहिजेत त्याचा आपणास अनुभव नाहीं व हिंदी लोकांशीं आपला तेवढा परिचयहि नाहीं; परंतु हिंदी लोकांची उंची वाढविण्याचा एक उपाय म्हणजे त्यांच्यांत अधिकाधिक आत्मविश्वास उत्पन्न करावा, त्यांच्यावर विश्वास टाकावा व सरकारच्या कक्षेंतील कोणत्याहि अधिकारावर येण्यास ते पात्र असावेत अशा प्रकारचें धोरण ठेवावें. हें धोरण अमलांत आणण्यास कांहीं मर्यादा असतील, परंतु जेथें आपला अंमल धोक्यांत येण्याचा प्रश्न नसेल तेथें हिंदी लोकांना नेमण्यास कोणताच प्रत्यवाय असूं नये. निदान मला तरी असा प्रत्यवाय ठेवण्याचें कारण दिसत नाहीं.

हिंदुस्थानांतील ब्रिटिशांच्या अंमलाकडे एक तात्पुरती घटना म्हणून तुम्ही पाहूं नका. हिंदी लोकांच्या भोळ्या व धर्मनिष्ठ समजुती नाहींशा होऊन ते आपल्या देशाचा राज्यकारभार हातीं घेण्यास समर्थ होई तोंपर्यंत आपण तेथें राहावयाचें व ते एकदां सुशिक्षित झाले म्हणजे आपण तेथून काढता पाय घ्यावयाचा, हें धोरण आपण अंमलांत आणल्यास हिंदी लोकांची मानसिक व बौद्धिक उंची वाढेल व ते आपला आपण कारभार करण्यास व स्वतःचें संरक्षण करण्यास समर्थ होतील.

**अभ्यास** :—मन्रोची भविष्यवाणी खरी ठरली काय ? इंग्रजांनीं हिंदुस्थान कोणत्या स्थितींत सोडला ?

---

# २६ : : : इंग्रजी राज्याचे फायदे : राजा राममोहन रॉय यांचे विचार

इ. स. १८२९

[ राजा राममोहन रॉय (इ. स. १७७४ ते १८३३) याची योग्यता अद्याप मराठी वाचकांस पूर्णपणें कळली नाहीं. त्यानें प्रथम वेदांचें बंगालींत भाषांतर केलें. हिंदु कॉलेजची स्थापना केली. तिबेटांत जाऊन धर्माचा तौलनिक अभ्यास केला. इंग्रजी शिक्षणाचा पुरस्कार केला. सती विरुद्ध मोहीम केली. विधवाविवाहाची, स्त्रियांस शिक्षण देण्याची व स्त्रियांना वारसा हक्क असण्याची आवश्यकता प्रतिपादन केली. बहुपत्नीकत्वास विरोध केला. मुद्रण स्वातंत्र्याचा आग्रह धरला. ज्यूरींतील वर्णभेदाचा निषेध केला. सनदशीर चळवळीचा पाया घातला. व्यक्तिस्वातंत्र्य व लोकशाही याचा उच्चैर्घोष केला. जमीनदारी जुलुमाविरुद्ध रयतेची वकिली केली व सरकारच्या करपद्धतींत समतेच्या तत्त्वावर सुधारणा करण्याचा आग्रह धरला. सारांश भूतदया, स्वातंत्र्याची आकांक्षा व शास्त्रीय दृष्टि या त्रयीच्या आधारावर भव्य व मनोहारी 'नवभारताचा निर्माता' हें अभिधान त्यास सार्थकतेनें लागू पडतें. अशा या राजा राममोहन रॉयचे प्रारंभींचे विचार पुढें दिले आहेत.

व्हिक्टर जेकिमो नांवाचा फरेंच शास्त्रज्ञ त्यास भेटला असतां त्याच्याशीं झालेल्या संभाषणाचें टिपण जेकिमोनें पुढीलप्रमाणें केलें आहे. —मुजुमदार, पृ. ४१.]

राजा राममोहन रॉय याच्याशीं झालेल्या संभाषणांत त्याच्या विचारांचा मोठेपणा व प्रांजळपणा पाहून मला आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, "माझ्या लहान वयांत या युरोपबद्दल मला फार तिरस्कार वाटे. कारण या युरोपांतल्याच एका देशानें माझ्या देशास गुलाम केलें." तारुण्यांतील अंध देशभक्तीमुळें त्यास इंग्रजांबद्दल व त्यांच्याबरोबर जें कांहीं आलें त्या सर्वांबद्दल मोठा तिरस्कार वाटे. परंतु दिवसेंदिवस इंग्रजी सत्ता प्रस्थापित झाल्यानें हिंदुस्थानास झालेल्या फायद्यांची त्यास जाणीव झाल्यापासून त्याच्या वृत्तींत फरक पडूं लागला. तो म्हणाला, आपण सर्व मानव जर या सृष्टींतील वस्तुमात्रांवर अवलंबून आहोंत व त्यांच्यावाचून आपलें चालत नाहीं तर अशा

स्थितींत राष्ट्रीय स्वातंत्र्याचें अवास्तव स्तोम माजवणें हा भ्रम नव्हे काय? मनुष्याला समाजांत एकसारखें आपल्या शेजाऱ्याशीं सहकार्य करीतच वागावें लागतें. या सहकारावाचून त्याचें जीवन शक्य नाहीं. विशेषतः शेजारी प्रबळ असेल तर मनुष्य त्यावरच अवलंबून राहतो. हें जर खरें आहे तर राष्ट्रीय स्वातंत्र्याचा टेंभा मिरवण्यांत व आपण दुसऱ्या कुणावरहि अवलंबून नाहीं हें सांगण्यांत काय अर्थ आहे? जेते हे जितांपेक्षां सुधारलेले असतील तर जेत्यांचें आक्रमण अनिष्ट ठरतेंच असें मानण्याचें कारण नाहीं. कारण जेते हे आपल्याबरोबर नव्या संस्कृतीचे फायदे घेऊन येतात. माझें तर असें स्वच्छ मत आहे कीं आणखी बरीच वर्षेंपर्यंत हिंदुस्थानावर इंग्रजांचा अंमल राहिल्यानें व त्यांचा सहवास झाल्यानें या देशास राजकीय स्वातंत्र्याचा मार्ग दिसूं लागेल.

**अभ्यास** :—"इंग्रज राज्याचीं शंभर वर्षें" या विषयावर इंग्रजांच्या सहवासानें हिंदुस्थानास झालेले फायदे दर्शविण्याच्या दृष्टीनें एक विस्तृत निबंध लिहा.

---

## २७ : : : सती बंदीचा कायदा

लाइफ ऑफ बेंटिक, बौलर. पृ. ९६ } { ८ नोव्हेंबर १८२९

[ लॉर्ड वुइल्यम बेंटिकचें निवेदन .... —मूर, पृ. २९३.]

प्रश्न कसाहि असो—सतीची पद्धति चालू ठेवण्याचा असो कीं बंद करण्याचा असो—त्याचा निर्णय गंभीरपणानें ठरविला पाहिजे. वर्षांनुवर्षें त्यांना वांचविण्याची सत्ता असतांनाहि क्रूर आणि अकालीं मरणास शेकडों निरपराधी स्त्रियांना बळीं जाऊं देणें ही विवेकबुद्धीला पटणारी गोष्ट नाहीं. उलट, जें कांहीं लोकमत अजमावलें त्याचा अर्थ लक्षांत घ्यावयाचा तर सतीविरोधी मार्ग पत्करल्यास ब्रिटिश साम्राज्यच धोक्यांत येणार आहे असें दिसतें. असें करणें म्हणजे, एकदम शेंकडों, हजारो, नव्हे लक्षावधि लोकांना उपयुक्त अशा थोर सुधारणा—ज्या आपलें राज्य चालू राहील तरच करतां येतील त्या

करण्याच्या आशा धुळीला मिळविण्यासारखें आहे. हा पर्याय म्हणजे मानवतेच्या दृष्टीनेंहि जास्त अपायंकारक आहे....उलट-एक एक दिवस उशीर म्हणजे भयंकर बळींच्या यादींत वाढ करणें होय....सतीबंदीमुळें होणाऱ्या भीषण परिस्थितिबाबत हिंदू कॉलेजचे सेक्रेटरी मि. होरेस विल्सन यांच्या मताला मी विशेष मान देतों.

त्यांचा पहिला मुद्दा असा: 'खरोखर सती हा हिंदुधर्माचा भाग नाहीं' असें सिद्ध करण्याचा यत्न करणें म्हणजे खरा प्रश्न डावलणें होय. कारण हिंदु धर्मांत काय आहे यापेक्षां त्यासंबंधीं लोकांचा समज काय आहे हेंच महत्त्वाचें आहे हें म्हणणें मला मान्य आहे.

दुसरा मुद्दा: ही चाल बंद करण्यानें विस्तीर्ण (प्रदेशभर) असमाधान पसरेल हेंहि मला मान्य आहे. त्यांचें म्हणणें असें कीं (या प्रयत्नांत) फारच थोडें यश येईल. हें मात्र मला शंकास्पद वाटतें...एतद्देशीयांतील सुशिक्षित (गृहस्थ) राजा राममोहन रॉय, यांना सतीची चाल बंद व्हावयास हवी, पण तेहि म्हणतात कीं, "सरकारनें तसा कायदा केला तर लोक बिथरतील....ते म्हणतील कीं जेव्हां राजसत्ता मिळवावयाची होती तेव्हां आमच्या धर्माचा इंग्रजांनीं मान ठेवला व सहिष्णुता दाखविली, पण आतां सर्वसत्ताधीश झाल्याबरोबर त्यांचें पहिलें कृत्य म्हणजे (धार्मिक) बाबींतील तटस्थ वृत्तीचा त्याग. ...मुस्लीम विजेत्याप्रमाणें याच्या पुढची पायरी म्हणजे त्यांच्या धर्माची जबरदस्ती आम्हांवर होणें हीच होय."

"आतां कौन्सिलपुढें सतीची चाल बंद करण्याचें बिल मी मांडत आहे. निजामत अदालत मधील सर्व न्यायाधीशांचा मला पाठिंबा असलेलें पत्र सोबत आहे.... हिंदूंचें कल्याण हाच माझा सर्वोच्च हेतु आहे. धार्मिक श्रद्धा आणि आचार यांचा आणि माणूस मृत्यूच्या तोंडीं देणें याचा विरोध आहे हें समजावून देणें ही पहिली पायरी होय. मग लोक या प्रश्नाचा शांत मनानें विचार करूं शकतील. धर्मांतर घडवून आणण्याचा विचारसुद्धां माझ्या मनाला शिवत नाहीं. मी हिंदूंच्या करितां कायदे करीत आहे ही माझी भावना आहे, आणि मला माहीत आहे कीं कित्येक प्रगत हिंदूनाहि असेंच वाटतें.

.....ब्रिटिश राज्यावरील हा डाग धुऊन काढण्याचें श्रेय ज्या सरकारचा

मी एक भाग आहे त्या सरकारला मिळावें ही माझी महत्त्वाकांक्षा असणें यांत कांहींच अप्रामाणिकपणाचें नाहीं."

**अभ्यास** :—सतीच्या चालीबद्दल तुमची विचारसरणी सांगा. लॉर्ड बेंटिकच्या पूर्वी सतीची बंदी कोणत्या राज्यकर्त्यांनीं केली होती काय ? बेंटिकच्या धोरणानें ब्रिटिश राज्यास धोका आला कीं बळकटी आली ?

---

## २८ : : : इंग्रजींतूनच शिक्षण द्या

ए मिनिट बाय मि. टी. बी. मेकॉले

२ फेब्रुवारी १८३५

[ गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलचा कायदे-मंत्री म्हणून या वेळीं मेकॉले हिंदुस्थानांत आलेला होता. 'युरोपियन विज्ञान व पाश्चात्य पद्धतीचें शिक्षण' हें हिंदुस्थान सरकारनें संस्कृत व अरबी या भाषांतून द्यावें कीं इंग्रजीतून द्यावें असा वादाचा प्रश्न उत्पन्न झाला. 'कमिटी ऑफ् पब्लिक इन्स्ट्रक्शन' पूर्वींच नेमलेली होती, तिच्या सभासदांत या मुद्यावर मतभेद माजला होता. दोन्ही पक्ष तुल्यबळ होते. कंपनीला पार्लमेंटनें १८१३ च्या कायद्यानें जे अधिकार दिले त्याअन्वयें इंग्रजी भाषा माध्यम करतां येणार नाहीं असें कांहीं सभासदांचें मत होतें, यामुळें बहुधा हा प्रश्न कायदेमंत्री मेकॉलेकडे विचारार्थ आला. त्याच्या उत्तरांतील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे. त्या वेळचा गव्हर्नर जनरल लॉर्ड वुइल्यम बेंटिक यानें मेकॉलेचें मत बरोबर असल्याचा निर्णय दिला व हिंदुस्थानांत इंग्रजी माध्यमांतून शिक्षण सुरू केलें. आतां स्वराज्य आलें तरी हें माध्यम जाईल कीं नाहीं याची शंका वाटते.—मूर, पृ. ११० ]

....या कायद्याचा जो अर्थ अभिप्रेत आहे असें कांहीं जणांचें म्हणणें आहे, त्याप्रमाणें कोठल्याहि अर्थ लावण्याच्या पद्धतीनें तसा अर्थ काढतां येईल असें मला वाटत नाहीं. त्यामध्यें विशिष्ट भाषा किंवा शास्त्रें शिकवावीं असें सांगितलेलें नाहीं. हें माझें म्हणणें कौन्सिलला पटलें नाहीं तर ज्या वाक्यांशामुळें ही अडचण निर्माण होत आहे तो वाक्यांश काढून टाकणारा कायदाच मी मांडीन...ही लाख रुपयांची ग्रँट चांगल्या रीतीनें कशी उपयोगावयाची हा खरा प्रश्न आहे.

......एका मुद्यावर सगळयांचें एकमत दिसतें कीं हिंदुस्थानच्या या भागांतील रहिवाशांच्या बोलभाषांमध्यें वाङमयीन अगर वैज्ञानिक माहिती नाहीं. इतकेंच नव्हे तर त्या इतक्या दरिद्री आहेत कीं अन्य कोठून तरी (ज्ञानभांडार आणून) त्यांना समृद्ध केल्याशिवाय कोणताहि महत्त्वाचा ग्रंथ त्यांत अनुवादित करतां येणें अवघड आहे. उच्च अभ्यास करणाऱ्यांचें सामर्थ्य असलेल्यांची बौद्धिक उंची वाढविण्याचें आजचें साधन म्हणजे मातृभाषा व्यतिरिक्त कोणती तरी अन्य भाषा त्यांना शिकविणें.

मग ही भाषा कोणती असावी? कमिटीच्या अर्ध्या सभासदांचें मत आहे कीं ती इंग्रजी असावी, उरलेल्यांचा जोरदार आग्रह अरबी व संस्कृत-चा आहे. मुख्य प्रश्न हा कीं कोणती भाषा माहीत असणें मोलाचें आहे? मला अरबी, संस्कृत येत नाहीं... पण सुप्रसिद्ध संस्कृत अरबी ग्रंथांचीं भाषांतरें मीं वाचलीं आहेत. संस्कृत व अरबी भाषांतील सगळें वाङमय एकत्र केलें तरी तें फार तर चांगल्या युरोपियन ग्रंथांतील एका कपाटांतल्या फळीवर मावणाऱ्या ग्रंथांतील ज्ञानाएवढें भरेल. सध्यां मातृभाषेंतून ज्यांना ज्ञान देतां येत नाहीं अशा लोकांना आपणांस शिक्षण द्यावयाचें आहे. त्यांना कोणती तरी परकीय भाषा शिकवली पाहिजेच. आपल्या भाषेच्या हृचा अधिकारा-बद्दल पुनः सांगण्याची गरज नाहीं. पाश्चिमात्य राष्ट्रांत सुद्धां ती महत्त्वाची भाषा आहे. हिंदुस्थानांत राज्यकर्त्यांची इंग्रजी हीच भाषा आहे. राजधानीं-तून एतद्देशीय लोकांतील वरचा वर्ग ही भाषा बोलतो. पूर्व समुद्रांतील व्यापाराची भाषा तीच होण्याचा संभव आहे.

....पश्चिम युरोपीय भाषांनीं रशियाची सुधारणा केली. तार्तर लोकांच्यासाठीं या भाषांनीं जें केलें तेंच हिंदूंकरितां ही भाषा करील यांत मला संशय वाटत नाहीं.

....एतद्देशीयांना इंग्रजींत तज्ज्ञ करतां येणें शक्य आहे आणि याच दिशनें आपले प्रयत्न झाले पाहिजेत.

मर्यादित साधनांनीं सर्व समाजाला आपण शिक्षण देऊं शकणार नाहीं. आपण असा एक वर्ग निर्माण करण्याची शिकस्तीची खटपट केली पाहिजे कीं जो आपण आणि ज्या असंख्य लोकांवर आपण राज्य करतों त्यामध्यें

दुभाष्या (interpreters) म्हणून कार्य करील––मात्र हा वर्ग वर्णानें व रक्तानें हिंदी पण रुचि, मतें, नीति व बुद्धिमत्ता यांनीं इंग्रजच व्हावा.

........या वर्गावरच आपण देशी भाषांत सुधारणा करणें, वैज्ञानिक परिभाषा करून...... त्या समृद्ध करणें व बहुजन समाजाला ज्ञान देण्यास त्या साधन होतील इतक्या समर्थ करणें हें काम सोपविलें पाहिजे.

**अभ्यास** :—तुम्हांला मेकॉलेची विचारसरणी बरोबर वाटते काय? इंग्रजी शिक्षणानें आपल्या देशाचे कोणते फायदे–तोटे झाले? ‘ जन्मानें भारतीय व मनानें इंग्रज ’ असा वर्ग निर्माण झाला काय? या सर्व प्रश्नांची चर्चा करा.

---

## २९ : : ई. इं. कंपनीच्या सनदेची फेरतपासणी

(इ. स. १८३३)

[ ईस्ट इंडिया कंपनीशीं करारमदार करण्याचा व हिंदुस्थानांतील राजकीय अंमलाची फेर व्यवस्था करण्याचा कायदा. याची मुदत ३० एप्रिल १८५४ पर्यंत आहे. ––बानर्जी, पृ. १७६. ]

३. या कायद्यानें २२ एप्रिल १८३४ पासून कंपनीचा चीनच्या व्यापारावरील मक्ता व हिंदुस्थानांतील चहाच्या व्यापारावरील मक्ता यांचा शेवट होत आहे.

३९. हिंदुस्थानांत आपल्या ताब्यांत असलेला सर्व मुलूख व त्याचा वसूल व त्याचप्रमाणें मुलकी व लष्करी व्यवस्था यासंबंधीं सर्वाधिकार गव्हर्नर जनरल व त्याचे सल्लागार यांना असावा व त्यांना ‘ गव्हर्नर जनरल ऑफ इंडिया इन् कौन्सिल’ असें नांव असावें.*

४०. या कौन्सिलचे चार साधारण सभासद असावेत. त्यांपैकीं तिघांची नेमणूक कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनीं आपल्या नोकरांतून करावी. कौन्सिलवर नेमणूक होण्यापूर्वीं त्यांची दहा वर्षें तरी नोकरी झाली असली

---

* या गव्हर्नर जनरलला पूर्वीं गव्हर्नर जनरल ऑफ फोर्ट विल्यम’ असें म्हणत असत. रेग्युलेटिंग ॲक्ट (पृ.२७९) पहा. इ.स.१८३३च्या सुमारास जवळजवळ सर्व हिंदुस्थान ताब्यांत आलें तेव्हां त्यास अन्वर्थक अभिधान प्राप्त झालें.

पाहिजे व एखादा नोकर लष्करी अधिकारी असेल तर तो कौन्सिलचा सभासद असतांना त्यानें आपल्या लष्करी अधिकाराचा त्याग केला पाहिजे. कौन्सिलांतील चौथा सभासद कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनीं आपल्या नोकरांपैकीं न नेमतां बाहेरचा नेमावा. त्यास राजाची व बोर्ड ऑफ कन्ट्रोलच्या अध्यक्षाची लेखी पसंती असली पाहिजे. या सभासदानें एरवीं कौन्सिलांत बसूं नये किंवा मत देऊं नये. फक्त कायदे करण्याचे वेळीं व तेवढ्यासाठीं त्याचा कौन्सिलांत अंतर्भाव व्हावा. हिंदुस्थानांतील कंपनीच्या फौजेचा सर सेनापति या कौन्सिलचा अधिकारपरत्वें सभासद असावा व त्याचा दर्जा गव्हर्नर जनरलच्या खालोखाल असावा.

८७. इंग्रजी अंमलाखालीं असलेल्या हिंदुस्थानांतील कुणाहि इसमास त्याच्या धर्मावरून, जन्मावरून, वंशावरून किंवा वर्णावरून कंपनीच्या राज्यांत अधिकाराची जागा घेण्यास मना केलें जाणार नाहीं. (वर्ण, जात, धर्म हीं लायकीच्या आड येणार नाहींत.)

**अभ्यास** :—१. या सनदेंतील ८७ व्या कलमाची राणीच्या जाहीरनाम्यांतील अभिवचनांशीं तुलना करा. २. कंपनीच्या व्यापाराचा मक्ता काढून घेण्याचा त्या वेळच्या प्रधानमंडळाचा काय हेतु असावा ?

---

## ३० : : : इंग्रजांची वाताहात

पार्लमेंटरी पेपर्स–अफगाणिस्थान पृ. १०३ — { १९ फेब्रुवारी १८४२

[ हिंदुस्थानचे तत्कालीन गव्हर्नर जनरल लॉर्ड ऑक्लंड यानें सीक्रेट कमिटीला पाठविलेलें पत्र —मूर, पृ. ३२४. ]

१......ब्रिटिश सैन्याला जोराचा फटका बसल्याबद्दल खेद वाटतो आणि त्याला कारणीभूत असणाऱ्या गंभीर परिस्थितीसंबंधीं स्पष्ट माहिती मिळाली नाहीं, यामुळें वाईट वाटतें.

३. तुमच्याकडे पाठविलेल्या कागदपत्रावरून ध्यानीं येईल कीं मेजर पॉटिजरनें २८ डिसेंबरला जलालाबादेस कळविलें कीं काबूलशीं अद्याप वाटाघाटी चालू आहेत; २९ डिसेंबरला त्यानें व एल्फिन्स्टननें अधिकृत

रीतीनें जलालाबादेच्या अधिकाऱ्यांना लिहिलें कीं, काबूलशीं झालेल्या करारानुसार त्यांनीं पेशावरला जावें. ४ जानेवारीस काबूलहून इंग्रजांनीं कळविलें कीं पेशावरला जाण्यास लगेच निघालें पाहिजे. ६ जानेवारीला सैन्यानें तळ हलविला. पण आमच्या माहितीप्रमाणें रसदेशिवाय, निवाऱ्याचीं किंवा संरक्षणाचीं साधनें नसतांना (अशा स्थितींत) आणि कडक हिंवाळचांत डोंगराळ भागांत शत्रूच्या हल्ल्यास तें सैन्य बळीं पडलें. २–३ मुक्कामांत ही सेना असंघटित व गलित धैर्य झाली. लष्करी संघटना हें तिचें स्वरूप शेवटीं नष्टच झालें!

४. या दुर्दैवी माघारींत काबूलहून निघालेले धडधाकट असे किती लोक होते तें समजलेलें नाहीं; पण तेथें असलेल्या सैनिकांची संख्या दीर्घ काल चाललेल्या झगड्यानें बरीच घटली असावी. आणि आम्हांला असें वाटतें कीं, ४,००० इतकीसुद्धां संख्या त्यांत नसावी; कित्येक अधिकारी जखमी झालेले वा मृत्युमुखीं पडल्यानें सेनेलाहि दौर्बल्य आलेलें होतें.

**अभ्यास** :—पराभवाचें वृत्तसुद्धां तारीखवार व आंकडेवार धाडण्याची इंग्रजांची पद्धति अनुकरण करण्यासारखी आहे.

---

## ३१ : : : सिंध कां जिंकला?

२२ मार्च १८४३

[गव्हर्नर जनरल एलिनबरोनें लॉर्ड वेलिंग्टनला लिहिलेलें पत्र.
—मूर, पृ. ३३०]

अमीरांशीं तंटा केल्याशिवाय सिंधूच्या खालील भागावर मोक्याची जागा आपल्या ताब्यांत ठेवणें कसें शक्य होतें? एरवीं कराची येथील आपल्या मुक्कामाचें आपल्याला समर्थन करतां आलें नसतें; अफगाणिस्तानशीं युद्ध संपल्यामुळें, (अमीराशीं) नवीन तह केल्याखेरीज बक्करलाहि तळ ठेवणें अन्यायाचें झालें असतें. जें कांहीं घडलें त्यावरून 'सिंधू'च्या खोऱ्यांतून आपण दूर जातांच नाविक वहातुकीला नदी मोकळी केल्याचा तह अमीराकडून झुगारला जाणार हें दिसत होतें. आपण अफगाणिस्तानांतून मार खाऊन परतलों अशी चुकीची समजूत अमीराची झालेली होती. म्हणून जरूर त्या दुरुस्त्या तहांत करून घेण्याचें मी ठरविलें.

ज्रो पर्शियन पत्रव्यवहार सांपडला त्याच्या खरेपणाचा निर्णय स्थानिक अधिकारीच घेऊं शकतात, दुरून निश्चित मत बनविणें कठिणच होतें; परंतु पत्रें खरीं असलीं तर फेरतह करणें योग्य व आलेल्या संधीचा फायदा घेण्याचें धोरण आम्हांस पसंत वाटलें...मी सर्वाधिकार सर चार्ल्स नेपियरकडे सोंपविला... नंतर घडलेल्या घडामोडी, हाती लागलेली माहिती आणि अमीरांनीं नुकताच केलेला विश्वासघात यांनीं सिद्ध केलें आहे कीं अमीर हे शत्रु असून त्यांच्यावर अवलंबून राहण्यांत अर्थ नाहीं हें माझें म्हणणें बरोबर होतें. आतां आपण जिंकलेला प्रदेश ताब्यांत घेण्याखेरीज अन्य कांहीं मार्ग आहे असें मला वाटत नाहीं.

**अभ्यास** :—सिंध जिंकण्याची ही मीमांसा तुम्हांस पटते काय? सकारण उत्तर द्या.

---

## ३२ : : : शीखांशीं युद्धघोषणा

पेपर्स रि. होस्टिलिटीज इन् नॉर्थ वेस्ट पृ. ३० — {१३ डिसेंबर १८४५

[ गव्हर्नर जनरलची घोषणा, १३ डिसेंबर १८४५ —मूर, पृ. ३३५.]

गव्हर्नर जनरल इन् कौन्सिलची मतापासून इच्छा होती कीं, पंजाबमध्यें जोरदार शीखराज्य पुनः स्थापन व्हावें,... अद्यापहि ही आशा सोडून दिलेली नाहीं. असें कळतें कीं दरबारच्या आज्ञेनें शीख सैन्य ब्रिटिश प्रदेशावर हल्ला करण्यासाठीं लाहोरहून नुकतेंच निघालें.

गव्हर्नर जनरलच्या हुकुमाप्रमाणें त्याच्या प्रतिनिधीनें याचें स्पष्टीकरण योग्य मुदत देऊन मागितलें, पण उत्तर आलें नाहीं. तेव्हां पुनः मागणी करण्यांत आली. ब्रिटिशांनीं कांहीं आगळीक केली नसल्यानें शीख सरकारच्या हेतूविषयीं शंका घेणें उचित वाटलें नाहीं. दोन्ही राज्यांत तंटा उद्‌भवूं नये म्हणून महाराजांना अडचणींत टाकील असें गव्हर्नर जनरलनें कांहीं करण्याचें थांबविलें.

(आम्ही) कोणत्याहि तऱ्हेनें आगळिकीस कारण दिलें नसतांहि शीख सैन्यानें हल्ला केला आहे.

तेव्हां ब्रिटिश प्रदेशाच्या परिणामकारक रक्षणासाठीं ब्रिटिश सरकारच्या अधिकाराच्या प्रतिष्ठेसाठीं आणि तह व शांतता मोडणाऱ्यांच्या पारिपत्यासाठीं गव्हर्नर जनरलला उपाय योजलेच पाहिजेत.

---

## ३३ : : : पंजाब खालसा

[लॉर्ड डलहौसीनें ईस्ट इंडिया कंपनीच्या संचालक मंडळाला दिलेल्या वृत्तांतून. —मूर, ३४७.]

२७ एप्रिल १८४८....नंतर (शीख) सरदारांनीं कळविलें कीं सैन्यावर त्यांचा तावा नाहीं व मूळराजच्या विरुद्ध तें लढणार नाहीं...

सरकारच्या दप्तरीं कित्येक पत्रें आहेत कीं, जीं शीख सरदारांनीं जवळच्या प्रदेशांतील मुसलमान, हिंदू व शीख सत्ताधिशांना पाठविलीं आहेत. त्यांत मुख्य भाग हाच आहे कीं, ब्रिटिशांचा नाश करून त्यांना येथून घालविणें आवश्यक आहे.

यापेक्षांहि त्यांचा कडवटपणा पुढें गेला आहे. अफगाणांची मदत शीख कधीं मागतील व वाटेल तो त्याग करून ती घेतील असें कोणासहि वाटणार नाहीं. परंतु ब्रिटिश विद्वेषामुळें त्यांनीं हेंहि केलें आहे. अमीर दोस्तमहंमदला त्यांनीं बोलाविलें. पेशावरचा प्रांत त्यांस देण्याचें त्यांनीं मान्य केलें आहे.

तो आला. त्यानें शीखांचीं देवळें लुटलीं, गांवें उध्वस्त केलीं व लोकांना क्रूरतेनें वागविलें, तरीहि शीख राष्ट्र त्याचें साह्य घेतच आहे.

अद्यापहि मला हें मान्य आहे कीं सुसंघटित, बलवान् व मित्रत्वाचें हिंदुराज्य पंजाबमध्यें असावें...परंतु नंतर घडलेल्या घटनांनीं सिद्ध केलें आहे कीं असें होणें अशक्य आहे.

...जाहीरनामा काढण्यांत येत आहे कीं, ब्रिटिशांच्या हिंदी साम्राज्यांत पंजाब समाविष्ट करण्यांत आला आहे.

**अभ्यास** :—ब्रिटिश राज्याच्या सीमेवर आपल्याशीं दोस्ती करणारें प्रबळ हिंदुराज्य इंग्रजांस कां पाहिजे होतें याची मीमांसा करा. मग शीखांचें राज्य खालसा कां करण्यांत आलें ?

## ३४ : : : राज्य खालसा करण्याचा सिद्धांत

[ १८४८ मध्यें डलहौसीनें कोर्ट ऑफ् डायरेक्टरला लिहिलेल्या खलित्यांतून —मूर, ३५१–५२.]

माझें विचारपूर्वक झालेलें व निःसंदिग्ध मत मी कळवितों. दूरदृष्टीचें व अचूक धोरण म्हणून ब्रिटिश सरकारनें संस्थानी प्रदेश अगर त्यांचा कारभार मिळविण्याची येणारी न्यायपूर्ण संधि कधींहि सोडूं नये. मग हे प्रसंग कोठल्याहि रीतीचे—नैसर्गिक वारस नसल्यानें येवोत किंवा हिंदू पद्धतीनें दत्तविधान केलें असलेल्यास ब्रिटिश सरकारची अनुमति न घेतल्यानें येवोत.

**अभ्यास** :—या सूत्रान्वयें कोणकोणतीं राज्यें लॉर्ड डलहौसीनें खालसा केलीं ?

---

## ३५ : : : ब्रह्मदेशाशीं युद्ध

पार्लमेंटरी पेपर्स नं. २४५ } { २८ फेब्रुवारी १८५६

[ आपली कारकीर्द संपत आली असतां लॉर्ड डलहौसीनें आपल्या राज्यकारभाराचें सिंहावलोकन करणारें विस्तृत वृत्त लिहिलें. त्यामध्यें १८० कलमें आहेत. आगगाडी सुरू करणें, पोस्टाची व्यवस्था, ब्रह्मदेशाचें युद्ध, नागपूर खालसा,हें सर्व झालें तरी सर्वच कसें सामसूम होतें, काश्मीरचा राजा इंग्रजांना कसा भितो, गंगेचा कालवा, आसामांत चहाचे वाढते मळे इत्यादि अनेकविध वर्णन व त्यासंबंधीं आपण काय काय केलें तेहि डलहौसीनें त्यांत लिहिलें आहे. त्याची कारकीर्द समजण्यास अभ्यासकांनीं हें मूळ लिखाण वाचणें इष्ट होय. यांत तिसरें कलम ब्रह्मदेशासंबंधीं आहे तें येथें अनुवादित केलें आहे. —मूर, ३५३–३५४.]

दोन वर्षें झालीं नाहींत तोंच हिंदुस्थान सरकारला एकाएकीं ब्रह्मदेशाच्या विरोधाला तोंड द्यावें लागलें.

रंगून बंदरांतील कांहीं ब्रिटिश व्यापाऱ्यांना आव्हा राजाच्या अधिकाऱ्यांनीं फार छळलें व त्यानें यंदाबूचा करार मोडला.

लॉर्ड वेलस्लीनें मोठ्या दूरदृष्टीनें असें तत्व सांगून ठेवलें होतें कीं,

गंगेच्या मुखाशीं ब्रिटिश निशाणाचा अपमान झाला तर तो जणूं काय इंग्लंडांत टेम्स नदीवरच झाला असें समजून त्या तीव्रतेनें त्याचा प्रतिकार करावा. या तत्त्वाबरहुकूम कोणत्याहि एतद्देशीय सरकारनें ब्रिटिश नागरिकांचा अपमान केला असता तर मीहि त्याबद्दल तत्काळ (नुकसान भरपाई) मागितली असती. ब्रह्मी दरबारशीं आपले असलेले संबंध व त्या सरकारचें आपल्याशीं दीर्घकाळचें वागणें लक्षांत घेतां त्या सरकारकडून होणाऱ्या या पद्धतशीर तह-भंगाबद्दल आतां नुकसानी मागणें हिंदुस्थान सरकारला भाग पडलें. ब्रिटिश व्यापाऱ्यांनीं यासंबंधीं आपली रीतसर तक्रार आतां पुढें मांडली आहे.

हिंदुस्थान सरकारचा ज्या पौर्वात्य राष्ट्रांशीं संबंध आला त्यांत ब्रह्मी लोक हे अत्यंत उद्धट, गर्विष्ठ व अहंकारी आढळले.

....१८२५ च्या युद्धाच्या पूर्वी दिसत असे, तशी आज ब्रह्मी सरकारची वृत्ति दिसत आहे.

युरोपांतील टीकाकारांना ब्रह्मी जात ही कितीहि क्षुद्र वाटत असली तरी पूर्वेकडे त्यांना महाभयंकर समजतात. २५ वर्षांपूर्वी चितगांगकडे ते गेले असें समजतांच कलकत्त्याच्या बाजारांत घबराट निर्माण झाली. गेल्या युद्धाच्या वेळींहि ते आले अशा वदंतेने आसाम आराकान भाग भयव्याप्त झाला.

....मित्रत्वानें नुकसान भरपाई (Reparation) मिळण्याचे यत्न केले. पण व्यर्थ.....शेवटीं हिंदुस्थान सरकारनें पेगूवर स्वारी केली आणि कांहीं आठवड्यांत ब्रह्मदेशाचा किनारा आपल्या ताब्यांत घेतला....(तरीहि आव्हाच्या राजानें आमच्या मागण्याकडे दुर्लक्ष केलें).

......शेवटीं १८५२ मध्यें पेगूच्या राज्याचा ब्रिटिशांनीं ताबा घेतला. मनांत हेतु असा कीं, मागील अन्यायाची नुकसान भरपाई मिळावी आणि भावी कालांत ब्रह्मी सरकारनें स्वस्थ रहावें.

ब्रह्मदेशाशीं युद्ध संपल्यापासून आतां हिंदी साम्राज्यांत सर्वत्र शांतता आहे. ज्या शहाण्या माणसाला पूर्वेकडील घडामोडींची माहिती आहे तो असें भविष्य कधींहि करूं शकणार नाहीं कीं, आपल्या पूर्वेकडील प्रदेशांत सतत शांतता नांदेल. अनुभवानें, वारंवार येणाऱ्या विचित्र व ताज्या अनुभवानें असें शिकविलें आहे कीं आपल्याविरुद्ध बाहेरील युद्ध व अंतर्गत बंड

केव्हांहि सुरू होईल. कदाचित् जेथें तें होण्याची फार शक्यता कमी वाटते तेथेंच तें भडकेल व अत्यंत जुजबी साधनांनीं व अनपेक्षित पद्धतीनें त्याचा पसार होईल. कोणीहि माणूस, हिंदुस्थानांत सतत शांतता राहील असें निश्चिततेनें सांगू शकणार नाहीं. एवढें मात्र म्हणतां येईल कीं, परकीय सरकारकडून मोठा भयंकर हल्ला आपल्यावर यापुढें होणार नाहीं.

**अभ्यास** :—१ लॉर्ड वेलस्लीचें सूत्र कोणतें ? आंतरराष्ट्रीय दृष्टीनें तें कितपत योग्य वाटतें ? २. हिंदुस्थानांतील शांततेसंबंधानें डलहौसीचे विचार तुम्हांस कां पटतात किंवा कां पटत नाहींत तें सांगा. ३ ब्रह्मी सरकारचें वागणें चुकलें कीं बरोबर होतें ? चर्चा करा.

---

# ३५ : : : कंपनीचें शिक्षणविषयक धोरण

१९ जुलै १८५४

[ आपल्या देशाच्या ब्रिटिश राजवटींतील शैक्षणिक इतिहासांत 'वुड्सचा खलिता' फार महत्त्वाचा मानतात. त्यांत सर चार्लस् वुड, (नंतरचे लॉर्ड हॅलिफॅक्स), हे ईस्ट इंडिया कंपनीच्या बोर्ड ऑफ कंट्रोलचे अध्यक्ष होते. यांनीं हिंदुस्थान सरकारकडे आपली शिक्षणविषयक योजना पाठविली. इ. स. १८५३मध्यें कंपनीच्या सनदेची फेरतपासणी करण्यांत आली. त्यानंतर हा खलिता पाठविण्यांत आला. शिक्षणाचें कार्य हें सरकारचें कर्तव्य आहे असें ठरलें. प्रत्येक प्रांतांत शिक्षण-खात्याची मांडणी या खलित्याच्या आधारानें करण्यांत आली व तीच बैठक आजहि बव्हंशानें कायम आहे. मुळांतील खलित्यांत १००कलमें आहेत, त्यांतील कांहीं त्रोटक अवतरणें पुढें दिलीं आहेत. वुड्स एज्युकेशन डिसपॅच—एस्.एम्.टी. टी. कॉलेज (कोल्हापूर) एज्युकेशनल पॅम्प्लेट नं. १० वरून हा सारांश दिला आहे. ]

२. अत्यंत पवित्र कर्तव्यांपैकीं आमचें हें कर्तव्य आहे कीं, आमच्याजवळ असलेल्या साधनांनीं हिंदुस्थानांतील एतद्देशीय लोकांना उपयुक्त ज्ञानानें मिळणारे फायदे मिळवून द्यावे.

३. या कार्याला आम्ही विशेष महत्त्व देतों. कारण यामुळें केवळ अधिक बौद्धिक लायकी मिळते इतकेंच नव्हे तर त्याचा फायदा घेणारांची

नैतिक पातळीहि वाढते. त्यामुळें विश्वासाच्या जागीं काम करणाऱ्या नोकरांचा पुरवठा तुम्हांस व्हावा.

७. या शिक्षणाचा उद्देश हा आहे कीं प्रगत अशा कला-वाङ्मय, विज्ञान, तत्त्वज्ञान व युरोपीय वाङ्मयाचा, थोडक्यांत म्हणजे सर्व युरोपियन ज्ञानाचा प्रसार करावा.

१४. इंग्रजी समजणाऱ्यांना इंग्रजी माध्यमानें हें ज्ञान द्यावें, परंतु ज्यांना इंग्रजी येत नाहीं अशा वर्गाला देशी भाषांतून हें ज्ञान द्यावें. इंग्रजी येणारांनीं त्यांना प्राप्त झालेलें ज्ञान आपल्या देशबांधवांना आपल्या मायभाषेंतून द्यावें. या रीतीनें हळूहळू युरोपीय ज्ञान सर्व समाजाच्या आटोक्यांत यावें.

१७. यासाठीं आम्हीं ठरविलें आहे कीं, निरनिराळ्या प्रांतांच्या सरकारांनीं शिक्षण विभाग स्थापावा.

२४. आतां अशी वेळ आली आहे कीं हिंदुस्थानांत विद्यापीठें स्थापन करावी. त्यांनीं वाङ्मय विज्ञान शाखांतील तज्ज्ञांना लायकीनुसार पदव्या द्याव्या.

२५. लंडन युनिव्हर्सिटीची घटना आदर्श म्हणून पुढें ठेवावी.

२८. पदवी परीक्षांत धर्म हा विषय ठेवण्यांत येणार नाहीं. विद्यापीठाशीं संबंध असलेलीं कॉलेजें भिन्न भिन्न धर्मपंथांच्या नेतृत्वाखालीं असूं शकतील.

५१–५२. एतद्देशीयांच्या शिक्षणाचा प्रश्न योग्य साधनांच्या अभावीं एकट्या सरकारला सोडविणें अशक्य आहे हें जाणून....आम्हीं हिंदुस्थानांत ग्रँट-इन्-एडची पद्धति चालू करण्याचें ठरविलें आहे. ही पद्धति या देशांत (इंग्लंडांत) यशस्वी झालेली आहे.

५३. ही मदत देतांना शाळेंत दिल्या जाणाऱ्या धार्मिक शिक्षणांत ढवळाढवळ केली जाणार नाहीं.

६७ ....आमची इच्छा आहे कीं होईल तितक्या लवकर प्रत्येक इलाख्यांत शिक्षक विद्यालयें व शिक्षक वर्ग स्थापले जावे.

७९ ....मेडिकल कॉलेज व सिव्हिल इंजिनिअरिंग कॉलेजें स्थापण्यांत व चालविण्यांत आम्ही साहय देऊं.

८४. सरकारी संस्थांतून देण्यांत येणाऱ्या धार्मिक शिक्षणासंबंधीं बराच गैरसमज दिसतो ...... तेथील शिक्षण धर्मातीत राहील .....शाळेच्या

वेळां व्यतिरिक्त ख्रिस्तीधर्मासंबंधीं विद्यार्थ्यांनीं शिक्षकांना माहिती विचारली तर आमची हरकत नाहीं. अर्थात् हें अध्ययन दोन्ही बाजूनें ऐच्छिक राहील.

**अभ्यास** :—१. शिक्षणाचा उद्देश काय होता? तो काय असावा असें सांगितलें जातें? २. शिक्षण देण्याचें कर्तव्य कोणाचें? सरकारनें ग्रँट-इन्-एड (मदतीसाठीं देणगी) ही खाजगी संस्थांना सरकारी मदत देण्याची योजना कां स्वीकारली? ३. असे कोणते मुद्दे यांत आहेत कीं ज्यामुळें या खलित्याला विशेष महत्त्व दिलें जातें?

---

## ३७ : : नेपाळच्या जंगबहादुरास नानासाहेबांचें पत्र

शमीपूजन
का. न. केळकर पृ. १७३

३ फेब्रुवारी
१८५९

["काँग्रेसच्या जन्मापूर्वींहि चाळीस वर्षें होऊन गेलेली ही पहिली राष्ट्रीय चळवळ होती असा 'यंग इंडिया' पुस्तकांत लाला लजपतराय यांनीं इ. स. १८५७ च्या चळवळीबद्दल उल्लेख केला आहे...रंगून येथें बादशाहाच्या कबरीला साक्ष ठेवून नेताजींनीं सैनिकांना उद्देशून भाषण केलें कीं, "१८५७ च्या अपयशाचा आम्ही सूड उगवूं आणि त्याकरतां स्वत:चें आणि शत्रूचें रक्त सांडूं!" या क्षोभांतील मुख्य व्यक्तींपैकीं नानासाहेब यांचे कांहीं विचार उताऱ्यांत आहेत.

"१८५७ च्या डिसेंबरांत दुसरी कानपूरची लढाई झालीआणि १८५८ च्या मार्चमध्यें लखनौमध्यें बंडवाल्यांचा पराभव झाला... दि. ३१ डिसेंबर १८५८ रोजीं रापती नदीचे कांठीं इंग्रज व बंडवाले यांचा चुरशीचा सामना झाला. शेवटीं निरुपाय होऊन नदी-पलीकडच्या अरण्यांत पेशवे आपल्या सहकाऱ्यांसह बेपत्ता झाले. हा नेपाळचा प्रदेश होय. लखनौची बेगम, युवराज ब्रिजिस कादर या सर्वांच्या विचारें नेपाळ सरकारकडून आलेल्या बद्रिसिंगाजवळ पेशव्यानें पुढील पत्र दिलें. युवराज कादरनेंहि असेंच पत्र लिहिलें पण दोहोचाहि उपयोग झाला नाहीं." 'शमीपूजन' ग्रंथांतून वरील माहिती येथें घेतली आहे.]

"लखनौच्या बेगम साहेब यांना त्यांचेजवळ असलेले सर्व राजे, तालुक-

[५७

दार, शिपाई, आश्रित यासुद्धां आपण चित्तौन येथें भेट घेण्यास पत्रद्वारें विनंति केली, तो मजकूर विदित झाला. आपल्या महनीय औदार्याबद्दल आजवर आम्ही कर्णोपकर्णीं ऐकतच होतों तें समक्ष प्रत्ययाला येऊन फार आनंद वाटला. सर्व बावतींत इंग्रजांशीं आपला हितविरोध असतां त्यांनाहि आपण मदत केली ! हें पाहून असें मनांत आलें कीं, आजवर अनेक उदार राजे यापूर्वी हिंदुस्थानांत झाले व आजहि आहेत, पण त्यांना आपली तुलना नाहीं. यावरूनच भरंवसा वाटतो कीं, येथील सर्व परिवारांसह आम्ही चित्तौनला आपल्या भेटीस निघून आलों तर आपण आपला उदार आश्रय आम्हांस नाकारणार नाहीं ! आतां जगांत आपणांशिवाय आम्हांस दुसरा आधार नाहीं ! इंग्रज सरकारनें आजवर इतके तहनामे मोडले आणि इतक्या वचनांना हरताळ फासला आहे कीं, त्याचा येथें पुनरुच्चार करण्याचें कारण नाहीं. आणि त्यांनीं अखेर लोकांचा धर्महि बुडविण्याचा प्रयत्न केला म्हणून तर विद्रोह उत्पन्न झाला ! येथून निघण्यापूर्वी आमचे बंधु श्रीमंत महाराजा गंगाधरराव ऊर्फ बाळासाहेब पेशवे यांनीं स्नेहभावाचें पत्र पाठविलेंच आहे. तरी आपल्या इच्छेप्रमाणें ते आपली भेट घेऊन आपणांशीं योग्य ती चर्चा करतीलच."

---

## ३८ : : : 'मी बंडखोर नाहीं'

शमीपूजन
पृ. १०४

७ मे
१८५९

[इंग्रज सेनापति होप ग्रँटला पाठविलेल्या पत्रांत नानासाहेब लिहितो.]

...पुणें व सातारा ही जहागीर परत मिळाल्याशिवाय आम्हीं शस्त्र खालीं ठेवणार नाहीं. हिंदुस्थानचें राज्य गिळंकृत करून उलट मलाच बंडखोर (outlaw) ठरविण्याचा इंग्रजांना काय अधिकार पोहोंचतो ?

**अभ्यास** :—या सर्व पत्रांवरून या क्रांतिकारकांचे काय हेतू होते तें सांगा ? नेताजींनीं या प्रसंगाची आठवण आपल्या आझाद सैनिकांना कां करून दिली ?

---

## ३९ : : : राणी व्हिक्टोरियाचा जाहीरनामा

[१, नोव्हेंबर १८५८.–कीथ भाग १, पृ. ३८२.]

आजपर्यंत विश्वस्त म्हणून आमचे वतीनें सन्मान्य ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्थानांतील प्रदेशाचा जो राज्यकारभार चालविला तो, पार्लमेंट सभागृहांत जमा झालेल्या सरदार, धर्मगुरु व सन्मान्य नागरिक यांचे मतानुसार व मान्यतेनुसार नानाविध महत्त्वाच्या कारणांसाठीं आमच्या हातीं घेण्याचें आम्हीं निश्चित ठरविलें आहे.

आम्ही असें जाहीर करतों कीं, सन्मान्य ईस्ट इंडिया कंपनीच्या अधिकारान्वयें व आधिपत्याखालीं एतद्देशीय संस्थानिकांशीं जोडलेले राजनैतिक संबंध व केलेले करारमदार आम्हीं मान्य केले आहेत व ते आमचेकडून काळजीपूर्वक राखले जातील; व त्यांच्याकडूनहि ते तसेच टिकविले जातील अशी आमची अपेक्षा आहे.

सध्यां आमच्या अमलाखालीं असलेल्या प्रदेशाची वाढ करण्याची आमची इच्छा नाहीं; आणि जसें आमच्या वसाहतींवर व हक्कांवर आक्रमण झाल्यास त्याची क्षमा केली जाणार नाहीं तसें दुसऱ्यांच्या वसाहती व हक्क यांजवर आम्ही अतिक्रमण करणार नाहीं. आमच्याप्रमाणेंच एतद्देशीय संस्थानिकांचे हक्क, त्यांचा दर्जा व मानमान्यता यांचा आम्ही आदर करूं; आणि अंतर्गत शांतता व सुव्यवस्था यांमुळेंच फक्त साध्य होणारा सामाजिक विश्वास व उत्कर्ष ते व आमचे प्रजाजन या दोघांनाहि व्हावा अशी आमची मनीषा आहे.

ज्या कर्तव्यबंधनांनीं आम्ही आमच्या इतर प्रजाजनांशीं बांधलेले आहोंत त्याच बंधनांनीं हिंदुस्थानांतील रहिवाशांशींहि आम्ही निगडित आहों, आणि ईश्वराच्या आशीर्वादानें आम्ही तीं बंधनें विश्वासपूर्वक व न्यायबुद्धीनें टिकवूं.

ख्रिश्चन धर्माच्या सत्यतेवर आमचा संपूर्ण भरंवसा आहे. त्या धर्मामुळें आम्हांस मनःशांति मिळते हें कृतज्ञतापूर्वक मान्य करतों. परंतु आमचीं हीं मतें आमच्या प्रजाजनांपैकीं कोणावरहि लादण्याची आमची मुळींच इच्छा नाहीं.

धार्मिक श्रद्धा व धार्मिक आचार या कारणांसाठीं कोणाचाहि पक्षपात होऊं नये, कोणालाहि उपद्रव वा अस्वस्थता पोहोचूं नये व कायद्याचें समान व निःपक्षपाती संरक्षण सर्वांसच मिळावें अशी आमची--राणीसाहेबांची इच्छा आहे व हाच आमचा आनंद आहे असें आम्ही जाहीर करतों.

आमच्या हाताखालील अधिकाऱ्यांना आम्हीं असें सवत बजावतों व आज्ञा करतों कीं, आमच्या आत्यंतिक अवकृपेचें दुःख होऊं नये म्हणून त्यांनीं आमच्या कोणाहि प्रजाजनाची धार्मिक श्रद्धा किंवा पूजाअर्चा यांमध्यें ढवळाढवळ करण्यापासून अलिप्त रहावें.

आणि अशी आमची आणखी इच्छा आहे कीं, आमच्या प्रजाजनांना मग ते कोणत्याहि जातीचे वा पक्षाचे असोत, जर शिक्षण, कर्तबगारी व प्रामाणिकपणा यामुळें नोकरींतील कर्तव्यें योग्य रीतीनें पार पाडण्याची पात्रता आली असेल तर सरकारी नोकरींत सहज व निःपक्षपातीपणानें प्रवेश मिळावा.

खोटा प्रचार करून व बंडाला प्रवृत्त करून आपल्या देशबांधवांची दिशाभूल करणाऱ्या महत्त्वाकांक्षी लोकांच्या कृत्यांनीं हिंदुस्थानभर ओढवलेली दुःस्थिति पाहून आम्हांस फार दुःख वाटत आहे. रणक्षेत्रावर बंडाचा बीमोड करून आम्हीं आमचें सामर्थ्य प्रत्ययास आणलेंच आहे, आतां अशा रीतीनें दिशाभूल झालेल्या व पुनः कर्तव्याच्या मार्गाकडे वळण्याची इच्छा करणाऱ्यांना क्षमा करून आमचें दयालुत्व दाखविणें ही आमची इच्छा आहे.

ज्यांच्यावर ब्रिटिश प्रजाजनांचा खून करण्यामध्यें प्रत्यक्ष भाग घेतल्याचा आरोप आला आहे किंवा येण्याची शक्यता आहे त्यांच्याशिवाय इतर सर्व अपराध्यांना आमच्याकडून क्षमा केली जाईल. खुनी इसमावर दया दाखविण्यास मात्र आमची न्यायबुद्धि आम्हास मनाई करीत आहे.

सरकारविरुद्ध शस्त्र उचलणाऱ्या इतर सर्वांचे व्यक्तिशः आमच्या विरुद्ध, राजपदाविरुद्ध व आमच्या दर्जाविरुद्ध झालेले अपराध--ते आपल्या घरीं येऊन शांततेचें व्यवहार सुरू करतील तर--विसरून सरसकट बिनशर्त माफ करण्याचें वचन आम्ही जाहीर करीत आहों.

ईशकृपेनें अंतर्गत शांतता प्रस्थापित होईल तेव्हां हिंदुस्थानांतील उद्योगधंद्यांना उत्तेजन देणें, जनतेच्या उपयोगाच्या व सुधारणेच्या कामांना

प्रोत्साहन देणें आणि हिंदुस्थानांतील आमच्या प्रजाजनांच्या फायद्यासाठींच हिंदुस्थानचा राज्यकारभार चालविणें अशी आमची मनापासून इच्छा आहे. त्यांचा उत्कर्ष हेंच आमचें सामर्थ्य, त्यांचें समाधान हेंच आमचें संरक्षण व त्यांची कृतज्ञता हेंच आमचे सर्वोत्कृष्ट बक्षीस होय! आणि आमच्या लोकांच्या हितासाठींच आमच्या इच्छा शेवटास नेण्याचें सामर्थ्य आम्हाला व आमच्या हाताखालील अधिकारी वर्गाला तो सर्वशक्तिमान ईश्वर देवो ही प्रार्थना!

**अभ्यास** :—१ सत्तावनच्या दंगलीनंतर शांतता प्रस्थापित करण्यासाठीं काढलेला हा जाहीरनामा या दृष्टीनें त्याचें पृथक्करण करा. २ 'हा जाहीरनामा सुराज्याचें आश्वासन आहे, स्वराज्याचें नव्हे' विवेचन करा.

---

## ४० : : : राणू रावजीची आत्मकथा : मुद्रणाच्या पहिल्या धडपडी

[ कै. राणू रावजी आरू (इ. स. १८४८–१९२२) हे नामांकित पंचीगार ऊर्फ पंचमेकर होऊन गेले. त्यांचें चरित्र मुंबईच्या छापखान्याच्या धंद्याशीं निगडीत झालें आहे. त्यांनीं जी आत्म-कथा निवेदन केली ती श्री. दत्तशर्मा देवधर यांनीं लिहून काढली; ती पुणें मुद्रकसंघातर्फे प्रसिद्ध होणाऱ्या "मुद्रण प्रकाश" या नियतकालिकांत (वर्ष १ लें अंक १।२ मध्यें) इ.स. १९३८ सालीं प्रसिद्ध झाली. त्यांतून अंक १ पृ.१३–१४ व अंक २ पृ.६५–६६ वरून पुढील उतारे घेतले आहेत.]

१८५७ सालच्या बंडाच्या वेळीं आमचें आळें हें होळकर शाहीचें गांव इंग्रजांनीं आपले ताब्यांत घेतलें. त्या वेळचे धांगडधिंग्यामुळें आमची फारच गंमत उडे. आम्ही रानावनांत गुरें वळण्यास गेलों असतां सोजीर पाहिला कीं ते धरतील सवरतील या भीतीनें आम्ही दडत असूं. पण, ईश्वरकृपेनें या संकटांतून आम्ही लवकरच मुक्त झालों! कारण तीनच दिवसांनंतर सर्वत्र स्थिरस्थावर झालें.

* * *

[ ६१

आमचा एक धनी बनारजी नामें पारशी गृहस्थ होता. त्याचा दारूचा पिठ्ठा असून, त्यावर कोठें साफसूफ करणें, दारूचे पेले धुणें वगैरे जें जें काम तो मला सांगे तें तें मी लक्ष लावून करीत असे. त्याला दोन मुलगे होते. पुढें ते स्टेशनवर फिटर असतां कांहीं दिवस त्यांचा फराळाचा डबा पोंचविण्याचें काम करीत असे. त्याबद्दल मला ३ रु. मिळत. तेव्हां स्वस्ताई असल्या-कारणानें मला माझे पोटाला पुरण्याजोगतें हें उत्पन्न होतें. साधारणपणें त्या वेळचा बाजरीचा भाव २ रुपये फरा, तांदूळ ३।४ रुपये फरा (फऱ्याचा हिशोब मुंबईमापी १६ व देशरानच्या ८ पायल्या आहे) असे; व दूध, तूप व तेल अनुक्रमें १ रुपयास ८ शेर, १॥ शेर व ८ शेर होतें. भायखळ्याच्या बाजूला तर त्या वेळीं वस्तीहि झालेली नव्हती; त्यामुळें सोबत करून राहणें म्हणजेच घरभाड्यादाखल समजलें जाई.

* * *

मला येथें मिशनरी लोकांच्या उद्योगप्रियतेबद्दल मोठी प्रशंसा करावीशी वाटते. याचें कारण त्यांनीं मोठें धाडस करून व संकटें सोसून आणि नाना देशाटनें करून येथील लोकांची व एकंदर परिस्थितीची माहिती करून घेतली, व एतद्देशीय भाषांचें ज्ञान संपादन करून घेऊन त्यांनीं तें आपल्या राष्ट्रांत नेऊन पसरिलें. त्यांच्या उद्योगामुळेंच जगांतील अनेक भाषांचे टाईप व छापखाने प्रथम सुरू झाले असें म्हणण्यास हरकत नाहीं. याचें कारण त्यांची ख्रिस्ती धर्मप्रसाराची तळमळ व त्यासाठीं वेगवेगळ्या भाषांतून बायबल छापून प्रसिद्ध करण्याचें वेड हें होय. पण त्यामुळें आम्हांस मात्र एक फायदा झाला. आमचे देशांत छापण्याची कला नवीन आल्यामुळें आम्हांसहि आमचे वेद, ग्रंथ, पुराणें, शास्त्रें, कला, काव्यें इत्यादि छापून काढतां आलीं.

* * *

मी जावजीच्या* टाईप फाउंड्रींत असतांना मला स्वतःला पंच घासण्या-विषयींचा फार निदिध्यास लागला होता. पण या फाउंड्रींत मला इतर कामेंच फार असल्यामुळें फारसा वेळ मिळत नसे; व म्हणून मी पंच घासण्याचें काम स्वयंस्फूर्तीनें घरींच करूं लागलों. मला या गोष्टीची संथा माझा आद्य गुरु टॉमस ग्राहाम याचेपासून प्रथम मिळाली. खरोखर हा त्याचा मजवर मोठा

* 'निर्णयसागर' टाइपफौंडरी व प्रेसचे मूळ मालक.

प्रसाद होय; व पुढें पुढें मी त्याचें स्मरण करून आपलें काम येईल तसतसें करूं लागलों. यानंतर मला कामानेंच शिकविलें म्हटलें तरी चालेल.

ज्याप्रमाणें महाभारतांत एकलव्य नामक व्याधानें द्रोणाचार्यास आपला मनोमय गुरु करून धनुर्विद्येंत त्यांचा प्रसाद म्हणून प्रावीण्य मिळविलें, त्याचप्रमाणें मीहि टॉमस यास मनोमय गुरु करून या विद्येंत प्रावीण्य संपादन केलें. पंच घासण्याच्या कामाची मला पुढें पुढें इतकी गोडी लागली कीं चालू नोकरी सोडून केवळ पंच करण्याचाच अभ्यास वाढावा म्हणून मी इ. स. १८६९ सालीं जावजीची नोकरी सोडून मुंबई समाचार नांवाच्या पारशाच्या छापखान्यांत ३० रुपयांच्या जागेवर आपला प्रवेश करून घेतला. येथें मी सुमारें वर्ष-सहा महिने असेन. तितक्या अवधींत मी टाईप पाडणें, घासणें, मेट्रिसा फिट करणें वगैरे कामावरच होतों. पण मला माझ्या आवडीची वस्तु जी पंच करणें त्यास वेळ मिळेना म्हणून मी तेथीलहि नोकरी सोडून पुण्यास ज्ञानप्रकाश छापखान्यांत टाईप फाउंड्रींत नोकरी धरली. सन १८७१ मध्यें मला येथें दरमहा २० रु. पगार होता, तरी मला येथें काम शिकण्यास मिळेल म्हणून तेवढ्यावरहि राहाण्यास मी तयार झालों.

**अभ्यास**:—१. अर्वाचीन युगांतील नवे धंदे सुरू करणारांचीं चरित्रें जमवा. २. त्या वेळचे पगार व बाजारभाव यांची सद्यःस्थितीशीं तुलना करा.

---

## ४१ : : : लॉर्ड मेयोचा खून

{ २६ फेब्रुवारी १८७२

हिंदु पेट्रियट पत्राचा अग्रलेख }

[ इंग्रजी राज्यांत वृत्तपत्रांवर पुष्कळ वेळीं नियंत्रणें असत. कित्येक वेळां राज्यकर्त्यांस सावधगिरीचा इषारा देतांना मोठ्या कुशलतेनें आपले विचार प्रकट करावे लागत. प्रस्तुत छोटा उतारा तत्कालीन संपादकीय करामतीचा एक नमुना म्हणून पुढें दिला आहे. —मुजुमदार, पृ.९३]

इंग्रजांच्या शिस्तशीर राज्यांत आपल्या महत्त्वाकांक्षेस आतां वाव उरला नाहीं म्हणून कांहीं असंतुष्ट आत्मे हळहळत असतील. या राज्यांत वाघ आणखी गाय (आपला वैरभाव विसरून) एकाच ओढ्यावर पाणी

पितांना आढळतील, इतका राज्यकर्त्यांचा सर्वांस दरारा आहे. अशा स्थितींत कदाचित् कांहीं असंतुष्ट गट मनांतून राणीचें राज्य उलथून पडावें अशी इच्छाहि करीत असतील. परंतु खरें म्हटलें तर हे सर्व असंतुष्ट आत्मे व गट नुसती घुंगुरटीं आहेत. यांनीं कदाचित् चावा घेतला तरी तेवढयानें कांहीं गंभीर प्रश्न उत्पन्न होण्याचें कारण नाहीं. राष्ट्रपुरुषाचे चित्तांत यामुळें कांहीं अन्यथा विचार आला असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं. देशाचें हृदय शाबूत असून आपलें काम करीत आहे. शिपायांच्या बंडासारख्या अग्निदिव्यांतूनहि तें सहीसलामत बाहेर पडलें. प्रस्तुत मरहूम मेयोसाहेबांचा खून झाला याबद्दल आम्हांस वाईट वाटतें; परंतु या खुनासारखे प्रकार हे ब्रिटिश राज्यकर्त्यांबद्दल जनतेच्या ज्या भावना आहेत त्यांचें निदर्शक होत, असें कुणी मानील तर आम्हांस अधिकच वाईट वाटेल.

**अभ्यास** :—कायद्याच्या काटेकोर मर्यादेंत राहून प्रामाणिकपणानें आपलें मत व्यक्त करून जनतेस राष्ट्रीय विचाराचें बाळकडू पाजणाऱ्या तत्कालीन वृत्तपत्रीय भाषेचा काळजीपूर्वक अभ्यास करा. अशा सफाईदार लेखांचा संग्रह करा.

---

## ४२ ‘बंड व विद्वत्ता’: १८५९मधील ज्ञानप्रकाशाचें मत

[इंग्रजी राज्य सुरू झाल्यावर मराठींत वृत्तपत्रें निघूं लागलीं. परंतु १२ फेब्रुवारी, १८४८ ला निघालें व आजहि चालू आहे असें मराठी वृत्तपत्र म्हणजे पुण्याचा ज्ञानप्रकाश होय. त्यानें १०१ व्या वर्षांत पदार्पण केल्याच्या आनंदाबद्दल, १२ फेब्रुवारी १९४९ ला सर्वपक्षीय समारंभ पुण्यास करण्यांत आला. प्रारंभीं हें वृत्तपत्र शिळाप्रेसवर छापलेलें असे. गुरुवार ता. १७ मार्च सन १८५९ च्या अंकांतील ४ थ्या पृष्ठावरील पहिल्या स्तंभाचा ठसा पुढें दिला आहे. त्या वेळीं पृष्ठाचा आकार—१२″×९″ असून प्रत्येक पृष्ठांत २ स्तंभ व एकूण अंक ४ पृष्ठांचा असे. १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धाची तत्कालाला अनुरूप अशी चर्चा या अंकांत आलेली आहे. हा लेख २॥ पृष्ठें म्हणजे जवळजवळ निम्मा अंक झालेला आहे.]

विलायतेत डब्लीन ह्मणून एकराजधानी आहे, तेथील कालेजांत कायदे शिकविणारे प्रोफेसर यांणीं आपले विद्यार्थ्यांस असा प्रश्न केला कीं, हिंदुस्थानांत नानासाहेब व दुसरे विद्वान नेटीवलोंक यांणीं बंडाचे समयीं जी वर्तणूक केली त्यावरून सरकारानें नेटिवासंसुधारणुके करतां विद्याशिकवावी किंवा नाहीं, या विषयाचे उत्तर तुह्मीकारण सहित. द्यावें. आता विलायती उत्तर विलायतेत कायहोईल ते पाहावें. परंतु अह्मास वाटते कीं, हिंदुस्थानांत बंड झालें त्यांतही काहीलोक सरकारानें विद्वान केले होते, ह्मणूनच त्यांस मलिकामा आजमा राणीचा जाहिरनामा ह्मणजे कितीं महत्वाचा आहे, हे समजून हजारो लोक राणीच्या जाहिरनाम्या प्रमाणें शरण आले व येतील, आतां बंडज्यानीकेले ते लोक विद्वानांत गणनीय नाहित, बरे आतां हे लोक तरी कितीहोते याकडे लक्षदिले असतां हिंदुस्थानातील सर्व प्रजा मिळूना अठरा कोटीआहे, त्यांतून अशा प्रकारचे लोक एक लक्षास अठाविसांच्या आंतच आहेत.

## ४३ : कायदे मंडळांत बिनसरकारी लोकांचा प्रवेश

[सर चार्ल्स वुडचें हाऊस ऑफ कॉमन्समधील भाषण, ६ जून १८६१. —बानर्जी, भा. २ पृ. २३–२४ व ३१.]

युरोपियन लोकांना हिंदी लोकांसंबंधीं कांहीं वर्षांपूर्वी संपूर्ण विश्वास वाटत असे तो आतां वाटेनासा झाला आहे. पूर्वी कांहीं झालें तरी वरचे बडे अधिकारी व असंख्य हिंदी जनता यांच्यांत वैराची भावना नसे. किंबहुना बहुजन समाजास सरकार हें आपलें पाठीराखें आहे असें वाटत असे. जर कांहीं विरोध किंवा मत्सर असलाच तर तो इंग्रज वसाहतवाले व कांहीं इंग्रज अधिकारी यांच्याविषयीं वाटत असे. कारण जनता व हे (इंग्रज) लोक यांच्यांत प्रत्यक्ष हितविरोध उत्पन्न होत असे. जेव्हां कांहीं दिवसांपूर्वी माझ्या असें लक्षांत आलें कीं हितविरोधाची भावना ही बहुजन समाजांत खालपर्यंत व अधिकारी वर्गांत वरपर्यंत जाऊन पोहोंचली आहे तेव्हां मला त्याबद्दल फार वाईट वाटलें. कारण आपल्या राज्याच्या स्थैर्याच्या दृष्टीनें हें सुचिन्ह नव्हे. मी या मुद्यावर फार विस्तार करीत नाहीं परंतु आपल्या राज्यकारभारावरील संकटाकडे डोळेझांक करणें मूर्खपणाचें होईल हें जाणून आपण आपल्या राज्यकारभाराच्या संस्था स्थिर पायावर उभारणें हें आपलें कर्तव्य आहे.

आपण जर कायदे करण्याच्या कामांत बड्या हिंदी लोकांना सहकारी करून घेतलें तर त्यापासून मोठे फायदे होतील. एक तर त्यांच्या देशाच्या राज्यकारभारांत त्यांना अजीबात वगळलें अशी जी त्यांची आजपर्यंतची भावना आहे ती नाहींशी होईल व हे बडे हिंदी लोक आपल्या राज्याशीं हलके हलके समरस होतील. (हिंदी लोक असलेल्या) कौन्सिलास एखाद्या वादसभेचें स्वरूप द्यावें असा माझा हेतु नाहीं. माझा उद्देश या लोकांच्या हातीं एक कायदे करणारी संस्था द्यावी एवढाच आहे. गव्हर्नर जनरलचें कार्यकारी मंडळ व हे सभासद यांनीं मिळून बनलेलें हें कायदेमंडळ सर्व हिंदुस्थानसाठीं कायदे करील. प्रांताप्रांतांतून कायदे करणारीं छोटी मंडळें अस्तित्वांत आणावीं अशी माझी सूचना आहे. परंतु या (वरिष्ठ) कायदेमंडळास त्यांच्या बरोबरीनें सर्वत्र लागू पडणारे कायदे करण्याचा अधिकार असावा असें माझें मत आहे.

**अभ्यास** :—हिंदुस्थानांत कायदेमंडळें स्थापन करण्याची इच्छा इंग्रजांना कोणत्या कारणानें झाली ?

## ४४ : : : मल्हारराव गायकवाड बडतर्फ

[ हिंदुस्थान सरकारचा जाहीरनामा, १९ एप्रिल १८७५.
—मूकर्जी ५८३।५८४]

संबंधित अशा सर्वांस :—

वडोदे संस्थानांतील ब्रिटिश सरकारचे माजी प्रतिनिधि कर्नल फेयर सी. बी. यांवर विषप्रयोग करण्याच्या प्रयत्नाला महाराजांनीं प्रोत्साहन दिलें या आरोपाच्या सत्यत्वाबद्दल चौकशी करतां यावी आणि महाराजांना या आरोपांतून सोडवणूक करून घेण्याची प्रत्येक संधि दिली जावी म्हणून ब्रिटिश सरकारनें राजे मल्हारराव गायकवाड यांना आपल्या अधिकाराची अंमलबजावणी करण्यास तात्पुरता प्रतिबंध करून बडोदा संस्थानचा राज्यकारभार तात्पुरता आपल्या हातीं घेतला आहे.

चौकशी मंडळानें कामकाज संपविल्यानंतर महाराणीसाहेबांच्या सरकारनें बडोदा संस्थानचीं राज्यसूत्रें मल्हारराव होळकर यांचे हातांत द्यावींत कीं नाहीं याचा विचार केलेला आहे.

चौकशीमंडळामध्यें मतभेद झाल्याकारणानें महाराणीसाहेबांचे सरकारनें आपला निर्णय चौकशी मंडळाची चौकशी वा अहवाल यांवर आधारलेला नाहीं किंवा चौकशीचा निर्णय राजेसाहेबांवरील आरोपाची सत्यता सिद्ध करतो असेंहि गृहीत धरलेलें नाहीं.

राजे मल्हारराव गायकवाड यांची कुप्रसिद्ध गैरवर्तणूक, संस्थानच्या राज्यकारभारांतील अव्यवस्था, आवश्यक सुधारणा घडवून आणण्याच्या कामांतील त्यांची दिसून आलेली अपात्रता आणि मल्हारराव गादीवर आल्यापासून आतांपर्यंत बडोद्याच्या कारभारासंबंधीं सर्व प्रसंग ध्यानांत आणून तसेंच राजेसाहेबांस पुन्हा सत्ताधिष्ठित करणें बडोद्याच्या नागरिकांच्या हिताच्या दृष्टीनें घातक ठरेल व वडोदे संस्थान व ब्रिटिश सरकार यांमध्यें जे संबंध राहणें अवश्य आहे ते टिकविण्याचे दृष्टीनें विसंगत होईल म्हणून महाराणीसाहेबांचे सरकारनें असा निर्णय घेतला आहे कीं, राजे मल्हारराव यांना बडोद्याच्या सार्वभौमपदावरून काढून टाकण्यांत येईल आणि ते व

त्यांचे वंशज यांना त्याबाबतचे सर्व हक्क, मान व विशेष अधिकार लाभण्यापासून प्रतिबंध केला जाईल.

तदनुसार ' हिज एक्सलन्सी व्हाइसरॉय आणि गव्हर्नर जनरल इन कौन्सिल ' यांनीं राजे मल्हारराव गायकवाड यांना बडोद्याच्या सार्वभौमपदावरून बडतर्फ केलें आहे आणि ते किंवा त्यांचे वंशज यांना त्याबाबतचे सर्व हक्क, मान आणि विशेष अधिकार लाभण्यापासून प्रतिबंध केला आहे.

बडोदे संस्थानमधून देण्यांत येणारी योग्य साधनसामुग्री व नेमणूक ज्या ठिकाणीं ते व त्यांचें कुटुंब राहूं शकतील अशी हिंदुस्थान सरकारनें मान्य केलेली हिंदुस्थानांतील जागा पसंत करण्याची परवानगी मल्हारराव यांस देण्यांत येईल.

राजे खंडेराव गायकवाड यांनीं १८५७ सालीं केलेल्या राजनिष्ठेच्या कामगिरीची जाणीव व्यक्त करण्याच्या इच्छेनें प्रेरित होऊन, बडोदे संस्थानांत एतद्देशीय राज्यव्यवस्था प्रस्थापित करण्यासाठीं म्हणून, ज्याची हिंदुस्थान सरकारनें बडोदे संस्थानचें सार्वभौमपद घेण्यास योग्य मनुष्य म्हणून निवड केली असेल अशा गायकवाड घराण्यांतील एका व्यक्तीस दत्तक घेण्याची परवानगी राजे खंडेराव गायकवाडाचे विधवा पत्नीस तिच्या विनंतीवरून देतांना दयाळू महाराणीसरकार यांना आनंद वाटत आहे. दत्तकास बडोद्याचें सार्वभौमपद देतांना, बडोद्याचे गायकवाड आणि हिंदुस्थानसरकार यांमध्यें विद्यमान असलेल्या करारमदारांत कांहींहि फरक केला जाणार नाहीं, आणि ११ मार्च १८६२ रोजीं अर्ल कॅनिंगच्या सनदेनें बडोद्याच्या गायकवाडांना जे हक्क व ज्या सवलती दिल्या आहेत ते सर्व आतांच्या गायकवाडराजास मिळतील.

---

## ४५ : : प्रिन्स ऑफ वेल्स यांस 'अनावृत' पत्र

कलकत्त्याचा हिंदु पेट्रियट } { २७-१२-१८७५.

[ इ. स. १८७५ सालीं राणी व्हिक्टोरियांचे ज्येष्ठ चिरंजीव एडवर्ड--नंतरचे सातवे एडवर्ड--हिंदुस्थानांत आले त्यांस उद्देशून : —मुजुमदार, पृ. १०५ ]

....*आपल्याला ४ महिन्यांत सर्व देश हिंडून कितीशी लोकस्थिति कळणार? त्यांतच आपण जेथें जातां तेथें सरकारनें आधींच सजावट करून सर्व रस्ते इ. आकर्षक केलेले असतात. अर्थात् आपण पहातां तो सर्व कृत्रिम वरवरचा देखावा आहे, खरा नव्हे. आपण समजाल कीं संपत्ति व श्रीमंती या देशांत उतू चालली आहे. परंतु वस्तुस्थिति अगदीं उलट आहे. राणीच्या राज्याविरुद्ध लोकांची तक्रार नाहीं. परंतु तिनें काढलेल्या जाहीरनाम्याविरुद्ध येथील अधिकाऱ्यांची वागणूक पाहून लोकांना दुःख होतें. नुसतीं शृंगारलेलीं शहरें पाहून भुलून जाऊं नका, आमच्या देशांतील दुःस्थितीचें तीं शहरें निदर्शक नव्हेत. इंग्लंडांत परत जाल तेव्हां तुमच्या व आमच्या मातोश्रींनाहि ही गोष्ट सांगा की जें जें चकचकीत तुमच्या नजरेस पडलें तें सारें सोनें नव्हतें. आमची तक्रार आपल्या घराण्याविरुद्ध नाहीं. येथील राज्यपद्धतीबद्दल आहे. आपल्या आगमनाप्रीत्यर्थ हिंदुस्थाननें लाखो रुपये खर्च केलेले आहेत, आणि जर यामुळें महाराणी व्हिक्टोरिया, आपण व राज्याधिकारी यांचे मनांत कांहीं सक्रिय सहानुभूतीचा उदय झाला तर या पैशाचा पूर्ण मोबदला मिळाला असें हिंदुस्थानला वाटेल.

आपणास दीर्घायुष्य व आरोग्य लाभो !

**अभ्यास** :—इ. स. १८७५ च्या सुमारास हिंदुस्थानांत पडलेल्या दुष्काळाची माहिती मिळविल्यास या अग्रलेखांतील विचारांचा समर्पकपणा बरोबर लक्षांत येईल.

---

* प्रारंभीं प्रिन्स ऑफ वेल्सचें गुणवर्णन केल्यावर हा मजकूर लिहिलेला आहे.

---

## ४६ : : : : रशियाचें साम्राज्यवादी धोरण

हिंदु पेट्रियट } { २० नोव्हेंबर १८७५.

[ कम्युनिस्ट रशियाच्या प्रसाराबद्दल आज विशिष्ट गटांत हाकाटी चालू असतां सुमारें ७० वर्षांपूर्वींचा रशियाच्या परराष्ट्रीय धोरणासंबंधींचा प्रस्तुत उतारा वाचकांस मनोरंजक वाटेल. कित्येक तर असें म्हणतील कीं झारशाही गेली, कम्युनिझम आला, परंतु रशियाचा मूळ स्वभाव कायम राहिला.—मुजुमदार, पृ. १०९. ]

....परंतु त्यावरोबरच रशियाच्या पूर्वेकडील आक्रमणाकडे आपण डोळेझांक करतां कामा नये. तुर्कस्थानांत नुकत्याच झालेल्या बंडाळीच्या बुडाशीं रशियाचा हात असला पाहिजे. या बंडाचा एकंदर इतिहास पाहातां व आज तुर्कस्तानांत केवढ्या मोठ्या प्रमाणावर युद्ध चालू आहे याचा विचार करतां त्याच्या बुडाशीं रशियाचें कारस्थान आणि रशियाचें चातुर्य व हत्यारबल हींच असलीं पाहिजेत असा तर्क वाहातो. आणि आतां तर रशिया उघड उघड तुर्कस्तान काबीज करण्याची भाषा बोलूं लागला आहे !

पूर्वेकडील प्रदेशांतहि रशिया स्वस्थ नाहीं. काबूलच्या अमीरास आपल्या कक्षेंत गोवण्याचा त्याचा प्रयत्न आहे..... या आंतरराष्ट्रीय परिस्थितींत युरोपियन राष्ट्राचें धोरण काय असणार ? इंग्लंडनें प्रशियाकडे आपलें तोंड वळविलें आहे, परंतु जर्मन राष्ट्रांनीं आपला थांगपत्ता अद्याप लागूं दिला नाहीं.

अशा स्थितींत आम्हां हिंदवासीयांचें कर्तव्य स्पष्ट आहे. पूर्वेकडील प्रदेशांतील ब्रिटिश सत्तेच्या स्थैर्यासाठीं झटणें हें आपलें कर्तव्य आहे. आपलें भवितव्य इंग्रजांशीं निगडीत झालें आहे. हिंदुस्थानांत इंग्रज सरकारनें केलेल्या कांहीं कायद्यांविरुद्ध आम्हीं क्वचित् कठोर टीका करूं. तसेंच इंग्रजांच्या संस्थानिकांच्या संबंधाच्या, व सर्वसामान्य जनतेबाबतच्या दृष्टिकोनाबद्दल नापसंती व्यक्त करूं. परंतु इंग्रजी अंमलाच्या स्थैर्यावरच या देशांतील शांतता, सुव्यवस्था व प्रगति हीं अवलंबून आहेत. या राज्याबद्दल कांहीं लोक असंतुष्ट आहेत हें आम्हांस माहीत आहे, परंतु त्यांना किंवा त्यांच्यां-

तील सर्वांत असंतुष्ट इसमासहि राज्यकर्त्यांत बदल व्हावा असें वाटत नाहीं, याची शंका नको. इंग्रज जाऊन रशियन आले तर तेवढ्यानें त्यांचीं दुःखें नाहींशीं होणार नाहींत हें त्यांस पक्कें माहीत आहे. रशियानें हा देश जिंकावा असें कोणासच वाटत नाहीं. परंतु रशियन अस्वलाची धडक जवळ आल्यास ब्रिटिश सिंहाच्या मनाचा, क्वचित् विसर पडलेला जन्मजात मोठेपणा जागृत होईल ( व त्या मोठेपणामुळें राज्यकर्त्यांचें हिंदुस्थानाबाबतचें धोरण बदलेल) एवढें मात्र त्यास वाटत असावें! तें कसेंहि असो, आम्ही आपल्या देशबांधवांस स्वच्छ बजावूं इच्छितों कीं, इंग्रज राष्ट्राच्या कल्याणप्रद अंमलाखालीं प्रजेस आज जे हक्क व कायदे मिळत आहेत तसे कोणत्याहि युरोपियन राष्ट्राच्या अंमलाखालीं मिळणार नाहींत. हिंदुस्थानच्या तुकड्या-साठीं ब्रिटिश सिंह व रशियन अस्वल यांची झुंज होणार नाहीं अशी आम्हांस आशा आहे. परंतु यदाकदाचित् तो दुर्दिन उगवलाच तर आमचें कर्तव्य स्पष्ट आहे. हिंदी संस्थानिक व प्रजा ब्रिटिश निशाणाखालीं एकत्र होतील व मास्कोवाल्यांस हांकून लावतील. सर्व बाजूंनीं विचार केला तर इंग्रजांना न्याय व निःपक्षपातीपणा यांची जेवढी मनापासून आवड आहे तेवढी युरोपांत कोणत्याहि राष्ट्रास नाहीं यांत शंका नाहीं.

**अभ्यास** :—वरील लेखांत संपादकांनीं आपली राज्यकर्त्यांबद्दलची राजनिष्ठा कशी कौशल्यानें व्यक्त केली आहे तें पाहण्यासारखें आहे. इंग्रज जाऊन रशियन नको हें स्पष्ट म्हटलें; पण इंग्रज जाऊन स्वातंत्र्य प्राप्त झालें तर तें इष्ट कीं अनिष्ट याबद्दल कांहींच म्हटलेलें नाहीं. किंबहुना तें न म्हणतांच कळावें असा लेखकाचा रोख असावा.

---

## ४७ : गव्हर्नर जनरल व भारतमंत्री यांचे संबंध

[ रिपनचें पत्र. तारीख २४ मे १८८१. लॉर्ड रिपन हा हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल होण्यापूर्वी इ. स. १८६६ सालीं कांहीं महिने हिंदुस्थानचा भारतमंत्री होता, यामुळें त्यास साहजिकच दोन्ही कामांचा अनुभव होता—बानर्जी, भा. २, पृ. ४३-४४.]

....मी पूर्वी भारतमन्त्री होतों त्या काळांत व आज गव्हर्नर जनरल व इंडिया ऑफिस यांच्या परस्पर संबंधांत फारच फरक झालेला आहे. त्या काळांत लंडन येथून हिंदुस्थानवर अंमल करणें ही गोष्ट चुकीची मानली जात असे. त्या वेळीं सर्वांस असें वाटे कीं भारतमंत्र्यांनीं राज्यकारभाराचीं धोरणें बांधून द्यावींत, पण तीं अमलांत आणण्याचा तपशील गव्हर्नर जनरलच्या हातीं सोंपवावा. जोंपर्यंत गव्हर्नर जनरल भारतमंत्र्यांच्या धोरणाबाहेर जात नाहीं तोंपर्यंत त्यास हवें तेवढें स्वातंत्र्य द्यावें व भारतमंत्र्यानें त्याचा पाठपुरावा करावा. परंतु अलीकडे अनेक कारणांनीं विशेषतः तारायंत्रासारखीं दळणवळणाचीं साधनें वाढल्यानें नवीनच राज्यपद्धति अस्तित्वांत येत आहे. अलीकडे इंडिया ऑफिस हिंदुस्थानच्या कारभारांत कितीतरी हात घालतें; पण एकंदरींत गेल्या वर्षाचा अनुभव जमेस धरतां घडून आलेला बदल फायदेशीरच आहे.......मात्र अलीकडे हर्टिंग्टन (भारतमंत्री) यांस हिंदी प्रश्नाखेरीज इतर अनेक प्रकरणें संभाळावीं लागत असल्यानें त्यास हिंदी प्रश्नांकडे पुरेसें लक्ष देण्यास फावलें नाहीं, यामुळें अनेक बाबतींत इंडिया ऑफिसमधील लोकांनीं आपल्याच मनाप्रमाणें सर्व कारभार चालविलेला दिसतो !

**अभ्यास** :—'तारायंत्रामुळें हिंदी राज्यकारभारांत घडून आलेला बदल फायदेशीरच आहे' असें वर म्हटलें आहे. फायदेशीर कोणाच्या दृष्टीनें ? तुम्हांस हें मत मान्य आहे काय ?

## ४८ : : : स्थानिक स्वराज्याचा हेतु

[ लॉर्ड रिपनचा भारतमंत्र्यास खलिता : २५ डिसेंबर १८८२
—ब्रानर्जी भा. २, पृ. ४४–४७]

सध्यां देशांत वाहणाऱ्या वाऱ्याकडे वरवर नजर टाकली तरी असें दिसून येईल कीं हा देश एका मोठ्या स्थित्यंतरांतून जात आहे. शिक्षण फैलावत आहे. वर्तमानपत्रें प्रभावी होत आहेत. व्यक्तिनिष्ठ राज्यपद्धति जाऊन त्या ठिकाणीं कायद्याचें राज्य प्रस्थापित झालें आहे. रेल्वे व तारायंत्राचा प्रसार, युरोपशीं वाढतें दळणवळण, पाश्चिमात्य विचारांचा संघर्ष या सर्वांमुळें लोकांत स्थित्यंतर घडून येत आहे. नव्या कल्पना, नव्या आकांक्षा प्रत्यहीं उदय पावून लोकमत प्रभावी होत आहे. अशा वेळीं आपल्यासारख्या एकतंत्री सरकारनें कोणतें धोरण ठेवावें हा प्रश्न आहे. या नव्या मनूबरोबर वेगानें पुढें जाणें हें धोक्याचें ठरेल. परंतु अजिबात मागें राहणें तर फारच विघातक ठरणार आहे.

अशासारखे विचार लक्षांत घेतां, सध्यां मी सुचवीत असलेली योजना ही अल्पशी असली तरी लोकांच्या वाढत्या आशा-आकांक्षांना वाव देण्याच्या दृष्टीनें फारच उपयुक्त ठरेल. या योजनेनें लोकांचें राजकीय शिक्षण होईल व त्यांना प्रातिनिधिक संस्थांची कल्पना येईल. इतकेंच नव्हे तर शिक्षणानें वाढत जाणाऱ्या पात्रतेप्रमाणें लोकांची अधिकाधिक राजकीय प्रगति होण्याची सोयहि या योजनेंत आहे. जनतेस आपल्या देशाच्या राज्य-कारभारांत सुजाणपणें अधिकाधिक भाग घेण्याचें शिक्षण देणें हें येथील इंग्रजी अंमलाचें योग्य असें ध्येय असलें पाहिजे; किंवहुना सध्यांच्या हिंदु-स्थानच्या राजकीय स्थितींत याहून अधिक उच्च ध्येय मला आढळत नाहीं.

हिंदुस्थान सरकारपुढें सध्यां दोन मार्ग आहेत. एक शिक्षण व मुद्रण-स्वातंत्र्य यांच्या साहृयानें जनतेस स्वराज्यास अधिकाधिक पात्र करण्याचा; दुसरा, मुद्रणस्वातंत्र्यास विरोध करून व शिक्षणाच्या प्रगतीचा संकोच करून जनतेस राज्यकारभारापासून शक्यतों दूर ठेवण्याचा. एक प्रगतीचा मार्ग आहे तर दुसरा दडपशाहीचा आहे. लॉर्ड लिटननें दडपशाहीचा मार्ग स्वीकारला.

मी जाणून बुजून पहिला मार्ग स्वीकारला असून त्याचे परिणाम काय होतील याबाबत भविष्यकाळावर माझा पूर्ण विश्वास आहे.

**अभ्यास** :—हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत उदारमतवादी व दडपशाहीचें धोरण ठेवणारे जे गव्हर्नर जनरल आलटून पालटून आले त्यांची नांवें सांगा व त्यांच्या धोरणांचें समीक्षण करा.

---

## ४९ : : : १८९६ चा दुष्काळ

[ केसरी–अग्रलेख ता. २४–११–१८९६ ]

महाराणी साहेबांची जी इच्छा आहे कीं, दुष्काळांत कोणीहि उपाशी मरूं नये, तो सफल होण्यास फारशी अडचण पडणार नाहीं. सरकारची व लोकांची इच्छा या बाबतींत एकच आहे; व असल्या प्रसंगीं दोघांचें कर्तव्यहि एक असल्यामुळें परस्पर विरोध येण्याचा संभव नाहीं. तथापि कित्येक प्रसंगीं सरकार काय करणार, किंवा सरकारनें काय केलें पाहिजे, याचा लोकांस चांगलासा बोध नसल्यामुळें त्यांस जागच्या जागीं उपाशी मरण्याचा प्रसंग येतो. उदाहरणार्थ, आपण कामगारांची स्थिति घेऊं. फॅमीन रिलीफ कोड कलम १५१ यांत असें सांगितलें आहे कीं, साळी व कोष्टी यांस दुष्काळ कामगिरीवर खडी फोडण्यास न सांगतां त्यांच्याकरितां त्यांच्या धंद्याचीं कामें काढून त्यांस मदत करावी; व जरूर पडल्यास थोडीबहुत फुकटहि मदत द्यावी. हें कलम सरकारनें नगर, सोलापूर, विजापूर व नाशिक या जिल्ह्यांस लागू केलें आहे, व तेथील कलेक्टरांस याप्रमाणें हुकूमहि गेले आहेत. परंतु कलेक्टर नुसत्या हुकुमानें काय करणार? पैशांच्या मंजुरीखेरीज साळ्यांकरितां कामें त्यानें कोठून काढावीं ? यासाठीं लोकांस ही गोष्ट मुद्दाम समजावून सांगून जेथें कोष्टी रिकामे पडले असतील तेथें त्यांची

फॅमीन रिलीफ कोडांतील कलम १५१ प्रमाणें ठिकठिकाणच्या पुढाऱ्यांनीं खटपट केली पाहिजे.* सरकार झालें तरी देवाप्रमाणें आहे. तें आपण होऊन कांहीं बोलत नाहीं, त्यांस कौल द्यावा लागतो; व कौल लावण्यास गुरवाची जरूर लागते व थोडासा धूपहि जाळावा लागतो. करितां फॅमीन रिलीफ कोड लोकांनीं नीट समजावून घेतल्याखेरीज गरीब लोकांच्या जिवाचा कधींहि पूर्ण बचाव व्हावयाचा नाहीं; व येवढ्याचसाठीं पुणें सार्वजनिक सभेनें "दुष्काळ निवारण्याचे मार्ग" या नांवाचें एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध करून त्यांत आपल्या हलक्या पगाराच्या नोकरांकरितां, शेतकऱ्यांकरितां, कारागिरांकरितां व शेतकीच्या जनावरांकरितां सरकार काय करीत आहे व काय करणार आहे याची थोडक्यांत माहिती दिली आहे. हें पुस्तक मागवून घेऊन जर ठिकठिकाणच्या पुढारी लोकांनीं आपापल्या तालुक्यांतील किंवा गांवांतील लोकांस माहिती करून दिली तर गरिबांचे जीव बचावल्याचें अंशतः तरी श्रेय त्यांच्या पदरीं पडेल. लोकांनीं दुसरें असें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, असले भयंकर दुष्काळ खाजगी धर्म केल्यानें कधींहि टळत नाहींत. जेथें हजारो कोस प्रदेश व लाखों लोक दुष्काळानें ग्रासले, तेथें एखादा धर्मात्मा फुकट अन्नछत्र काढून काय करणार ? हीं अन्नछत्रें काढूं नयेत असें आमचें बिलकूल म्हणणें नाहीं. उलट ज्यास धर्म करण्याची शक्ति आहे त्यांस आमची अशी सूचना आहे कीं, हल्लींच्या सारखा लोकांस मदत करण्याचा प्रसंग क्वचितच येतो व (येऊंहि नये); सबब असल्या प्रसंगीं सर्वांनीं यथाशक्ति धर्म करून गरिबांचें संरक्षण केलें पाहिजे. परंतु येवढ्यानें कांहीं होत नाहीं. खरी तजवीज सरकारकडूनच झाली पाहिजे; व ती सरकार खुषी असलें तरी त्यांच्या हातून करवून घेणें हें पुष्कळ अंशीं लोकांच्या हातांत आहे हें लोकांनीं कधींहि विसरतां कामा नये; व येवढ्याच करितां आम्हीं केसरींतून त्यांस पुनः पुनः इशारा करीत आहों.

—केसरीतील निवडक लेख, भाग १, पृ. ५८२

**अभ्यास** :—आज स्वातंत्र्यप्राप्तीनंतरहि अशा उद्योगाची आवश्यकता आहे कीं नाहीं ? चर्चा करा.

---

* 'सोय करविली पाहिजे' असें पाहिजे.

## ५० : : : प्लेगचा आरंभ

[ केसरी, लेख ता. ६–१०–१८९६ ]

हल्लीं जी मुंबईस भयंकर तापाची सांथ चालू आहे तिच्या संबंधानें वाचकांस कांहीं माहिती देण्याचा आमचा विचार आहे. मांडवी हा मुंबई शहराचा एक फार दाट वस्तीचा व बराच गलिच्छ भाग आहे. तेथील लोकवस्ती सुमारें ३७,००० आहे. तेथें धान्याच्या मोठाल्या वखारी आहेत व गुजराथी, वाणी व भाटे लोकांची वस्ती फार आहे. सात मजली मोठ्या हवेल्या बहुतेक मालांनीं भरलेल्या व ज्यांत हजार हजार लोक राहतात अशा मोठाल्या चाळींहि तेथें बऱ्याच आहेत. वाणी व भाटे यांच्याशिवाय बोहरी, खोजे व इतर मुसलमान लोक, देशावरील व कोंकणांतील मराठे, कुणबी वगैरे लोकांचीहि तेथें बरीच वस्ती आहे. हा भाग बहुतेक मुंबई बेटाच्या पूर्वदिशेकडील असल्यामुळें पश्चिमेकडून वाहणाऱ्या समुद्र वायूचा याला फारसा फायदा मिळत नाहीं. कारण ह्या शहराच्या पश्चिमेकडे असणारा अरबी समुद्र व हा भाग यांच्या दरम्यान शहराचा बराच भाग डोंगराप्रमाणें आडवा पडून राहिला आहे. ह्या भागांतील गटारें जुन्या चालीचीं असल्यामुळें त्यांतून मैलापाणी खळखळा वाहून जात नाहीं. बराच दाट मैला गाळाच्या रूपानें तळाला सांचून राहतो. म्हणून ह्या प्रदेशांत फिरणाराला गटाराची दुर्गंधी बरीच अनुभवास येते. दाट वस्तीच्या मुंबई शहराचा अति दाट भाग, गलिच्छ लोकांची वस्ती, समुद्रवायु यथेच्छ न मिळणें, गटाराची वाईट स्थिति इत्यादि अनेक कारणें लक्षांत आणलीं म्हणजे, हल्लींची सांथ प्रथम मांडवी येथेंच कां सुरु झाली हें कळून येईल. शिवाय परदेशांतून व्यापारासंबंधानें व्यापारी गलबतें लागण्याची जागाहि ह्या प्रदेशापासून जवळच असल्यामुळें लांब लांब देशांतील संसर्गजन्य विकारांचा संपर्कहि प्रथम ह्याच प्रदेशांतील लोकांस घडणें साहजिकच आहे; व हल्लींची सांथ मुंबईस बाहेरून म्हणजे हांगकांग किंवा बगदादकडून आली असावी असें कित्येकांचें मत आहे. हल्लीं जो मुंबईस ताप सुरू आहे त्याला

७६ ]

इंग्रजींत प्लेग किंवा ब्युबॉनिक फीव्हर हें नांव आहे. हा रोग फार प्राचीन काळीं इकडे माहीत होता किंवा नाहीं हें खात्रीनें सांगतां येत नाहीं.

—केसरींतील निवडक लेख भाग १ ला, पृ. ५७४.

**अभ्यास :**—हा सर्वच लेख टिळकांच्या माहितीपूर्ण विवेचनाची साक्ष पटविणारा आहे.

---

## ५१ : : : 'पन्नास वर्षांपूर्वींचें पुणें'

[ पुणें येथील सुप्रसिद्ध दैनिक सकाळनें 'पन्नास वर्षांपूर्वीचें पुणें' या नांवाची एक लेखमाला इ. स. ४ मार्च ते ८ जुलै १९३९ पर्यंत प्रकाशित केली. याविषयासंबंधीं भिन्न धर्माच्या भिन्न व्यवसायाच्या व परंपरेच्या १७ स्त्री–पुरुषांच्या मुलाखती या पत्रानें प्रसिद्ध करून तत्कालीन समाजस्थितीचीं चित्रें लोकांपुढें कौशल्यानें मांडलीं आहेत. त्यांतील २४ जून १९३९ च्या अंकांतील मुलाखतीचा कांहीं भाग पुढें दिला आहे. प्रारंभीं सकाळचा प्रतिनिधि लिहितो. :

"रंगूबाईंचें वय आज कमींत कमी ९५ वर्षांचें असून जुन्या काळच्या गोष्टी त्यांच्या मनापुढें एखाद्या चलच्चित्रपटाप्रमाणें अगदीं ताज्या आहेत.

रंगूबाई जवळ जवळ दीड तास बोलत होत्या. त्या काळच्या सुशिक्षितांत मिल स्पेन्सरचा प्रचार असल्यामुळें त्यांच्या आठवणींत पाश्चात्य संस्कृतीचीहि आठवण होते. परंतु रंगूबाईच्या जगांत निर्भेळ पुण्याच्या आठवणी आहेत. त्यांत राजकारण, समाजकारण यांचा संपर्क नाहीं. बहुजन समाज आणि त्यांतून स्त्रीसमाज कसा रहात असे याचें वर्णन त्यांच्याकडे मिळतें. रंगूबाईंची मुलाखत आटोपून उठतांना मला पन्नास वर्षांपूर्वींचें पुणें भेटलें असें वाटलें." ]

रंगूबाई म्हणाल्या "आमच्या सोमवारांत त्या वेळीं एका मारवाड्यानें दोन मुलें मारलीं होतीं. तीं कां मारलीं हें कांहीं समजलें नाहीं, पण मोठीं गोंडस दिसणारीं अशीं तीं मुलें होतीं येवढें मला स्मरतें. तीं दुपारीं खेळत असतांना त्यांचेवर या मारवाड्यानें आरशानें प्रकाश पाडला आणि त्यांचें लक्ष आपल्याकडे वळवून घेतलें व घरांत या म्हणून मुलांना बोलावून नेलें. तेथें त्यांना तोंडांत बोळा देऊन मारण्यांत आलें असें सांगतात. पुढें हीं दोन्ही मुलें सांडल्याचा जेव्हां ओरडा झाला तेव्हां या मारवाड्यानें या मुलांचीं प्रेतें एका पेटाऱ्यांत घालून तो रेल्वे स्टेशनवर चालला होता. परंतु याच वेळीं त्याला पकडण्यांत आलें व असें क्रूर कृत्य केल्याबद्दल त्याला शनिवारवाड्या-पुढें फांशीं देण्याची शिक्षा झाली होती.

## ढोलक्यानें फांशीची वर्दी

पहाटे पांच वाजतां ही फांशीं देण्याची वेळ असे. या मारवाड्याला फांशी देण्याचा दिवस गांवांत ढोलकें वाजवून जाहीर केला होता व आमच्याच पेठेंत हा गुन्हा झाला असल्यामुळें आम्हीं बायकाहि पण फांशी पाहण्यास गेलों होतों.

शनिवारवाड्याच्या मोठ्या दरवाज्याजवळ उंच फळ्या मारून त्यावर या फासासाठीं दोन खांब रोवले होते व या खांबांमध्यें असलेल्या आडव्या दांडीला एक दोर लोंबत असून त्याला एक पांढरी पिशवी लाविली होती. पहाटेची वेळ असूनहि त्या वेळींहि फांशी पाहण्यासाठीं शनिवारवाड्यापुढें चिक्कार गर्दी लोटली होती व कांहीं बायकाहि आपलीं लहान लहान मुलें कडेवर घेऊन या मारवाड्याची फांशी पाहण्यासाठीं आल्या होत्या. एका गोऱ्या साहेबानें हत्यारबंद शिपायांचे पहाऱ्यांत या मारवाड्याला आणलें व एकदम फळीवर चढविलें. थोड्या वेळानें दोरीला लावलेली पांढरी पिशवी त्याचे गळ्यावर चढविली व त्याला खालचे खड्ड्यांत लोटून दिलें. त्यानंतर त्याचा कोणताच भाग आम्हाला दिसला नाहीं. फाशीची दोरी मात्र सारखी हलत होती. त्यावरून हा मनुष्य तडफडून मरत असावा येवढी मात्र चांगली कल्पना येत होती.

* * * *

## घरकामासाठीं तीन वाजतां उठावें लागे

त्या काळीं बायकांना उजाडेपर्यंत झोपून राहतां येत नसे. घरांत कामें करण्यासाठीं त्यांना पहाटें तीन वाजतां उठावें लागे व प्रथम दळण घरींच करावें लागे. चार वाजेपर्यंत प्रत्येक घरांत गाण्याचे सूर व जात्याची घरघर त्या वेळीं ऐकूं येई व चार वाजले कीं, बायका पाण्यासाठीं बाहेर पडत. कारण ५॥ वाजण्याचे आंत निदान ब्राह्मणेतर बायकांना तरी पाणी उरकावें लागे.

त्या वेळीं प्रत्येक पेठेंत दोन तरी हौद असत व या दोन हौदांवर सर्व पेठेचें पाणी भरणें चाले. या हौदांवर ५॥ वाजतां ब्राह्मण पुरुष स्नानासाठीं येत व त्या वेळीं मात्र बायकांनीं तिकडे फिरकावयाचें नाहीं, येवढेंच काय पण ब्राह्मणेतर पुरुषांनीं तेथें पाण्याला किंवा आंघोळीला जावयाचें नाहीं असा परिपाठ असे व तो आळीकर मंडळी मोठ्या आस्थेनें पाळीत. ब्राह्मण मंडळी देवाची प्रार्थना करण्यासाठीं हें करतात व त्यांना हें करूं दिल्यानें आपणालाहि पुण्य लागतें असें सर्वांना वाटे, म्हणून कोणी त्या वेळीं ब्राह्मणांचे वाटेसच जात नसत. ८॥ च्या सुमारास ब्राह्मण मंडळी हौदावरून जात व मग सर्व जातींचे या हौदावर पाणी भरणें वगैरे व्यवहार चालत असत. त्या वेळीं सदासर्वकाळ पुण्यांतील हौदांतून पाणी वहात असे व हे हौद दर महिन्याला वर्गणी काढून स्वच्छ केले जात.

विधवांना या हौदांवर पाणी भरण्यास परवानगी नसे व ब्राह्मण स्नान करीत असतांना कोणीहि विधवेनें समोर जावयाचें नाहीं असा नियम असे. संध्याकाळीं ५॥ वाजतां पण ब्राह्मण अर्घ्य देण्यासाठीं या हौदांवर येत, त्या वेळींहि हाच नियम पाळला जाई.

* * * *

## पैशाच्या कवड्यांत बाजारहाट

त्या वेळीं कवड्या व्यवहारासाठीं बाजारांत चालत व या कवड्या घेऊन शनिवारवाड्याच्या जवळच्या बाजारांत मुलें विक्रीसाठीं बसत. एका पैशाला त्या वेळीं ९६ कवड्या मिळत व तेवढ्या कवड्या घेऊन बाजारांत

केवढ्या तरी वस्तु विकत घेतल्या जात. एका पैशांत या कवड्यांच्या सहाय्यानें वाण्याकडचे रोजचे जिन्नस विकत घेतां येत असत.

त्या वेळीं शनिवारवाड्यापुढें भाजीची मंडई असे व तेथें भाजी घेऊन, वाण्याच्या दुकानांतील जिन्नस घेण्यासाठीं मंडळी मोती चौकांत येत. तेथून फडक्यांच्या हौदापर्यंत दुतर्फा वाण्याचीं दुकानें असत. मोतीचौकापासून बुधवारचौकापर्यंत त्या वेळी पासोड्यांचीं दुकानें असत व या ठिकाणीं खेडेगांवांतून विणकर मंडळी आपल्या पासोड्या आणून विक्रीसाठीं मांडीत. इतर कापडबाजार बोहरी आळींत असे.

* * * *

## भजनाचे अड्डे

भजनाचे अड्डे फार मोठमोठाले असत व तालीमबाज मंडळी हे भजनाचे अड्डे फार उत्तम चालवीत. त्या वेळीं बुवांवर लोकांची फार भक्ति असे व कांहीं मंडळी तर त्या वेळीं बुवांचे सेवेसाठीं जाऊन राहात. त्या वेळीं जंगली महाराज फार मोठे बुवा होते व त्यांचीच समाधी आज ८० फूट रस्त्यावर बांधली आहे. ते रोकडोबाचे देवळांत रहात व ज्ञानेश्वरी वगैरे उत्तम समजावून सांगत. बरीच ब्राह्मण मंडळीहि त्यांचे भजनीं होती.

* * * *

## संगीत सत्यनारायणाची सुरुवात

रामाचारी नांवाचे गाजलेले कीर्तनकार त्या वेळीं होते. त्यांचें कीर्तन ऐकावयास फार गर्दी जमे. हे कीर्तनकार पूर्वी तमाशे करीत, पण त्यांनीं पुढें कीर्तन करावयास सुरुवात केली.

रामाचारी यांनींच प्रथम संगीत सत्यनारायण करावयास सुरुवात केली. त्यांना फार लोक कीर्तनास बोलावीत व त्यांचे कीर्तनाला बरीच गर्दी जमे.

त्या वेळीं बायका बाहेर पडावयाच्या म्हणजे पहाटे पाण्यासाठीं व कधींतरी देवदर्शनासाठीं होय. आजच्या सारख्या रस्त्यांतून बायका फिरतांना फारशा दिसत नसत. बाहेर काय चाले तें आम्हांला पुरुष सांगतील त्या वेळीं कळे.

बायका रस्त्यानें जाऊं लागल्या कीं त्यांना गर्दीतहि पुरुष वाट देत. त्या पहाटे पाण्याला जाऊं लागल्या कीं अंगणांत अगर रस्त्यावर झोपलेली मंडळी डोक्यावर पांघरूण ओढून घेऊन झोंपत. कोणी बायकांचेकडे पाहण्यानें त्यांना उपसर्ग पोचेल असें त्यांना वाटे व ते मोठ्या अदबीनें वागत.

**अभ्यास** :—'रंगूबाईच्या वेळचें पुणें व आजचें पुणें' यांत दिसून येणाऱ्या फरकावर चिकित्सक टिपण करा. रंगूबाईच्या मुलाखतींतील कोणत्या गोष्टी ऐकीव असतील व कोणत्या विश्वसनीय असतील, याची छाननी करा.

---

## ५२ : : : 'राणी सरकारचा जयजयकार'

[ केसरी, ता. २२ जून १८९७. अग्रलेख शेवटचा भाग ]

वास्तविक म्हटलें म्हणजे ही वेळ हिंदुस्थानांत तरी ज्युबिली करण्याची नव्हे असें कोणासहि खास वाटल्यावाचून राहणार नाहीं. आम्हीं दीन प्रजेनें देखील आमच्या महाराणी सरकारचा गौरव केला पाहिजे खरा, पण तो केव्हां ? कांहीं तरी सुबत्ता असतांना. हिंदुस्थानसरकारचे हुकूमहि थोडेबहुत अशा प्रकारचे आहेत, परंतु खालील अधिकाऱ्यांच्या फाजील इच्छेनें लोकांवर कांहीं ठिकाणीं निरर्थक खर्चाचा बोजा बसत आहे हें कांहीं चांगलें नाहीं. राज्यकर्त्यांचें प्रजेसंबंधानें जें एक कर्तव्य आहे तें घडून न आल्यामुळें आमच्या जवळील जपानांत तीस वर्षांत जी सुधारणा झाली नाहीं ती आमच्या दुर्दैवानें आमच्या शहाण्या राज्यकर्त्यांच्या सांठ वर्षांच्या अमदानींतहि आम्हांस मिळाली नाहीं. करितां चक्रवर्तिनी श्री महाराणी व्हिक्टोरिया यांस आमची हिंदुस्थानांतील लोकांच्यातर्फे अशी प्रार्थना आहे कीं, त्यांनीं या महोत्सवाचे प्रसंगीं आपल्या या हिंदुस्थानवासी प्रजेस कांहीं तरी अधिक हक्क देऊन उत्कर्षाच्या मार्गास लावावें. इंग्रजी राज्याचा विस्तार मोठा आहे व त्याच्या राज्य-

'छत्राखालीं मोठ्या आनंदानें रहाण्यास आम्ही तयार आहोंत. पण मग अर्थातच राणीसरकारच्या इतर प्रजेप्रमाणेंच राज्यांत कोठें गेलें तरी आम्हांसहि हक्क असले पाहिजेत. महाराणी सरकारचीं जर आम्ही लेकरें आहोंत तर एका भागांतील लेकरें दुर्दैवी व दीन आणि दुसऱ्या भागांतील श्रीमंत व उर्मट कां असावीत हें आम्हांस कळत नाहीं. इंग्रज लोकांच्या ज्या वसाहती आहेत तेथेंहि आम्हांस येण्यास लोक प्रतिबंध करूं लागले आहेत. हा भेदाभेद जोंपर्यंत राहील तोंपर्यंत इंग्रजी सार्वभौम राज्याची घडी कधींहि नीट बसावयाची नाहीं. महाराणी सरकारास हें तत्त्व मान्य आहे हें त्यांच्या १८५८ सालच्या जाहीरनाम्यावरूनच सिद्ध होत आहे. तरी चाळीस वर्षांत त्या जाहीरनाम्यांतील तत्त्वांची किती अंमलबजावणी झाली हें पाहून या महोत्सवाचे प्रसंगीं महाराणीसरकार दयाळू होऊन जर त्यांची पुरी अंमलबजावणी करण्यास सांगतील तर तीस कोट लोकांच्या उत्कर्षाचा पाया घातल्याचें श्रेय त्यांस मिळेल. इतकेंच नव्हे, तर इंग्रजी सार्वभौम राज्यास त्यामुळें अधिक बळकटी येऊन तें अधिक चिरस्थायी होईल. ईश्वर करो आणि या मोठ्या उत्सवाचे प्रसंगीं महाराणी श्री व्हिक्टोरिया यांस अशा प्रकारची बुद्धि होऊन त्यांची अंमलबजावणी त्यांच्याच हातून घडून येवो अशी आम्हां सर्वांची प्रार्थना आहे. हिंदुस्थानास जर कांहीं आशा असली तर हीच आहे, व ती श्री व्हिक्टोरिया राणीसरकार दीर्घायु होऊन त्यांच्या हातें सफल व्हावी असें आमचें ईश्वराजवळ मागणें आहे.

—केसरींतील निवडक लेख, खंड १ ला, पृ. ६६२

**अभ्यास** :—कायद्याच्या मर्यादेंत राहून निर्भीड लेखन कसें करावें याचा हा लेख उत्तम नमुना आहे.

———

## ५३ : : : बंगालची फाळणी

[ केसरी, ता. १५–८–१९०५ ]

**अभिनवमदलेखाश्यामगंडस्थलानाम् ।**
**न भवति बिसतंतुर्वारणं वारणानाम् ॥**

**—भर्तृहरि**

शिरोभागीं निर्दिष्ट केलेल्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें परकीय राजसत्तारूपी हत्ती ह्या देशांत जेव्हां मदोन्मत्त होऊन सर्वत्र संचार करूं लागतो तेव्हां लोकमताच्या बिसतंतूचें त्याच्यापुढें कांहीं एक चालत नाहीं. संमतीवयाचे कायद्याचें उदाहरण ढळढळीत आमच्या डोळ्यांपुढें आहे; आणि गेल्या सोमवारीं कलकत्त्यास झालेल्या प्रचंड सभेमुळें तोच प्रश्न पुन्हां उद्भवला आहे. बंगाल प्रांताची वांटणी करून बंगाली भाषा बोलणारें राष्ट्र जरासंधाप्रमाणें विभागून टाकल्याचें श्रेय बलभीम कर्झन घेण्यास उद्युक्त झाले आहेत, किंवा त्यांनीं घेतलें आहे असें म्हटलें तरी चालेल. एकभाषा बोलणारे, एका आचारविचाराचे किंवा अनेक शतकें एकत्र राहिल्यानें एकमेकांशीं ज्यांचें दळणवळण अधिक दृढ आहे अशा प्रकारचे लोक एका लेफ्टेनंट गव्हर्नरच्या किंवा गव्हर्नरच्या सत्तेखालीं असल्यास त्यापासून राष्ट्राची अभिवृद्धि चांगली होते हें तत्त्व सर्वमान्य आहे. लॉर्ड कर्झन यासहि हें तत्त्व मान्य नाहीं असें नाहीं. उलट त्यांचें असें म्हणणें आहे कीं, याच तत्त्वाच्या जोरावर आम्ही बंगाल प्रांताचे दोन विभाग करीत आहों. परंतु कर्झन साहेबांची ही कोटी चुकीची आणि मानभावीपणाची असून त्यांचा अंतस्थ हेतु किंवा कारणें याहून भिन्न असावीं ही गोष्ट आकाशांतील सूर्याप्रमाणें आतां सर्व लोकांच्या ढळढळीत नजरेस आलेली आहे. लपंडावाची वेळ आतां उरलेली नाहीं, किंवा त्यानें कोणी फसूनहि जाणार नाहीं. शंभरांपेक्षां अधिक वर्षांच्या इंग्रजी शिक्षणानें बंगाली लोक इंग्रजी रीतीची चळवळ करण्यास शिकले आहेत, व यांची संघशक्ति जर अशीच कायम ठेविली तर यांच्या चळवळीस जोर मिळून पुढें मागें कदाचित् तिचा पगडा सरकारावरहि बसण्याचा संभव आहे. हा परिणाम लॉर्ड कर्झन यांस नको आहे. या बलभीम व्हाइसरॉयास

सर्व हिंदुस्थानभर रावणाप्रमाणें एकटेंच अनियंत्रित नाचावयास पाहिजे आहे आणि त्यांच्या राजकीय कारकीर्दीचें धोरण असें आहे कीं, आपणांसच नव्हे तर आपल्यामागून येणाऱ्या अनेक व्हाइसरॉयांसहि पादाक्रांत केलेल्या या देशावर उच्छृंखल रीतीनें आपल्याप्रमाणेंच सदैव नाचतां यावें ! सारांश, हिंदुस्थानच्या लोकांनीं राष्ट्रीय अस्तित्व कधींच संपादूं नये, किंवा संपादल्यास तें इतकें नेभळें असावें कीं, सिव्हिल सर्व्हिस, गव्हर्नर किंवा व्हाइसरॉय यांनीं लोकांच्या कल्याणाकरितां भरतभूमीवर ज्या तांडव नृत्यास सुरुवात केली आहे त्यास यत्किंचित्हि अडथळा न येतां हा कालभैरवाचा नाच हल्लींच्या प्रमाणेंच सदैव चालू रहावा ! या नाचांत पायाखालीं तुडविल्या जाणाऱ्या लोकांस ही स्थिति संमत नाहीं, हें सांगावयास नकोच. बंगाल्यांतील लाखों लोकांस जी गोष्ट पसंत नाहीं—आणि ही गोष्ट कोणती तर बंगाली भाषा बोलणारे जिल्हे फोडावयाचे एवढीच—ती जुलमानें, सक्तीनें आणि आग्रहानें त्यांच्यावर लादून त्यांचा जीव घेण्याचा प्रयत्न करणें हें निर्दयपणाचेंच नव्हे तर मुत्सद्द्याच्या दृष्टीनेंहि अत्यंत असमंजसपणाचें कृत्य होय.

—केसरींतील निवडक लेख, भाग ३ रा, पृष्ठ १.

**अभ्यास** :—बंगालची फाळणी त्या वेळीं अमान्य असतांना स्वातंत्र्य मिळतांना ती कां मान्य करावी लागली याची मीमांसा करा. याचे परिणाम काय झाले आहेत ?

---

## ५४ : : : स्वतंत्र मतदारसंघाचा उगम

['लेडी मिंटो' यांची दैनंदिनी १ ऑक्टो. १९०६. लॉर्ड मिंटो यांचें ना. आगाखानांना उत्तर : यांतील निवडक भाग—बानर्जी भा. २ पृ. १३०].

"आपल्या मागणीचा मी असा अर्थ समजतों कीं जेथें जेथें मतदानाचा अधिकार लोकांस द्यावयाचें हें ठरविलें आहे अशा कोणत्याहि प्रातिनिधिक पद्धतीमध्यें, मग ती पद्धत म्युनिसिपालिटी, डिस्ट्रिक्ट बोर्ड, किंवा कायदेकौन्सिल यांपैकीं कशासहि लागू असो, मुसलमान समाजास समाज म्हणून प्रतिनिधित्व मिळालें पाहिजे असा दावा आपल्या भाषणांत आपण मांडला आहे. तुम्ही असें दाखवून दिलेलें आहे कीं अनेक प्रसंगीं प्रचलित घटनेप्रमाणें असलेले मतदार संघ मुसलमान प्रतिनिधी निवडून देतील अशी अपेक्षा करणें अशक्य आहे व जर यदाकदाचित् त्यांनीं निवडून दिलाच तर त्याचें मत त्यांच्या जमातींतील बहुसंख्य मतदारांच्या मताविरुद्ध असेल; असें झाल्यास तो मुसलमान जमातीचा प्रतिनिधि ठरणार नाहीं. याखेरीज तुमचें असें न्याय्य मागणें आहे कीं, तुमच्या स्थितीचें मूल्यमापन फक्त तुमच्या संख्याबलावरून न करतां तुमच्या समाजाच्या राजकीय महत्त्वावरून आणि तुमच्या समाजानें बजावलेल्या साम्राज्याच्या सेवेवरून करण्यांत यावें.

### मागणीस तात्त्विक मान्यता

मी संपूर्णपणें तुमच्याशीं सहमत आहे. कृपा करून माझ्याविषयीं गैरसमज करून घेऊं नये. जमातींना प्रतिनिधित्व कोणत्या साधनांनीं मिळेल हें दाखविण्याचा मी प्रयत्न करीत नाहीं, परंतु माझी अशी पक्की खात्री आहे आणि तुमचीहि तशीच असेल असा मला विश्वास वाटतो कीं, ज्या जमातीनें या देशांतील लोकसंख्या बनली आहे त्या जमातीच्या श्रद्धा आणि परंपरा विचारांत न घेतां नुसते दरमाणशीं मतदानाचे अधिकार देण्यानें निवडणुकीच्या पद्धतीस अत्यंत अपायकारक असें अपयशच मिळेल. कारण हिंदुस्थानांतील असंख्य जनतेला प्रातिनिधिक संस्थांचें ज्ञान नाहीं.

स्वायत्ततेच्या शिडीच्या सुरुवातीच्या पायऱ्या म्युनिसिपल आणि डिस्ट्रिक्ट बोर्ड याच होत हें तुमचें म्हणणें मला मान्य आहे........तूर्त मी एवढेंच म्हणूं शकतो कीं मुसलमान समाजानें अशी निश्चित खात्री बाळगावी कीं माझा संबंध असलेल्या कोणत्याहि राज्यकारभारविषयक पुनर्घटनेमध्यें मुसलमानांचे म्हणून असलेले राजकीय हक्क आणि हितसंबंध यांचें संरक्षण केलें जाईल. आणि तुम्ही आणि हिंदी जनतेनें ब्रिटिश राज्याविषयीं असा भरंवसा बाळगावा कीं, राजेसाहेबांच्या हिंदुस्थानांतील साम्राज्यामधील असंख्य जनतेचीं धार्मिक मतें व राष्ट्रीय परंपरा यांना मान देण्यामध्यें ब्रिटिश राज्यानें आतांपर्यंत अभिमान बाळगला. तीच परंपरा पुढेंहि चालविण्यांत कसूर होणार नाहीं."

* * *

सायंकाळीं व्हाइसरीगल लॉजमध्यें शिष्टमंडळास चहापार्टी देण्यांत आली. या वेळीं कौन्सिलचे सभासदहि उपस्थित होते. पुष्कळांस इंग्रजी येत असल्यामुळें बऱ्याच प्रतिनिधींशीं बोलणें झालें, या बोलण्यांत त्यांना दाखविलेल्या सहानुभूतीचा आणि आस्थेचा त्यांनीं जाणीवपूर्वक जो उल्लेख केला तो त्यांच्या तोंडून ऐकणें मोठें हृदयस्पर्शी होतें.

एका अधिकाऱ्याकडून पुढील पत्र आज सायंकाळीं मिळालें.

"आज एक फार–फार मोठी गोष्ट घडली हें सांगणारी एक ओळ तरी आपणास लिहिलीच पाहिजे. हिंदुस्थान आणि हिंदी इतिहास यांच्यावर अनेक वर्षेंपर्यंत परिणाम करणारें एक मुत्सद्देगिरीचें कार्य घडलें आहे. राजद्रोही अशा विरोधी पक्षाला मिळण्यापासून सहा कोट वीस लाख लोकांना परावृत्त करणारें महत्त्वाचें कार्य झालें आहे !"

* * *

व्हाइटहॉलनें याच प्रकारचें मतप्रदर्शन केलें; सर्व घडामोडींचा वृत्तांत मिळाल्यावर मि. मोर्ले पुढीलप्रमाणें लिहितात :

## मोर्ले यांचें मिंटो यांना पत्र : ऑक्टोबर २६

"तुमच्या मुसलमानाविषयीं तुम्ही जें कांहीं सांगितलेंत तें सर्व मनोरंजक आहे. आपल्या उद्यानांतील पार्टीचे प्रसंगीं गुप्तपणें मला फिरतां

आलें नाहीं याचें मला दुःख वाटतें. सर्व कांहीं जितकें उत्तम व्हावयास हवें होतें तितकें उत्तम झालें आहे, आणि त्यानें तुमच्या दर्जावर आणि व्यक्तिगत अधिकारावर निर्णायक शिक्कामोर्तब केला आहे. आपण केलेल्या भाषणाच्या इतर चांगल्या परिणामांपैकीं एक परिणाम म्हणजे इकडच्या टीका करणाऱ्या पक्षाचे सर्व बेत आणि डावपेंच संपूर्ण उधळून टाकले गेले आहेत. म्हणजे असें कीं, यापुढें नोकरशाही विरुद्ध जनता अशा अगदीं सामान्य पद्धतीनें हिंदुस्थान सरकारचें वर्णन यापुढें त्यांना केव्हांहि करतां येणार नाहीं. मला अशी आशा वाटते कीं माझ्या कट्टर रॅडिकल (क्रान्तिकारक) मित्रांना देखील हा प्रश्न इतका साधा नाहीं असें दिसून येईल."

[ ज्या १ ऑक्टोबर १९०६ रोजीं वरील उद्यानोपहाराचा प्रसंग घडला त्याबद्दल खुद्द लेडी मिंटो या लिहितात : 'आजचा दिवस महत्त्वपूर्ण आहे व यानें हिंदुस्थानच्या इतिहासांत नवें पृष्ठ उघडलें आहे.' हिंदुस्थानांतील इंग्रजांचें राजकारण 'फोडा व झोडा' या तत्त्वावर आधारलें होतें यांत शंका नाहीं. कारण ना. आगाखानांनीं हें मुसलमानांचें शिष्टमंडळ घेऊन यावें याची सूचनाहि त्यांना लॉर्ड मिंटो यांचेकडूनच मिळालेली होती.]

**अभ्यास** :—१. हिंदुस्थानांतील जातवार मतदारसंघाचा उदय, वाढ व परिणाम यांचें चिकित्सक समालोचन करा. २. या घटनेनें इंग्रजांना इतका आनंद कां झाला ?

---

## ५५ : : : श्रीगीता आणि बॉम्ब

कलकत्ता–'वंदे मातरम्' } { २५ मे १९०८.

[ ब्रिटिशविरोधी क्रांतिकारक चळवळ आपल्या देशांत विशेष प्रमाणांत इ. स. १९०८ सालीं झाली. त्या काळांत मुझफरपूरला किंगफोर्ड या ब्रिटिश न्यायाधिशाच्या मोटारीवर तो आंत आहे असें समजून खुदिराम बोसनें बाँब फेंकला. या घटनेसंबंधानें लो. टिळक लिहितात : "१८९७ सालीं ज्युबिलीच्या[1] रात्रीं रँड् साहेबांचा खून झाल्यानंतर मुझफरपुरास बाँब गोळा उडेपर्यंत (मे, १९०८) अधिकारी वर्गाचें मन वेधणारें कृत्य प्रजाजनांच्या हातून झालें नाहीं........ वंगभंगावर बंगाली बाँबचा तर कटाक्ष आहेच, पण वंगभंगामुळें दृष्टीस पडूं लागलेल्या अधिक विस्तृत मैदानावर बाँब गोळ्याची नजर खेळत आहे. " (केसरी २६ मे १९०८).

लो. टिळकांनीं या बॉम्ब प्रकरणीं सरकारला बोचणारे व बॉम्ब-वाल्यांना बॉम्ब कां टाकावा लागला असेल याचें विवेचन करणारे, मे-जूनच्या केसरीच्या अंकांतून 'देशाचें दुर्दैव,' 'हे उपाय टिकाऊ नाहींत', 'बॉम्बगोळ्याचा खरा अर्थ', 'बॉम्ब गोळ्याचें रहस्य' इत्यादि लेख लिहिले, त्याबद्दल त्यांना ६ वर्षें हद्दपारीची व तुरुंगवासाची शिक्षा झाली.

या प्रकरणाच्या निमित्तानें बंगालमध्यें अनेक झडत्या घेण्यांत आल्या व अलीपूर बाँब खटला सरकारनें भरला. या खटल्यांत श्री. अरविंद घोष (सध्यांचे योगी अरविंद घोष) व त्यांचे बंधु श्री. बारींद्र घोष इ. अनेक तरुणांना गोवण्यांत आलें (२ मे १९०८). यापूर्वी सुमारें एक वर्ष 'वंदेमातरम्' या सुप्रसिद्ध इंग्रजी जहाल दैनिक व साप्ताहिक वृत्तपत्रांत श्री. अरविंद घोष हे प्रामुख्यानें संपादकाचें काम करीत. या वृत्तपत्रांत **'दी गीता अॅन्ड दि बॉम्ब इन बेंगॉल'** या नांवाचा अग्रलेख २५ मे १९०८ ला प्रसिद्ध झाला, त्यांतील मुख्य अंश पुढें दिला आहे.]

नुकत्याच झालेल्या बॉम्ब हल्लचांत कित्येक तरुण बंगाली पकडलेले आहेत. ज्वालाग्राही पदार्थ वापरणाऱ्या या तरुणांचा व भगवद्गीतेचा संबंध

१ व्हिक्टोरिया महाराणीची डायमंड ज्युबिली.

असावा याचें रहस्य इंग्रज माणसासच काय पण आंग्लविद्या विभूषित हिंदूलासुद्धां कळणें शक्य आहे असें आम्हांस वाटत नाहीं....हें कोणाच्या ध्यानीं आलेलें दिसत नाहीं कीं..युरोपियन क्रांतिकारकांच्या पद्धतींत गीतेच्या थोर आध्यात्मिक शिकवणीचा समावेश झाल्यानेंच बंगाली क्रांतिकारक व त्याच वळणाचे युरोपियन क्रांतिकारक यांच्यांतील भेद स्पष्ट होत आहे......

बरोबर अथवा चुकीनें 'बंगाली लोक हे भित्रे' असें अनेक वर्षें सांगण्यांत येत आहे....त्यामुळें त्यांना भारतीय सैन्यांत प्रवेशहि (देण्यांत येत) नाहीं......हळूहळू भित्रेपणा ( Timidity ) हें बंगाली लोकांचें वैशिष्ट्य समजलें जाऊं लागलें आहे. भित्रेपणा म्हणजे संस्कृतमध्यें कार्पण्य. 'कृपण' या शब्दाचा औपनिषदिक अर्थ असा आहे कीं 'शरीरापासून आत्मा पूर्णपणें भिन्न आहे हें ज्याला कळत नाहीं तो. नाशाची किंवा मृत्यूची भीति वाटण्याचें मुख्य कारण.....('आत्मा व शरीर भिन्न आहे')या तत्त्वाचें अज्ञान व विवेक बुद्धीचा अभाव....आपल्या समोर सगेसोयरे युद्धाला उभे ठाकलेले पाहून या कार्पण्यानें (भित्रेपणानें) अर्जुनाला पछाडलें ......म्हणून तो श्रीकृष्णाला म्हणाला; "कार्पण्यदोषोपहतः स्वभावः ....म्हणजे

"भीतीनें माझी स्वाभाविक वृत्ति नष्ट झाल्यानें मी तुम्हाला विचारीत आहे.....जें निश्चयें करून श्रेयस्कर असेल तें (माझें कर्तव्य) मला सांगा"........श्रीकृष्णांनीं सांगितलें कीं " असें पहा कीं मी (पूर्वीं) कधीं नव्हतों असें तर नाहींच, तूं व हे राजे (पूर्वीं) नव्हते असें नाहीं. आणि आपण सर्व यापुढें होणार नाहीं असेंहि नाहीं.

देह धारण करणारास या देहांत ज्याप्रमाणें बालपण, तरुणपण आणि म्हातारपण (प्राप्त होतें), त्याप्रमाणेंच (पुढें) दुसरा देह प्राप्त होत असतो. (म्हणून) या बाबतींत(मृत्यूच्या बाबतींत)ज्ञानी पुरुष मोह पावत नाहींत.

नित्य, अविनाशी व अचिंत्य असा जो शरीराचा मालक (आत्मा) त्याला प्राप्त होणारे हे देह किंवा शरीरें नाशवंत म्हणजे अनित्य होत, असें म्हटलें आहे. म्हणून हे भारता! तूं युद्ध कर!"...... म्हणजे मूळची चित्शक्ति अमर आहे, आत्मा अविनाशी आहे. रोग, दुःख, मृत्यु या गोष्टी नाशवंत आहेत.

(सारांश), ही शिकवणूक गीतेच्या अभ्यासकांच्या मनावर निरनिराळ्या प्रकारें ठसविली जाते.....म्हणून मार्ग चुकलेले असले व आपल्या देशाच्या मुक्ततेसाठीं बारींद्र घोष आणि त्याचे सहकारी यांनीं यूरोपियन क्रांतिकारकांच्या आत्मघातकी मार्गाला भगवद्गीतेच्या पवित्र सिद्धान्ताची जोड देण्यांत विपरीतपणा केला असला तरी त्यांच्या जीवनाची प्रेरणा याच पवित्र ग्रंथांतून मिळालेली आहे. आपणाला त्यांचे मार्ग कितीहि न आवडोत, पण या तरुणांनीं आपल्या स्वतःवर आणि इंद्रियांवर विजय मिळविला व बंगाल्यांचा स्वभावधर्म म्हणून समजला जाणारा भित्रेपणा नष्ट केला आहे हें नाकारणें शक्य नाहीं.......आम्हांला असें वाटतें कीं या तरुण मंडळींनीं आपल्या चुकांनीं सुद्धां जगापुढें सिद्ध केलें आहे कीं, हिंदुस्थान भलत्याच मार्गानें गेला तरीसुद्धां तो आपल्या मार्गानें जातो आणि मानवी चुका आणि अपराध यांच्या इतिहासांतहि नवीनता निर्माण करतो.

**अभ्यास** :—दहा भारतीय क्रांतिकारकांचीं नांवें सांगा.

---

## ५६ : हिंदुस्थान सरकारांत जबाबदारीचा प्रवेश

(इ. स. १९१९)

[इ. स. १९१९ च्या कायद्याची उद्देशपत्रिका ही २० ऑगस्ट १९१७ रोजीं भारतमंत्र्यांनीं केलेल्या घोषणेवर आधारलेली आहे. दोहोंतील शब्दयोजना अत्यंत काळजीपूर्वक केलेली आहे. हिंदुस्थानांत जबाबदार राज्यपद्धतीचा प्रवेश या घोषणेनें झाला. वरील उद्देशपत्रिकेंतील मुख्य भाग पुढें दिला आहे—बानर्जी भा. २ रा, पृ. २४०]

ज्या अर्थीं पार्लमेंटचें असें धोरण आहे कीं, ब्रिटिश हिंदुस्थानांतील लोकांचा राज्यकारभाराच्या अनेक शाखांतून वाढत्या प्रमाणांत अंतर्भाव करावा, तसेंच देशांतील स्वायत्त संस्थांचा क्रमाक्रमानें विकास करावा, हेतु हा कीं, त्या योगें ब्रिटिश हिंदुस्थान हे साम्राज्याचा अंगभूत घटक राहून त्याबरोबरच तेथें जबाबदार राज्यपद्धति क्रमशः वाढीस लागावी,

आणि ज्या अर्थी या धोरणानें होणारी प्रगति टप्याटप्यानेंच होत राहाणार, तसेंच या प्रगतीचा पहिला हप्ता ताबडतोब अंमलांत आणणें हें ज्या अर्थी आज अवश्य आहे.....

आणि ज्या अर्थी या देशांत होणारी घटनात्मक प्रगति किती वेळांत व कोणत्या तऱ्हेनें होईल हें पार्लमेंटनेंच ठरविणें इष्ट आहे, कारण पार्लमेंटच जनतेच्या प्रगतीबद्दल व कल्याणाबद्दल शेवटीं जबाबदार आहे,

आणि ज्या अर्थी हिंदुस्थानांतील लोक या नव्या प्रयोगांत कितपत सहकार्य करतील व त्यांच्यावर टाकलेल्या विश्वासाचा व जबाबदारीचा ते कितपत उपयोग करून घेतात यावरच पार्लमेंटला सुधारणांचे हक्क देतांना अवलंबून रहावें लागेल,

आणि ज्या अर्थी प्रान्तांतून स्वायत्त संस्थांची वाढ होत असतां प्रांतिक सरकारांना वरिष्ठ सरकारपासून शक्यतों अधिक स्वातंत्र्य देणें इष्ट ठरेल, पण त्याबरोबरच वरिष्ठ सरकारलाहि आपल्या जबाबदाऱ्या नीट पार पांडण्याची सत्ता राहील अशी योजना तयार करावी लागेल.

त्या अर्थीं असा कायदा केला जातो कीं,

(यापुढें कायद्याचीं कलमें सुरू)

**अभ्यास** :—इ. स. १९१९ सालीं पास झालेल्या द्विदल राज्यपद्धतीचा कायदा व त्याची अम्मलबजावणी हीं वरील उद्देशपत्रिकेशीं कितपत सुसंगत होतीं याचें विवेचन करा.

---

## ५७ : : : स्वातंत्र्याचें ध्येय

[ स्वराज्याचा प्रस्ताव मांडतांना महात्मा गांधींचें भाषण : नागपूर कॉंग्रेस १९२०—बानर्जी भाग २ रा, पृ. ३०२]

जो ठराव मांडण्याचा मान मला मिळाला आहे तो पुढीलप्रमाणें आहे: " हिंदुस्थानांतील जनतेकडून सर्व प्रकारच्या न्याय्य आणि शांततामय मार्गानें स्वराज्य मिळविणें हा हिंदी राष्ट्रीय सभेचा उद्देश आहे."

या ठरावाला फक्त दोन प्रकारचे आक्षेप घेतां येतील......एकतर आज आपण ब्रिटिश संबंध नाहींसे करण्याचा विचार करणें इष्ट नाहीं. पण मला असें म्हणावयाचें आहे कीं ब्रिटिशांशीं असलेले संबंध कांहींहि झाले तरी कायम स्वरूपाचे आहेत असा विचार करणें राष्ट्रीय स्वाभिमानास काळीमा लावणारें आहे. मला क्षणभरहि असें सूचित करावयाचें नाहीं कीं कोणतीहि किंमत देऊन हा संबंध आम्हांस बिनशर्त तोडून टाकावयाचा आहे. ब्रिटिशांशीं असलेला संबंध जर हिंदुस्थानच्या प्रगतीला कारणीभूत होणार असेल तर त्याचा आम्हांला नाश करावयाचा नाहीं. परंतु जर तो आमच्या राष्ट्रीय स्वाभिमानाशीं विसंगत असेल तर तो नाहींसा करणें हें आमचें परम कर्तव्य ठरेल. ब्रिटिशांशीं असलेले संबंध राखूनच आपण स्वतःची आणि ब्रिटिश लोकांची मनःशुद्धी करूं असा विश्वास बाळगणाऱ्या व न बाळगणाऱ्या अशा दोघांसहि या ठरावांत स्थान आहे.

इतर अनेक गोष्टींबरोबर सैन्य व इतर संरक्षक दलें, परराष्ट्रीय व्यवहार, वसूलविषयक आणि व्यापारविषयक घडामोडी आणि सांपत्तिक व आर्थिक धोरण यांवर अबाधित सत्ता असणें यांचा संपूर्ण स्वराज्यांत अंतर्भव होतो. ब्रिटिशांशीं ऐच्छिक भागिदारी ठेवणें किंवा त्यांचे संबंध संपूर्ण तोडून टाकणें यांपैकीं कांहींहि पसंत करण्याचें स्वातंत्र्य हिंदुस्थानला असलें पाहिजे !

**अभ्यास** :—स्वतंत्र हिंदुस्थान व इंग्लंड यांचे आजचे संबंध कसे आहेत ?

---

## ५८ : : : असहकारितेचा ठराव

[कलकत्त्याची स्पेशल काँग्रेस ता. ४ सप्टेंबर १९२० ला भरली. महायुद्धाचा शेवट झाल्यावर व जालियनवाला बागेच्या हत्याकांडानंतर भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या या इतिहास-प्रसिद्ध अधिवेशनांत म. गांधींनीं असहकारितेसंबंधीं ठराव मांडला, तो १८८६ विरुद्ध ८८४ मतांनीं पास झाला. तो ठराव पुढें दिला आहे.—पट्टाभिसीतारामय्या पृ. ३४१]

"ज्या अर्थीं हिंदुस्थान सरकार व साम्राज्य सरकार या उभयतांनीं हिंदी मुसलमानांना खिलाफतीसंबंधीं दिलेलीं अभिवचनें पार पाडलीं नाहींत व ज्या अर्थीं इंग्लंडच्या मुख्य प्रधानांनीं हीं अभिवचनें बुद्धिपुरस्सर मोडलेलीं आहेत व त्या अर्थीं आपल्या मुस्लिम बांधवांना त्यांच्या धर्म संकटांत हर-एक प्रकारें योग्य ती मदत करणें हें मुस्लिमेतरांचें कर्तव्य आहे,

तसेंच, ज्या अर्थीं एप्रिल १९१९ मध्यें घडलेल्या अनेक गोष्टी विचारांत घेतां सरकारनें पंजाबच्या गरीब लोकांसंबंधीं आपलें कर्तव्य करण्यांत बेगु-मान हेळसांड केली व त्यांचें रक्षण करण्यांत असमर्थता दाखविली, तसेंच ज्या सरकारी लष्करी अंमलदारांनीं शिपायाच्या इभ्रतीस न साजणारें असें रानटीपणाचें वर्तन केलें त्यांना शिक्षा देण्यांत सरकारनें कसूर केली, तसेंच, जो सर मायकेल ओड्वायर सरकारी गुन्ह्याबद्दल व लोकांच्या अन-न्वित हालअपेष्टांबद्दल बऱ्हंशीं जबाबदार आहे व ज्याला या हालअपेष्टांची कधी खंत वाटली नाहीं त्या ओड्वायरला सरकारनें बिनशर्त दोषमुक्त केलें आहे त्या अर्थीं,

या राष्ट्रीय सभेचें असें मत आहे कीं, उपरोक्त दोन अन्याय दूर झाल्याखेरीज हिंदी जनतेस कदापि समाधान वाटणार नाहीं. राष्ट्रीय सभेच्या मतें हे दोन अन्याय दूर करण्याचा व अशासारख्या अन्यायांना पुढें प्रतिबंध करण्याचा स्वराज्य स्थापणें हा एकच मार्ग आहे.

वरील अन्याय दूर होईपर्यंत व स्वराज्य मिळेपर्यंत हिंदी लोकांनीं महात्मा गांधीप्रणीत असहकारितेचा मार्ग अनुसरावा असें या राष्ट्रीय सभेचें मत आहे.

ज्यांनीं आतांपर्यंत लोकमताची धुरा वाहिली त्यांनीं या कार्यास प्रारंभ करणें जरूर आहे. सरकारनें चालविलेलीं न्यायकोर्टें, कायदेमंडळें, सरकारमान्य शाळा तसेंच सरकारनें दिलेल्या पदव्या यावरच सरकारचें स्थैर्य व इभ्रत आहे. हें बव्हंशीं लक्षांत घेऊन या लोकांनीं पुढें सांगितल्याप्रमाणें आचरण करावें.

(१) पदव्यांचा त्याग करावा, (२) स्थानिक स्वराज्य संस्थांतून सरकारनियुक्त जागांचे राजीनामे द्यावेत, (३) सरकारी दरबार-समारंभांस जाऊं नये, (४) सरकारमान्य शाळा कालेजांतून आपलीं मुलें काढून घेऊन राष्ट्रीय शिक्षण संस्थाची स्थापना करावी, (५) सरकारी न्यायकचेऱ्यावर बहिष्कार घालून त्या ठिकाणीं लोकांनीं आपलीं लवादमंडळें निर्माण करावींत, (६) लष्करी, कारकुनी व मजूर वर्गांनीं मेसापोटेमियांत चाललेल्या मोहिमेंत भाग घेण्यासाठीं पुढें येऊं नये. (७) लवकरच होणाऱ्या निवडणुकांवर काँग्रेसनिष्ठ मतदारांनीं व उमेदवारांनीं बहिष्कार घालावा, (८) परदेशी मालावर बहिष्कार घालावा.

उपरोक्त असहकारिता ही एक शिस्तीचें व स्वार्थत्यागाचें साधन आहे. या साधनाचें प्रत्येक स्त्री पुरुषानें आचरण करणें जरूर आहे. म्हणून सर्वांनीं स्वदेशी कापड वापरण्यास सुरुवात करावी व देशांतील गिरण्या देशाला पुरेसें कापड निर्मिण्यास समर्थ नसल्यानें घरोघर सूतकताई व हातमागावरील कापड विणण्याचें काम जारीनें सुरूं करावें."

या इतिहासप्रसिद्ध ठरावास बाबू बिपिन चंद्रपाल व देशबंधू दास यांनीं उपसूचना आणिली होती. परंतु बरीच चर्चा होऊन अखेर म. गांधींचा ठराव पास झाला.

**अभ्यास** :—वरील ठरावांत व्यक्त केलेला कार्यक्रम अंमलांत आणल्यानें काय परिणाम झाले याचें साधकबाधक विवेचन करा.

---

## ५९ : : : द्विदल राज्यपद्धतीचे दोष

[ द्विदल राज्यपद्धतीच्या कारभाराची चौकशी करण्यासाठीं सर अॅलेक्झांडर मुडिमन यांचे अध्यक्षतेखालीं इ. स. १९२४ सालीं नेमलेल्या सुधारणा चौकशी समितीच्या अहवालास अल्पसंख्यांकांची भिन्न मतपत्रिका जोडलेली आहे. या पत्रिकेंतून द्विदल राज्यपद्धतीचे दोष फार बारकाईनें सविस्तर दाखविलेले आहेत, त्यांतील कांहीं भाग पुढें दिला आहे.—जोशी व छबलाणी यांचें 'रिडिंग्ज इन इंडियन अॅडमिनिस्ट्रेशन' पृ २८७–२८९ वरून ]

सरकारच्या कामाचे राखीव व सोंपीव असे अगदीं वेगळे भाग पाडणें हें अशक्य आहे असें अनुभवास आलें आहे. घटनात्मक दृष्टीनें तर एका सरकारचे असे भाग संपूर्णतः अशक्य आहेत. खुद्द रोजच्या कारभारांतहि यामुळें कशा अडचणी येतात यासंबंधीं मुंबई सरकारनें ११ नोव्हेंबरच्या खलित्यांत प्रकट केलेले पुढील विचार वाचनीय आहेत.

" सरकारी कामकाजाच्या फायली लक्षपूर्वक पाहिल्या तर असें दिसून येईल कीं असा एकहि महत्त्वाचा प्रश्न नाहीं कीं ज्याची चर्चा करीत असतां किंवा ज्यासंबंधीं निर्णय घेत असतां दुसऱ्या सरकारी खात्याशीं त्याचा निकट संबंध येत नाहीं. सरकारचें मुख्य काम शांतता व सुव्यवस्था राखण्याचें, दुर्बलांचें दांडग्या लोकांपासून रक्षण करण्याचें आणि कोणताहि महत्त्वाचा निर्णय घेत असतांना त्यांतील विविध हितसंबंधीं पक्षांशीं समतेनें वागावयाचें. सरकारच्या कर्तव्या-संबंधीं ही कल्पना जर बरोबर असेल तर दिवाणांनीं सुचविलेल्या कोणत्याहि नव्या योजनेचा राखीव खात्याशीं संबंध येणारच. अशा थोड्याच बाबी असतील कीं जेथें सरकारच्या राखीव व सोंपीव विभागांचा परस्परांशीं संबंध येणार नाहीं. म्हणून दिवाणांच्या ताब्यांतील सोपीव खात्यांचा कारभार पहात असतां त्याबाबत राखीव खात्यांशीं कांहीं संबंध ठेवूं नये हें तत्त्व निराधार आहे."

### द्विदल राज्यपद्धतीचा दुसरा दोष

एका बाजूस लोकनियुक्त दिवाण व दुसऱ्या बाजूस ज्यांचा जन्म सरकारी वातावरणांत गेला असे कार्यकारी मंडळाचे सभासद या उभयतांच्या दृष्टिकोनांत फरक असणारच व ते उभयतां एकत्र आल्यानें त्यांत संघर्ष उत्पन्न होणारच.

### द्विदल राज्यपद्धतीचा तिसरा दोष

एके काळीं दिवाणगिरीचें काम केलेल्या व आतां सेवानिवृत्त झालेल्या अनेक सद्‌गृहस्थांनीं आपल्या साक्षींत असें सांगितलें कीं गव्हर्नरनें दिवाणांशीं व्यक्तिशः राज्यकारभाराबाबत विचारविनिमय केला, परंतु त्यांचें सामुदायिक अस्तित्व त्यानें कधींच लक्षांत घेतलें नाहीं. याचा अर्थ असा कीं, राज्यास प्रधान होते, पण प्रधानमंडळ अस्तित्वांत नव्हतें. ......गव्हर्नरचें वागणें एक राहो, परंतु खुद्द दिवाणांनीं देखील आपसांत सामुदायिक जबाबदारीचें तत्त्व पाळल्याचें दिसत नाहीं. हिंदुस्थानसारख्या देशांत कीं जेथें इंग्लंडप्रमाणें दिवाणांची एकाच पक्षांतून निवड होत नाहीं तेथें दिवाणांच्या परस्पर वागण्यांत निकट संबंध नसावेत हें साहजिक आहे.

**अभ्यास** :—" द्विदल राज्यपद्धति ही एक अवजड, किचकट व तर्कहीन आधारावर उभारलेली राज्यपद्धति आहे. ती मुळांतच सदोष असून तिचा अंमल सर्व बाजूंनीं अधिकच सदोष पद्धतीनें झाला " या विधानाचें बारकाईनें स्पष्टीकरण करा.

---

## ६० : : : हिंदुस्थान सरकार सार्वभौम आहे

[ गव्हर्नर जनरल लॉर्ड रीडींग यांचें निजामला पत्र–ता २७, मार्च १९२६—बानर्जी, भाग दुसरा पृ. ४५८ ]

ब्रिटिश हिंदुस्थानांतील अंतर्गत व्यवस्थेसंबंधीं हिंदुस्थानांतील ब्रिटिश सरकार ज्या भूमिकेवर उभे आहे त्याच भूमिकेवर हैद्राबादच्या अंतर्गत व्यवहाराबाबत हैद्राबाद संस्थानचे राज्यकर्ते या नात्यानें आपण उभे आहां, असें आपण विस्तारानें प्रतिपादिलें आहे. तुमच्या या प्रतिपादनाबाबत मजकडून अतिशयोक्ति न व्हावी म्हणून मी तुमचे स्वतःचेच शब्द उदधृत करतों.

## निजामचें म्हणणें

" परराष्ट्रविषयक धोरण व अधिकार यांशीं संबंध असणाऱ्या गोष्टी सोडून इतर सर्व अंतर्गत व्यवहारामध्यें ब्रिटिश सरकार ब्रिटिश हिंदुस्थानांत जितकें स्वतंत्र आहे तितकेंच हैद्राबादच्या अंतर्गत व्यवहारामध्यें हैद्राबादचे निजामहि स्वतंत्र आहेत. निकटवर्ती राष्ट्रांमध्यें वेळोवेळीं सहज निर्माण होणाऱ्या अंतर्गत व्यवस्थेच्या प्रश्नांबाबत मीं सांगितलेली मर्यादा पाळून दोन्हीहि पक्ष संपूर्ण स्वतंत्रतेनें वागले आहेत. आतां या मर्यादेमध्यें वऱ्हाडचा प्रश्न येत नाहीं व येऊं शकत नाहीं. वऱ्हाडचा विचार करितां परराष्ट्रासंबंधीं अधिकार वा धोरण यांचा त्यांत कांहीं एक संबंध येत नाहीं म्हणून हा प्रश्न एकाच पातळीवर असणाऱ्या दोन सरकारामधील विवाद्य प्रश्न म्हणून गणला जाईल."

हे शब्द सार्वभौम सत्तेशीं असलेले आपले जे संबंध आहेत त्याबद्दल आपली (निजाम साहेबांची) गैरसमजूत झाली असल्याचें द्योतक आहेत, आणि राजाधिराजांचा प्रतिनिधी या नात्यानें ही गैरसमजूत दूर करणें मला आवश्यक आहे; कारण अशा गोष्टींतील माझ्या मौनाचा आपण प्रतिपादलेल्या विधानांना माझी संमति आहे असा अर्थ कदाचित् यापुढें केला जाईल.

## ब्रिटिश सत्ता सार्वभौम

ब्रिटिश राजसत्तेचें सार्वभौमत्व हिंदुस्थानांत सर्वश्रेष्ठ आहे आणि म्हणून कोणाहि हिंदी संस्थानिकास समान भूमिकेवरून ब्रिटिशांबरोबर न्याय्य रीतीनें करारमदार करतां येणार नाहींत. ब्रिटिश राजसत्तेचें सार्वभौम श्रेष्ठत्व तह व करारमदार यांवर आधारलेलें नाहीं. तें यांवाचून स्वतंत्रपणें अस्तित्वांत आहे; आणि परराष्ट्रविषयक अधिकार व धोरण या अधिकारां-व्यतिरिक्त, हिंदी संस्थानिकांबरोबरील तह आणि करारमदार यांना विचार-पूर्वक मान देऊन अखिल हिंदुस्थानांत शांतता व सुव्यवस्था राखणें हाहि ब्रिटिश सरकारचा हक्क आहे व हें कर्तव्यहि आहे. यापासून ओघानें येणारे सिद्धान्त एवढे स्वसिद्ध आहेत आणि इतर संस्थानिकांप्रमाणें आपणांसहि ते इतक्या स्पष्टपणें लागू पडतात कीं त्यांचा निर्देश करण्याची आवश्यकता मुळींच वाटत नाहीं. परन्तु जर दाखले हवेच असतील तर मी आपणांस

अशी आठवण देतों कीं सम्राटपदाशीं कायमचे राजनिष्ठ राहण्याच्या अटीं-वर निजामाचें घराणें व निजामसरकार चालू ठेवण्याची ब्रिटिश सरकाराची इच्छा जाहीर करणारी सनद १८६२ सालीं इतर संस्थानिकांबरोबरच हैद्राबाद येथील राज्यकर्त्यांस मिळाली आहे.

## तुमचा दर्जा निराळा नाहीं

हिंदी संस्थानांच्या अंतर्गत व्यवहारांत हस्तक्षेप करण्याचा ब्रिटिश सरकारचा अधिकार हें ब्रिटिश सम्राटांच्या सर्वश्रेष्ठत्वामध्येंच अवश्य अंतर्भूत असणाऱ्या व म्हणून ओघानें निर्माण होणाऱ्या परिणामाचें दुसरे उदाहरण आहे. खरोखर ब्रिटिश सरकारनें पुन्हा पुन्हा असें दाखवून दिलें आहे कीं, गंभीर कारणाखेरीज हा अधिकार बजावण्याची त्यांची इच्छा नाहीं. संस्थानी राज्यकर्ते उपभोगीत असलेली बाह्य व अंतर्गत सुरक्षितता ही सरते शेवटीं ब्रिटिश सरकारच्या संरक्षक शक्तीमुळेंच त्यांना मिळत आहे. आणि ज्या ठिकाणीं साम्राज्याचे हिताचा संबंध असेल किंवा सरकारच्या कारभारामुळें जनतेच्या सुस्थितीस गंभीर व जबर धक्का पोचत असेल त्या ठिकाणीं प्रतिबंधक उपयांची जरुरी असल्यास तें योजण्याची अंतिम जबाबदारी साम्राज्यसत्तेवरच येऊन पडते. संस्थानिक उपभोगीत असलेल्या सार्वभौमत्वाच्या निरनिराळ्या पायऱ्या साम्राज्यसत्तवरील जबाबदारी पार पाडत असतां निर्माण झाल्या आहेत. परराष्ट्रविषयक अधिकार व धोरण यां-व्यतिरिक्त आपलें (निजाम साहेबांचें) सरकार व ब्रिटिश सरकार समान पातळीवर आहे या आपल्या म्हणण्याला विरोधक अशीं दुसरीं उदाहरणें पुढें मांडतां येतील. पण हा विषय आणखी वाढविण्याची अवश्यकता आहे असें मला वाटत नाहीं. मी फक्त एवढीच पुस्ती जोडतों कीं "विश्वासू मित्र" ही जी पदवी आपण लावतां त्या पदवीमध्यें आपणांस (निजामसाहेबांस) ब्रिटिश साम्राटांच्या सार्वभौमत्वाखालीं येणाऱ्या इतर संस्थानिकांपेक्षां कांहीं वेगळा दर्जा मिळवून देण्याची शक्ति नाहीं.

आपल्या विनंती अर्जावर भारतमंत्र्यांनीं दिलेल्या आज्ञा निर्णायक स्वरूपाच्या नाहींत हें आपलें मत मला मान्य करतां येत नाहीं यावद्दल वाईट वाटतें. संस्थाना संस्थानांतील किंवा संस्थान व साम्राज्य यांमधील

तंट्यांचा निर्णय करण्याचा हक्क व अधिकार साम्राज्यसरकारचा आहे, आणि जरी कांहीं प्रसंगीं कोर्ट ऑफ आरबिट्रेशन नेमलें असलें तरी निर्णय देण्याचें काम हिंदुस्थान सरकारचें आहे. आरबिट्रेशन कोर्टाचें कार्य हिंदुस्थान सरकारला स्वतंत्र सल्ला देणें एवढेंच आहे. ही वस्तुस्थिति माँटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्टाच्या ३०८ या परिच्छेदावरील झालेल्या ऊहापोहावरून आलेल्या निकालानुसार नरेंद्र मंडळानें मान्य केली आहे.

**अभ्यास** :—आजचें हिंदुस्थान सरकार व संस्थानिक यांचे राजकीय संबंध कसे आहेत याची चर्चा करा.

---

## ६१ : : : संयुक्त राज्यघटनेचा उदय

[ पहिल्या गोलमेज परिषदेंत सर तेज बहादूर सप्रू यांचें भाषण : १९ जानेवारी १९३१—बानर्जी, भाग २ रा, पृ. ३२६]

गेले नऊ आठवडे आपण या परिषदेंत जी चर्चा केली त्यांतून माझ्या मतें तीन महत्त्वाच्या कल्पना पुढें आलेल्या आहेत :

१. अखिल भारतीय संयुक्त घटना ही खरोखर पाहातां फार उदात्त व व्यापक अशा प्रकारची कल्पना आहे व तिला हिंदी संस्थानिकांच्या राष्ट्रप्रेमी वृत्तिमुळेंच इतकें मूर्त स्वरूप येऊं शकलें.

२. दुसरी कल्पना ब्रिटिश हिंदुस्थानच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाची आहे. ती म्हणजे मध्यवर्ती सरकारांत जबाबदारीच्या तत्त्वाचा प्रवेश ही होय. बिकानेरचे महाराज व भोपाळचे नबाब यांनीं केलेल्या भाषणांच्या आधारें लॉर्ड रीडिंग यांनीं दाखवून दिलेंच आहे कीं, मध्यवर्ती सरकारांत जबाबदारीचा प्रवेश होत असेल तरच संस्थानिक संयुक्त राज्यघटनेंत येण्याचा विचार करतील.

३. तिसरी महत्त्वाची कल्पना अशी कीं, हिंदुस्थान पुढील कांहीं वर्षांत स्वसंरक्षणक्षम झाला पाहिजे. खरें म्हटलें तर ही कल्पना जबाबदार राज्यपद्धतीचे तत्त्वांत अंगभूतच आहे.

**अभ्यास** :—१. डॉ. तेज बहादूर सप्रू यांनीं संस्थानिकांसंबंधीं दुसऱ्या परिच्छेदांत व्यक्त केलेली भूमिका स्पष्ट करा. २. मूळ योजनेप्रमाणें मध्यवर्ती सरकार संयुक्त राज्यपद्धतीच्या तत्त्वावर तयार होणें कां लांबणीवर पडलें ?

---

## ६२ : : : पाकिस्तानचा उदय

[ मुस्लिम लीगच्या लाहोर येथील अधिवेशनांत २३ मार्च १९४० रोजीं पास झालेल्या ठरावाचा मसुदा पुढें दिला आहे. या प्रसंगीं बॅ. जिना यांनीं केलेल्या भाषणांत सांगितलें कीं, " कित्येक समजतात कीं, मुसलमान ही एक अल्पसंख्याक जात आहे, तें खोटें आहे. राष्ट्र या शब्दाच्या कोणत्याहि व्याख्येप्रमाणें मुसलमान हें एक राष्ट्र आहे व त्यांना त्यांचें मूळचें घर, राहण्यास प्रदेश, व व्यवस्थेस आपलें स्वतःचें सरकार असलें पाहिजे. "—बानर्जी, भाग २ रा, पृ. ४२८]

"अखिल भारतीय मुस्लिम लीगच्या या अधिवेशनाचें असें विचारपूर्वक मत बनलेलें आहे कीं हिंदी राज्यकारभाराची पुनर्घटना करणारी कोणतीहि योजना पुढील मूलभूत तत्त्वांवर आधारलेली असल्याखेरीज ती नीट अमलांत येणार नाहीं. हीं मूलभूत तत्त्वें पुढीलप्रमाणें :—

भौगोलिक दृष्टचा सलग अशा ज्या भूप्रदेशांत मुसलमान हे बहुसंख्य आहेत तेवढे प्रदेश, जरूरीप्रमाणें प्रादेशिक पुनर्घटना करून वेगळे काढावे. उदाहरणार्थ, हिंदुस्थानच्या वायव्येकडील व पूर्वेकडील प्रदेशांत असे गट व त्या गटांचें एक सार्वभौम स्वयंशासित सरकार निर्माण करावें. अशा प्रकारच्या तयार झालेल्या नवीन प्रादेशिक घटकांत अल्पसंख्यांकांना योग्य, परिणामकारक व घटनेंत नमूद असलेली अशी धार्मिक, सांस्कृतिक, आर्थिक, राजकीय व इतर हक्कांसंबंधीं संरक्षक बंधनें असावींत व तीं त्यांच्या संमतीनें निर्माण करण्यांत यावींत. हिंदुस्थानच्या ज्या भागांत मुसलमान अल्पसंख्य आहेत त्या भागांत त्यांच्यासाठीं त्यांच्या संमतीनें धार्मिक, सांस्कृतिक, आर्थिक आणि राजकीय व इतर हक्कांचें व हितसंबंधांचें रक्षण करण्यासाठीं योग्य, परिणामकारक व घटनांतर्गत संरक्षक बंधनें निर्माण केलीं जावींत."

**अभ्यास** :—वर दिलेल्या मुस्लिम लीगच्या ठरावांत पाकिस्तान हा शब्द नसला तरी ती कल्पना कशी व्यक्त झालेली आहे हें बारकाईनें पाहा व आतां झालेल्या घटनेवरून ती स्पष्ट करा.

---

भाग ५ वा

# स्वतंत्र भारत

## १ : : : ‘ स्वातंत्र्यप्राप्तीच्या क्षणीं ’

[ शुक्रवार, तारीख १३ डिसेंबर १९४६ रोजीं भारतीय घटना समितीच्या अधिवेशनांत ‘ हिंदुस्थानचें राजकीय ध्येय ’ नमूद करणारा ठराव स्वीकृत झाला. त्यांत ‘ हिंदुस्थान हें स्वायत्त व सार्वभौम लोकराज्य आहे अशी ही घटनासमिति निश्चयपूर्वक व गंभीर घोषणा करीत आहे’, असें कलम प्रारंभींच आहे. या कलमाखेरीज घटना-समितीच्या या उद्देशनिदर्शक ठरावांत आणखी सात कलमें आहेत. हा ठराव मांडतांना आपल्या देशाचे पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं पुढील अर्थगर्भ भाषण केलें—कॉन्स्टिटयुअन्ट ॲसेम्ब्ली डिबेटस्, सरकारी अहवाल, खंड १ ला, अं. ५ वा–पृष्ठ ५८–५९]

“ मित्रहो ! या महत्त्वाच्या प्रसंगीं मी आपणासमोर उभा असतांना माझें चित्त विविध घटना नजरेसमोर येऊन भारावून गेलें आहे. आपल्या इतिहासांतील एक कालखंड संपला व लवकरच आपण नव्या युगास सुरुवात करूं. या वेळीं मला हिंदुस्थानचा गेल्या ५००० वर्षांचा भव्य भूत-काळ आठवतो. भारताच्या जीवनास सुरुवात होऊन आज ५००० वर्षें झालीं. अखिल मानव जातीच्या इतिहासाचा प्रारंभहि याहून फारसा अधिक जुना नाहीं. तेव्हांपासून आजपर्यंतचा काळ ! या विस्तृत कालांतील विविध घडामोडींनीं माझें चित्त या क्षणीं व्याप्त झालें आहे. या आठवणींत एक प्रकारची मादक उत्तेजकता आहे व त्याबरोबर त्या आठवणीमुळें माझें चित्त कांहींसें अस्वस्थहि होत आहे. भारताच्या भव्य भूतकालाला शोभून दिसण्यास मी पात्र आहे कां ? असा प्रश्न मनांत येतो. त्याबरोबरच माझी भविष्यकालाकडे नजर जाते. हा भविष्यकाल माझ्या मतें उज्ज्वलतर असाच आहे. भव्य भूतकाल आणि भव्यतर भविष्यकाल या दोहोंच्या मध्यें तरवारी-

च्या धारेप्रमाणें तळपणाऱ्या वर्तमानाच्या कांठावर मी उभा असतांना माझें मन किंचित् साशंक होतें व पुढें असलेल्या कठीण जबाबदारीच्या जाणिवेनें माझें मन भारावून जातें. भारताच्या इतिहासांत आपण एका विशिष्ट क्षणा-पर्यंत येऊन पोहोंचलों आहों. जुन्यांतून नव्या युगाचा उदय होत आहे. या संक्रमणाच्या क्षणांत खरोखरच कांहीं जादू आहे कीं काय तें मला माहीत नाहीं, परंतु मला मात्र ती भासते. रात्रीच्या अंधःकारांतून जेव्हां दिवसाचा उजेड प्रकाशमान होतो तेव्हां ज्या प्रकारचा अतर्क्य आनंद होतो व सृष्टीच्या अतर्क्य जादूगिरींत मन रममाण होतें तशा प्रकारच्या आंनदांत माझें चित्त गुंतून राहिलें आहे. हा उगवणारा दिवस कदाचित् अभ्रपटलांनीं व्याप्त असेल, परंतु कांहीं झालें तरी दिवस तो दिवसच. एकदां आकाश निरभ्र झालें, कीं आपणांस सूर्यदर्शन होणारच ! ”

**अभ्यास** :--पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या काळोख व सूर्यदर्शन संबंधींच्या अलंकारपूर्ण दृष्टांताचें संपूर्ण स्पष्टीकरण करा.

---

## २ : : : भारतसंघांत संस्थानांचा प्रवेश

( ५ जुलै १९४७)

[ १५ ऑगस्ट १९४७ ला आपला देश द्विखंड होऊन स्वतंत्र झाला. पाकिस्तान सोडून राहिलेल्या हिंदुस्थानमध्यें ५६५ देशी संस्थानें होतीं. मूळच्या हिंदुस्थान देशाचा ४५ टक्के प्रदेश संस्था-नांत होता. एकूण लोकसंख्येपैकीं २४ टक्के म्हणजे ९ कोटी ३२ लक्ष लोक या भागांत रहात होते. आपल्या देशांत असलेल्या ५६५ संस्थानांपैकीं ५५० संस्थानें एका वर्षाच्या अवधींत हिंदुस्थान सरकारनें भारतसंघांत समाविष्ट केलीं. अद्यापहि हें कार्य चालू आहे. कांहीं संस्थानें हिंदी संघांत पूर्णपणें विलीन झालीं, कांहींनीं आपले संघ करून व कांहींनीं पृथक्पणें हिंदी संघराज्याकडे संरक्षण, परकीय संबंध आणि दळणवळण हीं खातीं दिलीं. संस्थानी संघांत किंवा पृथक् गटांत लोकप्रतिनिधींच्या हातांत सत्ता देण्यांत येऊं लागली

२ ]

आहे. ३ जून १९४७ च्या घोषणेनें ब्रिटिशांनीं असें जाहीर केलें कीं, हिंदी स्वातंत्र्याच्या बरोबरच संस्थानिक आणि ब्रिटिश सम्राट् यांच्यांत झालेले करारमदार रद्द झाले; त्यांनीं आपले संघ स्थापावे, किंवा नजीकच्या हिंद अगर पाकिस्तानमध्यें सामील व्हावें. त्रावण-कोर व हैद्राबाद संस्थानांनीं स्वतंत्र राहण्याचा यत्न केला, पण तो व्यवहारांत अशक्य असल्याचा अनुभव त्यांना आला. हिंद सर-कारनें आपलें धोरण ५ जुलै १९४७ ला जाहीर केलें. संस्थानी खात्याचे मंत्री श्री. सरदार वल्लभभाई पटेल यांनीं ही घोषणा केली. त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे. --गव्हर्मेंट ऑफ् इंडिया व्हाइट पेपर ऑन् इंडियन स्टेटस् पृ. ४७ व ४८. याच अनुरोधानें लॉर्ड रीडिंग यांनीं निजामला पाठविलेलें पत्र (उतारा क्रमांक ५३, पृ. ३५०) वाचावा. ]

इतिहासाचा धडा आपणांस ठाऊकच आहे कीं, या देशांत अनेक सत्ता-धीशांचें अस्तित्व आणि बाहेरील स्वाऱ्यास एकदिलानें तोंड देण्याची असमर्थतता यामुळेंच एका मागून एक येणाऱ्या स्वाऱ्यांना हिंदुस्थान बळी पडला ! आपले अंतर्गत झगडे, प्राणघातक कलह आणि विद्वेष यामुळें आपली अधोगति झाली व अनेक वेळा परक्यांच्या ताब्यांत आपण गेलों. आपण स्वातंत्र्याच्या उंबरठ्यावर आहोंत. मागील चुका करणें किंवा त्या सांपळ्यांत पुनः आपण सांपडणें आपल्याला परवडणार नाहीं. ......संस्था-नांच्या व हिंददेशाच्या सुरक्षिततेसाठीं वेगवेगळ्या भागांत ऐक्य व सहकार्य यांची जरूरी आहे.

ब्रिटिशांनीं राज्य स्थापिलें तेव्हां त्यांनीं सत्ताधीशांच्या श्रेष्ठतेचा सिद्धांत (Doctrine of Paramountcy) मांडला......त्याचा पूर्ण अर्थ कधींच स्पष्ट झाला नाहीं. पण व्यवहारांत मात्र सहकार्यापेक्षां दास्यत्वाचा अधिक अनुभव आला......आतां ब्रिटिश राज्य संपुष्टांत येत आहे. म्हणून संस्था-नांनीं स्वातंत्र्य परत मिळवावें अशी मागणी केली जात आहे. .....पण भारताच्या सार्वजनिक हितसंबंधाला बाधक होणारें किंवा अंतिम लोक-सत्तेच्या हितविरोधी धोरण स्वीकारण्याची संस्थानिकांची इच्छा आहे असें मला वाटत नाहीं, व ही गोष्ट बहुतेक संस्थानें संघराज्यांत घटना समितींत आलीं आहेत यामुळें स्पष्ट होत आहे. अजून ज्यांनीं सामीलनामा स्वीकारला

[ २

नाहीं त्यांनीं तो स्वीकरावा अशी आमची विनंती आहे. संरक्षण, परराष्ट्रीय व्यवहार आणि दळणवळण हीं खातीं त्यांनीं संघसरकारकडे द्यावी एवढेंच आमचें म्हणणें.

हा देश व त्यांतील संस्था हाच येथील रहिवाशी लोकांना परंपरागत मिळालेला वारसा होय. या देशांतील कांहीं लोक संस्थानांत आणि कांहीं ब्रिटिश हिंदुस्थानांत आहेत हा योगायोग आहे. आपण सर्व याच देशाच्या स्वभाव-वैशिष्टयाचे व संस्कृतीचे भागीदार आहों. सर्वांचें हित एकच आहे. एवढेंच नव्हे तर, आपण रक्तानें आणि भावनेनें एकच आहों. ......म्हणून मी असें सुचवितों कीं आपण परके आहों असें मानून तहनामे करण्यापेक्षां एकत्र बसून मित्र या नात्यानें (सर्वांसाठीं) कायदे करणें इष्ट होय.

सर्वांच्या समान यत्नानें आपण आपल्या देशाला नव्या वैभवास नेऊं शकूं. आपणांत एकोपा नसेल तर नवीन संकटें आपल्यावर ओढवून घेऊं ही गोष्ट भारतीय संस्थानिक लक्षांत घेतील अशी मला आशा आहे.

**अभ्यास** :—१. देशाची आधिसत्ता कोणाची आहे, असें संस्थानिकांना संस्थानी मंत्र्यांनीं सांगितलें ? २. संस्थानी प्रजा व संस्थानेतर प्रजा यांत हितविरोध आहे काय ? असल्यास कसा व नसल्यास कां नाहीं तें स्पष्ट करा. ३. वल्लभभाईनीं दिलेला इतिहासाचा इषारा उदाहरणांनीं सिद्ध करा.

---

# ३ : : : कॉमनवेल्थमध्यें राहण्याची घोषणा

(२७ एप्रिल १९४९)

[ हिंदुस्थानचे मुख्य प्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं हिंदुस्थानांत लोकराज्य स्थापन झाल्यावरहि हिंदुस्थान हा कॉमनवेल्थचा समान दर्जाचा सभासद राहील असें इंग्लंडमध्यें जाहीर केलें. ते म्हणाले : "हिंदी लोकांच्या राजकीय आकांक्षा तृप्त व्हाव्या यासाठीं हिंदुस्थानांत सार्वभौम लोकराज्य स्थापन होणें आवश्यक आहे. परंतु हिंदुस्थानला कॉमनवेल्थचें सभासदत्व सोडून जाण्याची इच्छा नाहीं" यासंबंधींच्या सरकारी ठरावाचा सारांश प्रसिद्ध झाला आहे. टाइम्स ऑफ इंडिया, ता. २८ एप्रिल १९४९ पृ. १ कॉ. १ व ३]
४]

या सर्वसंमत कराराचें सार हेंच कीं हिंदुस्थानांत लोकराज्य स्थापन झाल्यावरहि हिंदुस्थान राजमुगुटास कॉमनवेल्थ संघाच्या ऐक्यतेचें प्रतीक म्हणून मान्यता देईल; परंतु हिंदुस्थान हें स्वतंत्र लोकशाही राज्य राहील. राजा हा हिंदुस्थानचा राजा असणार नाहीं. हिंदुस्थानचा लोकनियुक्त अध्यक्ष हा हिंदुस्थानचा राजकीय प्रमुख म्हणून सर्व प्रकारचे अंतर्गत व परराष्ट्रीय व्यवहार स्वतःच्या मुखत्यारीनें पाहील. परंतु हिंदुस्थान हा कॉमनवेल्थचा सभासद असल्यानें राजाला कॉमनवेल्थच्या ऐक्यतेचें प्रतीक म्हणून दर्जा राहील. याचा अर्थ राजाला कॉमनवेल्थच्या घटनेंत दोन प्रकारचें स्थान आहे (१) कॉमनवेल्थसंघाच्या ऐक्यतेचें प्रतीक म्हणून व (२) हिंदुस्थान वगळून ज्या कॉमनवेल्थच्या देशांनीं त्याला राजा म्हणून मान्यता दिली त्यांचा राजकीय प्रमुख असा राजा म्हणून. हिंदुस्थान हें सार्वभौम लोकराज्य झाल्यावरहि हिंदुस्थानला कॉमनवेल्थमध्यें समान दर्जावर ठेवण्यास कॉमनवेल्थनें मान्यता दिलेली आहे व त्या सभासदत्वाच्या सर्व सवलती मिळण्यास हिंदुस्थान पात्र आहे.

ही वरील घटना तपशीलवार स्पष्ट करून सांगणारा असा एक खलिता कॉमनवेल्थच्या सभासद राष्ट्रप्रमुखांनीं आपल्या सहीनिशीं प्रसिद्ध केला आहे.

**प्रश्न** :—हिंदुस्थान हा कॉमनवेल्थचा सभासद राहिल्यानें हिंदुस्थानच्या सार्वभौमत्वास 'तात्त्विक नसल्या तरी' प्रत्यक्ष स्थितींत कांहीं मर्यादा उत्पन्न होतात कीं नाहीं ह्याचें विवेचन करा.

---

# ४ : : : देशांतील दुफळीचा शेवट

## सरदार पटेल यांचें भाषण

[ब्रिटिश राजवटींत मुसलमान, शीख, ख्रिस्ती, अँग्लोइंडियन, हरिजन इ. जमातींना स्वतंत्र मतदार संघांतून कायदेमंडळांत प्रतिनिधित्व होतें. यालाच विभक्त मतदारसंघाची पद्धति म्हणतात. स्वातंत्र्यकालांत हीच पद्धति चालू ठेवावी किंवा काय योजना करावी या प्रश्नांचा विचार करण्यासाठीं घटनासमितीनें एक उपसमिति नेमलेली आहे. या समितीनें मुसलमान, ख्रिस्ती, शीख इत्यादींच्या बाबतींतील ही स्वतंत्र मतदार-

पद्धति बंद करण्याचें ठरविलें. मात्र हिंदु व शीखांतील वर्गीकृतांना (शेड्यूल्डकास्ट–साधारणतः हरिजनांना) त्यांच्या लोकसंख्येनुसार १० वर्षेंपर्यंत कायदेमंडळांत जागा द्याव्या अशी शिफारस केली. या उप समितीचे अध्यक्ष श्री. सरदार पटेल हे आहेत. त्यांनीं या शिफारशी घटना समिती-पुढें मांडतांना जें भाषण केलें त्यांतील कांहीं भाग पुढें दिला आहे. इंडियन इन्फरमेशन, १५ जून १९४९, पृष्ठ ५५८]

"....आज आमचा उद्देश असा आहे कीं—(माझ्या मतें या सभा-मंडळाचा उद्देशहि असा असावा कीं)—शक्य तितक्या लवकर व शक्य त्या द्रुतगतीनें ही राजकीय क्षेत्रांतील जातवारी व भेदाभेद नाहींसे करून सर्वांचा दर्जा समान करावा. ही (हरिजनांसाठीं राखीव जागांची) पद्धतीदेखील तात्पुरती म्हणून आपण स्वीकारीत आहों. बहुसंख्य जमातीनें आपल्या औदार्यानें अल्प-संख्यांकांत विश्वास उत्पन्न करावा व अल्पसंख्याकांनींहि भूतकाळ विसरावा. परकीयांनीं त्यांच्या दृष्टीनें पक्षपातीपणाचा आरोप टळावा म्हणून जमाती–जमातीमध्यें समतोलपणा ठेवण्यासाठीं जें केलें त्यामुळें या देशाला किती संकटें सोसावीं लागलीं याचा अल्पसंख्यांकांनीं एकवार नीट विचार करायला हवा.....स्वतंत्र भारताचा पाया घालण्याची जबाबदारी दोघांवर बहुसंख्यांकांवर आणि अल्पसंख्यांकांवरहि—बहुसंख्यांकांवर विशेषरूपानें—आहे. त्यांनीं समय-प्रसंग ओळखून असें वातावरण निर्माण करावें कीं त्यामुळें ही विषमता शीघ्रत्वानें नष्ट होईल......

"सर्वांच्या चिरंतन कल्याणाच्या दृष्टीनें ही कल्पनाच आपण विसरली पाहिजे कीं या देशात कोणी बहुसंख्य आहेत किंवा कोणी अल्पसंख्य आहेत. भारतांत केवळ एकच जमात (ऐका, ऐका) म्हणजे एकच राष्ट्र आहे.

"याप्रमाणें विचार प्रदर्शित करून मी उपसमितीच्या शिफारशी आपल्यापुढें मांडतों."

**अभ्यास :—** १–ब्रिटिश अमलांतील उतारे, ५४ स्वतंत्र मतदार-संघाचा उगम व ६२ पाकिस्तानचा उदय–हे वाचा. २–'स्वतंत्र मतदारसंघाचे परिणाम' यावर २० ओळी लिहा.

---

# सूचि

[ तयार करणार श्री. भा. वि. भावे ]

---

